विशेष बातम्या

# नोबेल शांति पुरस्कार

टमोर हे इण्डोनेशिया जवळचे एक लहानसे बेट. हे बेट अजूनही अशांत आहे. तरीही येथील रहिवासी स्वातंत्र्य प्राप्तीसाठी लढा आलेले आहेत. येथे शान्तता प्रस्थापित करण्यासाठी अहिंसा मार्गाचा अवलंब करीत ते आपल्या ध्येयाकडे वाटचाल करत आहेत. याबद्दल येथील दोन नेत्यांना या वर्षाचा नोबेल पुरस्कार दिला जाणार असल्याची घोषणा झालेली आहे. टमोरचे बिशप कार्लिस फिलिप बेलो हे प्रवासी जीवन जगत असले तरी या बेटाच्या स्वातंत्र्यासाठी अथक प्रयत्न करत आहेत. जोस रोमोस होर्ता हे पूर्वटमोरचे सर्वमान्य नेता आहेत. या दोन नेत्यांनाच हा शान्ति-पुरस्कार दिला जाणार आहे.

जवळजवळ गेल्या पाचशे वर्षापासून पूर्वटमोर पोर्तुगीजांच्या आहे. दुसऱ्या महायुद्धानंतर जगातील वसाहत-पद्धतीचा विनाश होऊ लागला. तेंव्हापासून टमोरची प्रजाही आपल्या स्वातंत्र्यासाठी लढू लागली. या लढाईने १९७५ पर्यन्त चांगलेच तीव्र रूप धारण केले. सत्तांतराची कोणत्याही प्रकारची व्यवस्था न करताच पोर्तुगीज शासकांनी अचानक हे बेट सोडून जाण्याचा निर्णय घेतला. स्वातन्त्र्य लढ्यात मग्न असलेल्या 'फ्रिटेलिन' ने राजधानी डिली येथून स्वतन्त्रतेची घोषणा केली. परन्तु इण्डोनेशियाने पूर्वटमोरला 'स्वतन्त्र देश' म्हणून मान्यता देण्यास नकार दिला. फ्रिटेलिन् विरुद्ध लढण्यासाठी त्यांनी आपले सैन्य पाठवले. त्यावेळी जी लढाई झाली, त्यात टमोरची जवळजवळ २,००,००० प्रजा मरून गेली. १९७६ च्या जुलैमधे इण्डोनेशियाने त्या बेटाला आपले २७ वे राज्य बनवले.

तरीही, अजूनपर्यन्त संयुक्त राष्ट्र संघाने पूर्व-टमोर चा 'इण्डोनेशियात सामावलेले राज्य' म्हणून स्वीकार केलेला नाही; तशी मान्यता दिली नाही.

१२ नोव्हेंबर १९९१ रोजी राजधानी डिली मधे मानवी हक्कांशी संबंधित एका कार्यकर्त्याच्या मृत्यूबद्दल एक शोकसभा घेतली गेली. या सभेला जवळजवळ तीन हजार लोक उपस्थित राहिले. त्यांच्यावर इण्डोनेशियाच्या सैन्याने गोळीबार केला. त्यात पन्नासपेक्षाही अधिक लोक मृत्यु पावले. यानन्तर फ्रिटेलिनचे नेता सनाना गुस्मावो यांना कारागृहात टाकले गेले. अजूनही त्यांची मुक्ती झालेली नाही.

टमोरेचे नेता रेमोस होर्ता यांनी १९७५ मधे देश सोडला व ते स्वच्छन्द प्रवास-जीवन व्यतीत करू लागले; देशाबाहेर राहून देशाच्या स्वातन्त्र्यासाठी कायम हालचाल करीत राहिले. संयुक्त राष्ट्र-संघात ते अनेक वर्षे पूर्व टमोरचे अनधिकृत प्रतिनिधी म्हणून राहिले. संयुक्त राष्ट्र-संघाने आपल्या देशाला केवळ 'ऑब्झर्व्हर' म्हणूनही मान्यता न दिल्याने ते न्यूयॉर्क सोडून देऊन ऑस्ट्रेलियात राहू लागले. तेंव्हापासून ते तेथे पूर्वटमोरचे प्रतिनिधी म्हणून रहात आहेत.

इण्डोनेशिया हा जगातला सर्वात मोठा मुस्लिम देश होय. पूर्वटमोरची जवळजवळ ८० टक्के प्रजा ख्रिश्चन धर्मीय आहे. १९८३ मधे बिशप बेलो तेथे गेले व त्यांनी आन्दोलनाला प्रारंभ केला. त्यांनी संयुक्त राष्ट्रसंघाला पत्राने कळवले की इण्डोनेशिया त्या बेटातून जेव्हा माघार घेईल, तेंव्हा जनतेचा कौल विचारात घेतला जावा. त्यांच्याकडून काही उत्तर मिळण्यापूर्वीच बिशपच्या म्हणण्याचे समर्थन करणाऱ्यांना इण्डोनेशियन अधिकाऱ्यांनी कारागृहात कोंबले. त्या दिवसापासून टमोरमधून बिशप बेलो व विदेशात राहून रोमोस होर्ता हे पूर्व टमोरच्या स्वातन्त्र्यासाठी लढत आहेत व शान्तिपूर्ण बदलासाठी प्रयत्नशील राहिले आहेत. त्यांची निस्वार्थ कृति लक्षात घेऊन त्यांना गौरवपूर्ण नोबेल पारितोषिक दिले जात आहे.







# विष्णुभट्ट विरचित

चन्दनपुरचा दरबार अगदी लहानसा असला तरी राजा कमलचन्द्र कवि-पंडितांचा खूप आदर-सत्कार करी. त्याने खूप कीर्तिही मिळवली. युवक मुरलीनाथ दरबारच्या मोठ्या कवींपैकी एक. आपले काव्य व वाक्चातुर्य यांच्या साह्याने तो राजा कमलचन्द्रचा प्रिय-पात्र बनला. इतका, की तो राजाचा अगदी निकटवर्ती व्यक्ती बनला. इतर कवि त्यामुळे मुरलीनाथचा द्वेष करीत. मुख्यत: वय व अनुभव अधिक असणारे त्यांच्यापैकी दोघे-तिघे त्याचा भारीच हेवा करीत.

मुरलीनाथचा नुकताच विवाह होऊन त्याने गृहस्थजीवन सुरू केले होते. चन्दनपुरपासून सहा कोसावरील गौरीपुरमधे रामचन्द्र नावाचा एक पंडित रहात असे. या रामचन्द्रनेच आपली गोदादेवी ही एकुलती एक कन्या मुरलीनाथला दिली होती.

थोड्याच दिवसात गोदादेवीने आपल्या पतीचा-मुरलीनाथचा खोलवर स्वभाव ओळखला, तेंव्हा तिला मोठे आश्चर्य वाटले. मुरलीनाथ भावनाप्रधान व अगदी पट्टीचा कवि असला, तरी स्त्रियांबद्दलचा त्याचा दृष्टिकोण हीनच होता. स्वभाव पुरा ओळखण्यापूर्वी तिने एक-दोनदा नवऱ्याच्या काव्य-रचनेत दखल दिली होती. पण मुरलीनाथने याबद्दल रागावून तिला त्या खोलीतून बाहेर हाकलले होते.

असेच दिवस जात राहिले. धनुर्मास सुरू झाला, तेव्हा गोदादेवीचा पिता तिला माहेरपणासाठी न्यायला आला; कारण हा अुत्सव त्याच्या घरी मोठ्या प्रमाणावर साजरा होई. सासऱ्याचे आमन्त्रण स्वीकारत मुरलीनाथ म्हणाला, ''आपण कन्येला बरोबर घेऊन जा. मी ऐन अुत्सवाच्या वेळी तेथे हजर राहीन.''

सुषमा मराठे



गोदादेवी आनन्दाने पित्याबरोबर माहेरी निघून गेली.

गोदादेवी गेल्यानन्तर तीन दिवसांनी नेहमीप्रमाणे दरबारात कवितागायनाचा कार्यक्रम चालू होता. मुरलीनाथ निसर्गसौन्दर्याबद्दलची कविता वाचत असताना अचानक राजा कमलचंन्द्रने त्याला थांबवले. तो म्हणाला, ''युवकवि, परिचय झाल्यापासून मी आपल्या कविता लक्षपूर्वक अैकत असतो. आपण नेहमीच निसर्गाबद्दलच्या कविता रचता; परन्तु त्या भगवन्ताचा साक्षात् प्रतिनिधी जो मी, या भूमीचा शासक, त्याची प्रशंसा आपण कधीच करीत नाही! हा निसर्ग व त्यातील प्राणीमात्र-यांना शांत ठेवणं, त्यांचा तोल राखणं ही जबाबदारी राजाचीच ना! त्यासाठी त्याला खूप श्रम करावे लागतात. त्याचा आपण कधी अुल्लेखही करत नाही! तेंव्हा आम्हा राजवंशीयाना असं डावलण्याचा काही सबल कारण असेल तर सांगा ना!''

अनपेक्षितपणे राजाकडून असा प्रश्न आल्याने मुरलीनाथ अवाकच झाला! प्रयत्न करूनही बिचाऱ्याला काही अुत्तर सुचेना! याचे खरे कारण होते- त्याचाच अंतरात्मा.

मुरलीनाथ केवळ धनार्जनासाठीच राजाच्या सेवेत रहात होता. राजेलोकांबद्दल मनातल्या मनात कुठेतरी त्याला आकस होता. मनोमन त्याला खात्री वाटे की - राजेलोकांनी कितीही



आदर अभिमान दाखवला, तरी त्यांचा आत्मा अहंकारपूर्णच असतो.

मुरलीनाथचा प्रगाढ विश्वास होता की, शरण आलेल्या शत्रूला क्षमा करण्याची खरी ताकद केवळ त्या एका भगवंतातच आहे! यामुळेच तो फक्त भगवन्त व त्याच्या सृजित सृष्टीबद्दलच्याच कविता रचत असे.

मनोमन घबराट झालेला मुरलीनाथ जेंव्हा कामलचन्द्रला अुत्तर देईना, तेंव्हा वयोवृद्ध कवि गंगभट्ट हळूच व्यंगभरल्या आवाजात म्हणाला, ''महाराज, इतक्या साध्या प्रश्नाचं अुत्तर मुरलीनाथकडून न येण्याचं इतकंच कारण असू शकतं की- राजांबद्दल याच्या मनात मुळीही सद्भाव नाही. त्यांच्याबद्दल तो अुदासीन असतो.''



गंगभट्टचे बोलणे ऐकताच राजाच्या चेहऱ्यावर आवेश व आग्रह दिसू लागला. कडवटपणे तो म्हणाला, ''युवकवि, अुदरनिर्वाहासाठी असं मन मारून रहाण्याची काही गरज नाही. अुद्यापासून आपणाला आवश्यक इतकं तीन वेळचं भोजन व इतर सोयींची व्यवस्था दरबारकडून केली जाईल. आपण आरामात आपल्या घरीच राहून आपल्या आवडीची काव्यरचना करत रहावे.''

असे बोलून राजा कमलचन्द्रने तर भर दरबारात मुरलीनाथचा घोर अपमानच केला. त्याला तो सहन होईना! पण करणार काय? त्यावेळी राजाला स्वतःकडून काहीही स्पष्टीकरण न देता तो केवळ नमस्कार करून व मस्तक खाली घालून दरबारातून निघून गेला.

त्या क्षणापासून मुरलीनाथ चुकल्या-चुकल्यासारखा राहू लागला. रात्रीची त्याची झोपही अुडाली.

राजभवनातून तीनही वेळा भोजन येअू लागले; पण मुरलीनाथला ते विषसमान वाटे! निद्रा-आहार नसल्याने व मानसिक दुःखामुळे तो एखाद्या आजाऱ्यासारखा दिसू लागला, अस्थिपंजर होअून गेला.

अशा स्थितीत मुरलीनाथ एके दिवशी सकाळीच घराबाहेर पडला आणि दिशाहीनासारखा पायी चालत राहिला. गावची सरहद्द ओलांडल्यावर भेलकांडून तो एका झाडाखाली बसला. आसपास फळांच्या बागा होत्या; मधून लहानसा नाला वहात होता. झाडाझुडुपांमधून हलकासा सुगंधित वारा वहात होता! या आल्हाददायक वातावरणामुळे त्याच्या मनातला अुद्वेग काहीसा कमी झाला! राजाच्या अपमानकारक बोलण्याने नीरस झालेल्या त्याच्या मनात आत्मविश्वास जागृत होअू लागला . पण नवोत्साह संचारू लागल्यानंतरही 'कमलचन्द्रची मर्जी पुन्हा कशी संपादन करावी' याबद्दलचे विचार मात्र त्याच्या मनात येईनात.

इतक्यात एका तरुणाने तेथे येअून त्याला प्रणाम केला. मुरलीनाथने त्याची 'तो कोण?' म्हणून चौकशी केली.

युवक हसत अुत्तरला, ''मला विष्णुभट्ट म्हणतात. आमचं घर गोदादेवीच्या घराजवळच आहे. मी आपणाला लग्नात पाहिलं होतं.''



मुरलीनाथ डोके हलवून गप्पच राहिला, ''मी असं ऐकलं की धनुर्मास अुत्सवात आपलं काव्य-गायन होणार आहे. गोदाताईकडून मला हे कळल्यावर मला रहावेना अन् राजस्तानातून मी निघून आलो. पण आत्ता, यावेळी आपण इथं कसे-हेच समजत नाहीय मला!'' युवकाने आश्चर्य व्यक्त केले.

काय अुत्तर द्यावे, हे मुरलीनाथलाही कळेना. विष्णुभट्टने पुन्हा विचारले, ''आपण बरेच अस्वस्थ वाटताय. अशी काही घटना घडली का, कि ज्यामुळे आपण इतके अस्वस्थ अन् कमजोर दिसताय?''

विष्णुभट्टची आदरभावना पाहून त्याला सर्वकाही सांगून टाकावेसे मुरलीनाथला वाटले. सांगावे तर लागणारच-कारण विष्णुभट्ट त्याचे काव्य ऐकण्यासाठीच तर आला होता ना?

मुरलीनाथकडून सविस्तर ऐकल्यावर विष्णुभट्ट मन्द हसत म्हणाला, ''आपली अडचण सोडवण्याचा एक अुपाय आहे माझ्या जवळ.''

''सांग बरं कोणता ते?'' मुरलीनाथने अुत्सुकता दर्शवली.

''प्रथम राजांबद्दलचा असलेला आपला दृष्टिकोण बदलून टाका. जेंव्हा कोणी 'राजा' म्हणून जन्म घेतो, तेंव्हा त्याच्यात थोडा 'राज-दर्प' असणं साहजिक आहे की नाही? तरी इतिहासात असेही बरेच राजे आहेत, की ज्यांनी पंडित कवि इ.ची कदर केली



आहे; अुच्चासनावर बसवून आपणासारख्या सरस्वती-पुत्रांचे पाय धुतले आहेत त्यांनी! कवि-पंडितांना त्यांनी साक्षात् शारदा मानलं; पालखीत बसवून स्वतः खांदा दिला! हे सत्य तर आपल्याला विदितच आहे नं?'' विष्णुभट्ट मोठ्या गंभीर स्वरात बोलला.

त्याच्या बोलण्यातले सत्य मुरलीनाथने मान्य केले. आत्मपरिक्षण करता करता काहीशा शरमेने त्याचे मस्तकही झुकले.

मुरलीनाथमधील हे परिवर्तन पाहून विष्णुभट्टने मृदु आवाजात त्याला एक भावपूर्ण शीघ्रकाव्य ऐकवले. त्या काव्याचा अर्थ असा - यमुनेच्या रेताड वेदिकेवर बसून मुरलीधर मधुर बासरी वाजवत होता. त्यामुळे नादमुग्ध झालेले



यमुनेचे पाणी आनंदाने, अुत्साहाने जास्तच फुगून प्रवाहित होअू लागले. परन्तु किनाऱ्यावरच्या वेळूच्या बनातले काही वेळू मात्र मुरलीचा मधुर नाद ऐकून ईर्ष्येने जळू लागले. मुरली त्यांच्याच जातीच्या बांबूपासून बनलेली असते नं! त्या वेळूंना वाटू लागले की या मुरलीनादात अडथळा आणावा अन् यमुनेचे मन आपल्याकडे वळवावे. या वेड्या इच्छेने ते मागे-पुढे डोलू लागले. त्यामुळे त्यांच्यावर खूपच रागावली. पण ती त्यांच्या ईर्ष्याळु स्वभावाला अन् निर्बुद्धपणाला हसू लागली. वेळूंनी केलेल्या या आगा-पिछा नसलेल्या बेसुऱ्या, तालहीन नादाच्या पार्श्वभूमीवर तिला मुरलीधराचे मुरलीगान अधिकच सुरेल अन् मधुर वाटले. यामुळे तिचा आनन्द अधिकच वाढून तिचे पाणी फुगून मुरलीधराकडे पोचण्यासाठी ओढ घेअू लागले. यमुना नदीप्रमाणेच गंभीर मनाच्या त्या कमलचन्द्र भूपतीकडे मुरलीधर नेहमी प्रेमदृष्टिने पाहत राहो!''

विष्णुभट्टची ही कविता ऐकून मुरलीनाथने टाळ्या वाजवल्या तो अुद्गारला, ''शाबास विष्णुभट्ट! माझ्या मनातल्या एका कोपऱ्यात पक्की धारणा होती की, माझ्यासारखा निसर्गवर्णन करणारा दुसरा कोणी नाहीच, पण माझा तो गर्व पार जमीनदोस्त झाला! आजपासून माझ्या निसर्गवर्णनाचं काही स्थानच नाही! फारच सुंदर शैलीत तुम्ही आपले भाव व्यक्त केलेत! अगदी अद्भुत!'' हसतहसत मुरलीनाथने विष्णुभट्टच्या दंडावर थोपटले आणि त्याची अगदी भरभरून प्रशंसा केली. नम्रतेने मस्तक झुकवत विष्णुभट्ट म्हणाला, ''आपणासाठीच ही कविता जन्मली!''

''ते तर दिसतंच आहे मला! म्हणजे याचा अर्थ असा की माझा द्वेष करणाऱ्या कवींनी राजाचे कान भरले?'' विचार करत मुरलीनाथने प्रश्न केला.

''होय. ताईच म्हणाली होती की गंगभट्ट आदि लोक आपला द्वेष करतात. तसं नसतं, तर भर सभेत आपल्या अपमानाला तो कारण बनला असता? राजाच्या शंकेचं त्यानं समर्थन केलं असतं?'' विष्णुभट्ट अुत्तरला.



''तुम्ही म्हणालात, ते शंभर टक्के खरं! इतक्या साऱ्या कवींनी भरलेल्या दरबारात राजाने माझ्याबद्दल कडू शब्द अुच्चारले, तेंव्हा माझं डोकंच फिरलं! तुम्ही आत्ता ऐकवलेली कविता मी त्यांना ऐकवू? काय विचार आहे तुमचा?'' मुरलीनाथने विचारले.

''हो, हो! जरूर ऐकवा ना! पण आपला वेष बदला अन् राजा एकान्तात असताना त्याला कविता ऐकवा. कवितेच्या शेवटच्या ओळी आपल्या मनात राजाबद्दल कसला द्वेष किंवा अनादर नसल्याचंच दाखवतात. अन् त्याबरोबरच हेही स्पष्ट होतं, की इतर कवि आपणावर जळत असूनही आपण राजाची कृपा, प्रेम व सान्निध्याची अपेक्षा करता.''

विष्णुभट्टच्या या बोलण्याला मुरलीनाथ ताबडतोब मान्यता देईना; तो काहीसा दुग्ध्यात पडला !

ही गोष्ट ओळखून विष्णुभट्ट म्हणाला, ''दाजी ! कुणा 'दुसऱ्या कविची कविता आपलीच' कशी बनवू या विचारांत नका पडू. ती कविता मी आपल्याला ऐकवली ना? माझी ताई गोदादेवी तर आपणाला प्राणप्रिय आहे. आपण माझ्या ताईचा जसा स्वीकार केला तसाच माझ्या या कविता-कन्येचाही करा ना!''

तरीही मुरलीनाथचा अभिमान आड येत होता. इतके सगळे सांगितले, विनवले, समजावले, तरीही मुरलीनाथ कबुली देत नसल्याचे पाहून विष्णुभट्ट बिचारा निराश झाला. आता याला कसे



समजावावे, याचा त्याने क्षणभर विचार केला.

नंतर जरा संकोचत विष्णुभट्टाने आपली पगडी व नाजुक मिसरूड काढून टाकली.

दुसऱ्याच क्षणी गोदादेवीच आपल्या समोर हसत अुभी असून तिचा केशसंभार डोक्यावरून घसरत असल्याचे मुरलीनाथच्या लक्षात आले.

अेकाअेकी त्याच्या मुखातून आश्चर्योद्गार निघाले, ''गोदा, तू?'' हसतच गोदादेवी म्हणाली, ''होय स्वामी! मला समजलं की, दरबारात आपला अपमान होअून मान खाली घालून आपण तेथून निघून गेलात. स्वतःच येअून आपल्याला काही सल्ला द्यावा, तर आपण

तो मानण्यातले नव्हेत! म्हणूनच मी या पुरुषवेषात इथे आले.''

आश्चर्यात बुडलेला मुरलीनाथ हे सर्व मन्त्रमुग्ध होऊन ऐकत होता. काही क्षणांनी भानावर येऊन त्याने नकारदर्शक आपली मान हलवली.

इतके सारे होऊनही आपल्या पतीचा नकार पाहून गोदादेवी ने दुःखाने व आवेगाने विचारले, ''आता का नकार?''

क्षणभर मौन राहिल्यानन्तर मुरलीनाथ म्हणाला, ''बायकोची अवहेलना, राजाबद्दलचा अुदासभाव अन् भर सभेत झालेला अपमान - या तीनही गोष्टी माझ्या मनात खोल रुतल्या आहेत. हे जणू तीन काटेरी वृक्ष तू एकाच बाणाने कापून टाकलेस. आता माझ्यासमोर एकच मार्ग आहे, अन् तो म्हणजे आपला अहंकार त्यागून मनापासून तुझ्यासमोर मस्तक वाकवू! असं केल्यानंतरच मी तुझा कृतज्ञ असल्याचं सिद्ध करू शकेन, तुझं ऋण फेडू शकेन.'' इतके बोलून झाल्यावर अुठून तो आपल्या पत्नीचे पाय धरू लागला.

पतीत झालेल्या आमूलाग्र परिवर्तनामुळे गोदादेवीच्या डोळ्यातून आनन्दाश्रू झरू लागले. त्याला मधेच थांबवत ती म्हणाली, ''नाही, नाही! असं नका करू! आपण माझं म्हणणं मानलंत यातच सर्व काही पोचलं मला !''

यानन्तर काही वेळ पतिपत्नींनी तेथील निसर्गाचा आस्वाद घेतला अन् ते राजधानीत पोचले.

दुसऱ्याच दिवशी बहुरूप्याच्या वेषात मुरलीनाथने राजाची भेट घेतली व त्याला गोदादेवीची कविता ऐकवली. आपल्या प्रयत्नात सफल झालेला मुरलीनाथ पुन्हा एकदा राजाचा प्रीतिपात्र बनला.

काही दिवसांनंतर त्याने राजाला आपल्या पत्नीच्या प्रयत्नाचे विवरण दिले अन् मोठ्या गर्वाने 'आपली पत्नी मोठी विदुषी असल्याचे' सांगितले.

तेव्हापासून त्यानन्तर गोदादेवीच्या सहयोगाने मुरलीनाथने अनेक अुत्तम काव्ये रचली. परन्तु त्या सर्व काव्यांवर त्याने लिहिले - 'विष्णुभट्ट विरचित.'








## १७

(पद्ममुखीने निश्चय करून तशीघोषणा ही केली की, ज्या युवकाला तिच्याशी विवाह करायची इच्छा असेल त्याला आपल्या पतीच्या धनुष्याला दोरी लावता येऊन त्याच्याप्रमाणेच बाराही कुऱ्हाडींच्या मधून बाण सोडून बरोबर लक्ष्यवेध करता आला पाहिजे. वृद्ध भिकाऱ्याच्या वेषात आलेल्या आपल्या पतीला तिने हे सांगून टाकले, कारण ती त्याला ओळखू शकली नाही. दुसऱ्या दिवशी तिने ती अट आपल्या घरी नुसतीच मौज-मजा करणाऱ्या युवकांनाही सांगितली. रूपधरचे धनुष्य-बाण तिने त्यांच्यासमोर ठेवले.) यानन्तर -

**सा**रे राजकुमार व अन्य विवाहेच्छु एक एक करून पुढे येऊन धनुष्याला दोरी लावायचा असफल प्रयत्न करत राहिले. ते पाहून दुर्बुद्धीने कालीला जवळ बोलावून त्याला म्हटले, ''अरे, या धनुष्याला जरा चरबी चोपड अन् नंतर आगीवर शेक.'' कालीने ते कामही केले, परन्तु त्याचा काहीच फायदा झाला नाही. ते दुष्ट ज्यावेळी धनुष्याबद्दलच्या चिंतेत होते व काय करावे हे त्यांना समजत नव्हते, तेव्हा डुकरांचा राखणदार आणि गुराखी बाहेर गेले. रूपधरही बाहेर गेला. त्याने या दोघांना जवळ बोलावून हळू स्वरात म्हटले, ''पहा, मी आता जे सांगेन, ते नीट ऐका. तुमचा मालक रूपधर जर परत आला, तर तुम्ही त्याच्यासाठी कायकाय कराल? हे जे दुष्ट लोक जमलेत, त्यांना विरोध कराल? लढाल त्यांच्याशी? अन् आपल्या मालकाला साथ द्याल? मनात काय असेल ते स्पष्ट सांगून टाका.''

'आपल्या मालकासाठी आपण



प्राणार्पणही करायला तयार आहोत' असे जेंव्हा ते म्हणाले, तेंव्हा रूपधर त्यांना म्हणाला, "मीच रूपधर आहे पहा! मी परत आलो, तर खूश होण्यासारखे तुम्हीच दोघं काय ते इथे आहात. देवकृपेनं मी जर या शत्रूचा नाश करू शकलो, तर मागाल ते इनाम देईन मी तुम्हाला! शेतं देईन, घर देईन रहायला. शंका वाटत असेल माझ्याविषयी, तर हा 'डाग' पहा!" त्याने त्यांना आपल्या पायावरचा तो डाग दाखवला.

आपल्या मालकाला पाहून ते दोघे अतिशयच आनन्दित झाले. "आत्ता आनन्द अन् अश्रूंची वेळ नाहीय. मी आता प्रथम आत जातो. नंतर एक-एक करून तुम्हीही तिथे या. मी धनुष्य मागेन. ते दुष्ट देणार नाहीत ते मला. डुकरांचा राखणदार मला ते आणून देईल. नंतर घरात असणाऱ्या सर्व स्त्रियांना आपापल्या खोलीत जाऊन दरवाजे नीट बन्द करून घ्यायला सांगायला हवं. काही गडबड झाली, तरी बाहेर न निघण्याबद्दल त्यांना निक्षून सांगण्यात यावे. सुखप्राप्ती, तू बाहेर जाऊन मुख्य दरवाजा-सिंहद्वार-बन्द करून घ्यायला हवं !"

नंतर तिघेजण एक-एक करून आत जाऊन आपापल्या स्थानांवर बसले. त्यावेळी विपुलयोद्धा धनुष्यावर आपले बळ आजमावून पहात होता. पण ते वाकवणे त्याला जमत नव्हते. निराशाभरल्या आवाजात तो म्हणू लागला, "किती दुर्भागी आहोत आपण ! विवाहाची गोष्ट सोडून द्या. तो करायचाच असेल, तर इथाकात काय कमी कन्या आहेत? मला दु:ख इतकंच वाटतंय, की रूपधरच्या तुलनेत आपण म्हणजे कोणीच नव्हे! आपल्या या पिढीची ही बलहीनता पाहून पुढली पिढी काय म्हणेल?"

त्याला मधेच अडवत दुर्बुद्धी म्हणाला, "जास्त भावनाप्रधान बनू नकोस. आज पर्व-दिवस आहे. धनुष्याशी आज आपलं काही देणं-घेणं नाही; त्याला आज स्पर्शही नाही करायचा. ठेवून दे ते! त्याचा उपयोग आपण पुन्हा एकाद्या दिवशी करू." हे बोलणे सर्वांना ठीक वाटले. सर्वांचे जेवण उरकल्यावर रूपधर म्हणाला, "हे पहा वीरांनो, आज तुम्हाला धनुष्याचं काही काम नाहीय. जरा मला द्याल ते? मीही जरा पहातो माझ्यात किती शक्ती आहे! माझं बळही म्हातारपणामुळे तसं क्षीणच होत चाललंय."



त्याचे बोलणे ऐकून सर्वजण चिडले. त्यांना भयही वाटले की, 'एकाद्या वेळी हा म्हाताराच हरवील आपणा सर्वांना.' दुर्बुद्धी नाराजीने म्हणाला, "नीच! तुझी बुद्धी भ्रष्ट झाली काय? दारू पिऊन झिंगलास होय? बरीच चढलीय वाटतं? तू खरोखरच धनुष्य वाकवलंस, तर आम्ही तुला जिवन्त सोडू होय?"

"दुर्बुद्धी, हे वृद्ध बाबा माझ्या मुलाचे अतिथी आहेत. त्यांना धनुष्य द्यायला मनाई का करत आहेस? तुला भीती पडलीय का, कि ते धनुष्य वाकवून माझ्याशी विवाहही करतील? तसा त्यांचा उद्देश असेल असं तुला का वाटतं?" पद्ममुखी रागाने बोलली.

"आम्हाला तसली काही भीती नाही वाटत. पण जे धनुष्य आम्ही वाकवून दोरी चढवू शकलो नाही, ते जर या म्हाताऱ्यानं केलं, तर तो आमचा घोर अपमान होईल. हा म्हातारा जर कुऱ्हाडींच्या मधून बरोबर नेम मारू शकला, तर यापेक्षा आणखी आमची मानखंडना ती काय?" विपुलयोद्धा मधेच बोलला.

"आई, तू उगीचच या बोलण्यात गुंतते आहेस. मी जर हे धनुष्य-बाण कुणाला दान म्हणून द्यायचं म्हटलं, तर मला अडवणारा मर्द जन्मलाच नाही कोणी! तू आता जाऊन आपलं काम बघ बरं!" धीरमती निर्भीडतेने बोलला.

त्याचे बोलणे ऐकून पद्ममुखीला आश्चर्यही वाटले, अन् आनंदही झाला. आपला मुलगा समर्थ होत असल्याचे पाहून खुशीने ती आपल्या खोलीत गेली.



इतक्यात धनुष्य उचलून डुकरांचा राखणदार रूपधरकडे जाऊ लागला, आणि सर्वजण ओरडू लागले. ते ऐकून घाबरून त्याने धनुष्य जमिनीवर ठेवले. पण त्याला प्रोत्साहन देत धीरमती म्हणाला, "त्यांच्या बडबडीशी तुला काय करायचंय? आपलं काम निर्भयपणे कर तू!"

राखणदाराने धनुष्य उचलून रूपधरला दिले. अन् स्त्रियांजवळ जाऊन बहुकीर्तीला तो म्हणाला, "छोट्या मालकांची आज्ञा आहे की, सर्व स्त्रियांनी आपापल्या खोलीत जाऊन दरवाजे बंद करून घ्यावे. काही गडबड झाली, तरी त्यांनी बाहेर येऊ नये." हे सर्व काय चाललंय ते न समजले तरी तिने राखणदाराच्या सांगण्याप्रमाणे सारी व्यवस्था केली.



इतक्यात धनुष्य हातात घेऊन रूपधर ते इकडे-तिकडे फिरवून पाहू लागला. सर्वांच्या नजरा त्याच्याकडे लागल्या होत्या. ''असं दिसतंय की याला धनुर्विद्येचं काहीच ज्ञान नाहीय. दोरीच चढवू शकला नाही, तर हा नेम काय मारणार? करूदे त्याला काय करायचंय ते!'' जमलेले लोक निरनिराळी टीका करू लागले.

रूपधरने अगदी सहजपणे दोरी चढवून धनुष्य डाव्या हातात घेऊन उजव्या हाताने टणत्कार केला. खूप छान आवाज निघाला. ते पाहून सर्वजण स्तंभित झाले. एक छानसा बाण भात्यातून काढून रूपधरने नेम धरून तो असा सोडला, की कुऱ्हाडींच्या टोकांमधून जाऊन त्याने अगदी बरोबर आपले लक्ष्य साधले!

नंतर धीरमतीला तो म्हणाला, ''पुत्रा धीरमती, तुझ्या प्रतिष्ठेला मी जरासुद्धा धक्का लावला नाही. तू तर पाहिलंसच की किती सहजपणे मी दोरी लावून नेम मारला. हे तथाकथित मोठे लोक काय म्हणायचं ते म्हणोत! पण आता स्पष्ट झालंय, की माझं बळ जराही क्षीण झालेलं नाहीय. आता या सर्वांच्या रात्रीच्या भोजनाची व्यवस्था कर. नंतर मनोविनोदाचे कार्यक्रम सुरू होतील.'' असे म्हणून त्याने इशारा केला.

धीरमती ताबडतोब एका हातात तलवार अन् दुसऱ्यात बर्छी घेऊन पित्याजवळ येऊन उभा राहिला. रूपधरने अंगावरचे जुने कपडे उतरून फेकून दिले अन् उडी मारून तो चौकटीत उभा राहिला. बाकीचे बाण त्याने आपल्या पावलांजवळ पसरले. ''आता खरा खेळ सुरू होत आहे. मी आणखी एक नेम मारणार आहे. असा नेम आजवर कोणीच मारला नसेल.'' असे म्हणत रूपधरने बाण दुर्बुद्धीवर मारला.

दुर्बुद्धी किंवा इतर कोणाच्या मनातही आले नाही की बाण त्याच्यावरच सोडला जात आहे. त्याचीच शिकार होत आहे! त्या वेळी दुर्बुद्धी एक मोठीशी सुरई दोन्ही हातात उचलून दारू पीत होता. बाण सरळ त्याच्या कंठात घुसून सुरई धडामकन् खाली पडली अन् पाठोपाठ दुर्बुद्धीही कोसळला! दुसऱ्याच क्षणी तेथे हाहाःकार माजला. आपापल्या आसनांवरून उठून हत्यारांसाठी ते इकडे तिकडे पाहू लागले. पण भिंतीवरची हत्यारे गायब होती! ''एका माणसाला मारतोस? दुष्टा, थांब तुला आत्ता सजा दाखवतो.''



सर्वजण ओरडू लागले. अजूनही सत्यगोष्ट त्यांच्या लक्षात आली नाही. योगायोगानेच सर्व घडत असल्याचे त्यांना वाटत होते.

आपल्या भुवया चढवत रूपधर त्यांना म्हणाला, ''कुत्र्यांनो, तुम्हाला वाटत होतं, की मी ट्रॉयहून परत येणारच नाही. अन् तेच साहस धरून तुम्ही माझं घर घेरून बसलात, माझी इस्टेट चरत राहिलात. माझ्या दासी आपल्याशा केल्यात. माझ्या जिवन्तपणीच माझ्या बायकोशी विवाहाची स्वप्नं पाहिलीत! तुम्हाला देवाचीही भीती नाही, मलाही भीत नाही ना तुम्ही? आता यमपाशातून वाचणार नाही तुम्ही कोणी!''

भयाने सर्वांची बोबडी वळली! केवळ एकटा विपुलयोद्धा बोलू लागला, ''तू जर खराच रूपधर असशील, तर तुझं बोलणं बरोबर आहे. आमच्या हातून मोठ्याच चुका झाल्या, अन्याय केला आम्ही. या सर्वाचं मूळ आहे दुर्बुद्धी. तो केवळ तुझ्या बायकोशी विवाह करण्यासाठी नाही आला, तर तो तुझ्या मुलाला - धीरमतीला ठार करायच्या विचारात होता. तुझी सगळी इस्टेट हडपायची होती त्याला. आम्ही तुझी सारी नुकसानभरपाई करून देऊ. जी दारू आम्ही आजवर प्यायलो त्याची किंमतही चुकवू. वर्गणी करून तुझं धन देऊ आम्ही. आमच्यातला प्रत्येकजण तुला बीस बैल देईल.''

''दुष्टांनो, तुम्ही मन मानेल तसं वागलात. त्याची एकच शिक्षा आहे. ती म्हणजे तुमचा जीव. तुमच्यापैकी प्रत्येकाचा जीव घेईन मी. पळायलाही अवसर नाहीय तुम्हाला.'' रूपधर चांगलाच पेटून उठला होता.

विपुलयोद्धा आपल्या अनुयायांना म्हणाला, ''बंधूंनो, हा तर आपल्या जिवावरच उठला



आहे. आता आपापल्या तलवारी अुपसून एकदम सर्वजण हल्ला करू याच्यावर. पाहूया किती जणांना मारू शकेल तो.''

ओरडतच त्याने रूपधरवर तलवार अुगारली. पण दुसऱ्याच क्षणी रूपधरचा बाण त्याच्या छातीत घुसला.

बाकी सर्वजण आता रूपधरवर तुटून पडले. धीरमतीने आपल्या बर्छीने त्यापैकी काहीजणांना यमसदनाला पाठवले. नंतर तो आपल्या पित्याला म्हणाला, ''बाबा, मी तुमच्यासाठी, या राखणदारासाठी अन् पशुपालकासाठीही पट्‌कन हत्यारं घेअून येतो.'' ''बाण संपून जाण्यापूर्वी परत ये.'' रूपधर म्हणाला. धीरमती ढाली, बर्च्या, शिरस्त्राणे वगैरे ठेवलेल्या खोलीत जाअून हत्यारे घेअून लगेच परतला. चारहीजण ती घेअून दरवाजासमोर अुभे राहिले. बाण संपल्यावर धनुष्य खाली ठेवून रूपधरने हाती बर्च्या घेतल्या. तोपर्यन्त काहीजण मेले होते, काही जिवन्त होते. त्याचवेळी कालीने आपल्या मालकांना मदत केली. मागील बाजूने जाअून हत्यारांच्या खोलीतून तो बर्च्या आणि ढाली घेअून आला.

रूपधरच्या लक्षात आले तेंव्हा तो म्हणाला, ''धीरमती, यांना आपल्या दासी मदत करत असाव्यातसं वाटतंय.''

''चूक माझी झाली बाबा! हत्यारं आणताना कुलूप लावायला विसरलो.'' असे म्हणून तो व राखणदार कुलूप लावण्यासाठी धावले. दुसऱ्या वेळी काली खोलीत घुसला तेंव्हा राखणदाराने त्याला पकडले.

यानन्तर दोन्ही पक्षात बर्च्यांनी लढाई सुरू झाली. सौभाग्याने शत्रूच्या एकाही बर्छीने रूपधर किंवा धीरमती जखमी झाले नाहीत. पण या दोघांनी फेकलेल्या बर्च्यांमुळे मात्र बरेचसे शत्रू ठार झाले.

नंतर बर्च्या संपल्यावर त्यांच्यात द्वंद्व-युद्ध सुरू झाले. त्या दिवशी देवतांची कृपा होती रूपधरवर. सर्वचे सर्व शत्रू मरून गेले. दोघांनाच त्यांनी जीवदान दिले, कारण ते अगदीच नालायक होते.

मोठे दालन प्रेतांनी भरले होते. म्हाताऱ्या दासीला बोलावून रूपधर म्हणाला, ''बाकी सर्व दासींना बोलावून खोली धुवून घे अन् नोकरांना हे मुडदे बाहेर न्यायला सांग.''

**(पुढील अंकी समाप्त)**







# भगवान विष्णूंची माया

**ध्रु**व कडक तपस्येत मग्न होता. इन्द्राला त्याची तपस्या भंग करायची होती. त्याने विरुथ नामक एका गन्धर्वाला राक्षसरूपात पाठवले. विरुथ ध्रुवाजवळ आला. एका मुनींने हे पाहून शापवाणी अुच्चारली की, ''तू खरोखरचाच राक्षस बनून रहाशील.''

या शापामुळे विरुथचे देवत्व लोप पावले. शबरी नदीच्या किनाऱ्यावर आपले वास्तव्य बनवून आसपासच्या ऋषि-मुनींना खात राहून तो आपले राक्षस-जीवन व्यतीत करू लागला. पण त्याची दिव्यदृष्टी मात्र अजून त्याच्याकडे शाबूत होती. तीन्ही लोकात कुठे, काय घडत आहे, हे त्याला समजत असे.

शबरी व गोदावरी नदीच्या संगमावर असणाऱ्या आश्रमात काही मुनिजन रहात असत. एके दिवशी मुनिबालक समिधा गोळा करायला आलेले असताना विरुथ तेथे पोचला. त्याला पाहून ती मुले घाबरून पळून गेली. परन्तु भरत नावाचा एक मुलगा मात्र न भिता तेथेच अुभा राहिला.

पळून गेलेल्या मुलांनी भरतच्या पित्याला सांगितले, ''तुमचा भरत राक्षसाहाती सापडला आहे.'' भरतचा बाप राक्षसाला म्हणाला, ''हा माझा एकुलता एक पुत्र आहे. वाटलं तर मला खा, पण याला सोडून दे.''

''ठीक आहे, मी तुला एक संधी देतो. मी अुद्या सकाळी परत येईन. यामधल्या अवधीत आपल्या मुलाला अशा जागी लपव की जी मला ठाअूक असणार नाही.'' विरुथ म्हणाला.

पिता भरतला आपल्या आश्रमात घेअून गेला. त्याने ठरवले की 'मुलाला वाचवण्यासाठी जरूर तर आपले सगळे तपोबलही खर्ची घालायचे.' होम करून त्याने ब्रह्मदेवाची पूजा केली. ब्रह्मदेव साक्षात् प्रकट

**दगडू वाघमारे**

झाले.

"माझ्या मुलाचं रक्षण करा! उद्या सकाळपर्यन्त त्याला अशा जागी लपवून ठेवा, की जिथे राक्षस पोचू शकणार नाही." मुनीने विनवले.

ब्रह्मदेव मुलाला आपल्या लोकी घेऊन गेले. ते स्वतः ज्या कमलासनावर बसत, त्याच कमळाच्या एका पाकळीत त्यांनी मुलाला रूपान्तरित केले.

दुसऱ्या दिवशी ठरलेल्या जागी येऊन विरुथ भरतच्या पित्याला म्हणाला, "मूर्खा, ब्रह्मदेवाने तुझ्या मुलाला फुलाच्या पाकळीचं रूप दिलंय. तुला काय वाटतंय, मला इतकंही समजणार नाही? हरलास तू. ठीक आहे, मी तुला आणखी एक संधी देतो. यावेळी तरी त्याला अशा जागी लपव, की जिथे माझी पोच असणार नाही."

भरतच्यापित्याने आता महादेवाचे स्मरण केले. भगवान शंकर मुनीसमोर प्रकट झाले. ब्रह्मदेवाला केलेली विनंतीच मुनीने शंकरालाही केली. शंकर त्याला कैलासावर घेऊन गेले अन् एका कळीत रूपान्तर करून त्याने कळीने पार्वतीचा कान अलंकृत केला.

विरुथ दुसऱ्या दिवशी येऊन मुनीला म्हणाला, "अरे तुझा मुलगा कळीच्या रूपात पार्वतीच्या कानावर बसला आहे. मला हे रहस्यही समजलंय. आता एक शेवटची संधी देतो मी तुला."

त्या दिवशी भरतच्या पित्याने भगवान विष्णुंची आराधना केली. विष्णु प्रकट झाल्यावर त्यांनी पुत्राच्या रक्षणाचा भार त्यांच्यावर सोपवला. विष्णु बालकाला घेऊन गेले.

दुसऱ्या दिवशी विरुथ आला. त्याने आपल्या दिव्य-दृष्टीने तिन्ही लोक धुंडाळले. पण भरत कुठे आहे, हे त्याला कळेना. शेवटी त्रासून तो ओरडला, "हे मुनिबालका, कुठे आहेस तू?"

"इथे आहे." भरतचा आवाज त्याला स्पष्ट ऐकू आला.

विरुथ म्हणाला, "मी तुला काहीही करणार नाही. समोर ये." विरुथची छाती फाडून भरत बाहेर आला. राक्षस मरून पडला. विरुथ आता शापमुक्त झाला. पुन्हा तो गंधर्व बनला. भरतच्या पित्याला नमस्कार करून तो स्वर्गात परतला.







# द्विगुण - यथार्थनामा

निश्चयाचा पक्का विक्रमराजा पुन्हा झाडाजवळ गेला. झाडावरून प्रेतकाढून त्याने आपल्या खांद्यावर टाकले अन् नेहमीप्रमाणे स्मशानाची वाट चालू लागला. तेव्हा प्रेतातला वेताळ बोलू लागला, "राजा, मिट्ट काळोखात जिथं भुता-खेतांचा संचार असतो, तिथं तू नाना प्रकारच्या यातना सहन करत आहेस. ज्या लक्ष्यप्राप्तीसाठी तू झगडत आहेस, ते तुला कसं अन् केव्हा प्राप्त होणार? की होणारच नाही? कधी कधी अकल्पित पणे आपल्या इच्छा पूर्ण होतातही. इतक्या सहजपणे त्या पूर्ण होतील असं आपल्या मनातही नसतं. असं का होतं हे विज्ञ व तपस्वीही तार्किकरूपात सिद्ध करू शकत नाहीत. उदाहरणार्थ द्विगुण नावाच्या एका व्यक्तीच्या उपवासाबद्दल तुला सांगतो. आपला थकवा दूर करत शान्तपणे ती गोष्ट ऐक." इतके बोलून वेताळ गोष्ट सांगू लागला.

सर्वजण म्हणत असत की बलभद्रपुरच्या

## बेताळ कथा



बलरामच्या घराच्या परसात जमिनीत पुरलेले धन आहे. बलरामने ते मिळवण्यासाठी केलेले सारे प्रयत्न असफल झाले. प्रथम त्याने एका ज्योतिष्याला बोलावून धन मिळायची खरोखरच शक्यता आहे का, हे विचारून पाहिले. नंतर एका मान्त्रिकाला बोलावून धन कुठे पुरलेले असायची शक्यता आहे, ती जागा निश्चित करून घेतली. त्याने सांगितल्या जागेवर बलरामने खोदून पाहिले. पण हाती काहीच आले नाही. फक्त ज्योतिषी आणि मान्त्रिक त्याच्याकडून बरंचसं धन लुटून नाहीसे झाले.

एके दिवशी एक संन्यासी त्याच्या घरी आला अन् म्हणू लागला, ''एकाद्या संन्यासी अथवा अुत्तमशा माणसाला आपल्या घरी तीन दिवस भोजन दे, चौथ्या दिवशी त्याला कडक अुपास करायला लाव, पाचव्या दिवशी त्याच्या हातात कुदळ दे. तो जिथे खोदेल, तिथेच तुला धन प्राप्त होईल.''

त्या दिवसापासून लोक ज्याला ज्याला म्हणून 'चांगला' म्हणत अशा प्रत्येकाला बलराम आपल्या घरी बोलावू लागला. त्यांना तो म्हणे की, आपल्याला धन मिळाले तर त्यातला अर्धा वाटा अशी मदत करणाराला दिला जाईल. परन्तु कोणीच त्याचे निमन्त्रण स्वीकारीना. त्या सर्वांचे मत होते की, 'परक्याच्या धनाची अपेक्षा करणं पाप आहे.' लोभामुळे एक-दोघे आलेही. त्यांनी तीन दिवस चांगले स्वादिष्ट भोजन केले, अन् चौथ्या दिवशी कडक अुपासही केला. पण पाचव्या दिवशी कुदळीने जमीन खोदल्यावर मात्र काहीच न मिळाल्यामुळे 'आपण अुत्तम नसल्याचे' सिद्ध झाल्याने शरमून गेले. काहीजण तर अुघडअुघड म्हणाले की - संन्यासी खोटारडा आहे!

काहीही असो. हळूहळू येणारांची संख्या घटत गेली. काही दिवसांनी तोच संन्यासी बलरामकडे आला अन् बलरामने त्याला सर्व हकिकत सांगितली. संन्यासी गंभीर होत म्हणाला, ''मी तर तुला सांगितलं होतं. कडक अुपासाचा अर्थ आहे - चौथ्या दिवशी पाणीसुद्धा न पिता अुपास करायचा. हा नियम पाळला गेला का?''

बलरामने आठवून पाहिले. काही जणांनी फळं खाल्ली होती तर काहींनी दूध घेतले होते. पाणी तर सर्वचजण प्यायले होते! आता बलरामच्या लक्षात आले की धन मिळवण्या साठी अुपास कसा करायला हवा. मग तो



संन्याशाला म्हणाला, ''स्वामीजी, धनासाठी दुसरा कोणी इतका कडक अुपास नाही करणार. ते काम मी स्वतःच केलं तर?''

''फळाची अपेक्षा न करता तुझ्यासाठी कडक अुपास करणाराच सत्पुरुष मानला जाणार ना! आपल्या कामासाठी तू अुपास केलास, तर तो स्वार्थच होईल ना? आता तू असं कर; इथून थोड्या अंतरावर एक वस्ती आहे. त्यात द्विगुण नावाचा एक माणूस आहे. त्याला बोलावून आण. त्याच्याकडून कडक अुपास करवलास, तर कार्य सफल होईल.'' असे सांगून संन्यासी निघून गेला.

बलराम ताबडतोब त्या वस्तीकडे निघाला. पायी चालत संध्याकाळपर्यन्त तेथे पोचला. द्विगुणचा पत्ता सापडायला विशेष त्रास झाला नाही. पण घरात जाअून पहातो तो काय! घर दास-दासींनी भरलेलं! बलरामला वाटले होते की द्विगुण दरिद्री असेल. पण त्याचे घर इन्द्रभुवनासारखं भव्य आहे. सर्व लोकांच्यात द्विगुण चांगला तेजस्वी दिसत होता. चांगला अुंच अन् दृढकाय होता तो. अंगावर रेशमी वस्त्रे अन् चमकत्या अलंकारांनी सजलेला! भगवंताच्या मूर्ती-सारखा प्रकाशित दिसत होता तो.

बलरामला पाहून द्विगुण स्वतःपुढे होअून, तो का आला आहे वगैरे चौकशी करू लागला. बलरामचे चांगले स्वागत केले त्याने. पण अशा महान् माणसाला आपले काम सांगायला बलराम संकोचू लागला. द्विगुणने पुनःपुन्हा आग्रहाने विचारल्यावर त्याने आपले काम सांगितले.

मनातल्या मनात बलराम भीत होता कि



यावर द्विगुणची काय प्रतिक्रिया होईल! परन्तु मोठ्या प्रेमाने पाठीवर थोपटत द्विगुण म्हणाला, ''आज रात्री तर आपण इथेच मुक्काम करा. सकाळी आपण बरोबरच निघू तुमच्या गावी. तोपर्यन्त मी इथली सर्व व्यवस्था करून ठेवतो.''

बलरामला फारच आनन्द वाटला.

द्विगुणच्या आतिथ्यामुळे बलराम चांगला डाराडूर झोपला. पहाटेच सेवकांनी त्याला अुठवून म्हटले, ''लवकर तयार व्हा. आमचे मालक तयार होअून बसले आहेत.''

बलराम पट्कन अुठून बसला. सेवकांनी त्याला मोठ्या वैभवाने स्नान करवले. सेवकांना विचारून बलरामने द्विगुणची माहिती मिळवली. त्याला कळले की, द्विगुण नोकरांना खूप चांगला पगार देतो, पण त्याबरोबरच



त्यांना फार सतावतोही. तो स्वतः खूप चांगली कामं करतो, पण त्याबरोबर स्वतः अनेक व्यसनांच्या अधीनही आहे.

बलरामने त्यांना मोठ्या औत्सुक्याने विचारले की, ''एकूणात द्विगुण चांगला माणूस आहे की वाईट?''

''त्यांच्यात चांगुलपणाही आहे आणि वाईटपणाही आहे पण हां, ते आपला वाईटपणा, आपले दुर्गुण लपवायचा प्रयत्न करत नाहीत. हेच त्यांचं वैशिष्ट्य.'' नोकर म्हणाले.

आता बलरामला चिंता वाटू लागली. ''संन्याशानं ह्याचं नाव का सुचवलं कुणास ठाऊक! यांच्या उपासानं लाभ होईल की नाही?'' त्याच्या मुखातून अनायास शब्द बाहेर पडले.

यावर नोकर हसू लागले, ते म्हणाले, ''आमचे मालक या उपासाचा रात्रभर प्रचार करत होते. आम्हीही ऐकून आश्चर्यचकित झालो. उपासदीक्षा द्यायला तुम्हाला आमचा मालकच सापडला होय? बाकी सर्व दिवसाकाठी तीनदा खातात तर ते सहा वेळा खातात. त्यांच्याकडून उपास करवणं देवालाही नाही जमणार!''

नोकरांच्या बोलण्याने बलरामची काळजी आणखीच वाढली. सर्व भार संन्याशावर टाकून आता त्याने याबद्दल विचार करणे सोडून दिले.

थोड्याच वेळात प्रवासासाठी गाडी आली. गाडीत खूपशी गाठोडी होती. बलराम-द्विगुण यांच्याबरोबर एक स्वयंपाकीही गाडीत चढला. द्विगुणने बलरामला त्याचा परिचय करून दिला - ''मी भोजनप्रिय आहे, अन् याच्या स्वयंपाक सोडून इतर कोणी काहीही बनवलेलं मला आवडत नाही. त्यामुळे मी बाहेर कुठे गेलो, तर याला बरोबर नेतोच.''

गाडी निघाली. वाटेत स्वयंपाक्याने दोघांना फराळ करवला. द्विगुणने बलरामपेक्षा दुपटीने तो खाल्ला. त्याच्या पचनशक्तीचे बलरामला फारच आश्चर्य वाटले. थोड्या वेळाने पुन्हा द्विगुणने काही पक्वान्ने खाल्ली.

थोडे दूर गेल्यावर रस्त्यातून जाणारा एक परिचित माणूस त्यांना दिसला. गाडी थांबवून द्विगुण त्याच्याशी बोलला. तो माणूस म्हणाला, ''माझी बायको आजारी आहे. वैद्यानं मागवलेली औषधं आणायला चाललोय मी.'' त्याला सहानुभूती दाखवून धीराने रहायला द्विगुणने सांगितले.



''मलाही घ्या ना आपल्या गाडीत. लवकर पोचेन मी. तसा माझ्या बायकोच्या जिवाला धोका नाहीय; पण वेदनेमुळे फार घाबरते आहे ती. लवकर लवकर औषधं देऊन तिच्या वेदना थांबवाव्या असं वाटतंय मला.'' तो माणूस गयावया करत म्हणाला.

''जिवाला धोका नाही नं? शरीराच्या वेदना सहन करायलाच हव्यात! पाच वर्षांपूर्वी तुझ्या बायकोनं लोणी चोरल्याबद्दल मुलाचा उगीचच संशय घेतला होता. त्याला खूप मारलं होतं नं तिनं? मग आता सोस म्हणावं त्याचा परिणाम!'' असे म्हणून द्विगुणने गाडी पुढे हाकलायला लावली. बलरामला त्याच्या या वागणुकीचे आश्चर्य वाटले.

आणखी पुढे गेल्यावर एक माणूस झाडाखाली रडत बसलेला त्यांना दिसला. गाडी थांबवून त्याच्याजवळ जाऊन त्याला नीट निरखल्यावर द्विगुण म्हणाला, ''नरसिंहच ना तू? काय झालं बाबा तुला?''

नरसिंह म्हणाला, ''माझे वडील चार दिवसांपूर्वी वारले. कामाला जावं तर त्यांची फार आठवण येतेय मला; दुःख सहन नाही होत.''

''अरे, मरून गेले ना ते? बरं झालं. लहानपणी मला 'पेरू देतो' म्हणून त्यांनी कच्च्या ताडगोळ्याचा गर दिला होता.'' असे म्हणून द्विगुण जोराने रडू लागला.

द्विगुणचे रडणे पाहून स्तंभित झालेला नरसिंह स्वतःचे रडणे बन्द करून त्याला धीर देऊ लागला. पण ताबडतोब हसत द्विगुण म्हणाला, ''तुझा बाप मोठा दुष्ट होता. जिवन्त असेपर्यन्त अनेकांना फसवत असे तो ! शेतकामाच्या मजुरांना त्यांची मजुरीही तो देत नसे. माझी एक एकर जमीन हडपून त्यानं स्वतःच्या जमिनीत दाखल केली. असल्या दुष्टाच्या मरणाबद्दल रडण्याऐवजी हसायलाच हवं; रडतोस कशाला?'' अन् तो गाडीत जाऊन बसला.



द्विगुणच्या बोलण्यात सत्य असेलही, पण त्याला इतकं कठोर बोलायची गरज नव्हती! बलरामला त्याची नियत बरी नाही वाटली. दुपारी गाडी थांबवून द्विगुणने पोटभर खाल्ले. त्याला वाईट वाटू नये म्हणून बलरामनेही थोडेसे खाऊन घेतले.

''इथे थोडा वेळ विश्रान्ती घेऊया. एका तासानन्तर पुन्हा भूक लागेल मला. तेंव्हा काहीतरी खाऊन मग निघूया.'' द्विगुण म्हणाला.



बलरामला वाटले, 'अरे, ही काय भूक झाली?' दुपारच्या खाण्यानंतर गाडी निघून संध्याकाळी ते बलरामच्या घरी पोचले.

तेव्हापासून बलरामच्या घरातही द्विगुणची वागणूक विचित्र होती. प्रथम त्याने बलरामच्या बायकोच्या सौन्दर्याची प्रशंसा केली. नंतर तिला म्हणाला, ''तू सुंदर आहेस, पण घर सुंदर नाही राखलंस!'' बिचारीला फार वाईट वाटले. नंतर त्याने बलरामच्या मुलांनाही 'सुंदर' म्हटले, पण क्षणभरात त्यांच्या निरागसतेला नावे ठेवली. बलरामला धन प्राप्त होणार म्हणून आनन्द व्यक्त केला, पण लगेच या कामासाठी आपले घर, वैभव सोडून यावे लागल्याबद्दल चिडचिड करत राहिला.

तीन दिवस द्विगुणने बलरामकडे स्वादिष्ट भोजन झोडले. दिवसाकाठी सहा वेळा खाणारा माणूस यापूर्वी कधी न पाहिल्यामुळे घरची सर्व माणसे आश्चर्य करत राहिली. बलरामच्या कुटुंबीयाना शंकाही आली की, 'असला माणूस अुपास कसा करणार?'

तिसऱ्या दिवशी रात्री झोपण्यापूर्वी बलरामच्या बायकोला बोलावून द्विगुण म्हणाला, ''देवी, अुद्या माझा कडक अुपास! पाण्यालाही स्पर्श नाही करणार. अुद्या आराम कर तू.''

थोड्या वेळाने बलरामला बोलावून त्याने विचारले, ''तुला धन मिळालं. तर त्यातला वाटा देशील मला?''

बलरामला वाटले की, 'असल्या स्वार्थी माणसाहातून कसं काय धन मिळणार?' तरी तो म्हणाला, ''धन मिळालं, तर चौथा हिस्सा तुम्हाला देईन.''

शेवटी चौथा दिवस अुजाडला. बलरामला वाटले होते - द्विगुण खरेच कडक अुपास करील. पण त्याने तर आपल्या स्वयंपाक्या कडून पक्वान्ने बनवून घेअून. तीन वेळा पोटभर खाल्ले. विचारणा केल्यावर तो अुत्तरला, ''तसं तर मी सहा वेळा खातो की नाही? पण आज तीनच वेळा खाल्लं. म्हणजे मला हा कडक अुपासच घडला.''

बलराम काळजीतच होता. पण दुसऱ्या दिवशी हाती कुदळ घेअून द्विगुण खणू लागताच 'खणखण' आवाज आला. आणखी थोडे खोदल्यावर सोन्याची नाणी भरलेला घडा हाती आला!

ही गोष्ट सांगून वेताळ राजाला म्हणाला, ''विक्रमराजा, धन प्राप्त करायचं असेल, तर एका अुत्तम माणसाला तीन दिवस जेवायला



घालून चौथ्या दिवशी कडक अुपास करायला लावण्याबद्दल संन्याशाने सुचवले होते. होय ना? पण द्विगुणने तर संन्याशाच्या सांगण्याप्रमाणे कडक अुपास केला नाही. तरीही त्याच्याच हातून बलरामला संपत्ती मिळाली. तसं पाहिलं तर द्विगुणमधे अुत्तम पुरुषाच्या गुणांचाही अभावच आहे. बायकोच्या दुखण्यामुळे अस्वस्थ असलेल्या माणसाला सहानुभूती दाखवण्याऐवजी त्यानं शिव्या दिल्या; नरसिंहला सांत्वना न देता त्याला खरं-खोटं सुनावलं; मिळणाऱ्या संपत्तीत वाटा मागितला. हे सर्व पहाता बलरामला त्याच्या हातून केवळ योगायोगानंच धन मिळालं. यात द्विगुणच्या चांगुलपणाचा काहीच प्रभाव दिसत नाही.' द्विगुणमुळे संपत्ती मिळाली' असं मानणं माझ्या दृष्टीनं चूक आहे, भ्रम आहे. माझ्या या शंकेचं जमलं तर निरसन कर. पण अुत्तर माहीत असूनही द्यायचं टाळलंस, तर मात्र तुझं मस्तक तडकून जाईल.''

अुत्तर देत विक्रम बोलू लागला, ''जगात कोणी पूर्णतः अुत्तम असूच शकत नाही. अुत्तम व्यक्ति आपले दुर्गुण लपवू पाहील, तर त्याचा अुत्तमपणाच लुप्त होतो ना? द्विगुणनं आपला भलेपण अन् बुरेपणा दोन्ही अलगअलग केलंय - संभाळलंय. त्यामुळेच त्याचं भलेपण किंवा बुरेपण कोणापासून लपलेलं नाही. अुघडा मामला सगळा! त्याच्यात दोन व्यक्तिमत्वं आहेत. आपल्यातल्या चांगुलपणामुळे तो लोकांना गरज पडली तर मदत करतो. पण बुरेपणामुळे तो दुसऱ्यांचा द्वेष करतो, त्यांच्या दुर्गुणांवर बोट ठेवतो. स्वतः चांगला वैभवशाली असूनही तो बलरामच्या मदतीसाठी त्याच्याकडे आला. त्याच्यातल्या चांगल्या माणसाने बलरामच्या पत्नीनं दिलेलं भोजन खाल्लं अन् वाईट माणसाने आपल्या स्वयंपाक्यानं बनवलेले पदार्थ खाल्ले. त्याच्यातल्या चांगल्या माणसाने दिवसातून सहाऐवजी तीनदाच जेवून अुपास साजरा केला. अन् यामुळेच बलरामला धन प्राप्त झालं. या कारणानंच 'धन मिळणं' याला 'योगायोग' म्हणणं गैर आहे.''

राजाचे मौन भंग करण्यात सफल झालेला वेताळ पुन्हा प्रेतासह गायब होअून झाडावर लटकू लागला.



# साष्टांग - नमस्कार

बलिया हे समुद्रतटावरचे एक गाव. एकदा मोठे वादळ होऊन गावातल्या बऱ्याच घरांचे नुकसान झाले. श्याम नावाच्याएका गरीब शेतकऱ्याला आपले घर दुरुस्त करणे आवश्यक झाले. आसपासच्या लोकांकडे मदत मागितल्यावर सल्ला मिळाला की, पैसे व्याजाने देणाऱ्या चमनकडे जाऊन त्याने मदत मागावी.'

श्याम चमनकडे गेला, अन् हजार रुपये कर्जाऊ मागितले. त्याच्याकडे आपादमस्तक पाहून चमनने विचारले, ''श्यामच ना तू? मला ओळखलेस तू?'' त्याचा सूर चेष्टेचा होता.

''आपणाला न ओळखणारा गावात कोणी तरी असेल का?'' श्याम बोलला. ''मला वाटलं ओळखत नसावास. कधी रस्त्यावर दिसलास किंवा तलावाकिनारी आपण एकमेकांसमोर आलो, तेंव्हा मला कधी नमस्कार केलास? कधीच नाही. तू तर एक नंबरचा घमेंडखोर !'' चमनने असंतोष दर्शविला.

''नकळत चूक घडली हातून'' म्हणत श्यामने त्याला नमस्कार केला.

''हं! मला नमस्कार करण्यासाठी तुला वादळ व्हायची गरज पडली ना. असा नमस्कार तर सर्वच करतात. पण मला तुझी घमेंड जिरवायची आहे. आता मला चांगला साष्टांग नमस्कारच कर.'' चमनने आज्ञा केली.

चमनची इच्छा पुरी करून त्याच्याकडून हजार रुपये घेऊन श्याम तेथून निघाला. पण वरद एका झाडाखाली उभा राहून हे सर्व पहात होता. श्यामला अडवून तो म्हणाला, ''शी, शीः! कर्ज मिळवण्यासाठी साष्टांग नमस्कार केलास तू?''

यावर श्याम म्हणाला, ''आता माझ्याकडून कर्जवसुली करताना एकदाच काय, पण पुनःपुन्हा मला साष्टांग नमस्कार घालायला लावीन चमनला! पहातच रहा तू.''





समुद्रकिनाऱ्यावर सहल - १३

# भारताचा प्रवाळमय स्वर्ग

**शब्दांकन - मीरा नायर ◆ चित्रकला : गौतम सेन**




कोची (केरळ)च्या पश्चिमेला दोनशे ते चारशे किलोमीटर अंतरात अरबी सागरात लक्षद्वीप वसलेले आहे. ही बेटे सोडता दुसरी प्रवाळद्वीपे भारतात नाहीत. प्रवाळ म्हणजेच पोवळे.

लक्षद्वीप ३६ बेटांनी बनलेला एक छोटासा द्वीपसमूह आहे. हा भारताचा सर्वात लहान केन्द्रशासित प्रदेश होय. हा दर्जा याला १९५६ मधे मिळाला आणि १९७४ मधे याला 'लक्षद्वीप' हे नामाभिधान प्राप्त झाले. त्यापूर्वी याला लखदीव, अमेनीदीव किंवा मिनिकॉय बेटे असे म्हणत असत.

या ३६ पैकी फक्त १० वर मानव-वस्ती आहे. ही बेटे म्हणजे अम्मेनि, अंद्रोत, अगात्ति, बित्रा, चेत्तलात, कड्मत, कल्पेनि कवरत्ति, किल्तान आणि मिनिकॉय.

अगदी प्रथम केरळचे रहिवासी इथे पोचले. गोष्ट अशी की - केरळचा शेवटचा शासक चेरमान पेरुमाळ जेंव्हा मुस्लिम धर्म ग्रहण करण्यासाठी मक्केकडे रवाना झाला, तेंव्हा त्याची समजूत घालून परत आणण्यासाठी कण्णनूरच्या राजाने आपली माणसे पाठवली. पण जहाज खडकावर आपटल्यामुळे त्यांना परत यावे लागले.

परत येताना या लोकांना समुद्रात अनेक रमणीय बेटे दिसली अन् त्यांनी त्याबद्दल राजाला सांगितले. राजाने घोषणा दिली की जे प्रजानन या बेटांवर जाऊन शेती करतील, त्यांना ते करत असलेली जमीन फुकट मिळेल.' परन्तु आता नव्या शोधांमुळे असे आढळले आहे की खूप पूर्वीपासूनच भारतनिवासी तेथे रहात असत. तेथे प्राचीन बुद्धमूर्तीही सापडल्या आहेत.

अगदी प्रथम अम्मेनि बेटावर वस्ती झाली. हे बेट तीन कि.मी. लांब व १.६ कि.मी. पेक्षा थोडे अधिक रुन्द आहे. अम्मेनिवरील कारागीर कासव व नारळावरील कवचापासून सुंदर छड्या बनवतात. येथील शिल्पकार पोवळीं व दगडांवर सुंदर नक्षीकाम करण्यासाठी प्रसिद्ध आहेत.

अगात्ति हे लक्षद्वीपमधील सर्वांत अधिक उष्ण द्वीप आहे. हे या द्वीपसमूहातील सर्वात पश्चिमेकडील बेट. एप्रिल १९८८ मधे मुख्य भूमि व लक्षद्वीप बेटे यांच्यामधे विमानसेवा सुरू झाली. विमान अड्डा अगात्ति वरच आहे.



अन्द्रोतचा एक नावाडी



उजरा मशीद - कवरत्ति

अन्द्रोत अगात्तिच्या अग्नेयेस आहे. सर्वात अगोदर येथील रहिवाशांनीच मुस्लीम धर्माची दीक्षा घेतली. आज लक्षद्वीपच्या ४९,६८० लोकसंख्येतील ९४% इस्लामची अनुयायी आहे.

मुस्लिमधर्म लक्षद्वीपमधे कसा पोचला? असे मानले जाते की, एक मुस्लिम संत हजरत ओबेदुल्ला यांना महम्मद पैगंबर स्वप्नात दिसले. त्यांनी दूर देशात जाऊन त्यांना धर्मप्रसार करायची आज्ञा दिली.

हजरत ओबेदुल्ला जहाजात बसून निघाले. परन्तु वादळ होऊन जहाज बुडाले. एका फळीच्या आधाराने तरंगत हजरत साहेब अम्मेनित येऊन पोचले.

अम्मेनित धर्मप्रसार करण्यात सफल न झाल्याने ते जवळच्या बेटांवर गेले आणि अन्द्रोत, कवरत्ति अन् कल्पेनिच्या रहिवाशांना त्यांनी आपल्या धर्माची दीक्षा दिली. त्यांचा मृत्यु अन्द्रोतमधे झाला. त्यांची कबर तेथील जुम्मा मशिदीत आहे.

अन्द्रोत हे लक्षद्वीपचे सर्वात मोठे बेट असून ते पूर्णत: नारळाच्या झाडांनी आच्छादलेले आहे. इथल्या नारळांची बरोबरी होऊच शकत नाही.

लक्षद्वीपची राजधानी कवरति हे अम्मेनि आणि अन्द्रोत यांच्यामधे आहे. हे सहा कि.मी. लांब व जवळ जवळ एक कि.मी. रुन्द आहे. लक्षद्वीपचे हे सर्वात अधिक विकसित बेट होय. मुख्यभूमीच्या लोकांची सर्वात अधिक लोकसंख्या यावरच आहे. सरकारी कचेऱ्या व सरकारी कर्मचाऱ्यांची घरेही येथेच आहेत.

कवरत्तीचे कारागीर फारच कुशल आहेत. याचे प्रमाण म्हणजे येथील उजरा मशीद. ही केन्द्रशासित प्रदेशाच्या ५२ मशिदींपैकी सर्वात अधिक प्रेक्षणीय आहे. मशिदीच्या छताचा आतला भाग समुद्रात वाहून आलेल्या लाकडापासून बनवण्यात आलेला असून त्यावर खूप सुंदर कोरीवकाम केलेले आहे. हे काम आकर्षक हिरव्या व लाल रंगांनी रंगवलेले आहे. येथील विहीराच्या पाण्यात रोगमुक्त करण्याची शक्ति आहे, असे म्हणतात.



समुद्रातून वाहून आलेल्या लाकडावरील
सुंदर कोरीवकाम. अुजरा मशीद



कवरत्तिच्या दक्षिणेला आहे कल्पेनि बेट. याला अरब लोक 'कोल्फेनि' म्हणत असत. अरबस्तान हून भारताकडे येण्याच्या मार्गावर हे बेट येते. ते एका विशाल छल्ल्यासारख्या समुद्रतलावाने घेरलेले आहे. काल्पेनिच्या आसपास तीन बेटे आहेत-चेरियम्, तिलकम् आणि पित्ति.

पित्तिला 'पक्षिपित्ति' असेही म्हणतात. तीन बेटांपैकी हे सर्वात गमतीचे बेट आहे. खरे म्हणजे हा एक छोटासा खडक आहे. काही साहसी लोकच तेथपर्यन्त पोचू शकतात. कारण शेवटचे ५० मीटर अंतर पोहूनच पार करावे लागते. पक्षीपित्तिवर एकादे गवताचे पातेसुद्धा उगवत नाहीच परन्तु हजारो पक्षी मात्र-मुख्यत: टिटवी जातीचे-तेथे रहातात. यांचा टि-टी, टि-टी आवाज दूरवर ऐकू येतो.

दोन प्रकारच्या टिटव्या-'सूटी' व 'नॉडी' - येथे अंडी घालतात. त्या आपली घरही रेती किंवा खडकावर बनवतात. मोळ्या रंगी-बेरंगी शिपल्यां पासून बनवलेली ही घरही मोठी आकर्षक दिसतात. अंडी कोंबडीच्या अंड्याच्या आकाराची, परंतु काळा-भुऱ्या ठिकल्यांवाली असतात. अम्मेनि व अंद्रोतचे रहिवासी ही अंडी आवडीने खातात. अंडी गोळा करण्यासाठी ही माणसे पक्षिपित्तीवर येत असत. परन्तु आता हे ठिकाण सरकारने 'पक्ष्यांचे अभयारण्य' म्हणून घोषित केले आहे.

या टिटव्या कोळ्यांना चांगल्याच मार्गदर्शक वाटतात. कारण 'टूना' माशांचे कळप जेथे पोहत असतात, तेथेच हवेत या टिटव्या त्यांना पकडण्यासाठी तरंगत असतात. टिव्यांचे थोळके बघून कोळ्यांनाही माशांचा पत्ता लागतो.

मिनिकॉय हे लक्षद्वीपचे सर्वात दक्षिणेकडील बेट. येथील निळा निळा समुद्राचा घेरा विशाल व खोल आहे. लहान जहाजे सहजपणे तेथे प्रवेश करतात.

तेराव्या शतकातील महान इटॅलियन यात्रेकरू मार्को पोलो याने मिनिकॉयला 'स्त्रियांचे बेट' असे म्हटले होते. कारण येथील पुरुष मासे पकडण्यासाठी जास्तीत जास्त वेळ समुद्रावरच रहात असत. आजही परिस्थिती जवळजवळ तशीच आहे. पुरुष प्राय: मासे पकडण्या साठी किंवा नावाडी म्हणून जहाजांवर कामे करतात अन् बेटावर बाकीची कामे जास्त करून स्त्रियाच करतात-मेहनत मजुरीची कामे अन् दुकाने-कचेऱ्यांमधील कामेही !



'नॉडी' टिटव्या, पित्ति

मिनिकॉयच्या लोकांची वेषभूषा व बोलीभाषा लक्षद्वीपच्या इतर रहिवाशांपेक्षा निराळी आहे.

येथील पुरुष जीन्स व टी-शर्टस् घालतात व स्त्रिया गळ्याशी सुंदर कशिदा केलेले लाल रंगाचे झगे घालतात. त्या डोक्यावर पांढरा किंवा काळ्या कापडाचा तुकडा बांधतात लहान मुलीही डोक्याला काही न बांधता रहात नाहीत. बाकीच्या बेटांवरील पुरुष लुंगी वापरतात व स्त्रिया वर कशिदा केलेला तंग ब्लाऊज व खाली काची नावाचे एक वस्त्र गुंडाळतात. ते नीट बांधलेले रहावे म्हणून कमरेला पट्टा बांधतात.

मिनिकॉयचे लोक महल भाषा बोलतात. बाकीच्या बेटावर मुख्यत: मल्याळी बोलली जाते.

असे मानले जाते की मिनिकॉयच्या लोकांचे पूर्वज गुजराथेतून इथे येऊन राहिले होते. त्यांच्यातल्या बहुतांशी लोकांना 'टकरु' म्हणतात. हा शब्द बहुधा 'ठाकुर' चा अपभ्रंश असावा. अधिकांश घरांतून खाटल्या सारखा एक झोपाळा असतो.

त्यांच्या परंपरागत नृत्याला 'दांडी' म्हणतात अन् ते गुजराथच्या 'दांडिया-रास' सारखे असते.



लक्षद्वीप मधील स्त्रिया

बाकीच्या लक्षद्वीपप्रमाणे मिनिकॉयची समाज-व्यवस्थाही मातृप्रधान आहे-म्हणजे वंश व उत्तराधिकार आईकडून चालतो. बाकीच्या भारताच्या तुलनेत येथील समाजात स्त्रियांचे स्थान उच्च आहे.



रेवरींचे लवा नृत्य. हे पेशाने कलाल (ताडी काढणारे असून मिनिकॉयचे सर्वात जुने रहिवासी मानले जातात.





# सदाबहार

**वि**शालपुरमधे चार्वाक नावाचा एक तरुण होता. तो खूप मेहनती असून नवीन काही शिकवले तर मनापासून शिकत असे. कधीही कोणावर रागावत नसे तो. नेहमी हसतमुख असल्याने लोक त्याला 'सदाबहार' म्हणत असत.

या गावात प्रारब्ध नावाचा एक धनिक वैद्याच्या सल्ल्याने हवापालट म्हणून रहायला आला. खूप आजारी पडून मृत्युमुखातून वाचला होता तो.

प्रारब्धने गावात एक मोठेसे घर भाड्याने घेतले. एक स्वयंपाकी अन् एका हरकाम्या गड्याचीही सोय झाली. गावचे प्रमुख लोक रोज त्याला भेटायला येत असत. अन् थोडा वेळ गप्पा मारून निघून जात.

परन्तु प्रारब्ध नेहमीच कसल्यातरी काळजीत असे. गावच्या एका प्रमुखाच्या ही गोष्ट लक्षात आली. तो म्हणाला, ''आमच्या गावात चार्वाक नावाचा एक तरुण आहे. नेहमीच संतुष्ट असतो तो. त्याला जर आपला आपल्या घरी कामाला ठेवून घेतलंत तर त्याच्या अुल्हसितपणाचा आपणावरही चांगला परिणाम होईल.''

प्रारब्धला हा सल्ला बरा वाटला आणि त्याने चार्वाकला नोकरीला ठेवले. त्याचे काम इतकेच की - नेहमी मालकाबरोबर राहून त्याला लागलेसवरले पहाणे. चार्वाक तन मनाने प्रारब्धची सेवा करू लागला. कोणीही आले तरी त्याच्या कर्तव्यदक्षतेची खूप तारीफ करत. इतके सारे होऊनही प्रारब्धचे 'प्रारब्ध' बदलेना! त्याची चिन्ता जशीच्या तशीच राहिली. तो एकदा चार्वाकला म्हणाला, ''पाहिलंस, सर्व प्रकारची सुखं हात जोडून अुभी आहेत. पण काय अुपयोग? मी नेहमी दु:खीच असतो. जराही विश्रान्ती न घेता तू कष्ट करत राहूनही नेहमी हसतमुख असतोस.

सुनीला सावळे



तुझ्या तृप्तीचं रहस्य मला कळेल?''

''या जगात सर्वत्र आनन्दच तर भरला आहे. पण आपण दुःखी, असंतुष्ट का असता, हेच समजत नाही मला.'' चार्वाक बोलला.

''दुःख काय असतं, हे लहानपणी मलाही माहीत नव्हतं. माझ्याजवळ सुरुवातीला केवळ शंभर रुपये होते. इतक्या थोड्या भांडवलातून मी व्यापार सुरू केला. आज मी करोडपती आहे. आजारी पडलो आणि वैद्याच्या सल्ल्याने या गावी आलोय. माझे कुटुंबीय तिकडे माझा व्यापार संभाळत आहेत. त्यांनीच मला एकट्याला इथे पाठवलंय. सगळं काही आहे, पण एकटाच आहे नं मी इथे? माझं आपलं असं कोणी इथे नाही. मग कसा संतुष्ट राहू मी? काळजी तर वाटणारच.''

यावर हसून चार्वाक म्हणाला, ''आपल्याला तर याचाच आनंद वाटायला हवा. आपण तिथे नसलात तरी आपली माणसं सुरळीतपणे व्यापार संभाळत आहेत. आपण इथे स्वतःसाठी हवा तितका खर्च करू शकत आहात.''

''पण आपल्याच लोकांनी आपली सेवा केली, तर मिळणारं सुख खास असतं.'' प्रारब्ध बोलला.

''दररोज आपण मला दहा रुपये देता. पण तिकडे प्रत्येकजण हजार रुपये मिळवत असेल नं! अन् ही पण आपलीच कमाई झाली नं?'' चार्वाक समाधान करत म्हणाला.

''पण फक्त दहाच रुपये घेणारा सेवक नको मला. मला तर असा माणूस हवा, की जो हजार रुपये घेईल. माझं दुःख हेच की माझी इच्छा पुरी होत नाहीय.'' प्रारब्ध बोलला.

आता जोरात हसत चार्वाक म्हणाला, ''महाराज, जगात सेवक वृत्ति ही सर्वात नीच वृत्ति आहे. ज्यांना दुसरं काहीच जमत नाही, तेच असलं काम करतात. पैसा जवळ असला तर दुसऱ्याकडून आपली कामं करून घ्यावंसं वाटू लागतं. आपणासारख्या धनिकांची सेवाचाकरी व्यवस्थित होणं हे माझ्यासारख्या सेवकांनाच शक्य आहे. आपले स्वतःचे समर्थ असणारे लोक हे काम थोडंच करतील?''

प्रारब्धला या गोष्टीचे वाईट वाटे, की तो महाभारत, रामायण इ. ग्रंथ वाचू शकला नाही. चार्वाकला वाटे की असे काही वाचणे म्हणजे आरामात बसणाऱ्या लोकांचे काम आहे. 'स्वतःला विश्रान्ती मिळत नाही'



याचाच आनन्द वाटे त्याला. प्रारब्धचे दुःख असे की - आपल्याला एका भयंकर व्याधीने ग्रासले आहे. चार्वाकचे म्हणणे असे की - इतक्या मोठ्या भयानक रोगातून वाचून प्रारब्धला आता आराम करायची संधी मिळत आहे.

चार्वाकजवळ प्रारब्धच्या प्रत्येक प्रश्नाला योग्य अुत्तर होते. आपले दुःख विसरण्या ऐवजी प्रारब्ध आता चार्वाकच्या आनंदाबद्दल त्याचा हेवा करू लागला. चार्वाकचा हसरा चेहरा पाहून त्याला दुप्पट दुःख होअू लागले. एक दिवस त्याने हे सत्य गावप्रमुखांना सांगितले. तेंव्हा एक प्रमुख म्हणाला, ''मग तर आपणाला संतोष देणारा मार्ग सापडलाच म्हणून समजा. आपण रोज त्याच्यावर रागवत रहा; आपल्या बोलण्याने त्याचे मन दुखवत रहा. मग त्याच्या चेहऱ्यावरचे हसू नाहीसे झाले की आपले दुःखही नाहीसे होईल.''

तेंव्हापासून प्रारब्ध चार्वाकला अुगीचच शिव्या देअू लागला; रागावू-ओरडू लागला. पण चार्वाकवर त्याचा काहीच परिणाम झाला नाही. शेवटी प्रारब्ध त्याला असेही म्हणाला की - तू बेशरम आहेस, कुत्रा आहेस!

पण नेहमीप्रमाणे हसून चार्वाक आपल्या कामात मग्न राहिला. आणखी एकदा प्रारब्ध त्याला 'डुक्कर' म्हणाला, एकदा 'रेडा' म्हणाला. नंतर एकदा 'गाढव' म्हणाला. तरीही चार्वाक हसतच राहिला अन् मनातल्या मनात कुढत प्रारब्ध त्याला म्हणाला, ''मी तर तुला इतक्या शिव्या देतो, तरी तू कसा काय हसू शकतोस?''

''कुत्रा हे विश्वासूपणाचं दुसरं नाव आहे.



डुक्कर-वराह तर दशावतारांपैकी एक. रेडा, गाढव अत्यंत सेवाभावी असतात. मला तर वाटलं की, आपण माझी स्तुती करत आहात. अन् स्तुतीनं खुश होणं हा तर मानवाचा स्वभावच नं!'' चार्वाक हसत अुत्तरला.

आता मात्र प्रारब्ध हतबुद्धच झाला. त्याने निश्चय केला की, कोणत्याही स्थितीत चार्वाकचा आनन्द नष्ट करायचाच. खूप विचार केल्यावर त्याला एक अुपाय सुचला. आतापर्यन्त चार्वाकला तो फक्त एकान्तातच शिव्या देत असे. कितीही शिव्या दिल्या तरी जोवर इतर कोणी ऐकत नाही, तोवर ठीक आहे. पण इतरांच्या अुपस्थितीत शिव्या खाव्या लागल्या तर शान्त स्वभावाचा माणूसही अुग्र बनेल; त्याची सहनशक्ती संपेल. आपला हा अुपाय अमलात आणण्या-

साठी त्याने चार्वाकला गावप्रमुखांच्या अुपस्थितीत तोंडाला येईल ते बोलून घेतले, शिव्या दिल्या, अपमानकारक शब्द अुच्चारले; तरीही चार्वाक हसतमुखाने आपले काम करत राहिला. यामुळे प्रारब्ध जास्तच भडकून आणखी शिव्या देत राहिला.

चार्वाकने शिव्या सहन केल्या. पण त्यामुळे सत्यवान नावाचा एक प्रमुख मात्र नाराज झाला. तो चार्वाकला म्हणाला, ''हे तुला इतक्या शिव्या देत आहेत, अन् तू गप्प आहेस? काम सोडून का जात नाहीस तू? मी तुझ्या जागी असतो, तर गाशा गुंडाळून केंव्हाच निघून गेलो असतो.''

''मी फुकटात थोडंच काम करतोय? पैसे घेतो ना?'' चार्वाक हसत म्हणाला, अन् क्षणभर थांबून पुन्हा म्हणाला, ''हे साहेब माझ्या कामावर खूश आहेत. शिव्या देत आहेत, पण काम सोडून जायला सांगितलं का मला त्यांनी? शिव्या अंगला थोड्याच चिकटतात? त्यांनी काम सोडायला न सांगता आपण ते सोडून दुसरीकडे कामाला जाणं अधर्म होईल.''

यावर सत्यवान काही बोलणार, इतक्यात त्याला थांबवत प्रारब्धच म्हणाला, ''थांबा, आता मला कळलं की हा 'सदाबहार' का आहे, नेहमी हसतमुख कसा रहातो. हा प्रत्येक विषयातलं 'भलं' तेवढं पहातो अन् 'बुरं' सोडून देतो, जे काम करेल, ते आपली जबाबदारी मानून करतो. त्या कामाला तो 'परोपकार' मानत नाही. जमेल तितकं तो करत रहातो. आवश्यकतेपेक्षा तो जास्त अपेक्षा ठेवत नाही कुणाकडून, आपल्याजवळ असेल त्यात आनन्द मानतो, जे नाही, त्यासाठी दुःख वाटून घेत नाही; त्यासाठी अुगीच धावपळ करत नाही. आणि म्हणूनच तो 'सदाबहार' आहे, हसतमुख आहे, नित्य संतुष्ट आहे. त्याच्यासारखं रहाणं इतरांना बहुधा जमणार नाही. पण त्या दिशेनं प्रयत्न करणं मात्र प्रत्येकाचं कर्तव्य आहे, धर्म आहे. त्यामुळेही चिन्ता काहीशी कमी होअू शकेल.''

यानंतर मात्र प्रारब्धने चार्वाकचा आनन्द मिटवायचा कधीही प्रयत्न केला नाही. आपली चिंता आपणच कशी कमी करावी याचा सतत प्रयत्न करत राहिला, अन् काही मर्यादेपर्यन्त त्यात यशस्वीही झाला.





## चांदोबा

# सोनेरी क्षण - ७



१. ही विजापुरच्या एका महान् राजाची समाधी आहे. हिचे बांधकाम कोणी केले? हिचे वैशिष्ट्य काय?

२. आसामच्या एका लहानश्या गावात सप्टेंबर-आक्टोबरमधे चांदणे नसलेल्या अन् धुके दाटलेल्या रात्री काही पक्षी कुठे थोडा जरी प्रकाश दिसला तरी त्या दिशेने झेपावून पडतात अन् काही दिवस त्यांच्या हालचाली अगदी निराळ्याच घडतात. आजपर्यंत असे का घडते याचा कोणीही शोध घेअू शकले नाही. ही घटना घडणाऱ्या गावाचे नाव काय?





३. येथे डायनासोरचे शरीर पाच भागात दाखवले आहे. रेषांवर पाच तुकडे कापून ते असे रचा की त्यातून एका हत्तीचे चित्र दिसू लागेल.



४. कमलपुष्पाच्या पाकळ्यांच्या आकारात बनलेली ही इमारत दिल्लीत आहे. तरी हे एक प्रार्थनामन्दिर आहे. एका पर्शियन वक्त्याने स्थापलेल्या अत्याधुनिक धर्माशी हे मन्दिर संबंधित आहे. या धर्माचे नाव काय?

# तीन सोप्या टप्प्यांनी गेंडयाचे चित्र काढा .....



## सोनेरी क्षण - क्रमांक ६



### अुत्तरे

१. कारेल कॅपेक. याने आपले नाटक आर.यू.आर. मधे प्रथम रोबोट शब्दाचा वापर केला.

२. मॅग्लेव्ह आगगाड्यांना चाकेच नसतात. मॅग्नेटिक लेव्हिटेशनचे हे संक्षिप्त रूप. तीव्र अशा चुंबकीय आकर्षणाच्या आधाराने त्या एका ठरीव मार्गाजिर धावतात.

३. रंगीत टेलिव्हिजन सेटवर कितीही विविध आकर्षक रंग दिसले तरी त्यात फक्त तीनच रंग निर्माण होतात. लाल, हिरवा व निळा.

४. बेंजामिन फ्रँकलिन त्यांच्या शोधांचा परिणाम म्हणजेच लायटनिंग कंडक्टर? या शोधाने त्यांनी अनेकांचे प्राण वाचवले.

५. शताब्दी वर्षांच्या नियमाचा अपवाद म्हणजेच इ.स. २००० हे वर्ष. कारण ४०० ने भाग जाणारे वर्ष लीप वर्ष असते.

६. नौका जास्तीत जास्त किती भरता येईल ती मर्यादा दाखवण्यासाठी बाहेरून तिच्यावर एक रेघ ओढलेली असते. तिला 'प्लेमसोल लाईन' असे म्हणतात. पाणी या रेघेच्या वर जाऊ नये.

७. राक्षसी मानवाचे नाव फ्रँकेन्स्टाईन' म्हटले, तर ते चूक आहे. हा राक्षस निर्माण करणाऱ्या वैज्ञानिकाचे नाव 'फ्रँकेन्स्टाईन' आहे.

**रोबोट्स्चा हिशोब**

रोज १८ मोटरकार बनवणारे ९ अल्फा रोबोट्स; २७ कार बनवणारे १८ बिटा रोबोट्स् आणि ९ कार बनवणारे २७ गामा रोबोट्स्.




अर्जुन इंद्राकडे असताना रोमश नावाचे महर्षी तीन्ही लोकी संचार करत स्वर्ग-लोकी पोचला. इन्द्रसिंहासनावर अर्जुनाला बसलेला पाहून त्याला फारच आश्चर्य वाटले. त्याला वाटले की, 'याने मोठी तपश्चर्या करून या सिंहासनावर बसायची योग्यता प्राप्त करून घेतली असावी.''

महर्षींचे आश्चर्य पाहून इन्द्र हसत म्हणाला, ''मुनिवर, हा अर्जुन साधारण मानव नव्हे. पूर्व जन्मी तो नर नामक महर्षी होता. नारायण नामक महर्षींबरोबर याने हजारो वर्षे बदरिका वनात तपश्चर्या केली. ऋषी नारायण हे पूर्व जन्मी कपिल महामुनी होते. तेच नर-नारायण आता भूभार हलका करण्यासाठी अर्जुन आणि कृष्ण रूपाने जन्मले आहेत. पाताळाचे निवात- कवच देवांना सतावीत आहेत. अर्जुन त्यांचा नाश करील. यासाठीच त्याला इथे बोलावले आहे. आता तुम्ही भूलोकात जाऊन काम्यक-वनात रहाणाऱ्या धर्मराजाला सांगा की, अर्जुन स्वर्गलोकात नृत्य-गायनाचे शिक्षण घेत असून सुखात आहे.''

रोमश महामुनि, इंद्राचा निरोप पोचवण्यासाठी भूलोकाकडे निघाले.

व्यासांनी धृतराष्ट्राला सांगितले की, अर्जुनाने स्वर्गलोकी पोचून दिव्यास्त्रे प्राप्त केली आहेत. धृतराष्ट्र संजयला बोलावून घेऊन म्हणाला, ''आता दुर्योधनाच्या दुर्बुद्धीमुळे कायकाय आपदा येतील ते पाहूया. बिचाऱ्या प्रजेला कायकाय त्रास भोगावा लागेल कुणास ठाऊक ! धर्मराज अन् अर्जुन यांच्यात तीन्ही लोकी विजय मिळवण्याची शक्ती आहे. आता माझ्या पुत्रांचा मृत्यु निश्चित आहे.'' त्याचा स्वर फार दुःखी होता.

''यात अतिशयोक्ति मुळीच नाही. द्रौपदीला सभेत आणून सर्व प्रकारे तिचा

**पांडवांच्या तीर्थयात्रा**



अपमान केला गेला. दुर्योधनाने आपली मांडी उघडी करत तिला आपल्या मांडीवर बसायला सुचवले. ती एका राज्याची महाराणी आहे, याचे भान त्याने ठेवायला हवे होते भीमाने त्याची मांडी फोडायची केलेली प्रतिज्ञा योग्यच होय. दु:शासनाने तर तिचे केस धरुन तिला भरसभेत खेचून आणले. दोघांनी अचकट-विचकट भाषा वापरली. कर्णानेही त्यात भरच घातली. दु:शासनाने तर नंतर अगदी ताच सोडून तिच्या तिला नग्न करायचा प्रयत्न केला. हे सर्व चालू असताना खुद्द आपण, विदुर अन् पितामह यांच्यासह नुसतेच बसून राहिलात. भीमाने पुन्हा एकदा प्रतिज्ञा उच्चारली. शेवटी श्रीकृष्णाने तिची लाज राखली. या पार्श्वभूमीवर आता पांडवांना सूड घ्यायचा असेल अन् आपल्या पुत्रांचा वध करायचा असेल, तर त्यात आश्चर्य काय ?'' संजय बोलला.

धौम्यांनी धर्मराजाला सल्ला दिला की अर्जुन परत येईपर्यंत पांडवांनी तीर्थयात्रा कराव्या. त्याप्रमाणे धर्मराज द्रौपदी व आपल्या बंधूसह यात्रेला निघणार होता, इतक्यात महर्षि रोमश तिथे पोचून म्हणाले, ''मी इन्द्राच्या सुधर्म सभेत गेलो होतो. तेथे अर्जुनही इन्द्राबरोबर त्याच्या सिंहासनावर बसलेला होता. ते दृश्य पाहून मला आश्चर्य वाटले. इंद्राने माझ्याकरवी निरोप पाठवला आहे की, अर्जुन तिथे सुखात आहे. या कामासाठीच मी इथे आलोय. इन्द्राने त्याला अनेक दिव्यास्त्रं दिलीत. आता चित्रसेन गंधर्वाकडून तो नृत्य-संगीतांचं शिक्षण घेत आहे. तुम्ही तीर्थयात्रा कराव्या अशी इन्द्राची इच्छा आहे मी स्वत: यापूर्वी दोनदा तीर्थयात्रा केल्या आहेत. आता तिसऱ्यांदा तुमच्याबरोबर करीन.''

हे ऐकून धर्मराजाला फार आनंद झाला. अर्जुन ज्यासाठी गेला, तो उद्देश सफल झाला. ज्या तीर्थयात्रा करायची त्याती इच्छा होती, त्याच करण्याबद्दल इन्द्राकडूनही संदेश आला. तीर्थयात्रेला निघण्यापूर्वी त्याने आपल्या बरोबर असलेल्या समुदायापैकी काहीजणांना हस्तिनापुरला अन् काहींना द्रुपदाकडे पाठवले. इन्द्रसेन आदि ज्यांच्याजवळ आयुधे, कवच आहेत, अशा थोड्यांनाच आपल्या बरोबर राहू दिले.

तीर्थयात्रा करत करत पांडवांनी गोमती, कन्या, गोतीर्थ, बाहुदा नदी-तीर, त्रिवेणी, गया क्षेत्र आदि तीर्थांचे दर्शन घेतले आणि अगस्तींच्या आश्रमात जाऊन त्यांची कथा श्रवण केली.

मणिमंत नगरात इल्वल व वातापी नावाचे दोन भाऊ होते. ब्राह्मणांचा प्रथम पाहुणचार करून नंतर ते त्यांना मारून टाकत असत वातापि बकरीचे रूप घेई अन् इल्वल त्या बकरीला मारून ब्राह्मण अतिथीला मांस खायला घाली. खाल्ल्यानंतर तो म्हणे, 'वातापि, बाहेर ये!' मग वातापि ब्राह्मणाचे पोट फाडून बाहेर येई अन् ब्राह्मण मरून जाई. या सर्व ब्राह्मणांज वळचे धन हे बंधू गोळा करत.

अगस्त्यने महामुनिने विदर्भ राजाच्या कन्येशी लोपामुद्राशी विवाह केला. तिच्या इच्छा-पूर्तीसाठी धन जमवायला तो बाहेर पडला. तो प्रथम तीन राजांकडे गेला. पण त्याला धन देण्याइतकी त्यांची प्राप्ती नव्हती. या तीन्ही राजांना अगस्तीने धन गोळा करण्यासाठी बरोबर घेतले. त्याला नंतर कळले की मणिमंतचे नागरीक वातापि व इल्वल यांच्याजवळ अपार धन आहे. ते मागण्यासाठी तो त्यांच्याकडे गेला.

इल्वलने नेहमीप्रमाणे वातापीला बकरीचे रूप दिले अन् तिचे मास अगस्तीला खायला घातले. ते खाऊन अगस्तीने ढेकर दिला. इल्वलने हाक मारली, ''वातापी, ये बाहेर।''

अगस्ती म्हणाला, ''आता वातापि राहिलाच कुठे? मी तर पचवून टाकलं त्याला.'' इल्वलचा चेहरा पांढरा पडला. त्याने अगस्तीला व त्याच्याबरोबर आलेल्या तीनही राजांना धन देऊन पाठवून दिले.

धर्मराजाने अगस्तीची ही कहाणी ऐकली, एकदा विंध्य पर्वत सूर्याला म्हणाला, ''तू का नेहमी फक्त मेरुपर्वतच्याच भोवती फिरत रहातोस ? मी तर त्याच्यापेक्षाही मोठा आहे. माझ्याभोवती फीर तू.''





''मी जाणून-बुजून मेरुपर्वताभोवती फिरत नाही. माझ्यासाठी ठरलेल्या मार्गाने मी फिरत असतो.'' सूर्याने सांगितले.

विंध्य चिडून सूर्य-चंद्र व अन्य ग्रहांच्या मार्गात अडथळा बनून विस्तृत होऊन उभा राहिला. त्यामुळे सारा लोक अंधारमय झाला. सर्व देव अगस्तीकडे जाऊन विनवू लागले. ''मुनिवर, आपला शिष्य विन्ध्य यानं सारा लोक त्राव्यस्त करुन टाकला. त्याला आपल्या काबूत आणा ना.''

अगस्ती लोपामुद्रासह विंध्य पर्वताकडे जाऊन त्याला म्हणाले, ''मी एका मुख्य कामासाठी दक्षिणेकडे घाललोय. तू वाटेतून दूर हो.'' तेव्हां मुनींना वाट देत विन्ध्याने त्यांना साष्टांग नमस्कार केला व वाट दिली. अगस्ती म्हणाले, ''मी परत येईपर्यन्त तू असाच पडून रहा.'' यानंतर दक्षिणेकडे गेलेले अगस्ती परत आले नाहीत; अन् विन्ध्यानेही आपले डोके उचलले नाही.

कालकेय नावाचे राक्षस समुद्रात रहात असत. रात्री भूमीवर येऊन ते ब्राह्मणांना छळत समुद्रात जाऊन देव त्यांना मारू शकत नव्हते. शेवटी ते अगस्तींना शरण गेले. तेव्हां या मुनींनी समुद्राचे सर्व पाणी एकाच घोटात पिऊन टाकले. आता कालकेय बाहेर आले. देवांनी त्यांच्याशी युद्ध करुन गेले. त्यावेळी सुकलेला समुद्र भगीरथने गंगा पृथ्वीवर आणल्यानंतरच पुन्हा जलमय झाला.

अगस्तींच्या आश्रमातून निघाल्यानंतर पांडव अनेक तीर्थस्थानी गेले. कौशिकी नदीच्या किनारी जाऊन त्यांनी विश्वामित्राचा आश्रम पाहिला. नदीपलिकडील विभांडकाचा पुत्र ऋष्यशृंग याचीही कथा त्यांनी ऐकली.

अंगदेशचा शासक रोमपाद हा दशरथाचा मित्र होता. त्याने ब्राह्मणांविरुद्ध द्रोह केला, तेव्हां ब्राह्मणांनी ते राज्य सोडून दिले व ते अन्य राज्यांत निघून गेले. यानंतर तेथे पाऊस न झाल्याने दुष्काळ पडला. तेव्हां रोमपादने आपल्या मित्रांच्या सल्ल्यावरुन काही सुंदरी ऋष्यशृंगकडे पाठवल्या. त्यांच्यामुळे आकर्षित झालेला ऋष्यशृंग राज्यात आला. रोमपादने आपली कन्या शान्ता हिचा विवाह त्याच्याशी करुन दिला. ऋष्यशृंगने राज्यात पाय ठेवताच तेथे नेहमीप्रमाणे पाऊस पडू लागला.

पांडव अशाप्रकारे अनेक तीर्थांना भेटी देत राहिले. ते महेन्द्र पर्वताजवळ पोचले. तेथे अकृतवर्णने धर्मराजाला परशुरामाची गोष्ट सांगितली. हयवंशज कार्तवीर्याने दत्तात्रय





करून वर मिळवून हजार हात मिळवले. शक्तीच्या मदाने आंधळा होऊन त्याने खूप धुमाकूळ घातला. एकदा कार्तवीर्य परशुरामाचे पिता जमदग्नी यांच्या आश्रमात आला. आश्रमाचा विध्वंस करून तो हेमधेनू पकडून घेऊन गेला. आश्रमात परत आल्याबरोबर त्याला ही बातमी कळली अन् त्याने युद्ध करून कार्तवीर्यला मारून टाकले. जमदग्नी एकटे असलेले पाहून कार्तवीर्यच्या पुत्रांनी आश्रमात प्रवेश केला आणि सुडबुद्धीने त्यांचा गळा कापून निघून गेले. यानन्तर परशुरामाने एकवीस वेळा विश्वभ्रमण करून पृथ्वी निःक्षत्रीय केली. अशा तऱ्हेने त्यानेही आपली सूडाची तहान भागवली.

पांडव प्रभास तीर्थी पोचल्यावर कृष्ण-बलराम आणि काही यादव ही खबर ऐकून त्यांना भेटायला आले. यादवांनी पांडवांना मोठ्या विश्वासाने सांगितले की युद्धात पांडव नक्कीच कौरवांचा अन्त करून सिंहासनावर बसतील.

यादव द्वारकेला परतल्यावर पांडवांनीही आपली तीर्थयात्रा पुढे सुरु केली. शेवटी ते गन्धमादन पर्वतावर पोचले अन् तेथेच अर्जुनाची प्रतीक्षा करत थांबायचे ठरवले. तो महापवित्र असा प्रदेश होता. सर्व पुण्यस्थलांतले उत्तम असे पुण्यस्थळ. तेथे पांडवांना नरकासुराच्या हाडांचा ढीग दिसला.

गंधमादनवर पोचता पोचताच जोरदार वारा पाहू लागून धूळ उडाली. सर्वत्र अंधःकार पसरला अन् जोरदार पाऊस पडू लागला, विजा चमकू लागल्या. आपल्या रक्षणासाठी ते सैरावैरा धावले. सकाळपर्यन्त पाऊस थांबला, वातावरणही शान्त झाले. परन्तु पायी चालल्याने अन् जोरदार पावसामुळे थंडीने कापत असलेली द्रौपदी शुद्ध जाऊन खाली कोसळली. नकुलने झटकन तिला आधार दिला नाहीतर खालच्या दगडांवरच ती आदळली असती. तिचे मस्तक आपल्या मांडीवर घेऊन धर्मराज बराच वेळ रडत राहिला. सर्वांनी तिची सेवा-शुश्रूषा केली. रस्ता दगधोंड्यांनी आणि काट्या कुट्यानीं भरलेला असल्याने पुढे जाणे अशक्य होते. तेव्हां भीमाने आपला पुत्र घटोत्कच याचे स्मरण केले. तो आपल्या राक्षससेनेसह तेथे आला. स्वतः घटोत्कचाने द्रौपदी व पांडवांना खांद्यांवर बसवले. बाकी सर्वांना अन्य राक्षसांनी उचलले व वेगाने ते पुढे जाऊ



लागले. कैलासजवळच्या बदरिकाश्रमी पोचल्यावर सर्वजण खांद्यांवरून खाली उतरले. जवळून गंगा वाहत होती. सर्वांनी तिच्या पाण्यात स्नाने केली. तेथील मुनिगणांनी पांडवांना कंदमुळे फळे इ.देऊन त्यांचा अतिथिसत्कार केला.

सहा दिवस तेथेच राहिल्यावर एकदा हवेतून एक दिव्य सुगन्ध आला अन् अचानक पांडवांच्या मध्ये अेक अपूर्व असे फूल येऊन पडले. ते अत्यन्त सुंदर असून त्याचा सुगंधच सर्वत्र पसरत होता ते आपल्या हाती घेत द्रौपदी भीमाला म्हणाली, ''हे मी धर्मराजाला देणार. असली फुलं घेऊन जाऊन आपण काम्यकपनात सुरक्षित ठेवू. माझ्या साठी आणखी फुलं शोधून आणता?''

द्रौपदीची इच्छा की पूर्ण करण्यासाठी भीम तेथून निघाला. हातात धनुष्य बाण घेऊन ज्या दिशेने सुगन्ध आला, त्या दिशेला तो जात राहिला. कोकिलांचे कूजन, भ्रमरांची गुणगुण आणि लहान लहान धबधब्यांच्या धारेचा आवाज त्याचे मन उल्हसित करत होते. वाटेत रस्ता अडवणारी झाडे कापून दूर करत, मधे मधे आरोळ्या ठोकत तो पुढे जात राहिला. एका ठिकाणी त्याला एक मोठी केळ्यांची बाग दिसली. त्या झाडांमधून वाट काढत त्याने पुन्हा एकदा आरोळी मारली ती ऐकून जलपक्ष्यांचा एक कळप आकाशात उंच उडाला. त्या पक्ष्यांना पाहून तेथे पाणी असल्याचे भीमाने ओळखले. त्या दिशेने जाऊन तो एका सरोवराच्या किनारी पोचला.

भीमाने प्रथम सरोवरात स्नान करून आपले शरीर शीतल करून घेतले. नंतर केळ्यांच्या बागेतून थोडा पुढे गेला. पुन्हा एकदा दंड थोडून त्याने सिंहनाद केला, आरोळी ठोकली. या जागेत हनुमान होता. हे गर्जन भीमाचे असल्याचे त्याने ओळखले. भीमाची भेट होणार म्हणून त्याला फार आनन्द वाटला. तो मुद्दामच भीमाच्या वाटेवर आडवा पसरला अन् आपली शेपूट त्याने अेकाद्या झेंड्यासारखी उंच उचलून धरली. नंतर त्याने एक टाळी वाजवून चारी दिशा दुमदुमून टाकल्या.

ते आवाज ऐकून भीम हनुमानाजवळ आला.



# चान्दोबाच्या बातम्या

## हत्तींसाठी रेडियो कॉलर

जंगलात फिरणाऱ्या हत्तींवर नजर कशी ठेवता येईल? नेहमी त्यांच्याबरोबर रहाता वा फिरता तर येणार नाही. यासाठी त्यांच्या गळ्यात आता लहानशा रेडियो-साधनाने युक्त अशी कॉलर किंवा पट्टा बांधण्यात येत आहे. या रेडियोचा रिमोट कंट्रोल अर्थात पर्यवेक्षकाकडे असणार. त्यामुळे पर्यवेक्षण सोपे होत आहे. नुकतेच बंगालच्या जल्दपारा प्राणी अभयारण्यात असे आढळले की, एक हत्तीण आपल्याबरोबर, हत्तींचा एक कळप घेऊन जात आहे! तेव्हा एका हत्तीला मादक औषध पाजून व त्याच्या गळ्यात असा पट्टा बांधून त्याला सोडले. सर्व हत्ती त्याच्या मागोमाग परत आले. यामुळे वन्य प्राणी शाखेच्या अधिकाऱ्याला त्यांच्यावर नजर ठेवणे सोपे झाले. अशाप्रकारे आतापर्यंत पाच वेळा कॉलरचा अुपयोग करण्यात आला आहे. पण यापूर्वी जे हत्ती निरनिराळे रहात होते त्यांच्या गळ्यात असे पट्टे बांधले गेले.

## सुंदर अुंट

'बिंटी होमलोल मधे एक अुंट ३,९०,००० अमेरिकन डॉलर्सना खरीदला गेला (जवळ जवळ १.३७ कोटी रुपये). अरबांचा गल्फ देशांत अुंटांच्या दौडीच्या स्पर्धा ही प्रसिद्ध क्रीडा आहे. ओमनमधेच असे खूपसे अुंट आहेत की, जे खूप वेगाने पळू शकतात. येथील सर्वसाधारण एका अुंटाची किंमत ८०० डॉलर असते. आतापर्यन्त सर्वात अधिक किंमतीला खरीदल्या गेलेल्या अुंटाची किंमत २,६०,००० इतकी आहे. परन्तु 'बिंटी' ३,९०,००० ला खरीदला गेला. त्याची खरेदी करणारा माणूस युनायटेड अरब एमिरेट्स्चा एक अज्ञात व्यापारी आहे. त्याचे म्हणणे असे की हा अुंट सर्वात अधिक वेगाने पळू शकणारा आहे. त्यामुळेच तो असे म्हणत फिरत असतो कि हा 'सुंदर अुंट' असून मी त्याचा मालक आहे.

## भारतीय चित्रांना सर्वाधिक मूल्य

'साअुथबीस ऑक्शन कंपनी' ही लंडनची सुप्रसिद्ध लिलाव करणारी कंपनी आहे. ऑक्टोबर ८ रोजी येथे भारतीय चित्रकारांच्या १५० चित्रांचा लिलाव झाला. केरळचे सुप्रसिद्ध चित्रकार राजा रविवर्मा (१८४८-१९०६) यांच्यापासून ते आजचे सुप्रसिद्ध भारतीय चित्रकार एम.एफ. हुसेन यांच्या पर्यन्तची अनेक चित्रे येथे प्रदर्शित झाली. त्या दिवशी विकलेल्या दहापैकी आठ चित्रे तर रविवर्माचीच होती. एका चित्राची ठरलेली किंमत होती २,२०,००० रुपये. पण लिलावात ते १४,१६,८०० ला विकले गेले. त्यांची बाकीची सात चित्रे ११,२०,००० रुपयात विकली गेली. रवीन्द्रनाथ टागोर यांचे एक चित्र ९,१३,००० रु. ना विकले गेले. हुसेनचे एकही चित्र तितक्या किंमतीला गेले नाही. विशेष गोष्ट अशी की ही सारी चित्रे खरीदणारे अन्य कोणी नसून तेथे रहाणारे भारतीयच आहेत.

## मॅक पोलिसमन

कॅलिफोर्नियाच्या सॅन जोन पोलिस विभागाचा एक रोबोट पोलिसमॅन आहे 'ऑफिसर मॅक'. इतर पोलिसवाल्यां प्रमाणे यानेही ऑक्टोबरच्या आरंभी आपले पद ग्रहण केले. 'मॅक' रस्त्या रस्त्यातून फिरत लोकांना 'अपराध कसे टाळावे' याबद्दल सांगत असतो.





'चांदोबा' पुरवणी - ९७

भारताची वृक्षसंपदा

# बेल

आपल्या देशात पवित्र मानल्या जाणाऱ्या वृक्षांमधे बेलाचे खूप महत्व आहे. शिवपूजेसाठी याच्या पानांचा अुपयोग केला जातो. याची पाने मऊ व जाड असतात. शिव-मंदिरांच्या प्रांगणात व मोठ् मोठ्या अुद्यानातून ही झाडे लावली जातात. ती अगदी सहज, आपली आपण वाढू शकतात. याचे फळही पवित्र मानले जाते. ते समृद्धी व संपदेचे चिन्ह मानले जाते. त्यामुळेच याला 'श्रीफळ' असेही म्हणतात. हिन्दी, मराठी, बंगाली भाषेत याला 'बेल' म्हणतात. गुजराथीत 'बिली', तमिळ व मल्याळीत 'बिल्व' असे म्हणतात. तेलगुत 'बिल्व-वृक्ष' किंवा 'मारेडु' म्हणतात.

नेहमीच हिरवेगार दिसणारे हे बिल्व-वृक्ष दहा मीटर पर्यंत अुंच वाढतात. झाडाची साल जाड व काटेरी असते, फांद्यांना गाठी असून त्या वाकड्या-तिकड्या असतात. थंडीत याची पाने झडतात. वसंत सुरु होताच पुन्हा पालवी फुटते.

याच्या कोमल हिरव्या-पांढऱ्या फुलांना सुगंध असतो. फळाचे साल कडक असून आतील गर खाल्ला जाऊ शकतो. वाळलेल्या गरात साखर घालून तो ताकात मिसळून स्वादिष्ट पेय बनवले जाते. बेलाची फळे, पाने, साल व मुळातही औषधी गुण असतात. भारतात सर्वत्र ही झाडे आढळतात.

संत्री, लिंबू यांच्याप्रमाणे बेलफळही सायट्रस जातीत सामावले जाते.



आपल्या देशातील ऋषि-मुनि

# अस्तिक

मनसादेवी व जरत्कारु यांचा अस्तिक हा पुत्र होता. च्यवन ऋषींजवळ याने विद्याभ्यास केला. मनसा कश्यप मुनींची कन्या होती. त्यांचा सर्पावर मोठाच अधिकार होता. एकदा सर्प घोर संकटात सापडले.

अर्जुनाचा नातू परीक्षित एकदा शिकारीसाठी अरण्यात गेला. तेथे तो ज्या मृगाचा पाठलाग करु लागला, तो शमिक मुनींच्या आश्रमाकडे गेला. तेथे जाऊन राजाने त्या मृगाबद्दल विचारणा केली. परन्तु ध्यानमग्न मुनींनी त्याच्या प्रश्नांना उत्तरे दिली नाहीत. रागाने मानसिक संतुलन बिघडून राजाने जवळच पडलेला मृत सर्प उचलून तो मुनींच्या गळ्यात घातला. शमिकांचा पुत्र शृंगीने हे दृश्य पाहिले, तेंव्हा क्रोधाने त्याने शापवचन उच्चारले की, 'हा अहंकारी राजा सात दिवसांच्या आत सर्पदंशाने मरेल.'

परीक्षितला हे कळल्यावर त्याला आपली चूक कळून चुकली. सापापासून वाचण्यासाठी त्याने साप आत पोचूच शकणार नाही असे एक भवन बनवले व त्यात तो राहू लागला. भवनाच्या चारी बाजूंना पहारेकरी डोळ्यात तेल घालून पहारा देऊ लागले. तरीही तक्षक नावाच्या सापाने अळी बनून एका फळात प्रवेश केला. इतर फळांबरोबर ते फळ भवनात पोचले. सातव्या दिवशी ते फळ खाण्यासाठी कापले, तेंव्हा अळी पुन्हा सर्प बनून राजाला डसली व त्याला तक्षकाने यमसदनास पाठवले.

तक्षकाच्या य कृतीने परीक्षित-पुत्र जनमेजय याने रागाने सर्पवंशाचाच नायनाट करण्यासाठी सर्पसत्र-यज्ञ आरंभला. मुनींच्या मन्त्रपठणामुळे जागोजागचे सर्प येऊन होमकुंडात मरु लागले. तक्षक घाबरून इन्द्रसिंहासनाला चिकटून बसला. तरीही मन्त्रप्रभावाने सिंहासनासीत इन्द्रासह तक्षक होमकुंडाकडे खेचला जाऊ लागला.

हे दृश्य पाहून देव भयभीत झाले. ते सर्वजण मनसादेवीकडे गेले व आपणाला या विपत्तीतून वाचवण्याची तिला विनन्ती केली. मनसेने आपला पुत्र अस्तिक याला पाठवून सर्पसत्र थांबवण्यास सांगितले.

अस्तिक जनमेजयाजवळ गेला. मुनिकुमाराने आपली प्रतिभा व विवेकाने जनमेजयाला आपणाकडे आकर्षित करून घेतले. त्याच्या बोलण्याने प्रसन्न झालेल्या जनमेजयाने त्याला वर देऊ केला. अस्तिकाने सर्पयज्ञ तेथेच थांबवण्याचा वर मागितला. जनमेजयाला यज्ञ थांबवावाच लागला. तक्षक व बाकीचे साप वाचले. काही लोकांचा असा समज आहे की, 'अस्तिक, अस्तिक' असे म्हटले की माणूस सर्पदंशातूनही वाचतो.





# तुम्हाला माहीत आहे काय?

१. 'वंदेमातरम्' गीताचे रचयिता कोण?
२. जगात सर्वात लहान स्वतन्त्र देश कोणता?
३. सूर्याभोवती किती ग्रह फिरत असतात?
४. इंग्लंडला बाकीच्या युरोपपासून निराळे करणाऱ्या कालव्याचे नाव काय?
५. भारताचे राष्ट्रीय पुष्प कोणते?
६. 'मिकी माऊस' व 'डोनाल्ड डक' यांचा उत्पन्नकर्ता कोण?
७. विदेशी वस्तूंवर आकारण्यात येणाऱ्या कराला काय म्हणतात?
८. अमेरिकेच्या करन्सीचे नाव काय?
९. नर्सच्या पेशाचे स्थापक कोण?
१०. भारतीय संसदेच्या दोन्ही सभांची नावे कोणती?
११. बुद्धिबळांच्या पटावर किती चौकटी असतात?
१२. सूर्यकिरणांपासून मिळणारे व्हिटेमिन कोणते?
१३. सर्वात अधिक सोने कोणत्या देशात सापडते?
१४. पांढऱ्या झेंड्याचा उपयोग कोणत्या स्थितीत केला जातो?
१५. सौरमंडलातील सर्वात मोठा ग्रह कोणता?
१६. 'नायटिंगेल ऑफ इंडिया' कोणाला म्हटले जाते?
१७. सर्वात अधिक उंचीचा प्राणी कोणता?
१८. ऑलिंपिक क्रीडा किती वर्षांतून एकदा घेतल्या जातात?

## उत्तरे

१. बंकिमचन्द्र चटर्जी.
२. रोममधील व्हॅटिकन सिटी.
३. पृथ्वीसह नऊ.
४. इंग्लिश चॅनेल.
५. कमळ.
६. वॉल्ट डिस्नी.
७. कस्टम ड्यूटी.
८. डॉलर.
९. फ्लरिन्स नाइटिंगेल.
१०. लोकसभा व राज्यसभा.
११. ३२ काळ्या व ३२ पांढऱ्या.
१२. व्हिटेमिन डी.
१३. दक्षिण आफ्रिका.
१४. तह करण्यासाठी.
१५. गुरु ग्रह.
१६. सरोजिनी नायडू.
१७. जिराफ.
१८. चार वर्षांतून एकदा.

# पंचवीस पैशांना चप्पल

चन्द्रभानु हा कनकपुरचा रहिवासी. भांडी खरेदीसाठी तो निघाला त्याच्या चपला जुन्या झाल्यामुळे एका चपलेचा अंगठा वाटेत तुटला. 'बाजारात जातोच आहोत तर नव्या चपलाही घेऊ' असा त्याने विचार केला.

वाटेत एक जुने देऊळ होते. तेथून जवळच असलेल्या दुकानात चप्पलजोड ओळीत लावून ठेवलेले होते. त्या पाहून चन्द्रभानुने ठरवले की बाजारात जाताजाता इथेच चपला खरीदाव्या. दुकानच्या समोर जाऊन तो उभा राहिला. तिथे एका फळीवर लिहिले होते - ''चप्पल जोड २५ पैसे'' त्याला फार आनंद वाटला की, 'ज्याची खरी किंमत दहा रुपये तरी असायला हवी, असा चप्पल जोड इथे पंचवीस पैशात मिळतोय. फारच स्वस्त आहेत की!' त्यापैकी आकर्षक दिसणारा जोड निवडून त्याने चपला पायात घालून पाहिल्या. आकार, रंग अन् मापाच्या दृष्टीने छानच होत्या त्या.

खिशातून पंचवीस पैसे काढून चन्द्रभानु दुकानदारापुढे करू लागला तेंव्हा त्याच्याकडे संशयाने पहात दुकानदार म्हणाला, ''या चपला तुमच्या नाहीत! त्या पराशरच्या आहेत. तुम्ही तर चपला इथे ठेवल्याच नाहीत.''

इतक्यात पराशर तिथे आला अन् चन्द्रभानुवर रागवत म्हणाला, ''अगदी दिवसाढवळ्या चोरी, अन् ती ही देवळासमोर?''

चपलेतून पाय काढत चन्द्रभानु म्हणाला, ''मी चोर नाहीय महाराज ! ही फळी पहा. हिच्यावर चक्क लिहिलंय की 'चप्पलजोडीचे पंचवीस पैसे.' 'चप्पल जोडी संभाळण्यासाठी पंचवीस पैसे' असे लिहिलं असतं, तर माझ्या हातून चूक झाली नसती. नीट शिक्षण झालं नसलं, म्हणजे अशी चूक होते.''

पटकन आपल्या चपला घालत पराशर म्हणाला, ''हो हो, नीट न शिकलेल्यांकडून अशी चूक होतेच, पण चांगले सुशिक्षित असूनही पंचवीस पैशात चप्पल खरीदू इच्छिणाराकडून अधिक चूक होते.''

**रोहित ब्रह्मे**







# अमावास्येची भुतं

**को**मल अन् सुकुमारी यांचं नुकतंच लग्न झालं. कोमलचे आईबाप त्याच्या लहानपणीच वारले होते. आजीनं त्याला वाढवला. पण त्याचे चार हात झालेले पहायला काही जगली नाही बिचारी! तिच्याकडून कोमलला दहा एकर सुपीक शेतजमीन मिळाली होती. तिच्या आधारे त्याचे दिवस मजेत जात.

सुकुमारीही सुखानं नांदू लागली. ना कोणाचा दबाव, ना कसल्या जबाबदारीचं ओझं! अगदी स्वतंत्र, बंधनमुक्त होती ती. आणि शेजारचं घर भाड्यानं घेऊन मंथरा तिथं रहायला आली! सुकुमारीचा सुखी संसार तिला पहावेना! पति-पत्नीत भांडण लावायचा तिनं विडाच उचलला.

''तुझा नवरा तर नोकरी करत नाही. शेती-वाडीचं कामही दुसऱ्यांकडूनच करून घेतो. मग कमीत कमी तुला स्वयंपाकात मदत करायला काय हरकत आहे?'' मंथरा नेहमी सुकुमारीचे कान भरी.

''मला कळत नाही, तुझा नवरा असा अन्याय का करतो तुझ्याशी! लग्नाला वर्ष झालं; पण सोन्याच्या बांगड्या किंवा किमानपक्षी कानात कुड्या तरी बनवल्या तुझ्यासाठी? मला तर वाटतंय की त्याचं प्रेमच नाही तुझ्यावर !'' सुकुमारीला असं चिथावलं तरी स्वत: मंथरा मात्र प्रत्येक सणावारी फक्त एक मोत्यांची माळच घाली. - होतंच काय तिच्याजवळ?

''तुझ्या बापाला हुंडा द्यायची ऐपत नव्हती, म्हणून कोमलशी लग्न झालं तुझं! नाहीतर तुझ्यासारख्या सुंदर मुलीशी एखादा लहान-मोठा जमीनदार सहज लग्नाला तयार झाला असता!'' कपडे वाळत घालत असलेल्या सुकुमारीला मंथरा म्हणे.

मंथरेच्या बोलण्याचा सुकुमारीवर प्रभाव पडू लागला. तिच्या बोलण्याचा आंतरिक हेतु

**आशा डेकणे**



समजण्याइतकी अक्कल नव्हती सुकुमारी-जवळ. त्यामुळे ती आता वारंवार कोमलशी भांडू लागली; तोंडाला येईल ते बोलू लागली. तिच्या दृष्टीत नवऱ्याची किंमत कमी होऊ लागली. सकाळी उठल्यापासून काही ना काही कारणाने तिची कचकच चालू होई, ती म्हणे, 'हं, आपली मिळालीय मोलकरीण अन्नावारी राबायला!' धुणीभांडी वगैरे कामाला विहिरीशी गेलं की मंथरा असेच आगीत तेल ओतायला. कोमल जेवायला बसला की सुकुमारी आदळआपट करत त्याला वाढताना तोंडाचा पट्टा सोडी, ''हो, आयतं मिळतंय चारी ठाव गिळायला! ना काम, ना धाम!''

शेतावरून कोमल परत आला, की सुकुमारी म्हणे, ''होऽ! आले ना बारा गड्यांचं काम उरकून! अंगाला, कपड्यांना कुठं मातीचा डाग तरी पडलाय का? नोकरांनी कामं करावीत अन् आपण बसावं चंकाट्या पिटत! म्हातारीनं आयती इस्टेट ठेवलीय नं!''

घरात सुख-समाधान नावालाही राहिले नाही. एके दिवशी मंथराचं बोलणं आठवत राहिल्यानं तिला झोप येईना. कोमल मात्र शेजारी घोरत आरामात झोपला होता.

त्याच्या आवाजानं त्रासून सुकुमारीनं त्याला उठवून म्हटले, ''तुम्ही इतक्या जोरानं का घोरता? मला झोप येत नाहीय. कुठे बाहेर निघून जाऊ का मी?''

मध्यरात्री बायकोनं केलेल्या असल्या आरोपामुळे कोमल चिडून ''बाईची जात तुझी ! अंधारात कुठे जाशील एकटी? मीच जातो त्यापेक्षा,'' अस म्हणून घराबाहेर पडला.

बायकोचा भांडखोर स्वभाव कोमलला आवडेना. दुःखी होऊन चालता चालता तो गावाबाहेर जंगलात केव्हा आला हेही कळलं नाही त्याला. अमावस्येमुळे सर्वत्र मिट्ट काळोख होता. आता घराकडे परतावं असा विचार त्याच्या मनात आला. इतक्यात एका वडाखाली काही मशाली जळत असलेल्या त्याला दिसल्या. स्वच्छ प्रकाश होता तिथे. कोमल तिकडे वळला. तिथे मशालींच्या उजेडात चार भुतं काही करमणुकीच्या कार्यक्रमात मग्न होती. 'भांडखोर बायकोच्या भीतीपुढे भुतांना काय मोजायचं?' - असा विचार करून कोमल पुढे झाला.

भुतांचा नायक किचकिच आवाजात सांगत होता, ''तुम्ही सगळं नीट ऐका. आपल्या चारांपैकी जो बाकी तिघांना खूप



हसवेल त्याला एक विशेष बक्षिस मिळेल.

लगेच एका भुताने गाणे म्हटले. दुसरं भूत आपले पाय पसरत अन् ते हवेत उडवत गात राहिला. तिसऱ्याने एक विनोदी गोष्ट सांगितली. त्यांच्या या कार्यक्रमात कोमलला विशेष मजा वाटेना. त्याला झोप अनावर होऊ लागली. जांभई देत तो आपला जवळच्याच दुसऱ्या वडाखाली खोडाला टेकून झोपून गेला. लगेच त्यानं घोरायलाही सुरुवात केली.

त्या आवाजानं क्षणभर भुतं थोडा वेळ दचकून गप्प झाली. मग जेंव्हा त्यांनी इकडेतिकडे पाह्यला सुरुवात केली तेंव्हा घोरत असलेला कोमल त्यांना दिसला. हळूहळू ती त्याच्याजवळ गेली. घोरताना त्याच्या मिशा वर-खाली हलत होत्या. माठासारख्या आकाराचं त्याचं पोट अन् घोरण्याचा आवाज ऐकून त्यांना हसू येऊ लागलं. त्यांच्या हसण्यानं कोमल जागा झाला. भुतांचा नायक त्याला म्हणाला, ''दर आवसेच्या रात्री आम्ही इथं करमणुकीचा कार्यक्रम करतो. आजच्या कार्यक्रमाचा विजेता तूच आहेस. आम्हा सर्वांना खूप हसवलंस तू.'' असे म्हणत एक काळी टोपी नायकाने कोमलच्या डोक्यावर ठेवली; अन् भुतं अदृश्य झाली.

बायकोवरचा राग आता जरा शान्त झाल्याने कोमल घराकडे निघाला. पोचता-पोचता सकाळ झाली. त्यावेळी सुकुमारी घरासमोर रांगोळी काढत होती. कोमलला पाहून ती गप्प राहिली, पण मनातल्या मनात ती विचार करू लागली की, 'रात्रीच्या आपल्या मूर्खपणाबद्दल क्षमा कशी



मागावी?''

''अग वेडे, शत्रू आणि दोस्तमंडळींच्यात हे क्षमा-प्रकरण चालतं. नवरा-बायकोमधे त्याला कसलं स्थान?'' कोमल एकदम म्हणाला.

आपल्या मनातला विचार कोमलला कसा कळला याचं सुकुमारीला आश्चर्य वाटलं.

कोमल म्हणाला, ''मलाही आश्चर्य वाटतंय याचं.''

सुकुमारीच्या मनात आलं, 'कोमलच्या डोक्यावर ही काळी टोपी कसली?'' पण कोमलला हा ही विचार समजला अन् त्यानं टोपी काढली. आता त्याला सुकुमारीच्या मनातलं काही कळेना. त्याला समजायला वेळ नाही लागला की 'हीच तर भुतांची अद्भुत भेट!' आनन्दानं त्यानं बायकोला सर्व



काही सांगितलं.

क्षणभर विचार करून सुकुमारी कोमलला म्हणाली, ''आपल्याला हो काय या टोपीची गरज? त्यापेक्षा राजालाच नेऊन द्या ती. त्यांना आपला शत्रू कोण, मित्र कोण हेही कळत नाही असं म्हणतात. टोपी त्यांनाच चांगली अुपयोगी पडेल नं?''

''वा, वा सुकुमारी! बायको असावी तर अशी! तुझ्यासारखी राजभक्ती इतर सर्वांच्यात असती तर किती छान! राजाला हेर अन् अंगरक्षकांवर कित्ती खर्च करावा लागतो. टोपी मिळाली तर हा खर्च वाचेल की!'' असे म्हणून कोमल ताबडतोब राजाकडे गेला. टोपीचं महात्म्य सांगत ती राजाला देअून तो परत निघाला.

राजाने कोमलला थांबवत म्हटलं, ''शाब्बास! तुझी राजभक्ती अजब आहे! तुझी भेट तर अमूल्य आहे. पण तुला काही दिल्यावाचून कसा परत पाठवू?'' अन् कोषाध्यक्षाला बोलावून मोहरांची एक थैली राजाने कोमलला दिली.

घरी आल्यावर कोमलनं मोहरा सुकुमारीच्या पुढ्यात ओतल्या. ती हर्षानं म्हणाली, ''इतकं धन? आता असं करा. व्यापार जाणणाऱ्या तुमच्या काही मित्रांचा सल्ला घेअून एखादा व्यापार सुरू करा. कामाला लागलात की हे ढेरपोटही थोडं कमी होईल अन् घोरायची सवयही जाईल.'' कोमलला हा सल्ला आवडला.

इतक्यात महिन्यापूर्वी आपल्या बहिणीच्या लग्नाला गेलेली मंथरा परत आली. सुकुमारीचं बदललेलं भाग्य पाहून ती अवाक् झाली. तरीही आपल्या बुद्धि-चातुर्याचा अुपयोग करून तिनं सुकुमारी कडून 'अमावस्येच्या भुतांची गोष्ट' माहीत करून घेतलीच.

त्याच रात्री तिनं आपला नवरा भीरू याला कोमलच्या भाग्याचा किस्सा सांगितला अन् त्याला म्हणाली, ''आजही आवसच आहे. तुम्हीही जंगलात जाअून कोमलसारखे घोरायला लागा. भुतं संतुष्ट झाली की कोमलसारखी दुसऱ्याचं मनं कळणारी टोपी नका आणू. त्यांच्याकडून स्वतःला अदृश्य करता येण्यासारखी टोपी मागून आणा. ती डोक्यावर ठेवून सरळ राजवाडा गाठा. अदृश्य रूपात खजिन्यातल्या मूल्यवान वस्तु लुटून आणा. राणी आठवड्यातल्या दर दिवशी निराळे दागिने घालते. तेही आणायला विसरू नका हं!''





बिचाऱ्या भीरूचा चेहरा अुतरला. तो म्हणाला, ''मला नाही घोरता-बिरता येत!''

मंथरा रागावून म्हणाली, ''माणसाला काहीही अशक्य नसतं फक्त प्रयत्न हवा करायला. जाअून प्रयत्न करा. नक्की व्हाल सफल.''

मंथरेनं सांगितल्याप्रमाणे भीरू जंगलात गेला. झाडामागून त्यानं भुतं पाहिली अन् भीतीनं थरथर कापत तो अेकदम ओरडला. दुसऱ्याच क्षणी भुतं त्याला घेरून म्हणाली, ''अरे नालायका! आमच्या गमतीत विघ्न आणलंस बघ!'' अन् रागावून त्याच्याकडे पाहू लागली.

भीरू घाबरत म्हणाला, ''ओरडलो नाही मी! तो घोरायचा आवाज होता.'' हे ऐकून भुतं खदाखदा हसू लागली. त्यांचा नायक भीरूची तारीफ करत म्हणाला, ''तूही गंमतीशीरच दिसतोस की! पण आता सांग, अमावस्येच्या या अंधारात इकडे कशाला आलास?''

अजूनही भीत असलेला भीरू गडबडत म्हणाला, ''अदृश्य पोटी मागायला.''

त्याच्या बोलण्याचं भुतांना आश्चर्यच वाटलं अन् ती आणखीच हसू लागली. त्यांचा सरदार भीरूची पाठ थोपटत म्हणाला, ''वा, वा! काय वाक्‌चातुर्य तुझं! तू तर जन्मापासनंच विनोदी असावास. माणसा, आता सांग, ही पोटी म्हणजे काय?''

आतापर्यंत भीरूची भीती गेली होती. तो म्हणाला, ''मला टोपी म्हणायचं होतं; टोपी. अदृश्य टोपी!''

''ओहो! असं होय?'' असं म्हणत



सरदारानं हवेत हात हलवला अन् एक पांढरी टोपी त्याच्या हाती आली. ती भीरूच्या डोक्यावर ठेवत तो म्हणाला, ''मानवा! खूप हसवलंस आज आम्हाला. पुढल्या अमावस्येला ये पुन्हा.'' अन् भुतं एकदम वटवाघळं बनून हवेत अुडून गेली.

खूप आनन्दानं भीरू तिथून निघाला. सकाळपर्यन्त राजवाड्यात पोचला तो. टोपीमुळे कुणाला न दिसता तो सरळ पहारेकऱ्यांच्या नजरेसमोरून जाअू शकला. त्याने खजिन्यात प्रवेश केला. तिथे रत्नं, मोती, मोहोरा यांचे ढीग होते. ते सर्व एका पोत्यात भरून अन् खांद्यावर लादून तो अंतःपुरात पोचला.

राजा-राणी आपापल्या मंचकावर झोपले होते. दोघांही गाढ झोपेत होते. एका

कोपऱ्यातल्या मेजावर राणीचे सातही दिवसांचे दागिने नीट रचून ठेवले होते, अन् तिथेच राजाचा मुकुटही होता. भीरूने सारे दागिने पोत्यात टाकले. जाताजाता तो विचार करू लागला, 'मंथरेच्या अकलेमुळे इतके दागिने मिळाले, तिच्याजवळ राणीचे दागिने असतील, तर मला राजाचा मुकुट का नको?' त्याने मुकुट उचलून अदृश्य टोपीवर दाबून बसवला अन् मोठ्या ऐटीत बाहेर पडला.

सवय नसल्यानं त्याला वाटलं की मुकुट फार वजनदार आहे. त्याने तो काढून हातात घेतला. राजवाड्याच्या महाद्वारातून जाऊ लागताच पहारेकऱ्यांनी त्याला पाहिले अन् ते ओरडू लागले. ''अरे, इतकी हिम्मत तुझी? खुशाल राजाचा मुकुटच चोरून नेत आहेस?'' त्याला पकडून, बांधून त्यांनी राजासमोर उभा केला.

भीरू थरथर कापू लागला. मुकुट काढताना त्याला चिकटून अदृश्य टोपीही डोक्यावरून निघाल्याचं त्याच्या लक्षात आलं. तो रडू लागला अन् मनातल्या मनात मंथरेला शिव्या देऊ लागला.

भीरूचे एकूण हावभाव पहाता, राजानं ओळखलं की याचा 'बोलविता धनी' दुसराच कोणी असणार. त्यानं कोमलनं दिलेली टोपी डोक्यावर ठेवली अन् खरी गोष्ट त्याला कळून चुकली.

ताबडतोब सैनिकांना पाठवून राजाने मंथरेला आपल्या समोर हजर करायला सांगितलं. कडक स्वरात चौकशी केल्यावर तिचा लोभीपणा आणि कुबुद्धी सर्वांना कळून चुकली. राजानं दोघांना तसेच्या तसेच राज्य सोडून बाहेर जायला फर्मावलं.

सर्व हकीकत कळल्यावर सुकुमारी कोमलला म्हणाली, ''त्या अमावस्येच्या भुतांमुळे आपला संसार ठीकठाक झाला. मंथरा नेहमी तुमच्याबद्दल माझ्या मनात वीष ओतत राहिली अन् माझं मन तिनंच कलुषित केलं.

डोकं हलवत कोमल म्हणाला, ''बघ सुकुमारी, ऐरी-गैरी माणसं बोलतात तेंव्हा त्यांच्यावर विश्वास ठेवू नये. अविवेक नावाची भुतं जोवर आपल्याच मनात ठाण मांडून बसतात, तोवर मंथरा नाहीतर आणखी कोणी चुगल्या करतच रहातं. आपणच विवेक संभाळावा हे बरं ना!''







# कारण

रघुनंदन मिश्रा अग्रहारच्या इतर रहिवाशांपेक्षा जास्त धनवान होता. पंधरा एकरांची सुपीक शेत-जमीन अन् दोन एकरात पसरलेली आमराई त्याच्या मालकीची होती. त्याला रुक्मिणी नावाची एकुलती एक मुलगी होती.

रुक्मिणी आता उपवर झाली होती. मिश्रा तिच्यासाठी स्थळे पाहू लागला. त्याची अशी इच्छा होती की, जावई काव्य-शास्त्र शिकलेला, सुंदर असावा. त्याला घरजावई करून घ्यायचाही मिश्राचा इरादा होता.

रघुनन्दन मिश्राच्या अपेक्षेप्रमाणे दोन-तीन युवक त्याला सापडले, पण घर-जावई बनून रहायला कोणीच तयार नव्हता. अशातच एकदा रुक्मिणी आपल्या आईबरोबर नात्यातल्या एका लग्नाला गेली. तिथे श्रीकान्त नावाच्या तरुणाशी तिचा परिचय झाला. इतरांच्या सांगण्याप्रमाणे श्रीकान्त विशेष श्रीमंत नव्हता, पण तो पंडित अन् व्यवहारी होता.

श्रीकान्त मुलीच्या मनात भरलाय हे आईने ओळखले अन् तिला खूप आनन्द वाटला. पण 'घर-जावई बनण्याची' अट आठवल्यावर ती काहीशी निराशही झाली. तरीही तिने श्रीकान्त जवळ त्याचे शिक्षण व पुढे काय करायचा इरादा आहे वगैरे चौकशी केली.

श्रीकान्त लगेच उत्तरला, ''माझ्या वडलांनी माझ्यासाठी दोन एकर जमीन ठेवली आहे. पण तिचं उत्पन्न कुटुंबाला पुरेसं होण्याइतकं नाहीय. आणखी काही कमाई करणं आवश्यक आहे. सर्वजण सल्ला देतायत की मी एकादं गुरुकुल सुरू करावं. मलाही ते योग्य वाटतंय.''

त्याचे उत्तर ऐकून रुक्मिणीच्या आईने लांब सुस्कारा सोडला अन् ती म्हणाली, ''तुम्हाला तर माहीत आहे, की आमचं-

सूर्यप्रकाश यादव

तुमचं बरंच दूरचं नातं आहे. पण शेवटी नातं ते नातंच! जवळचं असो वा लांबचं! माझ्या पतीनं मानलं, तर तुम्हाला जावई बनवायची इच्छा आहे माझी. तुम्ही माझ्या रुक्मिणीला पाहिलंच असेल.''

श्रीकान्त हसत म्हणाला, ''रुक्मिणीला पाहिलंय. तिचे वडील तर चांगले धनवान आहेत. त्यांना हवाय घरजावई. तुम्ही आमच्या दूरच्या नातेवाईक आहात, म्हणून जरूर मी अशा स्थळाच्या शोधात राहीन. मिळेलही कदाचित् कुठे!''

या गोष्टीला एक महिना झाला. रुक्मिणी व तिच्या आईने आग्रह धरला की श्रीकान्तशीच विवाह व्हावा. झक मारत रघुनन्दन मिश्राने थाटामाटाने लेकीचा विवाह श्रीकान्तशी करून दिला. पण 'ज्याने आपला घर-जावई बनायला नकार दिला, अशा माणसाचा चार चौघांदेखत अपमान करावा' अशी इच्छा मिश्राच्या मनात धुमसत होती. 'तसं झाल्यावरच आपल्या हृदयाची आग विझेल.'

लग्नानन्तर चार महिन्यांनी दिवाळीसाठी श्रीकान्त बायकोसह सासुरवाडीला आला. एका संध्याकाळी देवळाच्या मांडवात काही माणसे गप्पा मारत बसली होती. रघुनन्दनही त्यात होता. थोड्या वेळाने श्रीकान्त तेथे आला.

जावयाचा परिचय करून देत मिश्रा म्हणाला, ''सर्वजण म्हणतात, की माझा जावई मोठा विद्वान अन् विवेकी आहे. मलाही माहीत आहे ते. पण सर्वांसमोर हे सत्य प्रमाणित व्हावं असं वाटतंय मला!'' नंतर श्रीकान्तकडे वळून तो म्हणाला, ''तू विद्वान आहेस हे सर्वांना ठाऊक आहे. माझ्या काही प्रश्नांची उत्तरं दे बरं. प्रश्न पहिला असा-कधी-कधी आकाशात उडताना





बगळे मधुर आवाजात ओरडत जातात. का बरं असं?''

''त्यांना ही निसर्गाची भेट आहे.'' श्रीकान्त उत्तरला. ''लिंब अन् चिंचेची झाडं वसंत-ऋतूत पल्लवित होतात. याचं काय कारण?'' ''तीही निसर्गाचीच भेट आहे ''श्रीकान्त उत्तरला. ''रस्त्याच्या दुतर्फा जी झाडं असतात, त्यांच्या खोडाला गाठीच्या रूपात गोल गोळे दिसतात. याचं काय कारण?'' मिश्राचा पुढला प्रश्न होता. ''हे गोळेही नैसर्गिक रीत्याच बनतात.'' यावर हसून मिश्रा म्हणाला, ''विद्याहीन माणूसही माझ्या प्रश्नांची उत्तरं देऊ शकेल. पण आश्चर्य म्हणजे तुला बरोबर उत्तरं देता आली नाहीत. बगळ्यांच ओरडणं मधुर असतं. कारण त्यांची मान लांब असते. लिंब अन चिंचेच्या झाडांना वसंतात पालवी फुटते याचं कारण असं की, त्यांची मुळं जमिनीत खोलवर पसरलेली असतात. अन् रस्त्याच्या दोन्ही बाजूंच्या झाडांना गोळे दिसतात याचं कारण जनावरं आपली शिंगं त्यावर घासतात. कारणं तर अशी आहेत. पण तू म्हणतोयस की सर्वाचं मूळ निसर्गच आहे. तुझी ही उत्तरं मोठी विचित्र आहेत.''

यावर श्रीकान्त म्हणाला, ''बेडूक डरांव-डरांव करतात, ते काय त्यांच्या माना लांब असतात म्हणून करतात? बांबूंची झाडंही वसंतात पल्लवित होतात; त्यांची मुळं काय जमिनीत खोल रुजलेली असतात? अन् मामा, आपण क्षमा करत असाल तर एक विचारू? तुमच्या गळ्यावर जो इतका मोठा गोळा दिसतोय, तो काय जनावरांनी शिंगं घासल्यामुळे?''

हे ऐकून सर्वजण जोरात हसू लागले. रघुनन्दन मिश्राने आपली मान खाली घातली. त्याने प्रत्यक्षात जावयाची क्षमा न मागितली तरी त्याच्याशी आपली वागणूक बदलली. त्याला कळून चुकले की आपला जावई खरोखरच चांगला बुद्धिमान आणि हजरजबाबी आहे, व्यवहारी आहे. त्याने दिवाळसण खूप थाटामाटात साजरा केला. जावयाला सोन्याची साखळी, अंगठी व कपडे बनवून दिले. लेकीच्या अंगावरही दोन दागिने चढवून साडी-चोळी दिली. दोघे परत निघाल्यावर पुन:पुन्हा आपल्याकडे यायचे प्रेमाने आमंत्रणही दिले.



विशेष समाचार

# सर्वांना अन्नपुरवठा

**नो**व्हेंबर महिन्यात इटालीची राजधानी रोम येथे विश्व आहार महासभेचे आयोजन केले गेले. या सभेत जवळ जवळ १९० राष्ट्रांनी भाग घेतला. चाळीस देशांतून त्या त्या देशाचे अध्यक्ष हजर राहिले. आणखी चाळीस देशांतून त्या त्या देशाच्या प्रधानमन्त्र्यांनी हजेरी लावली. इतर देशांतून त्या त्या देशाच्या प्रतिनिधींनी या सभेत भाग घेतला.

जितकेजण सभेस अुपस्थित होते, त्या सर्वांचे एकमत होते की, संपूर्ण जगात कोणी अुपाशी राहू नये. या विषयाबद्दल अर्थात् कोणाचेच दुमत नव्हते, पण याबाबत मात्र त्यांच्यात मतभिन्नता होती की हे कधी शक्य होईल? भारताचे प्रधानमन्त्री श्री. देवेगौडा यानी आपले विचार मांडताना अशी इच्छा प्रकट केली की, सन् २००० त्या जानेवारीपर्यन्त हे काम पूर्ण व्हावे-जगात कोणीही यापुढे अुपाशी राहू नये. त्यांनी जगातील सर्व नेत्यांना विनन्ती केली की, येत्या तीन वर्षात या भूक-प्रश्नाचे निर्मूलन व्हावे.

भुकेच्या वेदनेपासून स्वत:चा बचाव करणे हा प्रत्येकाचा प्राथमिक हक्क आहे. रोममधील सभेने या मुद्याला दुजोरा दिला. जगात सध्या ऐंशी करोड जनता अुपाशी असते. या सभेने घोषणा दिली की येत्या वीस वर्षात ही संख्या अर्ध्यावर यावी. वीस वर्षांपूर्वी जी सभा घेतली गेली त्यातही जवळपास असाच ठराव केला होता. तरीही भुकेचा प्रश्न मिटला नाहीच. नेहमीच भुकेने लोक मरत असतात, हे कटु सत्य कोणी विसरु शकणार नाही. समजा, या ठरावाप्रमाणे जर निम्म्या संख्येची भूक भागली, तरी बाकीच्या ४० कोटी जनतेची भूक कधी भागणार? या प्रश्नाचे अुत्तर मिळणार नसेल, तर यापरती विटंबना ती काय? अन्न कमी का पडते? या प्रश्नाची अनेक अुत्तरे आहेत, कित्येक कारणे आहेत. जरुर तितके पीक न होणे, असलेले पीक सर्वांपर्यन्त न पोचणे ही मुख्य कारणे म्हणता येतील. वाढती लोकसंख्या, हे ही एक प्रमुख कारण आहेच.

आपल्या देशात सरकार रेशनिंग दुकानांद्वारा जनतेला वाजवी किमतीत धान्य पुरवठा करत असते. याद्वारे 'आर्थिक क्षेत्रात मागास लोकांना मदत करणे' हा मुख्य अुद्देश आहे. पण सर्वांना हे बरोबर माहीत आहे की या धान्य-पुरवठ्-याचे प्रमाण कमी आहे, बलहीन वर्गाच्या लोकांची गरज या प्रकारे पूर्ण होत नाहीय.

Food for all
WORLD FOOD SUMMIT

असे ही म्हणता येईल की 'पुरवठ्याचा योग्य अुपयोग न होणे' हाही प्रमाण कमी असण्याचे कारण असू शकते. असेही पहाण्यात आहे की, काही देशात-जिथे पीक दिवसेंदिवस जास्त येत आहे तिथे-हे पदार्थ समुद्रात फेकून दिले जात आहेत. जास्त किंमत मिळवण्यासाठी ते असे करत असतात. यांत त्यांचा केवळ व्यापारी दृष्टिकोण व स्वार्थ आहे.

आता रोममधील सभेच्या ठरावाचा विचार करावा तर, हे स्वच्छ ध्यानात येते की, ठराव हा केवळ ठरावच आहे. कोणत्याही देशावर ते दबाव आणू शकत नाहीत. म्हणून जगातील सर्व लोकांचे एकत्रित प्रयत्नही आवश्यक आहेत. यासाठी आपण सर्वांनी स्वत:ला एक सूत्रात बांधून घेणे आवश्यक आहे. हे लक्ष्य साधण्यासाठी आपण अन्न-पदार्थांचा दुरुपयोग न करता भुकेल्यांना यथाशक्ती मदत करायला हवी.



# तांब्याच्या घड्यातलं भूत

सीताराम पक्का दारुड्या होता. आपलं शेत, घर वगैरे त्यानं दारुपायी केंव्हाच फुंकून टाकलं. बरोबर उपाय न करता आल्यानं त्याची बायको आजारात मरून गेली. इतकं सारं पुरेसं नव्हतं म्हणून की काय, त्यानं आपल्या एकुलत्या एक मुलाला-राजालाही चमनला विकून टाकलं. चमन त्याला दारु खरीदण्यासाठी पैसे देत असे.

असेच दिवस जाता जाता एक दिवस सीताराम मरून गेला. बापाच्या अग्निसंस्कारनंतर राजा चमनला म्हणाला, ''मालक, इतके दिवस आपण मला जी मदत करत राहिलात, ती मी कधीच विसरू शकणार नाही. याच गांवात माझे आई-बाप दोघेही मरून गेले. मी अनाथ झालोय. आता मला इथं रहावंसं वाटत नाही, मला कोणी ओळखत नाही, अशा गावी जाऊन राहीन म्हणतो मी! इथून निघून गेलो म्हणजेच शान्ती मिळेल मला!''

त्याला सहानुभूती दाखवत चमन म्हणाला, ''मला कळल्या तुझ्या मनच्या वेदना! पण माझी परिस्थितीही जाणून घे तू. तुझ्या बापानं दारुपायी आपली सारी इस्टेट विकली. नंतरचा त्याचा सारा खर्च मीच सोसलाय. मी किती खर्च केलाय, हे माहीत आहेच तुला.''

''मग बोला, आता मला काय करायला हवं?'' राजानं विचारलं.

''सीतारामनं 'गुलाम' म्हणून तुला माझ्या हाती सोपवलंय. पण तरीही मी तुला 'गुलाम' मानायला तयार नाही. मी तसला व्यवहार नाही करणार तुझ्याशी. दोन्ही वेळा खायला घालीन तुला! तुला हे कबूल नसेल, तर माझी तीन कामं कर अन् माझ्या गुलामीतून कायमचा मुक्त हो.''

हे उत्तर ऐकून राजाने चमनला ती तीन कामं कसली म्हणून विचारलं.

गावाच्या सरहद्दी जवळ चमनची चार एकर जमीन होती. तिच्यात काहीच पीक येणं शक्य नसल्यानं ती खरीदायलाही कोणी तयार नव्हतं. आता राजाचं पहिलं काम होतं-ते म्हणजे ते शेत सुपीक करणं!

''पण ज्या शेतात काहीच उगवत नाही, ते मी तरी सुपीक कसं करु? असलं काम सांगणं बरं दिसतं का तुम्हाला?'' राजानं विचारलं.

''कष्ट करायचे म्हटलं, तर कोणतंच काम असाध्य नसतं राजा! कसलीही जमीन कष्टानं सुपीक करता येते. तुला स्वातन्त्र्य हवं असलं तर मेहनत करायलाच हवी, आता निर्णय घेणं तुझ्या हाती आहे.'' चमन बोलला.

राजानं ते काम हाती घेतलं अन् ती ओसाड जमीन सुपीक करायच्या कामाला लागला. खूप कष्ट केले. एक दिवस खणता खणता 'खण्ण' आवाज आला. आश्चर्य वाटून त्यानं तिथे आणखी खोल खणलं अन् त्याला आत एक तांब्याचा घडा मिळाला! त्याचं झाकण उघडताच त्यातून धूर निघाला अन् पहाता पहाता धुरानं भुताचा आकार घेतला! भूत विचारु लागलं, ''बोल, काय हवं तुला? तुझी कुठलीही इच्छा पुरी करीन मी!''

चकित होत राजानं विचारलं, ''कोण आहेस तू? माझी इच्छा पुरी करायचं तुला काय कारण?''

''मी या घड्यातलं भूत आहे. या घड्यात अजब शक्ती आहेत. त्यांच्या मदतीनं भल्या माणसांना मदत करणं हे माझं कर्तव्य आहे.'' भूत म्हणालं. जास्तच आश्चर्यानं राजानं विचारलं, ''पण मी भला माणूस आहे, असं तुला कसं समजलं?''

''मी सांगितलं ना, की या घड्यात अजब शक्ती आहेत? भल्या माणसानं याला स्पर्श करताच मला प्रेरणा मिळते.'' भूत बोललं.

''पण या घड्यात कसा काय शिरलास तू?'' राजानं विचारलं.



सुधा नरवणे





MR-F-2



"त्याच्याशी तुला काय करायचंय ? माझी मदत मिळव, अन् सुखानं जग ना !" भूतानं सल्ला दिला.

क्षणभर विचार करून राजा म्हणाला, "मग ऐक तर. मी एक गुलाम आहे, स्वातन्त्र्य मिळवण्यासाठी धडपडतोय, तऱ्हेतऱ्हेचे कष्ट झेलतोय. मला तर वाटतंय की तूही या तांब्याच्या घड्याचा गुलाम आहेस. होय ना ? मग स्वतःचे कष्ट दूर करण्यासाठी दुसऱ्या एका गुलामाला त्रास देणं बरं नाही वाटत मला ! पाप होईल ते !"

"तू तर खरंच चांगला माणूस आहेस. मी एक गोष्ट सांगतो तुला. ऐक नीट." भूत गोष्ट सांगू लागलं -

खूप पूर्वी शीतलपुरमधे दुर्जय नावाचा व्यापारी होता. फार दुष्ट अन् स्वार्थी होता तो. आपल्या भावांची इस्टेट हडपून त्यानं त्यांना घराबाहेर काढलं. चांगल्या विश्वासू अशा गोपी नावाच्या मित्रालाही फसवून त्याला पार कंगाल बनवलं त्यानं.

नंतर बिचारा गोपी जंगलात जाऊन घोर तपस्या करू लागला. फलस्वरूप त्याला दिव्य शक्ति प्राप्त झाल्या. गावात परत येऊन तो दुर्जयला म्हणाला, "तू फार पापं केलीस दुर्जय ! त्यांतून मुक्त व्हायचा मार्ग सांगतो मी. पण त्यापूर्वी आपलं सर्वस्व गरीबांना वाटून टाक."

त्याच्या सांगण्याप्रमाणे वागायचं दुर्जयनं कबूल केलं. पण प्रत्यक्षात संपत्ती आपल्या ओळखीच्या लोकांच्या हवाली करत त्यांना म्हणाला, "मी मागेन तेंव्हा सगळं परत द्या मला."

गोपीने दुर्जयसमोर एक तांब्याचा घडा ठेवत म्हटलं, "काही अद्भुत शक्तींनी युक्त असा हा घडा आहे. पवित्र मनानं याला स्पर्श केलास तर तुझी सर्व पापं धुऊन जातील. मग आपण दोघं जंगलात जाऊन आपलं उर्वरित आयुष्य घालवू."

घड्यात कसकसल्या शक्ती आहेत याबद्दल दुर्जयनं गोपीकडून जाणून घेतलं, अन् तो म्हणाला, "मला मुळीच जंगलाबिंगलात जायचं नाहीय. मुकाट्यानं घडा माझ्या हवाली करून चालू लाग."

गोपीनं हे मान्य केलं नाही, तेंव्हा दुर्जयनं जबरदस्तीनं तो घ्यायचा प्रयत्न केला. अन् बास ! एका भुतात परिवर्तित होऊन त्यानं त्या घड्यात प्रवेश केला !

खोल श्वास घेत गोपी म्हणाला, "मित्र म्हणून तुला मदतच करायची इच्छा होती





माझी, तुझा उद्धार केला असता मी, पण आता स्पष्ट झालं, की तुझ्या नशिबी लिहिलेलंच तुला मिळालं. आता तुला मी जमिनीत गाडतो. ज्या दिवशी तुझ्या मनात सद्‌बुद्धिची जागृती होईल, त्या दिवशी तुला एक भला माणूस भेटेल. त्याला तू मदत कर, म्हणजे तुझी पापं नष्ट होऊन तुला मोक्ष मिळेल."

तांब्याच्या घड्यात अडकलेला दुर्जय बरीच वर्षं घड्यात राहूनही गोपीला शिव्या देत राहिला. जवळ जवळ शंभर वर्षं तो घड्यात राहिला. नुकताच त्याला पश्चात्ताप वाटू लागला, एकाद्या भल्या माणसाला मदत करणं हे आपलं कर्तव्य आहे असं वाटू लागलं.

"हां, आता कळलं की तूच तो दुर्जय. मग माझीही कहाणी ऐक." असे म्हणून राजानेही त्याला आपली सारी हकिकत सांगितली.

भूत ताबडतोब म्हणालं, "माझ्या शक्तीमुळे कोणतीही अशक्य गोष्ट शक्य होते. ही ओसाड जमीन सुपीक बनवणं, हा तर माझ्या हातचा मळच !" अन् ते काही मन्त्र म्हणू लागलं, थोड्याच वेळात शेत हिरवं दिसू लागलं !

राजानं विचारलं, "बोल, आता काय करू मी ?"

"माझ्या बाबत आपल्या मालकाला काही बोलू नकोस. मी आता घड्यात परत जातो, तू जाऊन त्याला बाकीची दोन कामं विचारून ये." भुतानं सांगितलं.

चमनकडे जाऊन राजानं त्याला शेत सुपीक बनल्याचं सांगितलं. ते ऐकून त्याला आश्चर्यच वाटलं.

हा अजब प्रकार पहायला तो स्वतःच निघाला. बरोबर त्याची मुलगी शारदाही निघाली. तिथे पोचल्यावर हिरवंगार शेत पाहून दोघंही आश्चर्यचकीत झाली !

राजानं विचारलं, "आता सांगा, आणखी





दोन कामं कोणती ?''

''तू कोणी सामान्य माणूस नव्हेस. तुझ्यात नक्कीच अद्भुत शक्ती असली पाहिजे. नाहीतर हे कसं शक्य झालं असतं ?'' असं म्हणून अंगावरचं उपरणं खाली अंथरत चमन म्हणाला, ''हे उपरणं मोहोरांनी भरून दे मला.''

राजा भुताला भेटायला जायच्या विचारात होता; इतक्यात उपरण्यावर मोहोरांचा पाऊस पडू लागला. चमन आश्चर्यानं पहातच राहिला.

राजानं विचारलं, ''हं, आता आपलं शेवटचं तिसरं कामही सांगून टाका ना !''

चमन काही बोलणार, इतक्यात शारदा मधेच म्हणाली, ''तू लग्न कर माझ्याशी !''

''मी करीन लग्न, पण प्रथम मला स्वातन्त्र्य हवं.'' असं म्हणत राजानं चमनकडे पाहिलं.

तीक्ष्ण दृष्टीनं त्याच्याकडे पहात चमन म्हणाला, ''हं, थोडीफार जादू येऊ लागली, तर माझा जावई बनायचं स्वप्न पाहू लागलांस होय ? तू गुलाम आहेस अजून, हे विसरू नकोस. माझ्या अज्ञानी मुलीचं बोलणं निरर्थक आहे. आता मी आपले तिसरं काम सांगतो तुला, ऐक नीट कान उघडे ठेवून !''

राजा शान्तपणे म्हणाला, ''ठीक आहे, सांगा काय ते.''

''माझी इच्छा आहे, की तुझ्यासारखा गुलाम आयुष्यभर आपल्या जवळच असावा. अन् त्यानं माझी सेवा करावी. वाटलं तू स्वतःच रहा माझ्याकडे, किंवा दुसऱ्या कुणाची व्यवस्था करू शकतोस तू.'' चमननं आपली तिसरं कामही सांगून टाकलं.

त्याचं बोलणं ऐकून राजाला चांगलं कळून चुकलं की, तो एक नंबरचा ठक अन् कपटी माणूस आहे. आपली गुलामगिरीतून सुटका होऊ शकणार नसल्यानं तो निराश झाला. पण अचानक त्याला एक उपाय सुचला तो चमनला म्हणाला, ''मालक, तुम्हाला एक गुलाम हवा, असंच ना ? 'तुम्हांला' चा अर्थ असा की ज्यात प्राण आहे अशा 'चमनच्या शरीराला'.''

चमन 'हो' म्हणाला, ''ठीक, मग तसंच होईल. तुमच्यासाठी एका गुलामाची व्यवस्था झाली की मला स्वतन्त्र करावं लागेल तुम्हाला. शारदाशी माझं लग्न करून द्यावं लागेल. अट मान्य आहे ना ?''

चमननं अट कबूल केली.

शारदाला वाटलं की, आता आपलं लग्न झालंच, ती लाजून तिथून पळून गेली.

राजा मालकाला म्हणाला, ''थांबा जरा, क्षणभरात सगळी व्यवस्था करतो.''

चमन तिथेच खाली बसून मोहोरा मोजू लागला.

राजाने जाऊन भुताला घडलेली सर्व हकिकत सांगितली अन् म्हणाला, ''हा चमन एक नंबरचा धूर्त आहे. 'मनुष्य' म्हणून जगण्याच्या लायकीचा नाहीय. त्याला तसा अधिकारच उरला नाहीय. तू आपली पापं धुवून टाकून भला माणूस बनला आहेस. आता तुम्ही दोघं आपापली स्थानं बदला.

चमनचा आत्मा भूत बनून या घड्यात बन्दिस्त होईल, अन् तू त्याच्या शरीरात प्रवेश करशील. भला माणूस बनून आपलं पुढलं आयुष्य घालव. यामुळं तुला अन् मलाही स्वातन्त्र्य मिळेल.''

राजाच्या अकलेची तारीफ करून दुर्जयनं त्याच्या सांगण्याप्रमाणे सर्व केलं. नन्तर राजा चमनला म्हणाला, ''मालक, जिवन्त चमनचं शरीर मी भुताला गुलाम म्हणून देऊन टाकत आहे. याचा अर्थ असा की, मी तुमचे तिसरं कामही पूर्ण केलंय. आता मला स्वतन्त्र करून टाका.''

तोपर्यन्त चमनचा आत्मा घड्यात बन्द झाला, बाहेर निघता येईना म्हणून तो आतल्या आत तडफडू लागला, चमन रूपधारी दुर्जय त्याच्या आत्म्याला म्हणाला, ''स्वार्थ मर्यादेबाहेर पोचला की त्याची अशी स्थिति होते. हे स्वार्थी लोक आपल्याच पायावर कुऱ्हाड पाडून घेतात अन् स्वतःच स्वतःच्या विनाशाला कारण बनतात. तुला गुलाम हवा होता, अन् स्वतःच गुलाम बनलास बघ. पण तुझ्यासारख्या गुलामाशी मला काहीच देणं-घेणं नाहीय. म्हणून या घड्यासह तुला मी जमिनीत गाडतो. माझ्या अन् तुझ्यासारख्यांना सन्मार्गाला लावण्यासाठी चगोपीनं हा घडा निर्माण केलाय. आता त्याचा उद्देश सफल झालाय. जमेल तितक्या लवकर तूही भला माणूस बनायचा प्रयत्न कर.''

तांब्याचा घडा जमिनीत पुरल्यावर राजा अन् दुर्जय घरी पोचले. राजा आणि शारदेचं लग्न झालं. यानन्तर थोड्याच दिवसात दुर्जय मरून गेला.

स्वतः सुखी जीवन घालवत राजानं इतरांनाही सन्मार्ग दाखवला. त्यामुळे पुन्हा तांब्याच्या घड्यातल्या भुताला भेटायची संधी कुणालाच मिळाली नाही.

पण जमिनीत गाडलेलं भूत मात्र आणखी एका चमनची वाट पहात राहिलं.



# चारी मुंड्या चीत

नदी-किनारीच वसलेल्या परेल गावातील शेतकऱ्यांमधे रामनारायण हा बऱ्यापैकी धनवान शेतकरी. पण तो अपेक्षाकृत काहीसा अधिकच कंजूष होता. एक दिवस त्याच्या घरातल्या धान्याची पोती ठेवायच्या खोलीत साप शिरला. एका नोकराने ते पाहून मालकाला सांगितले. उलट त्याच्यावरच चिडत रामनारायण ओरडला, ''नुसता सांगायला काय आलास? जा, जा लवकर; अन् काठीनं मारून बाहेर फेकून दे त्याला!''

''पण मालक! तो साधासुधा साप नाहीय. गव्हाळ रंगाचा अत्यंत विषारी साप आहे तो ! त्याला मारणं माझ्याच्यानं नाही जमणार. म्हणत असाल तर त्या गारुड्याला - सावळ्याला बोलावून आणतो मी!''

रामनारायणने इशाऱ्याने संमती सुचवली. सावळ्याने येऊन पोत्यांच्या मधेच लपलेल्या सापाला बाहेर काढून टोपलीत बंद केला अन् दहा रुपये मागितले.

मागणी ऐकताच रागाने लाल होत रामनारायण म्हणाला, ''अरे साप पकडायला तर तुला पुरी दहा मिनिटंही लागली नाहीत. एकेका मिनिटाचा एकेक रुपया मागतोस होय?''

''ठीक आहे; मग ठेवा सापाला आपल्याजवळच!'' असे म्हणत गारुड्याने टोपलीतला साप काढून पुन्हा बाहेर सोडून दिला. तो पुन्हा पोत्यांमधल्या सापटीत दडून बसला.

ते पाहून रामनारायण घाबरून म्हणाला, ''अरे बाबा घे दहा रुपये, पण सापाला बाहेर काढ अगोदर !''

आता शांतपणे सावळ्या म्हणाला, ''सापाला एकदा पकडायचे दहा रुपये मागितले होते मी! आता पुन्हा पकडायचा असेल तर एकूण वीस रुपये द्यावे लागतील. कबूल असेल तर आत्ता पकडतो पहा!'' रामनारायणला तर आता चारी मुंड्या चीत झाल्यासारखेच वाटले.

पुन्हा दुसऱ्यांदा साप पकडल्यावर गारुड्याच्या हातावर वीस रुपये ठेवत हेव्याने रामनारायण म्हणाला, ''अरे वा! असा मिनिटाला एक रुपया कमवायला लागलास, तर गावच्या सर्व शेतकऱ्यांपेक्षा तूच जास्त पैसेवाला बनशील बघ!''








१८

रूपधरचे ध्येय पूर्ण झाले. आपल्या पत्नीशी विवाह करण्याच्या उद्देशाने तेथेच तळ देऊन राहिलेल्या सर्व राजकुमारांना त्याने व धीरमतीने मिळून यमसदनाला पाठवले. आपले हे ध्येय साधण्यासाठी रूपधर केवळ आपल्याच बळावर विसंबला नाही. आपल्या बुद्धीचा - युक्तीचाही त्याने वापर केला. देवदेवताही त्या दिवशी त्याच्याच पक्षाला सहायक होते. परन्तु केवळ एवढ्यानेच त्याच्या सर्व अडचणी संपल्या नाहीत) -यानंतर

हे सर्व चालू असताना पद्ममुखी झोपलेली होती. बहुकीर्ती तिच्या खोलीत जाऊन म्हणाली, ''मग ऊठ, ऊठ ! आता किती झोपणार ? तुझा पति आला सुद्धा बघ ! सर्व दुष्टांना त्यानं मारून टाकलंय. तुझे चांगले दिवस परत आले ग बाई !'' बडबडत तिने पद्ममुखीला उठवले.

प्रथम पद्ममुखीचा विश्वास बसेना ! शंका घेतच ती उठली अन् म्हणाली, ''देवाची लीला अगाध असते ! ज्यानं त्या दुष्टांना मारलं, त्या माणसाला जाऊन पाहूया, चल.'' म्हातारीला बरोबर घेऊन ती खाली आली अन् रूपधरसमोरच्या खुर्चीवर बसली. तिच्या चेहऱ्यावर कसलाच भाव नव्हता. रूपधरला वाटते होते की, ती खूप खूश होईल, आपल्याशी आनन्दाने बोलेल. पण तिला गप्प पाहून त्याला आश्चर्य वाटले. पद्ममुखी आपल्याशी अशी का वागतेय, हेच कळेना त्याला ! ती आपल्यावर प्राणापेक्षा प्रेम करते, हे त्याला ठाऊक होते. त्या दुष्ट राजकुमारांपासून स्वतःला

आपल्या देशातील ऋषि-मुनि:

# बलाकी

आपले प्राचीन मुनि जिज्ञासू असत. त्यांना सर्व काही माहीत असले तरीही आणखी जाणण्याची त्यांची इच्छा असे. अत्यन्त नम्र असत ते.

परन्तु मुनिकुमार बलाकी याचा स्वभाव मात्र अुलट होता. विद्याभ्यास संपल्याबरोबर त्याला असे वाटू लागले की आपण सर्वज्ञानी झालो. मोठ्यात मोठ्या ज्ञानी माणसालाही काही शिकवायची आपली योग्यता आहे, असा गर्व त्याला वाटू लागला. यामुळे सर्वजण त्याला 'गर्विष्ठ बलाकी' असे म्हणू लागले.

काशीचा राजा अत्यंत जिज्ञासू व ज्ञानपिपासू होता. बलाकीला हे कळल्यावर ताबडतोब काशीला जाअून तो राजाला भेटला. आपण राजाला ब्रह्मज्ञानाचा बोध करू शकतो असा दावा त्याने केला. त्याच्या बोलण्यावर प्रसन्न होअून राजाने त्याला तशी परवानगी दिली. परंतु प्रत्यक्षात बलाकीने एकादा मंत्र किंवा श्लोक म्हणावा, यापूर्वी राजाच तो म्हणून दाखवू लागला, अन् त्यांचा अर्थ व्याख्येसह सांगू लागला. महाराज आपल्यापेक्षाही मोठे ज्ञानी असल्याचे बलाकीला कळायला वेळ लागला नाही. आपला गर्व व अज्ञानाची त्याला लाज वाटली. काशीराजाची क्षमा मागून त्याने त्याचे शिष्यत्व पत्करले.

एक दिवस राजाने बलाकीला एक सुषुप्तावस्थेतला माणूस दाखवून विचारले की, 'सुषुप्तावस्थेत त्याची चेतना कुठे असेल?' बलाकी अुत्तर देअू शकला नाही, तेंव्हा स्वतः स्पष्टीकरण देत राजा म्हणाला, "सुषुप्तावस्थेत, म्हणजेच गाढ निद्रेत असताना माणसाला चेतना नसते. तरीही तो अनिर्वचनीय तूर्यानन्द (ब्रह्मलीनता) अनुभव असतो. कारण या स्थितीत त्याचा आत्मा भगवंतासमीप संचार करत असतो. जागृतावस्थेतही जर माणूस अशा तूर्यानन्दाचा अनुभव घेअू शकला, तर त्याचा अर्थ असा की, त्याच्यात खरोखरच आत्मज्ञान व आत्मनिग्रह आहे.





# तुम्हाला माहीत आहे काय?

१. 'कथा सरित्सागर' चे रचयिता कोण?
२. डायनामाईट मधला मुख्य रासायनिक पदार्थ कोणता?
३. होमर, मिल्टन, हेलन किलर व वेद मेहता यांच्यात कोणते साम्य आहे?
४. भारताच्या सांविधानिक शासन-पत्रात संपत्तीचे अधिकार व प्राथमिक अधिकारातून हटवलेले कलम कोणते?
५. राजनैतिक नेता असून शिवाय 'भारतीदास' नावाने प्रसिद्ध लेखक कोण?
६. 'मॅगसेसे' पुरस्कार मिळवणारे पहिले भारतीय कोण?
७. सर्वप्रथम नोबेल पुरस्कार मिळवणाऱ्या संस्थेचे नाव काय?
८. दर वर्षी १० डिसेंबर रोजी नोबेल पुरस्कार दिला जातो. या दिवसाचे वैशिष्ट्य काय?
९. 'लिबर्टी' मूर्तीच्या रूपाची कल्पना कोणाची?
१०. संयुक्त राष्ट्रसंघाच्या अधिकारिक भाषा कोणकोणत्या आहेत?
११. संयुक्त राष्ट्रसंघाचा 'चार्टर' केंव्हा अमलात आणला गेला?
१२. 'सुरक्षा समितीत आपणाला कायम स्थान हवे' अशी मागणी भारताने केंव्हा केली?
१३. 'रेव्हेन्यू स्टॅम्पची आत्मकथा' कोणी लिहिली आहे?
१४. इंग्रजी भाषा ही राजभाषा म्हणून स्वीकारणारे भारतातले राज्य कोणते?
१५. आपल्या देशातला १ नंबरचा राष्ट्रीय मार्ग कोणता?
१६. पुढील 'वर्ल्ड कप क्रिकेट' कोणत्या देशात होणार आहे?

## अुत्तरे

१. सोमदेव
२. नायट्रोग्लिसरिन
३. आंधळे असूनही यांनी महान् ग्रन्थ रचले.
४. १९७२ मधे आणलेले कलम.
५. अटल बिहारी बाजपेयी.
६. आचार्य विनोबा भावे.
७. बेल्जियमची आंतरराष्ट्रीय कायदा संस्था
८. जागतिक मानवी हक्काचा दिवस.
९. फ्रेड्रिक ऑगस्टे बार्तोल्डी.
१०. अरेबिक, चायनीज, इंग्लिश, फ्रेंच, रशियन व स्पॅनिश
११. २४ ऑक्टोबर, १९४५
१२. ३ आक्टोबर, १९९४
१३. अमृता प्रीतम
१४. नागालॅण्ड
१५. दिल्ली ते चंडीगड
१६. इंग्लंड

# अधिकाराचे बळ

जटावल्लभ नावाचा एक शिक्षक प्रथमच शहरात आला. रहाण्यासाठी त्याने धर्मशाळेत पाऊल ठेवले. तिथे तर प्रचंड गोंधळ चालू होता. काही माणसंपत्ते कुटत होती, तर काही दारु पीत बसली होती. ही धर्मशाळा, की गुत्ता?' असा त्याला भ्रम पडला. इतक्यात कोणीसा ओरडला, ''शूरवीर आला शूरवीर!''

बास, सगळे दारुडे आणि जुगारी अुघड्या दरवाजातून बाहेर पळाले. त्याच वेळी दुसऱ्या बाजूने बन्द दरवाजाला आपल्या पूर्ण बळाने कोणीतरी जोरदार लाथ मारली. दरवाजा तुटून पडला.

जटावल्लभ स्तब्ध होअून तिकडेच पाहू लागला. एक धट्टाकट्टा, सहा फूट अुंच माणूस तेथे अुभा होता! त्याच्या निरख्या मिश्या अन् आग ओकणारे डोळे पाहूनच जटावल्लभ गर्भगळित झाला. आत आल्याबरोबर जटावल्लभकडे पहात तो ओरडला, ''तहान, तहान! अरे त्या लाकडी टेबलावरचा पाण्याचा घडा दे मला.''

''बापरे! चांगला अडकलो की! शेवटी याच्या हाती अडकणं नशिबी होते माझ्या!'' असे स्वत:शी म्हणत जटावल्लभने घडा अुचलून त्या शूरवीराला दिला. त्यावेळी हात कापत होते बिचाऱ्याचे.

घडा अुचलून शूरवीराने सगळे पाणी एका दमात घटाघटा पिअून टाकले. 'याच्याशी दोस्ती करणं बरं' असा विचार करून जटावल्लभने विचारले, ''तुम्हाला आणखी पाणी हवं? खाण्याची काही व्यवस्था करून?''

''पाणी हवंय अन् खायलाही हवंय. पण अरे बहिऱ्या, ऐकलं नाहीस? सत्ताधर आत्ता येतोच आहे, बघ. आलाच तो!'' असे म्हणत तो तेथून पसार झाला.

इतक्यात एका बुटक्या माणसाने तेथे प्रवेश केला. त्याच्या पाठीमागे दहा हत्यारबन्द शिपाई होते. तो आपल्या बारीक आवाजात म्हणाला. ''इथल्या दारुड्या आणि जुगारी लोकांना माझ्या येण्याची खबर लागलेली दिसतेय. म्हणून सगळेच्या सगळे शेपूट घालून पळून गेले. जारे, त्यांचा पाठलाग करुन पकडून आणा. तोवर मी इथल्या मालकाला पकडून हातकड्या घालतो.''

''सर्वसाधारण जनता केवळ देहबळ पाहून नव्हे, तर त्याचा अधिकार पाहून घाबरते'' हे सत्य जाणून जटावल्लभ स्वत:शी हसत राहिला.







# सुख-दुःख दोन्ही वाटून घ्या

सूरज कामासाठी शहराकडे निघाला. वाटेत खाण्यासाठी त्याच्या बायकोने तीन भाकरी दिल्या. जवळचा रस्ता म्हणून तो जंगलाच्या वाटेने निघाला. जंगलाच्या मधेच एका तरुणाने त्याला अडवले.

तरुण दिसायला मोठ्या घरचा वाटत होता. त्याचे कपडे किंमती होते, पण ते मळलेले, चुरगळलेले होते. 'आपल्याला प्रथम काही खायला हवं' अशी सूरजकडे त्याने मागणी केली. सूरजने त्याला द्यायला नकार दिला. तेव्हा तरुणाने जबरदस्तीने भाकरी काढून घेतल्या. फार भुकेला असल्याने तो बकाबका खाऊ लागला. इकडे स्वत:ला काहीच उरत नाहीय असे पाहून सूरज ओरडत राहिला. पण त्या तरुणाने त्याच्या ओरड्याआरड्याकडे मुळीच लक्ष दिले नाही. नंतर त्याने विचारले, ''जवळचं भद्रगिरी गाव माहीत आहे नं तुला?'' सूरजने डोके हलवून म्हटले, ''हो, माहीत आहे.''

तो म्हणाला, ''शहरातून आलोय अन् मला भद्रगिरीला जायचंय. वाट चुकलो अन् या जंगलात अडकलो. तू मला भद्रगिरीला पोचव. तिथले जमीनदार माझे पिताजी आहेत. तू मला पोचवलंस तर ते तुला छानशी देणगी देतील.''

देणगी मिळायच्या आशेने सूरज तरुणाला भद्रगिरीला घेअून गेला. जमीनदाराने खूश होअून त्याला एक मोत्याची माळ बक्षीस दिली.

एवढ्याशा कामासाठी आपल्याला एवढे मोठे बक्षीस मिळेल अशी सूरजला कल्पनाही नव्हती. माळ मूल्यवान आहे, हे पाहूनच कळत होते. सूरजचा आनन्द वर्णनातीत होता.

माळ गळ्यात घातल्यावर शहरात जायचा आपला विचार त्याने सोडून दिला. लवकर

रेखा आठवले



गावात पोचून परिचित लोकांसमोर आपले भाग्य मिरवावे असे वाटून त्याने परतीचा रस्ता पकडला.

सूरजला सर्वात आधी दिसला गोविन्द. जरूरी कामासाठी निघालेल्या गोविन्दला अडवून तो म्हणाला, ''पाहिलीस माझ्या गळ्यातली ही मोत्यांची माळ? भद्रगिरीच्या जमीनदाराकडली आहे ही. त्यांनी बक्षीस दिलीय मला.''

गोविन्दने त्याच्या बोलण्याकडे लक्ष दिले नाही, कारण तो गडबडीत होता. तो म्हणाला, ''अरे लक्ष्मणच्या मुलीचं लग्न ठरलंय. गावचे सगळेजण ही बातमी ऐकून खूश आहेत. मी त्याला भेटून सांगायला निघालोय की - माझ्याकडून जमेल तितकी मी तुला मदत करीन. येतोस तूही माझ्या बरोबर?''

लक्ष्मणची मुलगी चांगली हुशार होती, घरकामात दक्ष होती. दिसायलाही सुंदर होती. पण अुजवा डोळा तिरळा असल्यामुळे तिचा विवाह लांबणीवर पडत होता. गावच्या लोकांना लक्ष्मणबद्दल सहानुभूती वाटत होती. मुलीचं लग्न कुठे पक्कं झालं म्हणजे बिचारा लक्ष्मण निश्चिन्त होईल असे वाटे सर्वांना. सूरजलाही हे सारे माहीत होते. पण गोविन्दने त्याच्याकडे लक्षच दिले नाही, आणि अुलट तो लक्ष्मणच्या मुलीच्या भाग्याबद्दलच बोलत राहिला याचे सूरजला वैषम्य वाटले. तो म्हणाला, मला आत्ता एक जरूरी काम आहे. मी नाही येअू शकणार तुझ्याबरोबर.''

थोडा पुढे गेल्यावर सूरजची गाठ पडली शिक्षक पूर्णानन्दशी. त्याला आपल्या गळ्यातली माळ दाखवत तो म्हणाला, ''ही काही साधीसुधी माळ नव्हे! भद्रगिरीच्या जमीनदाराची आहे ही. त्यांनी बक्षीस दिलीय मला!''

काहीतरी बोलायला हवं, म्हणून पूर्णानन्द म्हणाला, ''छान की!'' पण पुढे लगेच तो म्हणाला, ''आपल्या गावच्या पंडित रामशास्त्रींचा राजधानीत सत्कार झाला ना. त्यामुळे आपल्या गावची मान अुंचावली. रामशास्त्री कालच परत आल्याचं कळलं, मी त्यांनाच भेटायला निघालोय. येतोस तूही?''

सूरजला वाटले की आपण आपल्या माळेबद्दल बोललो अन् हा आपला तिकडे लक्षच न देता रामशास्त्रींचे गुण गात बसला आहे. आपली चीड लपवत तो म्हणाला, ''मी काही कामासाठी चाललोय. आत्ता नाही येअू शकत.'' आणि तो पुढे निघाला.





सूरज पुढे गेला आणि जवळच्या गल्लीत वळला, तर नेमका समोर नागराज त्याला दिसला. तो गडबडीत होता. तरीही सूरजला पाहून जरा थांबून म्हणाला, ''तुझ्या गळ्यात काय चमकतं आहे?

आपण काही न बोलताच नागराजने आपल्या माळेबद्दल विचारल्यामुळे सूरजला आनन्द वाटला. खूश होअून तो म्हणाला, ''ही भद्रगिरीच्या जमीनदाराची माळ आहे. खऱ्या मोत्यांची आहे. जमीनदारांची माळ खरीदणं काय माझ्या ऐपतीत बसेल?''

नागराजने आणखी काहीच विचारले नाही. सूरजने दिलेल्या माहितीकडे दुर्लक्ष करत तो म्हणाला, ''तू ऐकलंस? तुला तर माहीत आहेच, की आपल्या विराटची जमीन कोरडी पडलीय. गेली दोन वर्ष पाअूस न पडल्यानं कसलंच पीक आलं नाही तिथे. पण कालच त्याच्या विहीरीत पाणी भरलंय. विराटचे वाईट दिवस नाहीसे झाल्याने सगळेच खूश आहेत. मी त्याच्या आनंदात सहभागी होण्यासाठी त्याच्याकडे जायला निघालोय. चल, तूपण येतोस बरोबर?''

आता सूरजचे मन आक्रोशून अुठले. आपल्या भाग्याचं कोणीच कौतुक करत नाहीय! जमीनदाराने माळ का दिली, हे ही कोणीच विचारत नाहीय. नाराज होअून तो सरळ आपल्या घरी गेला.

सूरजच्या बायकोने माळ पाहिली आणि त्याच्या तोंडून हकिकत कळल्यावर म्हणाली, ''ही तर मोठ्या भाग्याची गोष्ट! फार



दिवसांपासून अशी मोत्यांची माळ बनवायची माझी इच्छा होती. ती आता अशी मिळाली मला.'' ती फारच आनन्दली.

''ही माळ तर पुरुषांची आहे. जमीनदारानं स्वतःच्या गळ्यातनं काढून दिली होती.'' सूरज ताबडतोब बोलला.

बायको हसत म्हणाली, ''माळ काय पुरुषांची अन् बायकांची अशी निराळी असते काय? श्रीमन्त वर्गात पुरुष या माळा घालतात, तर मध्यमवर्गात बायका वापरतात. कारण अशा घरात पुरुष काही घालतच नाहीत.''

''हं:! माझी श्रेष्ठता आणि सद्गुण पाहून जमीनदारानं माळ मला बक्षीस दिलीय. तेंव्हा ती मीच घालणार.'' सूरज म्हणाला.

''तुमचा असा काय मोठा पुरुषार्थ? अशा

कोणत्या आपल्या सद्‌गुणाचा अभिमान आहे तुम्हाला? त्या अपाशी माणसाला आपण होऊन भाकरीही दिली नाहीत तुम्ही! त्यानं जबरदस्तीनं घेतली तेंव्हा मुळमुळ रडत बसलात! त्याला घरी पोचवलं, ते सुद्धा जमीनदार काही देईल या आशेनं! ही तर सगळी भाग्याची गोष्ट. यात तुम्ही कोणती मर्दुमकी केलीत? मी भाकरी करून दिल्या नसत्या, तर तुमच्याशी बोलायचीही ताकत नव्हती त्या जमीनदाराच्या मुलाची! खरं तर तुमच्या या भाग्याची खरी अधिकारी मीच!''

''गावच्या इतर माणसांप्रमाणे तुलाही माझा हेवा वाटतोय.'' सूरज म्हणाला.

''गावचे लोक हेवा करतात तुमचा? असं काय विशेष आहे तुमच्यात, की ज्यामुळे त्यांनी किंवा मी तुमचा हेवा करावा?'' बायकोने बेधडक सूरजला विचारले.

तेंव्हा सूरजने गावात प्रवेश केल्यापासून जे जे घडले, ते सर्व तिला सांगितले आणि म्हटले, ''एक-दोन नव्हे, तर चांगली पाच माणसं भेटली मला. कोणी एकानंही माझ्या भाग्याचं कौतुक केलं नाही. हा हेवाच नाही तर काय दुसरं?''

''हा हेवा तर नक्कीच नव्हे. नीट विचार करून सांगा. गावच्या कुणाचं काही भलं झालं, तर तुम्हाला कधी त्याचा आनन्द वाटला? तो जाहीर केलात? त्यांच्या भाग्याचं कौतुक केलंत? त्यांच्या आनंदात, सुखात भाग घेतलात? तुम्ही जर असं काही केलं नाहीत, तर त्यांनी का करावं? आनंदातही देणं आणि घेणं दोन्ही जरुरीचं असतं.'' सूरजच्या बायकोने त्याची कानउघाडणी केली.

बायकोचा सल्ला आणि वास्तविकतेने भरलेल्या या गोष्टी ऐकून सूरज गप्पच झाला! त्याची बायको पुन्हा म्हणाली, ''तुम्हाला जो जो भेटला तो प्रत्येकजण दुसऱ्या कुणाच्या





चांगल्याबद्दल, भाग्याबद्दल बोलला. तुम्ही फक्त स्वतःबद्दलच विचार करत राहिलात! दुसऱ्या कुणाबद्दल विचार करायला तयारच नव्हता तुम्ही! इतकी वर्षं एकत्र नान्दलो आपण! पण कधी माझ्यासाठी एकदा दागिना तुम्ही बनवलात? खरीदलात? अचानक तुम्हाला ही माळ मिळाली. पण प्रेमानं ही बायकोला द्यावी, असं मनातही नाही आलं तुमच्या! तुम्ही तर एक नंबरचे अप्पलपोटे आहात.''

सूरजने तावडतोब माळ काढून तिच्या हातात देत म्हटले, ''मी ही गळ्यात घालून काय करू? तुलाच तर द्यायची मनात होतं माझ्या. अगीच नाटक करून पाहिलं गं! पण इतक्यात रागावून तू खुशाल 'मी स्वार्थी आहे, आपलाच विचार करतो' असा आरोप केलास माझ्यावर.''

सूरजच्या बायकोने माळ आपल्या गळ्यात घातली अन् त्याच्या दोन्ही पायांना हात लावत म्हणाली, ''हो, माझीच बुद्धी कोती आहे, लहान आहे; म्हणूनच असं बोलले मी! तुमची बुद्धीच खरी मोठी, म्हणून चन्द्रगिरीच्या जमीनदारानं तुम्हाला माळ दिली. केवढं माझं पुण्य खरोखर!''

तिच्या बोलण्याने सूरजच्या आश्चर्याला पारावार राहिला नाही. आपल्या बायकोच्या तोंडची प्रशंसा ऐकून तो खरोखरच फार खूश झाला.

नंतर तावडतोब लक्ष्मणच्या घरी जाऊन त्याच्या मुलीचं लग्न ठरल्याबद्दल सूरजने त्याचे अभिनन्दन केले आणि आपल्याकडून होईल तितकी मदत करायचे कबूल केले. तिथून तो सरळ रामशास्त्रीच्या घरी गेला व त्याच्या तोंडून राजधानीत झालेल्या त्याच्या सत्काराबद्दल चौकशी करून त्याचेही अभिनन्दन केले. तेथून विराटकडे गेल्यावर त्याला दिसले की तो आपल्या विहीरीचं पाणी शेताला देत आहे. त्याचेही अभिनंदन करून सूरजने त्याच्या विहिरीचे पाणी चाखले. आज सूरज अगदी ढाराढूर झोपला. दुसऱ्या दिवशी सकाळी उठून बाहेर येतो, तो त्याला दिसले की गावचे सारे लोक त्याच्या घरासमोर उभे आहेत!

चंद्रगिरीच्या जमीनदाराकडून बक्षीस मिळालेल्या मोत्याच्या माळेबद्दलची हकिकत विचारायला आले होते ते!





# अुसना दागिना

कमलाचा बाप गरीब होता. बायको मेल्यावार आई आणि बाप दोन्ही भूमिका निभावत त्याने मुलीचे पालनपोषण केले. देवाने तिला पैसा दिला नव्हता. तरी सौन्दर्य मात्र अुदारपणे बहाल केले होते. सर्वजण तिच्या सौन्दर्याची खूप स्तुती करत. आपण सुंदर आहोत, हे तिलाही छान कळले होते. तारूण्यात पदार्पण करताच ती स्वर्गलोकात विचरू लागली. आपल्या सौन्दर्यावर मोहित होअून एकादा जमीनदार आपल्याशी लग्न करुन आपल्याला सुखात ठेवील, असे स्वप्न ती पाहू लागली.

कमलाशी विवाह करायला अनेक युवक तयार होते. पण ते सगळे मध्यमवर्गीयच होते. त्यांना हुंडाही हवा होता, पण तिचा बाप तो द्यायला समर्थ नव्हता. त्यामुळे कोणतेच स्थळ जमेना.

अशा परिस्थितीत शहरात काम करणाऱ्या बॅनर्जीला कमला खूप पसन्त पडली. त्याचे आईबाप केंव्हाच मरुन गेले होते. हुंड्याशिवाय लग्नाला तो तयार होता. नातेवाईकांनी तिच्या भाग्याची तारीफ केली. पण कमला मात्र खूश नव्हती. लग्नानन्तर आपल्या स्थितीत आकाश-पाताळाचे अंतर पडेल अशी स्वप्नें तिने रंगवली होती आपल्या सौन्दर्याच्या बळावर आपण अुच्च स्थानावर आरुढ होअू अशी तिची अपेक्षा होती.

कमला संसार मांडायला बॅनर्जी बरोबर शहरात आली. त्याचे स्वत:चे घर होते, खायची-प्यायची कमतरता नव्हती. कमलावर त्याचे फार प्रेम होते. पण कमलाचे मन मात्र अुदासच होते. तिला नेहमी कशाची तरी कमतरता वाटे. रेशमी साड्या आणि दागिने आपणाजवळ नसल्याचे तिला खटके.

एकदा बॅनर्जीचा एक नातेवाईक लग्नाचे आमंत्रण द्यायला त्याच्याकडे आला. या माणसाने त्याला पूर्वी खूप मदत केली होती. बॅनर्जी कमलाला म्हणाला, ''या लग्नाला आपल्याला जायलाच हवं.'' कमलाने यावर काहीच अुत्साह दाखवला नाही.

ती म्हणाली, ''कोणत्या तोंडाने मला 'लग्नाला चल' म्हणताय? माझा गळा ओकाबोका आहे. लोक पाहून हसायचे नाहीत? नेसायला बरीशी साडीही नाही माझ्याकडे. सगळ्यांत आपली चेष्टा करून घेअू मी? मी नाही यायची. तुम्हाला हवं तर जा.''

काही न बोलता बॅनर्जी आपल्या मालकाकडून कर्जाअू रक्कम घेअून एक सुंदर साडी खरीदून आला. निळ्या रंगाची ती साडी फारच सुंदर दिसत होती. वाटेत चमेलीचा गजराही खरेदी करून तो घरी आला.

नवी साडी आणि गजरा कमलाच्या हाती देत तो म्हणाला, ''कमला, कुठलाही दागिना तुझ्या सौन्दर्यापुढे नगण्य आहे. हां, मला इतकं कबूल आहे की एकाद्या ठसठशीत दागिन्या-शिवाय जाणं बरं दिसणार नाही-आपण असं करु-शेजारच्या चन्द्रकान्ताकडे दागिनेच दागिने आहेत. आपण दोन-तीन दिवसात परत येअूच. तेवढ्यापुरता ती एकादा दागिना अुसना देतेका विचार.''

कमलाला ते बरे वाटले नाहीं; पण तिने दागिना मागितला. चन्द्रकान्ताने दागिन्यांची पेटीच तिच्या समोर ठेवली. चन्द्रहार कमलाला खूप आवडला. दोन-तीन दिवसात तो परत करायचा वायदा करुन कमला चन्द्रहार घेअून आली.

बैलगाडीने तीन तासांचा प्रवास करुन दोघेजण त्यांच्या त्या नातेवाइकाकडे पोचले. विवाह-मुहूर्त दुसऱ्या दिवशी सकाळी दहाचा होता. सकाळीच स्नान अुरकून कमलाने नवी



रूपमती व्यास



साडी नेसली अन गळ्यात चन्द्रहार घातला. डोक्यात फुले माळली. तशी ती सुन्दर होतीच. पण या साजशृंगाराने त्यात खूप भर पडली. लग्नाला आलेल्या सर्वांचे लक्ष तिने वेधून घेतले. कमलाने हे जाणले आणि ती फारच आनन्दली.

लग्न झाल्यावर दुसऱ्याच दिवशी पति-पत्नी शहरात परतले. चन्द्रकान्ताला दागिना परत करण्यासाठी कमलाने पेटी अुघडली, आणि पेटी रिकामी पाहून ती एकदम ओरडली. चन्द्रहार नाहीसा झालेला होता! कमलाला पक्के आठवत होते, की लग्नाच्या दिवशी घातलेला हार संध्याकाळपर्यन्त तिच्या गळ्यातच होता. संध्याकाळी स्नान करुन तो पेटीत ठेऊन तिने कुलूप लावले होते.

दागिना गेल्याचे जाणून तिचे सान्त्वन करत बॅनर्जी म्हणाला, ''लग्नाला आलेल्यांपैकी दागिना कोणी चोरला, हे कसं कळणार? आता चन्द्रकान्ताला आपण कसं सांगायचं चोरीबद्दल? आपणच धोकेबाज आहोत असा आरोप करील ती आपल्यावर! आपल्यासमोर आता एकच मार्ग आहे, तो म्हणजे अगदी तसलाच एक हार खरेदी करुन तो चुपचाप तिला द्यायचा-दुसऱ्या कुणाला कळूही देता अुपयोगी नाही याबद्दल.''

बॅनर्जी बाहेर गेला आणि दुपारी परत आला. त्याने सांगितले की, ''मालकाकडून आणखी थोडं कर्ज घेतलं अन् घर गहाण ठेवून रक्कम जमा केली. त्या रकमेतून आता आपण चन्द्रहार आणायला जाअूया.''

बऱ्याच दुकानात पाहिल्यानन्तर अगदी हुबेहूब तसलाच एक हार एका दुकानात मिळाला.

त्याच दिवशी संध्याकाळी कमलाने चन्द्रकान्ताला हार परत दिला. दोन दिवसांनी कमलाने मोलकरणीला काढून टाकले आणि सर्व काम ती स्वतःच करु लागली. रिकाम्या परसात तिने भाजीपाल्याचे बी पेरले, आणि घरच्या घरी झाडू बनवून ती इतर दुकानातून विक्रीला ठेवू लागली-बॅनर्जी या सर्व कामात तिला भरपूर मदत करत असे.

पाच वर्षे अशीच निघून गेली. मेहनत पडल्यामुळे कमलाचे शारीरिक तेज थोडे कमी झाले. एक काळ असा होता की आरशासमोर अुभी राहून ती तासन् तास त्यात आपले सौन्दर्य न्याहाळत असे. आता जीवनाबद्दलची तिची असंतुष्टतेची भावना



ही नाहीशी झाली.

एके दिवशी कमला आपल्या कमाईचा पैसा पेटीतून काढून मोजू लागली अन् एकदम आनन्दाने ओरडली. चन्द्रहार खरीदण्यासाठी काढलेले कर्ज या रकमेतून फिटण्यासारखे होते! गहाण ठेवलेले घर सोडवता येणार होते!

घरी आल्याबरोबर तिच्या तोंडून ही खुषखबर ऐकल्यावर बॅनर्जी म्हणाला, ''कमला, अुसनवारी फार महागात पडते असं म्हणतात. त्या वेळच्या परिस्थितीत मी तुला हे सांगितलं असतं, तर काही फायदा झाला नसता. पण आता माझी खात्री आहे की, तू माझ्याबद्दल गैरसमज करुन घेणार नाहीस. या आनन्दाच्या क्षणी एक सत्य मी तुला सांगणार आहे.''

''सांगा बरं काय ते?'' कमलाने अुत्सुकतेने विचारले.

''चन्द्रहाराची चोरी कोणीच केली नव्हती. स्नानाला गेलीस, तेव्हा तूच विसरलीस. मी तो अुचलून लपवून ठेवला. शहरात परतल्यावर मीच तो त्या दुकानात दिला. दुकानदार मित्र आहे माझा. दागिना खरेदी करायचं नाटक केलं मी नन्तर. खरं तर मी न आपलं घर गहाण ठेवलं अन् न कुठलं कर्जही घेतलं. आता या जमलेल्या रकमेतून तुला हवा तो दागिना खरेदी करुया आपण.'' हसत हसतच बोलला बॅनर्जी हे सगळे.

एकदोन क्षण कमला आनन्दाने चित्कारली. पण नन्तर नवऱ्याचे दोन्ही हात आपल्या डोळ्यांना लावत ती म्हणाली, ''अगदीच नासमज होते मी तेंव्हा, आपल्या सौन्दर्याचा अहंकारही होता खूप. देवानं दिलेलं सौंदर्य तर वयानुरुप आजही आहेच. आता त्या चमकदार दागिन्यांची अन् साड्यांची काय गरज? या पैशातून आपण एक छोटीशी नारळाची बाग खरीदूया. सावकाराकडची नोकरी द्या सोडून अन् बागेची देखरेख करा किंवा एकादा व्यापार सुरु करा. भविष्यात आपल्याला पैशांची गरज आहे खूप! आपण लवकरच दोनांचे तीन बनणार आहोत.''

या नव्या कमलात आणि दागिना हरवण्यापूर्वीच्या कमलात बॅनर्जीला आकाश पाताळाइतका फरक जाणवला.



Statement about ownership of CHANDOBA (Marathi)
Rule 8 (Form VI), Newspapers (Central) Rules, 1956

| | |
|---|---|
| *1. Place of Publication* | 'CHANDAMAMA BUILDINGS'<br>188, N.S.K. Salai<br>Vadapalani, Madras-600 026 |
| *2. Periodicity of Publication* | MONTHLY<br>Ist of each calender month |
| *3. Printer's Name* | B.V. REDDI |
| *Nationality* | INDIAN |
| *Address* | Prasad Process Private Limited<br>188, N.S.K. Salai<br>Vadapalani, Madras-600 026 |
| *4. Publisher's Name* | B.VISWANATHA REDDI |
| *Nationality* | INDIAN |
| *Address* | Chandamama Publications<br>188, N.S.K. Salai<br>Vadapalani, Madras-600 026 |
| *5. Editor's Name* | B.NAGI REDDI |
| *Nationality* | INDIAN |
| *Address* | 'Chandamama Buildings'<br>188, N.S.K. Salai<br>Vadapalani, Madras-600 026 |
| *6. Name and Address of individuals who own the paper* | CHANDAMAMA PUBLICATIONS<br>PARTNERS:<br>1. Sri B. VENKATRAMA REDDY<br>2. Sri B.V. NARESH REDDY<br>3. Sri B.V. SANJAY REDDY<br>4. Sri B.V. SHARATH REDDY<br>5. Smt. B. PADMAVATHI<br>6. Sri B.N. RAJESH REDDY<br>7. Smt. B. VASUNDHARA<br>8. Kum. B.L. ARCHANA<br>9. Kum. B.L. ARADHANA<br><br>'Chandamama Buildings'<br>188, N.S.K. Salai<br>Vadapalani, Madras-600 026 |

I, B Viswanatha Reddi, hereby declare that the particulars given above are true to the best of my knowledge and belief.

1st March 1997

**B. VISWANATHA REDDI**
*Signature of the Publisher*

विशेष समाचार

# युनायटेड अरब एमिरेट्स्

**भा**रताच्या इतिहासाचा अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांना ईशान्येकडील सात राज्यांबद्दल माहिती असेलच. सिंधुशाखा परिसरात सात देश आहेत. त्यांना 'सेव्हन सिस्टर्स' असे म्हणतात. अलिकडे त्यांना (संयुक्तपणे) 'युनायटेड अरब एमिरेट्स्' (यू.ए.ई.) असे संबोधले जाते. रस अल् कहिमा, अुम अल कवान, अजमान, शारजा, दुबई, अबुधाबी आणि फ्युजेरा नामक हे सात देश ईशान्येला पसरलेले आहेत. युनायटेड अरब एमिरेट्स्ने २ डिसेंबरला आपली रजतजयन्ती साजरी केली.

दीडशे वर्षपूर्वी या देशांना 'ट्रूसियल स्टेट्स्' असे म्हणत असत. १८२० च्या सुरुवातीला ब्रिटनबरोबर एक तह झाला, अन् त्यामुळे त्यांना हे नाव मिळाले होते. स्थानिक राज्यकर्त्यांनी जो तह मान्य केला, त्यानुसार ब्रिटन आपल्या सेना तेथे ठेवू शकत असे. अबुधाबीचे शेख जावेद खलीफा अल् नाह्यान यांनी दीर्घकाळ (१८५५ ते १९०९) शासनभार संभाळला. एमिरेट्सच्या सध्याच्या अध्यक्षांचे बंधु शेख शक्र हे १९२८ मधे सिंहासनावर बसले. त्यांचे बंधु शेख जावेद यांनी धार्मिक गुरूकडून विद्या प्राप्त करून घेतली व वाळवंटी प्रदेशात खूप प्रवास केला. त्यांनी आपल्या बन्धूला असे कळवले की, वाळवंटी प्रदेशात तेल-विहिरी खोदणाऱ्या विविध ब्रिटिश संस्थांना त्याने मदत करावी. तेल-अुद्योगाची त्यांनी विशेष माहिती मिळवली, अन् असेही ओळखले की या तेल-विहिरीच आपल्या देशाचे भविष्य अुज्वल करू शकतील.

एवढ्यातच 'पूर्व प्रान्तांच्या शेख'च्या स्वरूपात त्यांची नियुक्ती झाली. त्यांच्या जबाबदाऱ्या जास्तच वाढल्या. अल् अमिन प्रान्ताला व्यावसायिक भूमी बनवण्यात आले. त्यामुळे त्या प्रान्ताच्या लोकांच्या सामाजिक जीवनात मोठेच परिवर्तन घडले.

६ ऑगस्ट, १९९६ रोजी ते अबुधाबीचे शासक बनले. तेल-विहिरीपासून मिळणाऱ्या अुत्पन्नातून त्यांनी प्रजाहितासाठी आवश्यक योजना बनवल्या अन् देशाच्या अभिवृद्धीसाठी खूप प्रयत्न केले. ब्रिटनने सिंधु शाखांमधल्या आपल्या सैनिक-तुकड्या काढून घ्यायची इच्छा प्रकट केल्यामुळे आपसात तहही सहजपणे घडून आला. शेख जावेद यानंतर स्वत: बाकी सहा देशांच्या नेत्यांना भेटले व आपल्या सात देशांच्या फेडरेशनची आवश्यकता त्यांना समजावून दिली.

१८ जुलै, १९७१ रोजी 'युनायटेड अरब एमिरेट्स्' म्हणवल्या जाणाऱ्या फेडरल स्टेटच्या निर्मितीचा निर्णय झाला. याला एक अैतिहासिक निर्णय म्हणता येईल. चार महिन्यांनंतर २ डिसेंबरला तो अमलात आला. अबुधाबीचे शेख जावेद बिन सुलतान एमिरेट्सचे अध्यक्ष




नियुक्त झाले. यानन्तर दर पाच वर्षांनी त्यांचीच निवड होत आली आहे.

फेडरेशन बनल्यानन्तर सात देशांनी विविध क्षेत्रात त्वरित प्रगती केली. शिक्षण क्षेत्राचेच अुदाहरण घेअू. १९७१ मधे तेथे केवळ १४० शाळा होत्या. व्यावसायिक कॉलेज किंवा विश्वविद्यालये नव्हतीच. आता ९९० पेक्षा अधिक शाळा आहेत. अल् अमिनमधे १९७७ मधे एमिरेट्स् विश्वविद्यालयाची स्थापना झाली. यात जवळजवळ पंधरा हजार विद्यार्थी शिक्षण घेत आहेत. अुल्लेखनीय गोष्ट अशी की, त्यात काही परदेशी विद्यार्थीही आहेत. देशाची ८४ टक्के प्रजा साक्षर आहे. मध्यपूर्व देशांपैकी यू.ए.ई.ची मुलेच जास्त निरोगी आहेत. १९९६ मधे युनिसेफने या गोष्टीला दुजोरा दिला.



# अतिथि सत्कार

अेके काळी क्षेत्रपुर गावात सर्पानन्द नावाचा एक भाग्यवान माणूस रहात असे. येण्याऱ्या अतिथींचा चांगला आदर-सत्कार करून मोठ्या प्रेमाने तो त्यांच्या गरजा भागवत असे. त्याला अगदी खात्रीपूर्वक असे वाटे की आपल्यासारखा अतिथि-सत्कार करणारा दुसरा कोणी नव्हेच!

जे कोणी अतिथि येत, तेः सर्पानन्दची खूप स्तुती करून निघून जात. यामुळे सर्पानन्दला फारच हर्ष होई. परन्तु चांगला पाहुणचार घेऊन परत जाताना गोपाळ मात्र त्याला म्हणाला, ''श्रीपुरच्या रंगनाथनन्तर पाहुणचाराबद्दल कुणाचं नाव घ्यायचं म्हटलं, तर तुमचंच घ्यावं लागेल.

श्रीपुरच्या रंगनाथला अतिथिसत्काराबद्दल पहिला नंबर देऊन गोपाळने सर्पानन्दचे मन दुखवले. त्याने गोपाळला विचारले, ''हा रंगनाथ आहे तरी कोण? त्याचं खास असं वैशिष्ट्य काय?

आश्चर्यचकित झालेला गोपाळ म्हणाला, ''ऑं? तुम्हाला रंगनाथबद्दल खरंच काही माहिती नाहीय? त्याचं वैशिष्ट्य शब्दात बांधता येणं अशक्य! तुम्ही स्वतःच एकदा श्रीपुरला जाऊन आलात, की तुम्हाला त्याचं वैशिष्ट्य कळून जाईल.

आता सर्पानन्दला रहावेना. दुसऱ्याच दिवशी निघून तो श्रीपुरला पोचला. आणि पत्ता काढून रंगनाथच्या घरी गेला.

रंगनाथचे छोटे कौलारू घर होते. तो बाहेर कट्ट्यावरच बसलेला होता. सर्पानन्दला पाहून तो त्याच्याशी बोलला; त्याची चौकशी केली. पण सर्पानन्दने खरी गोष्ट लपवून 'आपण हिऱ्यांचा व्यापारी असल्या' चे सांगितले.

''तुम्हाला हिरे विकायचे असतील तर शंभुनाथच्या घरी जा. तुमचा जास्तीत लाभ होईल असं पाहतील ते. हिऱ्यांची चांगली किंमत मिळेल तुम्हाला. हिऱ्यांची पारख त्यांच्याइतकी कोणालाच नसेल.'' रंगनाथने सल्ला दिला.

सर्पानन्दने ताबडतोब विचारले, ''पण मी तुमचा अतिथि म्हणून रहायचं म्हटलं, तर काही हरकत नाही ना?'' ''महाराज, तुम्ही तर फार 'मोठे' वाटताय! मी आपला आहे एक गरीब माणूस! तुमचा पाहुणचार रीतसर करू शकणार नाही मी!'' आपली असमर्थता प्रकट करत रंगनाथ म्हणाला.

''माझी तर तुमच्याच घरी रहायची इच्छा आहे. पण आता तुम्हालाच पसन्त नसेल तर तसं सांगा; मी शंभुनाथकडे जाऊन राहीन.''

रंगनाथने आता ताबडतोब सर्पानन्दला घरात बोलावून परसात घेऊन जाऊन पाय धुवायला पाणी दिले. थोड्याच वेळात रंगनाथच्या बायकोने जेवणाची व्यवस्था केली. जेवणात पक्वान्न नसले तरी बाकीचे पदार्थ चवदार होते.

भोजनानन्तर सर्पानन्दने शंभुनाथकडे जायची इच्छा दर्शवली. परन्तु त्याला अडवत रंगनाथ म्हणाला, ''तुम्हाला माझ्या घरी रहायचंय ना; मग आज माझ्या घरीच पाहुणचार होईल तुमचा. नंतरच कुठं जायचं असेल तिथं जा तुम्ही.''

सारा दिवस तिथे कसा काढावा हे कळेना सर्पानन्दला. त्याच्या मनात आले, ''रंगनाथचा पाहुणचार अगदी साधाच तर दिसतोय! मी आपल्या घरी आलेल्या पाहुण्यांसाठी पक्वान्नं बनवतो आणि प्रेमानं खायला घालतो. मग गोपाळला या रंगनाथचाच अतिथिसत्कार सर्वोत्तम का वाटला बरं?'' अशा विचारात तो मग्न असतानाच रंगनाथच्या कुटुंबातील सर्वजण



शारदा लोकगारीवार



तेथे आले. त्यात रंगनाथची बायको, मुले अन् भाऊही होता.

त्या सर्वांनी सर्पानन्दकडे क्षेत्रपुरबद्दल माहिती विचारली त्याने सांगितलेली माहिती नीट लक्ष देऊन ऐकली. बोलता-बोलता सर्पानन्दला संगीताचे ज्ञान असल्याचे त्यांनी जाणले. लगेच खूप आग्रह करून त्यांनी त्याला दोन गाणीही गायला लावली. त्या दिवसापर्यन्त कधीच, कोणी सर्पानन्दचे बोलणे लक्षपूर्वक ऐकून घेतले नव्हते, त्याची चौकशी करून कोणी गाणी म्हणायला लावले नव्हते की त्याच्या संगीताच्या ज्ञानाची तारीफ ही केली नव्हती. त्यामुळे रंगनाथच्या कुटुंबीयांचे स्तुतिपूर्ण बोलणे ऐकून तो प्रसन्न झाला.

अतिथि-सत्कार म्हणजे केवळ 'पाहुण्याला पोटभर खायला घालणे' इतकाच नव्हे. त्याचे बोलणे श्रद्धापूर्वक ऐकले पाहिजे, त्याला आपली विद्वत्ता प्रकट करायला वाव द्यायला पाहिजे. हेच तर खरे आतिथ्य! सर्पानन्दला हे सर्व मनोमन कळून चुकले.

यानन्तर त्यानेही रंगनाथच्या कुटुम्बीयांची वैशिष्ट्ये त्यांच्याकडून जाणून घेतली. त्याच्या प्रश्नाला उत्तर देताना रंगनाथ म्हणाला, ''आमच्या गावात खूपशी जुनी देवळे आहेत, फळबागा आहेत; खूप जुना एक किल्लाही आहे या गावात. तुमची बघायची इच्छा असेल तर माझी मुलं आणतील फिरवून तुम्हाला! पण तुम्ही नक्की दमून जाल खूप! चालावं लागेल ना बरंच!''

गाव फिरून पहायचा सर्पानन्दचा उद्देश नव्हताच. त्यामुळे दमल्याचा बहाणा करून त्याने ते टाळले अन् कुटुम्बातले कोणकोण कोणकोणत्या विषयात प्रवीण आहे हे विचारून घेतले. रंगनाथ स्वतः चित्रकार होता; चांगली चित्रे काढू शकत असे तो. त्याची बायको छान गायची, भाऊ कविता करायचा अन् मुलं मातीची सुन्दर खेळणी बनवत अशी माहिती मिळून त्याला बरे वाटले.

सर्वांची कला थोडीथोडी आपल्याला पहायला आवडेल असे सर्पानन्दने सुचवताच, ते टाळण्याच्या उद्देशाने रंगनाथ म्हणाला, ''तुम्ही दमला आहात ना; तेव्हा आत्ता तुम्हाला त्रास नको. आज पूर्ण विश्रान्ती घ्या.''



तरीही सर्पानन्दने आग्रह केल्यावर रंगनाथ म्हणाला, ''आमच्या घरातल्या सर्वांना फार आवडलात तुम्ही. आमची इच्छा आहे की, तुम्ही आणखी काही दिवस आमच्याकडे रहावं. मग रोज आम्ही तुम्हाला आपली कला दाखवू. जोपर्यन्त हा सारा कार्यक्रम पुरा होत नाही, तोपर्यन्त तुम्हाला रहावं लागेल आमच्याकडे.''

सर्पानन्दला त्याच्या या प्रस्तावामुळे आनन्द वाटला. स्वतःच्या बाबत पाहुण्याला माहिती करून देण्यासाठी त्याच्याशी कसे वागावे हे त्याला समजले. त्याने आता ठरवले की, यापुढे आपणही आपल्या पाहुण्यांना स्वतःबद्दल आपणहोऊन काही सांगायचे नाही. घरी आल्या अतिथिला दोन-तीन दिवस आपल्या घरी ठेवून घेण्यासाठी कसे प्रामाणिक आणि तत्पर असायला हवे, हेही त्याला समजले; 'अतिथि केंव्हा एकदा परत जातोय' अशी प्रतीक्षा करणे योग्य नव्हे.

रात्रीच्या जेवणात सर्पानन्दला आवडणाऱ्या भाज्या रंगनाथच्या बायकोने बनवल्या. दुपारच्या गप्पांमधे मोठ्या चातुर्याने तिने त्याची आवड जाणून घेतली होती.

जेवणानन्तर सर्वांनी थोडा वेळ गप्पा मारल्या. नन्तर सर्पानन्दला. एका खोलीत घेऊन जाऊन रंगनाथने विचारले, ''तुमची काही अपुरी इच्छा असेल तर सांगा, मी पुरी करीन ती.''

ही तर अगदीच अशक्य गोष्ट झाली! कारण रंगनाथ सामान्य असून सर्पानन्द चांगला गबर माणूस! तो काय सर्पानन्दची इच्छा पुरी करणार! तेव्हा त्याला चांगला धडा शिकवण्याच्या उद्देशाने सर्पानन्द म्हणाला, ''असं बोलणं बरं नाही दिसत





तुम्हाला! तुम्ही पुरी करू शकणार नाही, अशी इच्छा मी का व्यक्त केली, असं वाटेल मला शेवटी! अन् तुम्हालाही वाईट वाटेलच ना? कोणीही आपलं सामर्थ्य पाहूनच वचन द्यावं, हे योग्य नव्हे का?''

''तुमचं बोलणं शंभर टक्के खरं आहे. तुमची इच्छा पुरी करू शकेन अशी खात्री असल्यामुळेच ती विचारायचं धाडस केलं मी. तेंव्हा अगदी नःसंकोचपणे बोला.''

''देवलोकात पोचून अप्सरांचं नृत्य पहायची इच्छा आहे माझी!'' रंगनाथ ती पुरी करू शकणार नाही, असे दर्शवण्याच्या स्वरात सर्पनन्दने इच्छा व्यक्त केली.

पलंगाकडे बोट दाखवत रंगनाथ म्हणाला, ''आता जरा आराम करा. तुमची इच्छा नक्की पुरी होईल.'' अन् तो त्या खोलीतून बाहेर पडला.

पलंगावर पडल्यावर सर्पनन्दला दुसऱ्याच क्षणी झोप लागली. त्याला एक स्वप्न पडले. स्वप्नात तो देवलोकात पोचला अन् त्याने तिथे अप्सरांचे नृत्य पाहिले. दुसऱ्या दिवशी जाग आल्यावर तो खूप संतुष्ट दिसत होता. रंगनाथजवळ कृतज्ञता व्यक्त करून, आपण बरोबर स्वप्न कसे पहू शकलो याबद्दल त्याने विचारले, ''ते स्वप्न खरंच होतं'' असे म्हणून रंगनाथने त्याला खरी गोष्ट सांगितली.''

रंगनाथकडे एकदा एक अतिथि आला. तो पाहुणचारावर फार खूश झाला आणि म्हणाला, ''पुत्रा, मी तपोसम्पन्न आहे. आपल्या तपस्येचा एक भाग कुणाला तरी अर्पण करायची माझी तीव्र इच्छा आहे. तो भाग एकाद्या उत्तम माणसाला द्यायचं मी ठरवलं होतं. आज लायक माणूस भेटलाय मला. आजपासून रोज तुझी एक इच्छा-ती किती असाध्य असली तरी नक्की पूर्ण होईल. या वराने अमर्याद संपत्तीचा वारस बनून अशाच प्रकारे अतिथि-सत्कार करत राहून सुखी हो.''

तपस्व्याच्या बोलण्यावर जराही आनन्द न दर्शवता रंगनाथ म्हणाला, ''स्वामी, आपण माझ्या घरी आलात हे माझं सौभाग्य. आपण देऊ केलेला वर फार धोकादायक आहे. इच्छा ही मनाशी संबंधित असते. मनावर ताबा ठेवणं कठीण! त्यामुळे वराचा दुरुपयोग करून कदाचित मी अनेकांना त्रासच देईन, त्यांना दुःखी करीन. आपणासारख्या इन्द्रिय-निग्रहीनाच वर योग्य होणार. माझ्यासारख्या सामान्य माणसांना तो योग्य नव्हे.'' अतिथि म्हणाला, ''मग रोज तुझ्याकडे शंभर सोन्याच्या मोहोरा वर्षाव्यात असा आशिर्वाद देऊ का?''

''मला इतकं सोनं मुळीच नको. स्वतः शेतात खपून जेवढं मिळेल, तेवढंच असावं माणसाजवळ. त्यातूत त्यानं गुजराण करावी. मी पाहुणचार केला. तर तोही त्याच पैशांतून करावा. मला तुमचा हा वरही नको.''

''मग अतिथींची इच्छा पुरी करायचा वर देऊ का? जसं सोनं, चांदी जवाहिर वगैरे?'' अतिथीने विचारले.

''पण मला आपल्या परिश्रमांचं म्हणून फळ प्राप्त होणार नाही ना. तेंव्हा अतिथींना संतुष्ट करायचा वर द्या मला.'' रंगनाथ म्हणाला.

''अतिथींना संतुष्ट करायचं असेल, तर धन, वस्तु अन् वाहनांची गरज पडेल ना?'' अतिथीने विचारले.

''मी तसं केलं, तर लोक माझ्याकडून पाहुणचार घ्यायला न येता दान घ्यायला येतील. मी 'दानी' बनू इच्छित नाही. माझी तर इच्छा आहे की दूरदूर अंतरावरून माझ्याकडे येणारांना मी आश्रय देऊन त्यांचा पाहुणचार करू शकावं, इच्छांचा मनाशी संबंध आहे नं? मन तृप्त करावं अशी शक्ति द्या मला.'' रंगनाथने मागणी केली.

रंगनाथची इच्छा आता तपस्व्याला नीट कळली. तो म्हणाला, ''जे स्वतः होऊन तुझ्याकडे येतील, त्यांचाच फक्त पाहुणचार करत जा. दिवसातून फक्त एकदाच तुझ्या अतिथींची इच्छा पूर्ण होईल, अन् तीही रात्री झोपेत! त्यामुळे त्याचं मन पूर्णतः तृप्त होईल.'' तेंव्हापासून रंगनाथ त्याप्रमाणेच अतिथिसत्कार करत राहिला.

ही सर्व हकिकत ऐकल्यावर सर्पनन्दच्या सर्व शंका नाहीशा झाल्या, स्वतःची इच्छा पूर्ण करण्यासाठी रंगनाथ त्या शक्तीचा उपयोग करत नाही, हे त्याला समजले. अतिथींच्या फक्त शरीरालाच नव्हे, तर मनालाही संतुष्ट करण्याचा त्याचा प्रयत्न असतो; म्हणूनच गोपाळने रंगनाथची मोठी स्तुती करून स्वतः जाऊन त्याला भेटायला सुचवले. घरी परल्यावर सर्पनन्दने स्वतःचीही वागणुक बदलली.



# जनावराचा स्वभाव

**ना**रायण नुकताच काशीयात्रा करून आला. गावच्या चावडीवर लोकांना आपले अनुभव सांगता सांगता तो म्हणाला, ''यात्रेत मला दोन पांगळी माणसं भेटली. मी जिथे राहिलो होतो, तिथे त्यांपैकी एकाला मी जेवण दिलं अन् वर थोडे पैसेही दिले. दुसऱ्या अपंगालाही मी भरपूर मदत केली.

यात्रेहून परत येत असताना मला प्रथम तो दुसरा अपंग दिसला. मी पहिलं, की तो एका आश्रमाची स्थापना करून ऋषिवेषात माळ अन् कमंडलू घेऊन तिथे बसलेला होता. मला पाहूनही त्यानं न पाहिल्याचं सोंग केलं. त्याचे शिष्य त्याची स्तुति करत लोकांना त्याचं महात्म्य सांगून त्यांच्याकडून पैसे उकळत होते.

तसाच पुढे गेल्यावर काही अंतरावर मला तो पहिला अपंगही दिसला. मला ताबडतोब ओळखून मी रहात असलेल्या जागी तो आला अन् माझी लहानमोठी कामं करत राहिला. माझ्याबद्दल त्यानं खूप आदरभावना दर्शवली. पण मला हे समजत नाहीय की, दोघांच्या वागणुकीत इतका फरक का?''

त्याची शंका दूर करत गावप्रमुख म्हणाला, ''नारायण, कुत्र्याला खायला घालून पहा; तो तुमच्या अंगावर एकादी माशीही बसू देणार नाही! त्याचप्रमाणे एकाद्या मांजराला दूध पाजून पहा; ते तुमच्याचकडून स्वतःची सेवा करून घेईल. कुत्रा आपल्याला खायला घालणाराला भगवंतापेक्षा महत्वाचा समजतो, पण मांजर मात्र स्वतःलाच भगवान मानतं! काशीयात्रेत तुला प्रथम भेटलेला अपंग कुत्र्यासारखा अन् दुसरा मांजरासारखा आहे. दोघांनी आपापला स्वभाव दाखवून दिला. माणूसही एक प्राणीच-जनावरच ! पण विचार करण्याच्या विशेष शक्तीमुळे तो जनावरांपेक्षा निराळा असतो. तरीही काहीजण आपला जनावर-स्वभाव दाखवत रहातात.







# सम्राट अशोक

**म**गध साम्राज्याच्या राजधानीचे नगर उद्याने आणि खूप लगडलेल्या फलवृक्षांनी पुरेपूर भरलेले होते. नगरातील प्रजेलाही निसर्गाचे भारी प्रेम असे, त्यामुळेच त्यांनी राजमार्ग व अन्य रस्त्यांच्या दोन्ही बाजूंना दाट छाया देणारे फुले अन् फळांचे वृक्ष लावून नीट वाढवले होते. नगरात पाहू तेथे सुगन्धी फुलेच फुले असत. या फुलांमुळेच नगराच्या एका भागाचे नाव 'कुसुमपुर' ठेवले होते. त्यातही तेथे पाटल-पुष्पे जास्त प्रमाणात फुलत असल्याने या राजधानीच्या नगराचे मोठे सार्थक असे 'पाटलीपुत्र' नाव पडले होते.

गंगा व सोन नद्यांच्या संगमावर जवळजवळ दोन हजार वर्षांपूर्वी अजातशत्रू नावाच्या राजाने किल्ला बांधला. दोन शतकांनंतर राजा चंद्रगुप्तने त्याचे क्षेत्र वाढवले अन् तो अधिक मजबूतही बनवला. त्यावेळी किल्ल्याला सत्तर बुरूज अन् चौसष्ट दरवाजे होते.

नन्दवंशीय राजे मगधवर शासन करत असत. किशोरवयीन चन्द्रगुप्तच्या मातेचा नन्दवंशीयांनी अपमान केल्यामुळे तो नन्दवंशाच्या विरोधात उभा राहिला. नन्दराजांनी चन्द्रगुप्तला पकडण्याची आज्ञा आपल्या शिपायांना दिली. त्याला खूप कडक शिक्षा द्यायचा त्यांचा विचार होता. पण चन्द्रगुप्त त्यांच्या हाती लागला नाही. स्वतःला वाचवून तो नगराबाहेर निघून गेला.

विश्वविजेता बनण्याचे स्वप्न बाळगून ग्रीक सम्राट अलेक्झांडरने भारतावर आक्रमण केले, तेंव्हाच मगधमधे या घडामोडी चालू झाल्या. चन्द्रगुप्त निर्भयपणे त्याच्या समोर



गेला व त्याच्या आक्रमणाला त्याने विरोध केला. त्याची निर्भत्सना केली. अलेक्झांडरनेही चन्द्रगुप्तला कैद करायची आज्ञा दिली. घोडेस्वार सैनिकांच्या पाठलागापासून स्वतःला वाचवून चन्द्रगुप्त तेथूनही पळाला.

असा धाडसी व अट्टड स्वभावाचा चन्द्रगुप्त नंतर मगधच्या सिंहासनावर कसा काय बसू शकला? चन्द्रगुप्त व चाणक्य यांच्या युतीमुळे, एकमेकांच्या मदतीमुळे जशी काही वायुने अग्नीला साथ द्यावी, तसा परिणाम घडला. चाणक्य नंदवंशीय धनानन्दकडून अपमानित झाल्यामुळे त्यानेही नन्दवंशाचा नायनाट करायची शपथ घेतली. हे एकच एक ध्येय समोर ठेवून त्याने आपले घरदार सोडले. याच काळात त्याची चन्द्रगुप्तशी भेट झाली. दोघांचे ध्येय एकच होते - ते म्हणजे नन्दवंश उध्वस्त करणे. चन्द्रगुप्तच्या धैर्य-साहसाला चाणक्याच्या विद्येने, विवेकाने मार्गदर्शन केले. जंगलाच्या मध्यावर त्यांनी सैन्य जमवायला आणि त्यांना युद्धविद्या शिकवायला सुरुवात केली. नंतर अचानक मगधवर हल्ला करून जनतेचा विश्वास अगोदरच घालवून बसलेल्या धनानन्दला राज्यातून घालवून देऊन सिंहासन हस्तगत केले. चाणक्य राज्याचा प्रधान व चन्द्रगुप्त राजा बनला. मगध राजभवनातच चन्द्रगुप्तची माता मुरा हिचा अपमान झालेला होता. तिची प्रतिष्ठा तिला परत मिळवून देण्यासाठी त्याने तिच्या नावावरून मौर्य वंश स्थापन केला.

इतके सारे घडेपर्यन्त अलेक्झांडरचा मृत्यु झालेला होता. तरी ग्रीक साम्राज्याचा अगोदरच पंजाबपर्यन्त विस्तार झालेला होता. आपले सैन्य त्यांच्या सीमेपर्यन्त घेऊन जाऊन चन्द्रगुप्तने काही मांडलिक राजांचा पराभव केला आणि त्यांची राज्ये हिरावून घेतली. त्यावेळी त्यांचा शासनभार अलेक्झांडरचा सेनापती सेल्यूकस हा संभाळत होता. चन्द्रगुप्तच्या हल्ल्याची वार्ता कळल्यावर तो ग्रीसहून परत आला. आपली गेलेली राज्ये परत मिळवण्यासाठी त्याने चन्द्रगुप्तशी लढाई सुरू केली. मगध सैन्याने जेंव्हा धैर्याने ग्रीक सैन्याला तोंड दिले, तेंव्हा सेल्यूकसला चन्द्रगुप्तशी हातमिळवणी करावी लागली. त्याने आपली कन्या हेलन हिचा विवाहही चन्द्रगुप्तशी करून दिला.

यानन्तर चन्द्रगुप्त ने माल्व, गुर्जर, सौराष्ट्र इ. प्रान्तांवर एकएक करून आपले आधिपत्य जमवले आणि आपले राज्य विस्तारित केले. 'विवेकी व शक्तिशाली सम्राट' म्हणून तो प्रसिद्धीस आला.

चन्द्रगुप्तनंतर त्याचा पुत्र बिंदुसार मगधच्या सिंहासनावर बसला. कठोर परिश्रम करून त्याने पित्याची संपत्ती वाढवली आणि सुस्थिर रूपात स्थापन झालेल्या शांततेचे दक्षतेने संरक्षण केले. बिन्दुसारच्या मुख्य परगण्यांची प्रधान नगरे बनली तक्षशिला व उज्जयिनी.

बिन्दुसारच्या शासनकाळात एकदा एक ब्राह्मण पाटलीपुत्रमधे आला. त्याच्याबरोबर त्याची सुंदर कन्याही होती. राजभवनाच्या सिंहद्वारी पोचून ब्राह्मणाने शिपायांजवळ राजदर्शनाची इच्छा व्यक्त केली.

ब्राह्मणाकडे आपादमस्तक पाहून पहारेकऱ्यांनी त्याची टिंगल करत विचारले, ''आपण कोणत्या राज्याचे महाराजे आहात? आपल्याबरोबरची ही महाराणी कोण? स्वतः राजानेच यांचे स्वागत करायला हवे काय?''

ब्राह्मण विनयाने बोलला, ''बाबांनो, मी आपला एक खेडवळ माणूस आहे. पण मला राजाला तावडतोब भेटायचे आहे. कृपा करून मदत करा मला. आत्ता मदत केलीत, तर तुमचं भविष्य उजळून जाईल.''

त्याचे बोलणे ऐकून पहारेकरी विचारात पडले. त्यांच्या बाजूला उभी असलेली तरुणी अत्यंत सौन्दर्यवती व गंभीर दिसत होती. पहारेकऱ्यांच्या सरदाराने ब्राह्मणाला त्याच्या इच्छेचे कारण विचारले.

''ही अत्यंत गुप्त गोष्ट आहे. ती मी



महाराजानाच सांगू शकेन.'' ब्राह्मण उत्तरला.

सरदार बोलला, ''जो काही उद्देश असेल, तो राजभेटीपूर्वी मन्त्र्याला सांगावा लागेल.''

यावर ब्राह्मण काही बोलणार, इतक्यात आतून घोड्याच्या टापांचा आवाज येऊ लागला. राजभवनातून घोड्यावरून कोणी बाहेर येत होते, हे स्पष्टच होते.

'बाजूला व्हा, बाजूला व्हा' म्हणत एका पहारेकऱ्याने ब्राह्मणाला मागे ढकलले. तो मागे आपल्या कन्येवर आदळल्यामुळे तीही खाली पडली. इतक्यात घोड्यावरून येणाऱ्या खुद्द राजानेच लगाम खेचून घोडा थांबवला. पहारेकऱ्यांनी राजाला प्रणाम केले. त्यांच्यावर नाराज होत राजाने खाली



पडलेल्या ब्राह्मणाकडे व त्याच्या कन्येकडे पाहिले. हळूहळू अुठत ब्राह्मण कापऱ्या आवाजात बोलला, ''महाराज यात या बिचाऱ्या पहारेकऱ्यांची काहीच चूक नाहीय. मी त्यांना 'आपले दर्शन कसे होईल' याबद्दल विचारत होतो अन् इतक्यात आपण इथे आलात!''

राजाने भेटीचे कारण विचारताच ब्राह्मण विनयाने म्हणाला, ''ती एक गुप्त गोष्ट आहे. आपल्याला एकान्तातच सांगेन.''

इतक्यात ब्राह्मणकन्येनेही अुठून राजाला प्रणाम केला. तिचे केस विस्कटलेले व वस्त्र मळलेले असले तरी ती अतिशय सुन्दर व मनोहर दिसत होती. राजा घोड्यावरून अुतरला आणि लगाम जवळच्या शिपायाहाती देत ब्राह्मणाला आपल्या मागोमाग येण्याची खूण करून तो आत जाअू लागला. कन्येसह ब्राह्मण राजामागोमाग एका विशाल दालनात पोचला. तेथील एका आसनावर बसत राजा म्हणाला, ''सांगा काय सांगायचंय ते ब्राह्मणवर !''

पुन्हा राजाला प्रणाम करत ब्राह्मण म्हणाला, ''माझ्या बोलण्यात काही विचित्रपणा व अविवेक वाटला तर आपण मला क्षमा करावी. मी इथे केवळ त्या विधात्याचा दूत म्हणून आलो आहे. माझी ही कन्या शैशवावस्थेत असताना एक साधुबाबा माझ्याकडे आले. हिला आशिर्वाद देत, ''वयात आली की ही महाराणी बनेल'' असे म्हणून ते निघून गेले. आता माझ्या सारख्या दरिद्री ब्राह्मणाची कन्या महाराणी कशी बनणार? ही केवळ एक



चेष्टाच असावी असं वाटून मी तिकडे लक्ष दिलं नाही. ही वयात येताच मी तिच्यासाठी वरसंशोधन सुरु केलं. त्यावेळी ज्योतिष्यांनी जेंव्हा तिची जन्मकुण्डली पाहिली, तेंव्हा त्यांना अतिशय आश्चर्य वाटलं ! त्यांनी बेधडक सांगून टाकले की - ही युवती नक्की महाराणीच बनणार!''

ब्राह्मणाचे कथन ऐकून राजाने आश्चर्याने मुलीकडे पहाताच तिने पुन्हा लज्जेने मान खाली घातली.

ब्राह्मण पुढे बोलू लागला, ''महाराज, मला माहीत असणारे आपण अेकटेच 'महाराजा' आहात, म्हणून मी इथे आलोय. मला वाटतंय की आपल्या या दर्शन भाग्यामागे विधात्याचा अदृश्य हस्त आहे. मला समजत नाहीय, की त्यावेळी आपणच



घोड्यावर नसता, तर माझं काय झालं असतं! मी आता आपली ही कन्या सुभद्रा आपल्या हवाली करतोय. कृपा करून तिचा स्वीकार करा."

"माझ्या कितीतरी राण्या आहेत. आपल्या म्हणण्याप्रमाणे मी हिच्याशी विवाह केला, तरी ही 'महाराणी' कशी काय बनणार?" राजाने शंका व्यक्त केली.

ब्राह्मण बोलला, "मला काहीच माहीत नाही. विधात्याच्या मनात असेल, ते घडेल."

राजाने हसत ब्राह्मणपुत्रीकडे पाहिले. सेवकाला पाठवून अंतःपुराच्या प्रमुख परिचारिकेला बोलावून घेऊन तो तिला म्हणाला, "मी परत येईपर्यन्त या युवतीची नीट काळजी घे. त्यात काही कसर रहाता कामा नये."

परिचारिका तरुणीजवळ गेली आणि राजा राजवाड्याबाहेर निघून गेला. आता तिथून निघायच्या तयारीत असलेल्या पित्याकडे अश्रुपूर्ण नेत्रांनी पहात सुभद्राने एकवार हाक मारली, "तातऽ!"

"मी आपलं कर्तव्य पार पाडलंय पुत्री! आता मी इथं रहाणं बरं नव्हे. पिता म्हणून माझा धर्म निभावलाय मी! आता चलतो", ब्राह्मण बोलला.

दुःखभरल्या आवाजात सुभद्रा बोलली, "मला सोडून जाऊ नका तात!"

"असं नको म्हणू सुभद्रा! मुलीचं घर माहेर नव्हे, सासर असतं बरं! तिचा विवाह योग्य व्यक्तीशी करून देणं, एवढंच मातापित्याचं कर्तव्य असतं! अन् मग कन्या परकी होते त्यांना. पत्नी बनल्यानंतर तिचं इतकंच कर्तव्य असतं की आपल्या परिवारातल्या कुणाला कसली आच लागू न देणं ! लक्षात ठेव की, इथे तू एकटी नाहीस. विधाता तुझ्याबरोबर सदैव आहे. इथे त्यानंच तुला पोचवलंय. तो सदासर्वकाळ तुझं रक्षण करील. दुःख नको करूस" ब्राह्मणाने मुलीचे सान्त्वन केले. एकदा हृदयपूर्वक तिच्याकडे पाहून तो भवनाबाहेर पडला. पाऊल उचलत नसले तरी विवशतेने तो तेथून निघून गेला.

पिता गेल्या दिशेकडे पहात कळवळून रडणाऱ्या सुभद्रेला हळूच धरून परिचारिका भवनात घेऊन गेली.

तिला पाहून अंतःपुरात हाहाःकार झाला. राण्यांच्या दासी एकमेकींशी कुजबुजू लागल्या.

"हिचं सौन्दर्य पाहून खरंच वाटत नाही,



की ही एका दरिद्री ब्राह्मणाची कन्या असेल! कोणी राजकुमारीच वेषांतर करून आली असावीसं वाटतंय." एक दासी बोलली.

"महाराजांनी हिच्याशी विवाह केला, तर ते नक्कीच इतर राण्यांना विसरून जातील, यात संशयच नाही." आणखी एक दासी बोलली.

तीनही राण्या दासींचे बोलणे लपून ऐकत होत्या. हेव्याने जळत त्या उठून आपापल्या महालात निघून गेल्या.

मुख्य परिचारिकेने सुभद्रेला एक विशाल महाल दाखवला. तिच्या भोजनाची व्यवस्था करून तिला नवी वस्त्रेही आणून दिली.

दुसऱ्या दिवशी भल्या सकाळीच बिन्दुसार राजमहालाबाहेर पडला. राज्याच्या सीमाप्रान्तात काही मांडलिकांनी केलेल्या बंडाचा बीमोड करण्यासाठी तो ससैन्य तेथे पोचला. हे काम पुरे होताहोता दोन महिने लागले. राजा परतेपर्यन्त त्या परिचारिकेने सुभद्रेच्या आवश्यक सुखसोयीकडे नीट लक्ष पुरवले. परन्तु परत आल्यावरही जेंव्हा त्याने तिची काहीच विचारपूस केली नाही, तेंव्हा तिने ओळखले की, राजा तिला अजिबात विसरूनच गेलाय.

'राजाने सुभद्रेशी विवाह केला, तर तो आपल्याला विसरून जाईल' असे राण्यांच्या मनात आले. तिच्या प्रेमात बुडून तो आपली मुळीच पर्वा करणार नाही, असे वाटून त्यांनी 'राजा सुभद्रेला विसरूनच जाईल' अशा उपायाची योजना केली. मान्त्रिकांना बोलावून घेऊन त्या तिच्यावर मंत्रतंत्रांचा प्रयोग करवू लागल्या.



राण्यांच्या प्रोत्साहनाने आता प्रमुख परिचारिकेचीही सुभद्रेचा अपमान करण्यापर्यन्त मजल पोचली. राण्यांची नखे कापण्याचे काम तिच्यावर सोपवले गेले. त्याही बहाणे करून तिचा अपमान करू लागल्या, तिची चेष्टमस्करी करू लागल्या, आपलं काम नीट करत नाही असे म्हणू लागल्या. त्या तिला टोमणे मारत, "अग तू तर दरिद्री कुटुम्बात जन्मलीस. एक ब्राह्मणकन्या असून राजाशी विवाहाचं स्वप्न पहातेस होय? तुझे सगळे प्रयत्न विफलच होणार बरं का ! अजूनही वेळ गेली नाहीय; मुकाट्यानं राजवाडा सोडून आपल्या पित्याकडे जा निघून. राजाला तू आवडत नाहीस हे तर आता ओळखलंच असशील. म्हणूनच तर युद्धावरून आल्यावर ते तुला भेटलेही नाहीत. तुझं नावही काढलं नाही त्यांनी !" सुभद्रेने

बिचारीने सगळे मुकाट्याने सहन केले. आपला त्रास कोणाला सांगायचा प्रयत्नही तिने केला नाही. 'विधाता तुझ्याबरोबर आहे' हे पित्याचे शब्द तिने चांगले लक्षात ठेवले होते. त्यामुळेच राण्यांच्या अपमानाला काही अुत्तर न द्यायचे आणि गप्प राहून विधात्याच्या निर्णयाची वाट पहायचे ठरवले तिने. काळ जात राहिला, पण तिने जणू आपले तोंड शिवून घेतले होते. दोन वर्षे अशीच निघून गेली.

एके दिवशी अुद्यानात हिंडताना राजाच्या पायात काटा मोडला. जवळच्या आसनावर बसून त्याने टाळी वाजवली. एक सेवक धावत तिथे आला.

राजा म्हणाला, ''पायातला काटा काढायला न्हाव्याला बोलावून आण.'' या कामात न्हावी हुशार असतात, पण नेमका त्या वेळी कोणी न्हावी राजवाड्यात नव्हताच. समोर अुभ्या असलेल्या सुभद्रेला पाहून सेवक म्हणाला, ''महाराजांच्या पायात घुसलेला काटा काढून ये.''

सुभद्रा घाबरतच राजाजवळ पोचली. त्याच्या पायांजवळ जमिनीवर बसून सहजपणे तिने काटा काढून टाकला.

राजा म्हणाला, ''तुला पूर्वी राजवाड्यात कधी कुठे पाहिल्यासारखं नाही वाटत!'' सुभद्रेने काहीच अुत्तर दिले नाही. पण तिच्या डोळ्यातून अश्रू मात्र वाहू लागले.

राजाने विचारले, ''केंव्हापासून रहात आहेस इथे?''

''ज्या दिवशी माझ्या तातांनी मला आपल्या हवाली केलं, त्या दिवसापासून महाराज!'' बाहेर पडणारं आपलं दुःख आवरायचा प्रयत्न करत सुभद्रा अुत्तरली.

राजाने तिच्याकडे एकदा लक्षपूर्वक पाहिले आणि अचानक विजेसारखी त्याच्या स्मृतिपटलावर आठवण जागृत झाली. त्या प्रमुख परिचारिकेचा त्याला अतिशय राग आला. त्याला स्वतःचाही राग आला. जरा शान्त झाल्यावर तो सुभद्रेला म्हणाला, ''अुशीर झाला तो झालाच. पण तुझ्यावरचा अन्याय ताबडतोब संपवायला हवा. आज सूर्यास्तापूर्वीच मी विवाह करीन तुझ्याशी.''

ताबडतोब मन्त्र्यांना व पुरोहितांना बोलावून घेअून राजाने त्यांना विवाहाची आवश्यक ती तयारी करायची आज्ञा दिली.

क्रमशः







# सुन्द-अुपसुन्द

**रा**त्रीची वेळ. सर्वत्र दाट काळोख पसरलेला. श्वापदांचे ओरडणे वातावरण जास्तच भयानक करत होते आणि निर्मनुष्य अशा त्या मसणवटीत राजा विक्रम पुन्हा त्या झाडापाशी पोचला. झाडावरील प्रेत अुतरवून त्याने ते आपल्या खांद्यावर लादले अन् तो परत स्मशानाची वाट चालू लागला. तेंव्हा प्रेतातला वेताळ बोलू लागला, ''राजा, मी खूप विचार करून पाहिला, पण तू हे इतके कष्ट कशासाठी झेलत आहेस, ते मला कळत नाहीय. तुला माहीतच आहे की हे जग मोठं विचित्र आहे. इथे केवळ योगविद्याधुरन्धर नव्हे, तर जादूटोणा जाणणारे, क्षुद्र शक्तींवर ताबा मिळवलेले तान्त्रिकही कधी कधी आपल्या अजब शक्ती प्रदर्शित करत असतात. त्यांना मिळत असलेली सफलता पाहून असं वाटतं की, त्यांना काहीही करणं शक्य असतं. पण आश्चर्य असं की त्यातले काहीजण आपल्या

## वेताळ कथा



वैयक्तिक अडचणींचा मार्ग शोधण्यात असफल होतात. आणि त्या सोडवण्यासाठी एकाद्या राजाच्या आश्रयाला जातात. तुला हे विचित्र नाही वाटत? तुझ्या बाबतीतही मला असं वाटतंय की असा कोणी योगी किंवा तान्त्रिक तुझ्या आश्रयाला आला असावा अन् त्याची इच्छा पूर्ण करण्यात सध्या तू गुंतलेला आहेस. खरं सांग, तू अशी कसली जबाबदारी स्वीकारली आहेस? वेळ पडली तर योगी असहाय जनतेला मदत करून त्याद्वारे मुक्ति मिळवण्याचा अुद्देश बाळगतो. पण तांत्रिक कीर्ती अन् अधिकाराची लालूच दाखवून प्रजेला पथभ्रष्ट करतो. अुदाहरणासाठी मी तुला सुन्द नावाच्या एका व्यक्तीची गोष्ट सांगतो. आपला थकवा घालवत आरामात ती ऐक.'' असे म्हणून वेताळ गोष्ट सांगू लागला.

खूप पूर्वीची गोष्ट आहे. मगध देशच्या धर्मपुरी गावात सुन्द आणि अुपसुन्द शेजारीशेजारी रहात असत. सुन्द संपन्न होता, पण त्याचं आपलं असं कोणी नव्हतं. जमेल तितकी, तो दुसऱ्यांना मदत करी. गावात त्यानं चांगलं नाव मिळवलं.

अुपसुन्दची वर्तणुक मात्र त्याच्या अगदी विरुद्ध होती. त्याचं कुटुम्ब मोठं होतं. व्यसनांपायी तो पाण्यासारखा पैसा खर्च करी. नेहमी सर्वांशी भांडण अुकरून काढी. भलं आपलं नुकसान झालं तरी चालेल. पण दुसऱ्याचा फायदा होअू न देण्याची त्याची नियत होती. त्याची विचार करण्याची रीतही तिरकस असे. दुसरा कोणी सुखीसमाधानी असेल, तर त्याला पहावत नसे, त्यामुळे गावचे लोक त्याला दुष्ट आणि द्वेषी म्हणत असत.

आपण निन्देचा विषय आहोत, हे अुपसुन्दला माहीत होतं. पण आपले वाईट गुणच त्याला कारण आहेत हे त्याला पटत नसे. तो दुसऱ्यांना म्हणे की - ही सारी त्या सुन्दचीच करणी आहे, त्यानंच आपल्याला बदनाम करण्यासाठी कंबर कसलेली आहे. स्वतःचा चांगुलपणा शाबित करण्यासाठीच तो दान धर्म करत असतो.

''माझं कुटुम्ब मोठं असल्यामुळेच मला कित्येक अडचणींना तोंड द्यावं लागतं. त्या अडचणी सोडवू शकत नसल्यामुळेच नाइलाजानं मला व्यसनांच्या आहारी जावं लागतं. माझा फक्त इतकाच अुद्देश असतो की, व्यसनाधीन होअून का होईना, पण थोड्या वेळासाठी तरी आपल्या चिन्ता मला विसरता याव्यात. माझीही दान द्यायची इच्छा असते, दीन-दुःखी लोकांना मदत करायची इच्छा असते, पण माझ्याजवळ धन नाहीय. सर्वांशी चांगलं वागावं, त्यांच्याशी मैत्री असावी अशी माझी इच्छा असते; पण माझं मनच नेहमी अशान्त असतं. त्यामुळेच मी इतरांशी भांडत रहातो. माझी ही कमजोरी सुन्दला चांगली माहीत आहे. तरीही मला मदत करायची त्याची इच्छा नसते. मी चिन्तामुक्त झालो, तर खरोखरच फार चांगला माणूस बनेन. पण मी तसा झालो तर सुन्दचं नुकसान होईल.'' असं एकदा अुपसुन्द ग्रामाधिकाऱ्याजवळ बोललासुद्धा. आश्चर्य प्रकट करत ग्रामाधिकारी विचारू लागला, ''तुझ्या भलेपणामुळं सुन्दचं कसं काय नुकसान होईल?''

''निखाऱ्यावरची राखही चांदीसारखी चमकते. जिथे कोणताच वृक्ष नसतो, तिथे एरंडीलाही महावृक्ष मानलं जातं. जिथं पंडीत नसतो, तिथं नुसता साक्षरही कालिदास असतो. तुम्हीच सांगा ना, हा सुन्द तरी असा कोणता भलेपणा करत असतो? मी त्याचा शेजारी असल्यामुळेच प्रत्येक गोष्टीत त्याच्याशी माझी तुलना केली जाते अन् त्याची स्तुती होते.'' अुपसुन्द अुत्तरला.

त्याचं अुत्तर ग्रामाधिकाऱ्याला बरोबर वाटलं. अन् गोष्ट कानोकान गावात सर्वत्र पसरली. असा प्रचारही झाला की, सुन्द अुपसुन्दला मुळीच मदत न करता शत्रुत्व दाखवत असतो. सुन्दच्या कानीही पडली ही बातमी.



सुन्द तावडतोब ग्रामाधिकाऱ्याकडे जाअून म्हणाला, कि गावचे प्रमुख लोक आणि अुपसुन्द यांना बोलावण्यात यावे. सर्वजण आल्यावर अुपसुन्दला विचारलं, ''बोल, तुझी कमाई किती?'' अुपसुन्दने कमाई मासिक 'शंभर मोहोरा' इतकी सांगितली. ''आता सांग, दर महिना तुझा खर्च किती?'' सुन्दने विचारलं, 'तीनशे मोहोरा' इतका खर्च अुपसुन्दने सांगितला. ''मग आता कर्ज किती झालंय?'' या सुन्दच्या प्रश्नाला अुपसुन्दकडून अुत्तर मिळालं, ''दोन हजार मोहोरा!''

आता सुन्द ग्रामाधिकऱ्याला म्हणाला, ''हे पहा, मी याचं कर्ज चुकवतो. माझ्या इस्टेटीतून मला महिना हजार मोहोरांची कमाई होते. ती मी तुमच्या हवाली करतो. त्यातून या अुपसुन्दला महिना पाचशे देत



चला. पण मग माझ्याही काही अटी आहेत त्या पाळल्या तरच याला माझी मदत मिळत राहील. यापुढे यानं सर्व व्यसनं सोडून द्यावीत अन् झगडे करू नयेत. आपल्याजवळची स्वत:ची जी कमाई येते, ती यानं परोपकारासाठी अुपयोगात आणावी. कबूल?''

सुन्दची तारीफ करत ग्रामाधिकारी म्हणाला, ''स्वत:ची कमाई तू माझ्या हवाली करणार अन् त्यातून पाचशे मोहोरा मी अुपसुन्दला देणार. मग बाकीच्या पाचशेचं काय करू मी?''

सुन्द बोलला, ''मी याच्याच शेजारी राहिलो, तर याच्याशी माझी तुलना होईल ना. माझी बरोबरी करायची योग्यताच नाही त्याची. यामुळे त्याला भलं नाव मिळणारच नाही. मग मी तरी इथे राहून त्याला या भाग्यापासून वंचित का करावं? मी हे गावच सोडून जातो. अन् शिवाय मला ऐहिक सुखांविषयी आसक्ती तर नाहीच आहे. मी आपला अरण्यात जाअून महर्षी लोकांच्या सहवासात राहून ज्ञानार्जन करीन. माझी अुरलेली इस्टेट गावकऱ्यांच्या भल्यासाठी खर्च करा. माझा हा निर्णय अटळ आहे.'' असे बोलून सुन्द तिथल्या तिथेच आवश्यक ते दस्तावेज बनवून देअून गाव सोडून निघून गेला.

यानन्तर सुन्द अरण्यात गेला आणि एका महर्षींच्या आश्रयाला राहिला. काही प्रश्न विचारल्यावर महर्षी त्याला म्हणाला, ''पुत्रा, मेधावी माणसाने फक्त दोन मार्ग निवडावेत. एक आहे तपस्येद्वारा मोक्षप्राप्ती आणि दुसरा विद्येच्या द्वारा ज्ञानार्जन. तुझ्यात अमर्याद ज्ञानलालसा आहे. तू योगी बनून प्रजाहित साध.''

त्यावेळी मगधवर राजा महागुप्तचे राज्य चालू होते. लागोपाठ दोन वर्ष पाअूस पडला नाही, त्यामुळे राज्यात पाणी व खाद्यपदार्थांची कमतरता पडू लागली. चालू वर्षीही पाअूस पडायची काही चिन्हं दिसत नव्हती. त्यामुळे दु:खी होअून राजाने मन्त्र्यांची बैठक बोलावली. सर्वच खिन्न होते, काहीच मार्ग सुचत नव्हता.

या परिस्थितीत सुन्द तिथे पोचला. राजाला भेटून तो म्हणाला, ''महाराज, एक अशी अडचण अुपस्थितीत झालीय, की जी फक्त आपणच दूर करू शकाल. आपण जर हे काम केलंत, तर मीही आपणाला माझ्याकडून भरपूर मदत करीन.''

वेष, भाषा आणि चेहऱ्यावरचं तेज पाहून राजाला वाटलं की, हा कोणी योगीच असावा. तो सुन्दला म्हणाला, ''महात्मा, आपली अडचण सांगा, मी सोडवीन ती. पण माझी अडचण मात्र आपण सोडवू शकणार नाही, तेंव्हा मला आपल्या मदतीची गरज नाही.''

सुन्द यावर गंभीरपणे म्हणाला, ''देणं-घेणं हा मानव धर्म आहे. आपल्या अडचणींचं वर्णन करा, मी ती नक्कीच दूर करीन.'' तेंव्हा राज्यात पाअूस नसल्याची अडचण महागुप्तने त्याला सांगितली.

सुन्द हसून म्हणाला, ''ही अडचण सोडवणं तर माझ्या हातचा मळ आहे. निसर्गाच्या शक्ति काही विशिष्ट सूत्रांवर आधारभूत असतात. वातावरणात अनुकूलता नसल्यामुळे आपल्या देशात पाअूस पडत नाहीय. काही मन्त्रांच्या साह्यानं ती अनुकूलता निर्माण करता येईल. बास, त्यासाठी योग्य अशी जागा हवी.'' चकित होत महागुप्त म्हणाला, ''माझ्या राज्यात आपण पाअूस पाडलात, तर मी आपल्याला कनकाभिषेक करीन.''

काहीही अुत्तर न देता, सुन्दने थोडा वेळ डोळे मिटले व नंतर ते अुघडून तो म्हणाला, ''रथ तयार करवावा. शिवपुत्र ग्राम या शब्द-यज्ञासाठी अनुकूल स्थळ आहे.''

रथ सन्नद्ध झाला. त्यात सुन्द आणि महागुप्त बसले. सुन्दच्या सूचनेवरून राजाने कसलेही आयुध धारण केले नव्हते.

बरेच दूर गेल्यावर घोडे अचानक थांबून गेले. सारथी घाबरत म्हणाला, 'महाराज, वाघांचा एक कळप वाट अडवून अुभा आहे!'

सुन्द व राजाने त्या दिशेला पाहिले. थोड्याच अंतरावर एकूण बारा वाघ अुभे होते. जलाशय सुकून गेल्यामुळे पाण्याच्या शोधात ते तेथे आले असावेत. दोन घोडे व





तीन माणसे पाहून त्यांच्यात अुत्साह संचारला होता. बरोबर हत्यार न घेतल्या-बद्दल राजाला फार वाईट वाटले. पण तो ते आणू तरी कसा शकला असता? सुन्दची तशी अटच होती.

सुन्द रथातून अुतरला आणि मन्त्रोच्चार करत वाघांजवळ पोचला. काय घडत आहे, हे महागुप्त डोळे फाडून पहात होता. एक एक करून एकामागोमाग एक वाघ पुढे येअून सुन्दसमोर गुडघे टेकवून त्यांनी जंगलात प्रयाण केलं.

सुन्द परत येअून रथात बसला आणि म्हणाला, ''क्रूर प्राण्यांची वर्तणुकही एका सूत्रात बांधलेली असते. शब्द समूहाच्या साह्याने त्यांच्यावर ताबा मिळवणं योग्याला शक्य असतं.''

थोड्या वेळानं रथ शिवपुत्र गावात पोचला. तेंव्हा काही गावकरी काळजीच्या अवस्थेत गावच्या सरहद्दीवर फिरत असलेले त्यांना दिसले. सुन्दने त्यांची चौकशी केली.

त्याच्याकडे आश्चर्यानं पहात एका वृद्धानं विचारलं, ''तू योगी तर नव्हेस ना?''

सुन्दने होकार भरला

म्हातारा म्हणाला, ''आमची गावदेवी ग्रामाधिकाऱ्याच्या स्वप्नात येअून म्हणाली की, एक योगी तुमच्या गावात येणार आहे. शब्दयज्ञ करून तो पाअूस पाडणार आहे. देवीनं पुढे असंही सांगितलं की शब्दयज्ञानं पाअूस तर पडेलच, पण तुमच्या गावात भूकम्प होईल. त्यापासून गाव वाचवायचं असेल तर वडाच्या झाडाजवळ असलेला दगड सहा फूट अुंच अुचलायला हवा. गावकरी त्याच प्रयत्नात आहेत. पण दगड तर एक अंगुळभरही वर यायला तयार नाही!''

आता काय करावे, असा राजाला विचार पडला. पण सुन्द जवळ येअून म्हणाला, ''महाराज, शरीरबळानं सर्व कामं होत नसतात. ज्ञानशक्तीचा अुपयोग केला तर पहाडही दळून त्याचं पीठ करता येईल. अणूतून ब्रह्मांड निर्माण करता येतं. आपल्या ज्ञानशक्तीच्या मदतीनं मी पत्थर वर अुचलीन'' असे म्हणून त्याने काही मन्त्र अुच्चारले.

दुसऱ्याच क्षणी तो पत्थर आपोआप तरंगत वर येअू लागला आणि बरोबर सहा फुटावर येअून तिथेच थांबला. गावकऱ्यांच्या तोंडून हर्षध्वनी अुमटले.

यानन्तर सुन्दने शब्दयज्ञ केला. तो संपता-संपताच आकाशात काळे ढग



जमायला सुरुवात झाली. ते पसरायला लागले अन् थंड वारे वाहू लागले. पाअूस पडू लागला. तो केवळ शिवपुत्र गावापुरताच नव्हे, तर राज्यभर पसरला होता. इतका खूप पाअूस पडला, की सारा मगध देश अुल्हसित झाला.

हे सर्व पहाता पहाता काहीसा घाबरलेला राजा महागुप्त सुन्दला म्हणाला, ''महानुभाव, आपण सर्वशक्तिसंपन्न आहात. अवतारी पुरुषाप्रमाणे आपण माझ्या राज्यात पाअूल ठेवलंत अन् माझ्या देशवासीयांचं दुःख दूर केलंत. मी तर एक सामान्य व्यक्ति! आपणाला स्वतःला न सोडवता आलेली अडचण, मी पामर कशी सोडवू शकेन? मला आता हीच चिन्ता पडली आहे!''

हसतहसत आता सुन्दने आपली कहाणी सांगितली अन् राजाला म्हटले, ''अुपसुन्दनं मला अजूनही सोडलेलं नाही. मी योगी बनून अद्भुत शक्ति मिळवल्याचं त्याला कळलं आहे. तो माझ्या आश्रमात येअून हटून बसला आहे की, मी त्याला योगविद्या शिकवावी. या विद्येसंबंधी कित्येक गुप्त तालपत्रं मी आश्रमात लपवली आहेत. मला आणखीही अशी बरीच गुप्त रहस्यं जाणून घ्यायची आहेत. अुपसुन्दनं मला त्रास देअू नये आणि माझ्या आश्रमाचं रक्षण व्हावं अशी माझी इच्छा आहे. यासाठीच मी आपणाकडे आलो आहे.''

महागुप्तला हे ऐकून आश्चर्य वाटलं. तो म्हणाला, ''आपण क्रूर श्वापदं ताब्यात ठेअू शकता, वजनदार पत्थर हवेत अुडवू शकता, नैसर्गिक शक्तींना प्रेरणा देअू शकता, अन् एका सामान्य माणसापासून वाचण्यासाठी माझी मदत मागता? आपल्या सुरक्षिततेची माझ्या कडून अपेक्षा करता?''

यावर काही अुत्तर न देता सुन्द दोन-तीन



क्षण गप्प राहिला आणि नंतर राजाकडे पहात गंभीर स्वरात बोलू लागला, "राजा, पापी लोकांना शिक्षा करायचं काम राजाचंच. दुसऱ्यांच्या कामात हस्तक्षेप करणं मला योग्य वाटत नाही."

हे ऐकून राजानं एक शब्दही तोंडातून काढला नाही. अरण्यातल्या सुन्दच्या आश्रमाच्या संरक्षणाची त्याने अुत्तम व्यवस्था केली आणि 'अुपसुन्दने त्या हद्दीत पाअूल ठेवू नये' असे आज्ञापत्रही काढले.

इतकी गोष्ट सांगितल्यावर वेताळ विक्रमला म्हणाला, "राजा, मन्त्रसामर्थ्यानं सुन्दनं पत्थर अुचलला, शब्दयज्ञानं पाअूस पाडला. असली कामं योगशक्ती असलेली माणसंच करू शकतात हे मला मान्य आहे. पण मला एक शंका आहेच. इतकी अपूर्व शक्ती असणारा असामान्य योगी एका सामान्य माणसापासून संरक्षणाची मागणी राजाकडे करतो, हे विचित्र नव्हे का? इतका अुत्तम योगी असूनही तो एका सामान्य माणसाला शिक्षा देअू शकला नाही, हे हास्यास्पद नव्हे का? सुन्दनं दाखवलेल्या तान्त्रिक शक्ति, या सर्वच्या सर्व क्षुद्र शक्ति नव्हेत का? माझ्या प्रश्नांची अुत्तरं माहीत असूनही मौन राहिलास तर तुझं मस्तक फुटून जाईल."

विक्रमराजा अुत्तरला, "ईश्वरानं माणसला बुद्धी, विचारशक्ती अन् बोलण्याची कला प्रदान केली. काही विशिष्ट सूत्रांच्या आधारे काम केलं, तर तो सन्मार्गी बनतो. पण दुष्टांचा व्यवहार कोणत्याही सूत्राला धरून नसतो. ज्ञान, विज्ञान, योगविद्या यांचा अशा माणसांवर कसलाच प्रभाव पडत नाही.

आपल्या विद्येच्या आधारे सुन्द अुपसुन्दला कदाचित शिक्षा देअू शकेल, पण त्याची बुद्धी नाही बदलू शकणार! शिवाय, योग्यानं कोणत्याही परिस्थितीत आपल्या स्वार्थासाठी दुसऱ्या कुणाला त्रास देअू नये. योगज्ञानाचा वैयक्तिक विषयासाठी अुपयोग करू नये. तसं केल्यास त्याच्या योगशक्ती नाहीशा होण्याची शक्यता असते. यामुळेच सुन्दने राजाची मदत मागितली"

आता राजाचं मौन भंग करण्यात यशस्वी झालेला वेताळ त्याला झुकांडी देअून प्रेतासह गायब झाला आणि पुन्हा झाडावर जाअून बसला.

**आधार : शरद राठोड यांची रचना**







# मन्नारची खाडी व त्याच्यापुढे

**शब्दांकन : मीरा नायर ◆ चित्र गोपकुमार**




कन्याकुमारीच्या किनाऱ्याच्या कडेने नावेतून पुढे जाताजाता आपण मन्नारच्या खाडीत प्रवेश करतो.

या खाडीच्या प्रवेशद्वारावरच मुख्यभूमीवर तिरुचेन्दुर हे तटवर्ती शहर आहे. इथले भगवान सुब्रह्मण्यम् किंवा मुरुगन् याचे मन्दिर प्रसिद्ध आहे. मन्दिराचे द्वार समुद्राकडे अुघडते. मूळचे मन्दिर हजार वर्षांपूर्वी बनलेले असले, तरी जवळजवळ तीनशे वर्षांपूर्वी सध्याचे नअू मजली गोपुर असणारे मन्दिर बांधले गेले. खूप दूरवरून भक्तजन खांद्यावर कावड घेअून येथे येतात. 'कावड' ला तमिळमधे 'कावडी' म्हणतात.

तिरुचेन्दुरपासून थोड्या अंतरावर आहे तूतुकुडी अथवा तुतिकोरीन. १९७४ मधे याला भारताचे दहाव्या क्रमांकाचे मोठे बंदर घोषित केले गेले. अशाप्रकारे दोन मोठी बंदरे असणारे तमिळनाडु हे भारतातील एकमेव राज्य आहे. नावा थांबण्याचा इथला किनारा मानवनिर्मित असून सर्व ऋतुंमधे त्याचा अुपयोग होअू शकतो. याच्या अुत्तर व दक्षिणेकडे बांधलेल्या समुद्रातल्या दोन मोठ्या भिंतीमुळे लाटांपासून बंदराचे रक्षण होते. ४,०९६ मीटर लांबीची अुत्तरेकडील भिंत तर जगातली दुसऱ्या क्रमांकाची समुद्रातली लांब भिंत आहे.

खूप पूर्वीपासूनच भारतीय मोत्यांना मोठा मान प्राप्त झालेला आहे. दुसऱ्या शतकात आपल्या देशातून रोम आदि भागात मोती निर्यात होत असत. आजही तुतिकोरीन हे मोती-व्यापाराचे केन्द्र आहे. आता



भगवान सुब्रह्मण्यमचे मन्दिर



त्याची ख्याती मीठ, खते, जड पाणी व
ऊष्णता ऊर्जेसाठीही आहे.

पवित्र रामेश्वर बेट मन्नार खाडीच्या उत्तर टोकाला आहे. रामेश्वर हे हिन्दूंच्या चार पवित्र धामांपैकी एक होय (बाकीची तीन आहेत - द्वारका, बदरीनाथ व जगन्नाथपुरी) प्रत्येक निष्ठावान हिन्दु व्यक्तीची एकदा तरी रामेश्वरदर्शनाची इच्छा असते. या बेटाचा रामायणातील घटनांशी मोठाच संबंध आहे. हिन्दु मतानुसार श्रीरामाने येथील शिवलिंगाची स्थापना केलेली आहे. कारण त्याला रावण-वधाचे प्रायश्चित करायचे होते. रावण हा ब्राह्मण असल्याने रामाच्या हातून ब्रह्महत्या घडली होती. कथा अशी आहे की श्रीरामाने हनुमानाला कैलासवरुन शिवलिंग आणायची आज्ञा दिली. हनुमानाने ताबडतोब उसळी मारली, परन्तु त्याला परतायला उशीर झाला व लिंगस्थापनेचा मुहूर्त टळू लागला. शेवटी सीतेने बनवलेल्या वालुकालिंगाची स्थापना करण्यात आली. थोड्या वेळाने आलेल्या मारुतीला अगोदरच लिंगस्थापना झाल्याचे कळले व त्याला वाईट वाटले. श्रीरामाने त्याला, 'आपण तू आणलेले लिंगच स्थापूया' असे म्हणून पहिले लिंग दूर करायला सांगितले. खूप प्रयत्न करूनही तो ते जराही हलवू शकला नाही. तेंव्हा श्रीराम त्याला म्हणाला, "हरकत नाही, आता तू आणलेलं लिंग याच्या बाजूलाच स्थापित कर. प्रथम नेहमी या लिंगाचीच पूजा केली जाईल, अन् नंतर सीतेने बनवलेल्या लिंगाची. हनुमानाच्या शिवलिंगाला 'काशी विश्वनाथ रामस्वामी लिंग' असे म्हणतात. आजही या लिंगाचीच अगोदर पूजा होते व नंतर रामाने स्थापलेल्या लिंगाची.



शिवलिंग हलवायच्या प्रयत्नात हनुमान

ई.स. च्या पंधराव्या शतकात रामनाडच्या सेतुपती वंशाच्या राजा उदयनने



रामेश्वर मंदिर बांधले. असे मानले जाते की रामाने स्थापित केलेल्या त्या शिवलिंगाच्या जागीच हे मंदिर बांधलेले आहे. या मंदिरात १,२०० मीटर लांबीचा एक प्रदक्षिणा मार्ग (बोळ) आहे. व त्यात १००० खांब आहेत. त्यांवर फार सुन्दर कोरीवकाम केलेले आहे. भारतात इतका लांब प्रदक्षिणा मार्ग अन्यत्र कुठेही नाही. हिन्दूंशिवाय शीखही रामेश्वरला पवित्र मानतात, कारण की, दहावे गुरु गोविन्दसिंह एकदा इथे आले होते.



रामेश्वर मन्दिर



लांबच लांब प्रदक्षिणामार्ग

तीर्थस्थान असून, शिवाय वैज्ञानिक दृष्टीनेही रामेश्वर प्रसिद्ध आहे. रामेश्वर बेटाच्या आसपास असणाऱ्या प्रवाळांच्या खडकात तऱ्हेतऱ्हेच्या समुद्रजीवांची वस्ती आहे. त्यांचे अध्ययन करण्यासाठी विद्यार्थी येथे येत असतात.

रामेश्वरच्या दक्षिण-टोकावर धनुष्कोडी आहे. तेथून श्रीलंका खूपच जवळ आहे.

धनुष्कोडीच्या अर्थ आहे - रामाचे धनुष्य. इथला तट धनुष्यासारखा वाकलेला आहे. येथे कोदंडरामाचे मंदिर असून त्यात राम, सीता, लक्ष्मण, हनुमान व बिभीषण यांच्या मूर्ती आहेत. रावणाचा भाऊ बिभीषण हा या ठिकाणीच रामाच्या आश्रयाला आला असे मानले जाते.

रामेश्वर बेटाजवळच समुद्रात वाळूच्या ढिगाऱ्यांसारखी एक ओळ आहे. त्याला 'अॅडम्स ब्रिज' असे म्हणतात. हिन्दु लोक यांना रामाने लंकेत जाण्यासाठी बांधलेल्या 'सेतु' चे अवशेष मानतात. भूशास्त्रज्ञ असे



धनुष्कोडीचे रेतीचे ढिगारे. स्पिनिफेक्स नावाचे गवत रेती वाहून जाऊ देत नाही. या गवताच्या तमिळ नावाचा अर्थ - रावणाच्या गुलमिशया

मानतात की, भारत व श्रीलंका खूप पूर्वी एकमेकांना जोडलेले असले पाहिजेत - त्याचाच हे ढिगारे म्हणजे पुरावा होय. ३० कि.मी. लांबीची ही ओळ म्हणजे जहाजांच्या आवागमनातला मोठाच अडथळा होय.



अगस्ती ऋषींना दर्शन देणारे शिवपार्वती

रामेश्वरहून आपण पाक खाडीतून पाक जलपट्टी (डमरू आकाराचा मध्य) ओलांडून शेवटी बंगालच्या उपसागरात प्रवेश करतो. इथे आपण कोडिक्करैला पोचतो तेंव्हा फ्लेमिंगो पक्षी पंख फडफड करून जणू आपले स्वागतच करतात. येथील पक्षी अभयारण्यात विविध प्रकारचे पक्षी पहायला मिळतात. कोडिक्करैजवळची समुद्रकिनाऱ्यावरील वेदारण्यम ही वस्ती आपल्या स्वातन्त्र्यलढ्याशी संबंधित आहे. चक्रवर्ती राजगोपालाचारींनी या ठिकाणी इथल्या मीठ-सत्याग्रहाचे नेतृत्व केले होते. नंतर राजाजी स्वतन्त्र भारताचे पहिले गव्हर्नर जनरल बनले. वेदारण्यमचे शिवमन्दिरही प्रसिद्ध आहे. येथील शिवपार्वतींच्या मूर्ती वर-वधूच्या वेषात आहेत. अगस्तीच्या प्रार्थनेवरूनच ते या वेषात प्रकट झाले असे मानले जाते. कैलास पर्वतावरील आपल्या विवाहसमयी त्यांनी हीच वेषभूषा धारण केली होती. यामुळे वेदारण्यमला 'दक्षिण कैलास' असेही म्हणतात.

कोडिक्करै









# राक्षसाची शपथ

चन्द्रशिला राज्याचा राजा विक्रमसेन भोगी व विलासी होता. आपल्या शारीरिक सुखांची सोय करण्यातच त्याचा जास्त वेळ जात असे. अन्तःपुरातून तो क्वचितच बाहेर पडे. प्रजाहिताबद्दल तो उदासिन असे. शासना-संबंधीच्या कामाची त्याला मुळीच आवड नव्हती. यामुळे त्याचे मन्त्रीच राज्यकारभार पहात असत. सहाजिकच आश्रित लोकांबद्दल पक्षपात आणि लाचलुचपतीचे प्रकार प्रमाणाबाहेर वाढले.

या राज्यात सिंहबल नावाचा युवक रहात असे. त्याचे आपले असे कोणीच नव्हते. घरचे कोणीच नसल्यामुळे मोठ्या कष्टाने त्याने शिक्षण घेतले आणि सैन्यात भर्ती होण्यासाठी आवश्यक असणारे प्रशिक्षणही घेतले.

नोकरीसाठी राजधानीत जाऊन राजाला भेटायची इच्छा त्याने दर्शवली. पण त्याला नोकरी मिळाली नाही कारण त्यासाठी मन्त्र्यांना लाच देणे आवश्यक होते.

दुःखी सिंहबलला राजा व मन्त्र्यांचा फार राग आला. त्यांच्याबद्दल त्याच्या मनात घृणा उत्पन्न झाली. आता पुन्हा नोकरीसाठी प्रयत्न करायची त्याची इच्छा नव्हती. त्याने विचार केला, ''जिथे प्रत्यक्ष राजा अन् मन्त्री आपली कर्तव्यं विसरले आहेत, प्रजेकडे दुर्लक्ष करून त्यांचंच रक्त शोषत आहेत, दरिद्री लोकांना 'देवाने दिलेला शाप' असे म्हणून त्यांची अवहेलना करत आहेत, आपली जबाबदारी प्रत्यक्ष शासनकर्तेचे टाळत आहेत, अशा राज्यात रहाणेच नको.'' त्याने शिकारी बनून आपला उदरनिर्वाह करायचे ठरवले. आणि राज्याच्या सरहद्दीवरील दंडकारण्यात प्रवेश केला.

अशी काही वर्षे निघून गेली. विक्रमसेन आता खूप आजारी पडला. राजवैद्यांनी परीक्षा करून दिलेल्या औषधांचा काहीच उपयोग

सुधा वैशंपायन



होईना. तेंव्हा रत्नाकर नावाच्या एका वृद्ध वैद्याने त्याला तपासून म्हटले, ''महाराज, अरण्यात मिळणाऱ्या अमृतवल्ली नामक वनस्पतीच्या मुळ्यांच्या अुपयोगाने आपण बरे होअू शकाल. पण ती वनस्पती मिळवणं फार कठीण आहे.''

जवळच अुभा असणारा राजपुत्र अग्निसेन वृद्ध वैद्याला म्हणला, ''ती वनस्पती कशी ओळखावी अन् ती कुठे मिळू शकेल इतकं सांगितलंत तर काहीही करून मी ती मिळवीन.''

वनस्पतीचे वर्णन करून रत्नाकरने सांगितले की, ती वनस्पती दंडकारण्याच्या पूर्व भागात मिळू शकेल.

चन्द्रशिला राज्याच्या सर्व लोकांना हे दंडकारण्य किती भयंकर आहे हे छान माहीत होते. एकदा युवराज अग्निसेन त्या भागात शिकारीला गेला होता आणि तिथल्या क्रूर श्वापदांपासून व विषारी सर्पांपासून स्वतःला कसाबसा वाचवून सुटून आला. त्यावेळी त्याने जंगली माणसांकडून ऐकले होते की तेथे सिंहबल नावाचा एक नागरी माणूस रहात असतो.

अग्निसेनने सैनिक पाठवून सिंहबलला बोलवून घेतले. अग्निसेननेही तोवर अैकले होते की बाप भोगी, विलासी आहे, तर सवाई बेटा मोठा क्रूर असून त्याला आपल्या प्रजेची कसलीच पर्वा नाहीय. पुत्राचे भविष्य बनवण्यात पित्याची भूमिका महत्वाची असते. पण पिताच अकर्मण्य असेल तर पुत्र कसा योग्य मार्गाने चालेल?

अग्निसेनने सिंहबलचे स्वागत करून म्हटले, ''सिंहबल, महाराज फार आजारी असल्याचं तू ऐकलं असशीलच! वैद्यानं सांगितलंय की, अमृतवल्ली वनस्पतीच्या अुपचारानेच त्यांचा रोग नाहीसा होईल. ती वनस्पती मिळवण्यासाठी मला तुझी मदत हवी. तू मागशील तितकं धन द्यायला तयार आहे मी!'' नंतर त्याने वैद्याने दिलेले वर्णनही सांगितले. पण आज सिंहबलची मदत हवी म्हणून तो त्याच्यशी लाडीगोडीत बोलला. एरव्ही त्याला 'जंगली' म्हणून त्याने दूर जायला लावले असते.

सिंहबल अुत्तरला, ''युवराज, पैशांबद्दल बोलू नका. माझ्या दृष्टीनं परोपकार हीच मोठी संपत्ती होय. मी तुम्हाला मदत नक्कीच करीन.''

दुसऱ्याच दिवशी दोघेही अश्वारूढ होअून



जंगलात पोचले. सिंहबल पुढे-पुढे जात राहून वाटेत येणारी झाडे-झुडुपे कापत राहिला. तेंव्हा तिथले साप फुसफुसत शेजारच्या दुसऱ्या झाडांवर निघून गेले.

चार दिवस अशा प्रकारे प्रवास केल्यावर ते वैद्याने सांगितलेल्या पर्वतीय भागात पोचले. सिंहबल आता अुत्साहाने म्हणाला, ''युवराज, आपण बरोबर जागी पोचलो आहोत. वैद्यानं सांगितल्याप्रमाणे अमृतवल्लीचं झुडूप एका फुटापेक्षा अुंच नसणार. घोड्यांवर बसून आपण ते शोधू शकणार नाही. आता खाली अुतरून ते शोधत राहूया.''

दोघेही घोड्यांवरून अुतरले अन् त्यांना झाडाला बांधून टाकले. अमृतवल्ली शोधता शोधता त्यांना कळले की, जवळच्याच पहाडातल्या गुहेत रक्ततर्पण नावाचा राक्षस रहातो.

हा रक्ततर्पण राक्षसांपैकी अुत्तम जातीचा होता. त्याचे पूर्वज दंडकारण्याचे अधिपती होते. हलक्या जातीच्या राक्षसांप्रमाणे जनावर मारून खाणं तो अपमान समजे. त्याने फक्त एवढीच शपथ घेतली होती की, 'मरण्यापूर्वी आयुष्यात एकदाच एक माणूस मारून खाईन.' त्याला आता एकाऐवजी चांगली दोन माणसे दिसली. आनंदाने आरोळी ठोकून तो धावतच या दोघांकडे येअू लागला. त्याची आरोळी ऐकताच सिंहबल व अग्निसेन भयाने कापू लागले. युवराज बेशुद्ध होता होता म्हणाला, ''सिंहबल, आता काय मार्ग? मला तर वाटतंय की त्या वैद्यानं जाणून बुजून राक्षसाच्या तोंडी देण्यासाठी आपल्याला इथं



पाठवलंय; अमृतवल्ली हा एक बहाणा! आता परमेश्वरच वाचवू शकेल आपल्याला.''

खाली पडणाऱ्या अग्निसेनला पकडून सिंहबल म्हणाला, ''युवराज, राज्यातल्या प्रत्येकाला माहीत आहे की, आपले पिता भोगलालसी आणि आपण स्वतः क्रूर आहात. हा राक्षस अत्यन्त क्रूर असल्याचं मीही ऐकलं होतं. अशा परिस्थितीत आपण काय करावं? देवावर भरंवसा ठेवून गप्प रहायचं? नाही, म्यानातनं तलवार अुपसा आपली!'' अन् त्याने स्वतः धनुष्यावर चढवण्यासाठी भात्यातून बाण काढला.

एवढ्यात राक्षस त्यांच्या अगदी जवळ पोचून दोघांना दोन्ही हातात अुचलत ''अरेवा! आज माझी शपथ पूर्ण होणार! पण एक धर्मसंकट आहे. मरणापूर्वी एकच माणूस

मारून खायची शपथ घेतली होती मी! पण आता इथे तर दोघंजण आहेत. काय करावं बरं!'' असे बोलत दोघांकडे तीक्ष्ण नजरेने पाहू लागला.

तेव्हा सिंहबल म्हणाला, ''हे राक्षसोत्तमा, धर्म-अधर्म जाणण्याची तुला समज आहे, हे पाहून मला आनन्द वाटतोय. जीवन आणि मृत्यु यांच्यामधे लटकणाऱ्या चन्द्रशिला राज्याच्या महाराजांच्या औषधासाठी अमृतवल्ली शोधायला आलोत आम्ही दोघं. हे त्या राज्याचे युवराज आहेत. ते रोपटं कुठे आहे हे सांगितलंस तर युवराज ते घेऊन जाऊन पित्याला वाचवतील; अन् मग आरामात तू मला खा. तुझी शपथ मुळीच मोडणार नाही.''

तावडतोब दोघांना खाली ठेवत सिंहबल म्हणाला, ''ते रोप इथे जवळच आहे. जरूर देतो मी ते तुला! जन्म देणाऱ्यासाठी कोणी त्याग करणं हे या जगात अगदी सहाजिकच आहे. पण एकाद्या युवराजाने आपल्या रक्षणासाठी तुझ्यासारख्या सामान्य नागरी-काला बळी द्यावं हे बरं दिसतं का?''

दुसऱ्याच क्षणी राक्षसाचे पाय धरत अग्निसेन म्हणाला, ''हे भल्या राक्षसा, छान डोळे अुघडलेस माझे! माझ्या प्रजेला आपल्या भोगलालसी राजाची घृणा वाटतेय, अन् माझ्या क्रूरपणासाठी तिला माझा द्वेष वाटतोय. माझ्या चुकीबद्दल मला शासन मिळायला हवंच. अमृतवल्ली सिंहबलच्या हवाली करून मलाच खा!''

हे ऐकून राक्षस खो खो हसू लागला अन् म्हणाला, ''ज्या दया, करुणा इ. सात्विक गुणांबद्दल बोलताय, ते तर राक्षस-स्वभावाच्या अगदी विरुद्ध आहे. त्याचं पालन होणार नाही. पण तुमच्यासाठी मी त्याग करायला तयार आहे. चला माझ्याबरोबर ''आणि तो त्यांना जरा दूर घेऊन गेला. तिथल्या झाडीतून अमृतवल्ली रोपटी मुळासकट अुपटून त्यांच्या हाती देत तो म्हणाला, ''एकच का, दोन-तीन घेऊन जा. पण माझी शपथ मात्र राहूनच गेली. याचं कारण, बहुधा मी राक्षस-स्वभावाविरुद्ध काही दुष्कृत्य केलं असलं पाहिजे.'' लांब सुस्कारा सोडत तो आपल्या गुहेकडे वळला.

सिंहबल आणि युवराज मोठ्या आनन्दाने घोड्यांवर आरूढ होऊन नगराकडे निघाले.







# सोनेरी क्षण - ९

## जगात हे कोठे आढळेल?

### ... कोला अस्वल?

कोला अस्वलांची पिल्ले, कांगारूच्या पिल्लांप्रमाणेच पहिले सहा महिने मातेच्या पोटाला असलेल्या पिशवीत वाढतात. खाताना ती खूप गमती करतात. त्यांचा मुख्य आहार म्हणजे युकेलिप्टस्‌ची पाने. ही कुठे आढळतात सांगू शकाल?





### ... मत्स्यकन्येचा पुतळा?

हॅन्स क्रिश्चिअन अॅण्डरसन हे सुप्रसिद्ध बालवाङ्मय लेखक होते. त्यांच्या स्मृति-प्रीत्यर्थ मत्स्यकन्येचा एक कान्स्य पुतळा एका बंदराच्या प्रवेशद्वारी स्थापित केला आहे. हे बंदर कोणते?



### ... मॅडम टुत्स्वाड्स् वॅक्स संग्रहालय?

एक फ्रेन्च महिला मॅडम टुत्स्वाड्स् यांनी १८३४ मधे एक संग्रहालय स्थापन केले. आजही ते सुप्रसिद्ध व अप्रसिद्ध अशा व्यक्तींच्या मेणाच्या पुतळ्यांसाठी प्रसिद्ध आहे. हे संग्रहालय कोठे आहे?

### .....सोन्याच्या द्वाराचा पुल?

'गोल्डन गेट ब्रिज' सोन्याच्या द्वाराचा पुल हा जगातील सर्वात सुन्दर पुलांपैकी एक गणला जातो. १९३७ मधे त्याची निर्मिती झाली असून तो १२२० मी. लांबीचा आहे. तो ओलांडायचा म्हटले, तर तुम्हाला कुठे जावे लागेल?



**प्रयत्न करून पहा :**

## बॉडी रोल



गंमत म्हणून हा खेळ खेळता येईल.

अ - टेनिसचा चेंडू उजव्या हातात पकडा.

आ - दोन्ही हात उचलून इंग्रजी अक्षर 'टी' च्या आकारात उभे रहा.

इ - हातातला चेंडू उजव्या हातावरून हळूच घसरत सोडा.
तो कोपर, दंड व छातीवरून घसरत जाऊन डाव्या हातात पोचेल. क्रमवार तुम्हाला असे करणे जमले, की डाव्या हातातला चेंडू उलट क्रमाने उजव्या हातात आणायचा प्रयत्न करा.



## टेडी बेअरचे बाहुले

**आवश्यक वस्तु:**

जुना प्लॅस्टिकचा टेडी बेअर, प्लॅस्टर ऑफ पॅरिस, कात्री, दोऱ्याचा तुकडा व रंग.

**बनवायची रीत:**

१. प्लॅस्टिक टेडी बेअरचे मधोमध कापून दोन उभे भाग करा.

२. प्लॅस्टर ऑफ पॅरीसमधे पाणी मिसळून, चांगले मळून त्याचा गोळा बनवा.

३. कापलेल्या बेअरच्या दोन्ही भागात तो गोळा नीट भरून दोन्ही भाग दोऱ्याने एकमेकांवर नीट बांधा.

४. प्लॅस्टर ऑफ पॅरीस घट्ट होईपर्यन्त ते तसेच राहू द्या.

५. नन्तर हळू हळू प्लॅस्टिक काढून घ्या. आता प्लॅस्टर ऑफ पॅरिसचा टेडी बेअर तुमच्या हाती येईल.

६. शेवटी त्याचे डोळे, नाक व तोंडाला रंग लावा.







# महाभारत

एक वर्षाच्या वनवासानन्तर अर्जुन इन्द्रलोकी गेला. त्याला परत येता येता पाच वर्ष निघून गेली. तो परत आल्यानन्तर ते चार वर्ष गन्धमादन पर्वतप्रान्तात राहिले. कुबेराच्या परवानगीने आणि त्याने नेमलेल्या यक्षांच्या मदतीने त्यांनी त्या दिव्य प्रदेशाचे सौन्दर्य खूप पाहून घेतले. त्यांच्या वनवासाची दहा वर्षे अशी निघून गेली अन् आता इथे अकरावे वर्षही संपले. लवकरच बारा वर्षेही पूर्ण होतील अन् शेवटचे अज्ञातवासाचे वर्ष पुरे करून कौरवांशी लढून आपला सूडाचा अग्नी शमवतील, त्या वेळाची भीम मोठ्या आतुरतेने वाट पहात होता. एके दिवशी त्याने आपल्या मनातली ही गोष्ट अग्रज धर्मराजाला निःसंकोचपणे सांगून टाकली. अर्जुन, नकुल, सहदेव यांनीही भीमाला दुजोरा दिला. त्यांच्या बोलण्यातून स्पष्ट दिसत होते, की ते ही भीमासारखे त्या वेळेच्याच प्रतीक्षेत आहेत.

धर्मराजाने त्यांच्या भावना ओळखल्या आणि तो देवप्रान्त सोडून निघून जायचे ठरवले. भीमाने स्मरण केल्याबरोबर घटोत्कचाने आपल्या अनुचरांसह येऊन पांडवांना वृषपर्वाच्या आश्रमात पोचवले. तेथून ते बदरिकारण्यात आले. त्या सुन्दर अरण्यात एक महिना राहून पुढे ते किरात देशातल्या सुबाहुपुरला गेले. इन्द्रसेन, विशोक इ. पांडवांचे सहयात्री तेथेच राहिले. घटोत्कच व त्याच्या अनुचरांनाही पांडवांनी तेथूनच परत पाठवले व ते स्वतः पायी चालत हिमालयातल्या विशाखयूपला पोचले.

या प्रान्तात शिकार करायला अनेक श्वापदे होती. शिकारीची आपली आवड भागवत पांडव वर्षभर तेथेच राहिले.

एके दिवशी हातात आयुध घेऊन भीम शिकारीला निघाला. त्याने अनेक जनावरे

भीमाचे शापविमोचन - १२



मारली. शिकारीत मग्न असताना त्याला अचानक हिरव्या रंगाचा महासर्प दिसला. त्याचे तोंड एकाद्या गुहेसारखे विशाल असून त्यात अति भयंकर असे चार दात होते. त्याचे डोळे प्रकाशमय होते आणि तोंडातून विषज्वाला निघत होत्या. त्या ज्वाला मोठमोठ्या वृक्षांना जाळत होत्या. अशा भयंकर सर्पाला भीम निडरपणे जाऊन भिडला. पण अुलट सापानेच त्याचे शरीर आपल्या विळख्यात लपेटून घेतले. भीमाने निस्तेज होत त्याच्या विळख्यातून स्वतःला सोडवायचा खूप प्रयत्न केला. भीमाच्या अंगात हजार हत्तींचे बळ असूनही तो स्वतःला सोडवू शकेना.

भीम वेळेवर परत न आल्याने, धर्मराज तो गेल्या दिशेला शोधासाठी निघाला. अर्जुन व नकुल-सहदेवांवर त्याने द्रौपदीच्या रक्षणाचा भार सोपवला. धौम्यही त्याच्याबरोबर गेला. मार्गात भीमाने मारलेल्या श्वापदांचे ढीग पडले असल्याने शोध घेणे अवघड झाले नाही.

पुढे गेल्यावर सापाच्या विळख्यात अडकलेला भीम त्याला दिसला. आता असहाय होअून तो निराश दिसत होता. भीम का व कसा सर्पाच्या तावडीत सापडला हे धर्माला कळेना! सर्पाला संबोधित करून तो म्हणाला, ''सर्पराजा, तुला खाद्यच हवं असेल तर बोल, काय हवं तुला? तू मागशील ते आणून देतो, पण माझ्या भ्रात्याला सोडून दे.''

सर्प म्हणाला, ''महाशय, तुमचा भ्राता योगायोगानेच माझ्या तावडीत सापडलाय. मी त्याला आता कोणत्याही परिस्थितीत सोडणार नाही. तुलाही हवं तर रहा इथं! अुद्या गिळून टाकीन तुला.''

त्याचे दर्पयुक्त बोलणे ऐकून धर्मराजाने विचारले, ''पण आहेस तरी कोण तू?''

''मी तुझा पूर्वज ! माझं नाव नहुष! चन्द्राच्या सातव्या पिढीतला आहे मी. आपल्या जीवनात मी अनेक पुण्यकृत्यं केली. खूप तपस्या करून इन्द्रपद मिळवलं. पण ते मिळवल्यावर गर्व झाला मला, आपल्या मर्यादा ओलांडल्या मी. ब्राह्मणांचा अपमान केला. अगस्ती-मुनींनी क्रोधित होअून मला सर्प बनायचा शाप दिला. पण त्यांच्या कृपेनं पूर्वस्मृति, अन् असीम बळ मला प्राप्त झालंय त्यांनीच मला सांगितलंय की माझ्या प्रश्नांचे बरोबर अुत्तर देणाराकडून मला शापमुक्ति





मिळेल.'' सर्प बोलला.

''मग विचार तर. यथाशक्ती अुत्तरं द्यायचा प्रयत्न करीन.'' धर्मराज म्हणाला.

''ब्राह्मण कोण? त्याला काय माहीत असणं आवश्यक आहे? सापाने विचारले, ''मला बरोबर वाटणारं अुत्तर देतोय मी. ब्राह्मण तोच, की ज्याच्यात सत्य, दान, सहनशक्ती, तपस्या, दया, करुणा आदि गुण असतील. त्याला माहीत असायला हवं ते परब्रह्मतत्व, की ज्यात न सुख आहे अन् न दुःखही.''

''राजा, तू सांगितलेले सगळे गुण जर एकाद्या शूद्राच्या अंगात असतील, तर त्याला ब्राह्मण म्हणावं का? तू म्हणालास की परब्रह्मतत्व हे सुखदुःखाच्या पलिकडे आहे. पण जगात असं काहीच नाही, की जे सुखदुःखाच्या पलिकडे आहे.'' सपनि विचारले.

''ज्याच्यात सत्य, दान, दया आदि गुण असतील, तो शूद्र नव्हेच. आणि हे गुण ब्राह्मणात नसतील, तर त्याला ब्राह्मण म्हणू नये. सदाचार हा सर्वोत्तम आहे. ज्याप्रकारे शीत व अूष्ण यांच्यामधे शून्य आहे, त्याच प्रकारे सुख व दुःख यांपेक्षा भिन्न असं जगात काहीच नाही. या द्वंद्वापलिकडे एकच आहे, ते म्हणजे परब्रह्म-तत्व.'' धर्मराज अुत्तरला.

''तू म्हणालास की सदाचार सर्वोत्तम होय. मग केवळ सदाचारामुळेच कोणी ब्राह्मण बनत असेल, तर वर्णाश्रमाची गरजच काय?'' सपनि विचारले.

धर्मराज म्हणाला, ''बोलणे, जन्मणे, मरणे, जन्माला घालणे या गोष्टी सर्व मानवांना समान रूपाने नैसर्गिक आहेत. परंतु पूर्वी जाति-संकरामुळे वर्ण-विभाजन आवश्यक झाले. वेदज्ञात्याला मुख्य गुण हवे - त्यांचा सदाचार व त्यांची व्यवहार शैली. ब्राह्मण-स्त्रीच्या पोटी जन्मलेला प्राणी, तोपर्यन्त शूद्र स्त्रीच्या पोटी जन्मलेल्या प्राण्यासारखाच असतो, जोवर त्याच्यावर काही संस्कार घडत नाहीत. आपल्या जीवन कालात सत्य आदि सद्गुण ग्रहण केल्यावरच तो ब्राह्मण बनतो. असा गुण-ग्राही शूद्रसुद्धा ब्राह्मण बनतो. स्वतः मनुने खूप पूर्वीच हे सांगितले आहे.''

यावर सर्प म्हणाला, ''तुझ्या अुत्तरांनी माझं समाधान झालं. मी तुझ्या भ्रात्याला गिळणार नाही.'' अन् तो शापमुक्त होअून त्याला पूर्वीचे नहुषाचे रूप प्राप्त झाले. इतक्यात स्वर्गातून विमान आले अन् त्यात बसून नहुष स्वर्गात गेला.

अशाप्रकारे धर्मराजाने आपल्या भ्रात्याला सोडवले व धौम्यासह तो आपल्या पर्णकुटीत परतला. नंतर घडलेले सर्व त्याने सर्वांना सविस्तर सांगितले. सर्वांना भीमाच्या दुस्साहसाचे व धर्मराजाच्या ज्ञानाचे आश्चर्य वाटले.

वर्षाकाल संपेपर्यन्त पांडव द्वैतवनातच राहिले. नंतर ब्राह्मण व परिवारासह ते काम्यकवनात पोचले. ऋषींनी त्यांचे स्वागत केले.

श्रीकृष्ण सत्यभामेला बरोबर घेअून पांडवांच्या भेटीसाठी तेथे पोचले. सर्व पांडवांच्या अुपस्थितीत श्रीकृष्ण धर्मराजाला म्हणाले, ''राजा, इतकी वर्ष अरण्य हेच तुझे निवासस्थळ आहे, पण तू अरण्यधर्माचं पालन न करता, राजधर्माचंच पालन करत राहिलास. धर्मराज, हे तुझं नाव मोठं सार्थक आहे. निश्चित काळ पूर्ण झाल्याबरोबर आम्ही सर्व तुला पाठिंबा देअू आणि त्या स्वार्थी, कपटी, ईर्ष्याळू कौरवांचा समूळ नाश करू. तू राजा बनणार हे निश्चित.'' नन्तर तो द्रौपदीला म्हणाला, ''पांचाली, दुर्योधनाच्या डोक्यावर सध्या मृत्यु विचरत आहे. तुझ्या मुलांची सुभद्रा अुत्तम काळजी घेत आहे. प्रद्युम्न त्यांना धनुर्विद्या शिकवत असतो.''



कृष्णाला प्रणाम करत धर्मराज म्हणला, ''तूच तर आमचा मुख्य आधार आहेस. आता आमचा वनवासकाळ संपत आला आहे. तुझ्या कृपेनं अज्ञातवासाचं वर्षही सफलतेनं समाप्त झालं, तर पुढेही तूच आम्हाला मार्गदर्शन करायचं आहेस. आता लगेच आम्ही काय करावं याबद्दल आम्हाला आज्ञा दे.''

श्रीकृष्ण तेथे असताना मार्कण्डेयही आला. त्याचे वय खूप असूनही तो केवळ वीसच वर्षाचा वाटत होता. त्याच्या मुखावर तेज होते. तेथे अुपस्थित असणाऱ्या सर्वांना विविध कथा सांगून अनुकरणीय धर्मसूत्रेही सांगावीत अशी त्याची इच्छा होती. आश्रमाच्या बाहेर या गोष्टी चालू असताना आत सत्यभामा व द्रौपदी गप्पागोष्टी करण्यात मग्न होत्या.

सत्यभामेने द्रौपदीला विचारले, ''तुझे पति शूरवीर आहेत. दिक्पालांपेक्षा त्यांच्यात



काहीही कमी नाहीय. पण मला तर या गोष्टीचं आश्चर्य वाटतंय की असे बलवान पाचही पति तुझ्या मुठीत कसे रहातात. तुझं मन ते कधीच दुखवत नाहीत. तुला पसंत नसणारं कुठलंच काम ते करत नाहीत. तुझा मान ठेवतात. याचं कारण काय? त्यांना आपल्या ताब्यात ठेवण्यासाठी तू काय खास व्रतं, पूजा वगैरे केल्यास काय? की मन्त्र, जडी-बुट्टी इ. चा वापर केलास? मलाही आपल्या पतीला असंच मुठीत ठेवता यावं, म्हणून तुझी काय खुबी असेल ती सांग ना. माझ्या पतीचा स्वभाव तुला माहीतच आहे.''

द्रौपदी म्हणाली, ''सत्यभामा, आत्ता तू ज्या मन्त्रतन्त्रांचा अुल्लेख केलास, त्यांचा अुपयोग वाईट चालीच्या स्त्रियाच करतात. कृष्णाच्या बायकोला असे बोलणे शोभत नाही. माझ्या बाबतीतला तुझा संशयही त्रुटिपूर्ण आहे. आपल्याला ताब्यात ठेवण्यासाठी आपली बायको मन्त्र-तन्त्रांचा वापर करते असं कळलं, तर त्यांच्या दृष्टीनं तिची काही किंमत राहील का? पांडव माझ्याशी इतक्या प्रेमानं का वागतात, ते ऐक नीट. मुळात मीच कधी कसली अनावश्यक मागणी करत नाही. माझी एकादी अुचित मागणीही ते पुरी करू शकले नाहीत, तरी मी कधी रागावत नाही. माझ्या पतींचं माझ्यावर मनापासून प्रेम आहे हे मला माहीत आहे. पण याचा अर्थ असा नव्हे की, मी त्यांची सेवा करणं टाळावं. आपलं कर्तव्य मी कधीही चुकवत नाही. मी स्वत: त्यांची सेवा करते, दासदासींच्या भरंवशावर नाही सोडत. त्यांना आवडणारे भोजनपदार्थ मी स्वत: बनवून वाढते. ते जे काही बोलतात किंवा करतात, त्याला मी कधीच विरोध करत नाही. मी कधी अकारण हसत नाही, आपल्या सवतींचा द्वेष करत नाही. धर्मराज इन्द्रप्रस्थात राज्य करत असताना हजारो ब्राह्मण, ब्रह्मचारी, संन्यासी इ. अतिथि म्हणून येत-जात असत. त्यांच्या सत्काराचा भार मी संभाळत असे. इतकंच नव्हे, तर पांडवांच्या बाकीच्या पत्नी, हजारो दासदासी, पशुपालक इत्यादींचं कुशल पहाण्याचं काम मी स्वत: करत असे. खजिन्याचा हिशोबही मीच पहात असे. थोडक्यात म्हणजे परिवाराचा संपूर्ण भार मी संभाळत असे. यामुळेच माझ्या पतींचं प्रेम



आणि विश्वास आहे माझ्यावर. मन्त्रतन्त्रांच्या आधारानं मी त्यांना ताब्यात ठेवते अशी तुझी समजूत निराधार आणि त्रुटिपूर्ण आहे.''

द्रौपदीचे सारे बोलणे सत्यभामेने मनापासून ऐकून म्हटले, ''तुला असं विचारून मी खरोखरीच फार मोठी चूक केलीय. मला आता पश्चात्ताप होतोय त्याचा! माझ्या चुका मला आता कळून चुकल्या आहेत. माझ्यात सेवा-भाव मुळीच नाही, द्वेष अगदी पुरेपूर भरलेला आहे. मागण्या पुऱ्या झाल्या नाहीत, तर मी पुन्हा पुन्हा रुसते. तू डोळे अुघडलेस माझे! रागावू नकोस माझ्यावर! मी फक्त चेष्टा केली असं समज.''

महामुनि मार्कण्डेय, श्रीकृष्ण व सत्यभामा पांडवांचा निरोप घेअून आपापल्या दिशेने निघून गेले, आणि काम्यकवन सोडून पांडव पुन्हा द्वैतवनात आले.

तेथे असताना एक ब्राह्मण तेथून हस्तिनापुरला गेला व धृतराष्ट्राला म्हणाला, ''महाराज, मी द्वैतवनातून आलो आहे. तेथे पांडव अून, वारा, पाअूस यांना तोंड देत कष्टाचं जीवन जगत आहेत. लोक-विजेते पाच पति असूनही द्रौपदी अनाथासारखी जगत आहे. तिचे कष्ट वर्णनातीत आहेत.''

हे ऐकून धृतराष्ट्राला दु:ख झाले. कारण आपल्याच अुपेक्षेमुळे पांडव व द्रौपदीला इतका त्रास सहन करावा लागतोय हे त्याला चांगले माहीत होते. तो ब्राह्मणाला म्हणाला, ''माझ्या सगळ्या पुत्रांपेक्षा धर्मराज अुत्तम आहे. त्याच्या मनात कधी राग येत नाही. अर्जुन हाच त्याचा विधेय आहे. पण भीमाचा स्वभाव भिन्न आहे. तो महाबली असून त्याला चटकन क्रोध येतो. परन्तु वचनबद्ध धर्मराजाविरुद्ध तो कधीच काही बोलत नाही, मन मारून गप्प रहातो. माझा पुत्र दुर्योधन दुष्ट वृत्तीचा आहे, त्याची बुद्धी वक्र आहे. त्याच्या अन्यायांमुळेच पांडवांना इतका त्रास सहन करावा लागतोय. पुढे तो त्यांना अर्धं राज्य देअून टाकील, तर काहीही संकट येणार नाही. पण तो तसं करणार नाही हे मला माहीत आहे. पण ते त्याच्याच विनाशाला कारण होईल.''



# चिडचिडा नोकर

भवानीनगरच्या जमीनदारांच्या जंगली प्रान्तात अलिकडे दोन-तीन वर्ष पाऊसच पडला नाही. त्यामुळे तिथले शेतकरी शेतसारा भरू शकले नाहीत. तिथल्या जमीनदाराचा वसुलीकारकून वामन अुदार स्वभावाचा होता. त्यामुळे शेतकऱ्यांची स्थिती पाहून सारा भरण्यासाठी त्यांच्यावर दबाव आणणे, जुलूम-जबरदस्ती करणे, असले प्रकार तो करू शकला नाही. खजिना-अधिकाऱ्याकडे त्याने यासंबंधी पूर्ण स्पष्टीकरण करून सारा भरता न आल्याचे कारण कळवले. परन्तु जमीनदाराला त्याचा अर्ज व कारणे खरी वाटली नाहीत. आणि त्याने वामनला नोकरीवरून काढून टाकले. शेषफणी नावाच्या माणसाला त्या जागी नेमायची आज्ञा त्याने आपल्या दिवाणाला दिली.

शेषफणी हा चिडचिड्या स्वभावाचा असून दया, करुणा वगैरे भावनांशी त्याचा जणू संबंधच नव्हता. त्याने तिथल्या एका मोठ्याशा गावात कचेरी अुघडली आणि दवंडी पिटवली की 'जे शेतकरी सारा भरणार नाहीत, त्यांना जमिनीवर पालथे झोपवून त्यांच्या पाठीवर मोठे वजनदार पत्थर ठेवले जातील. त्या गावात प्रताप नावाचा एक युवक होता. योग्य वेळी योग्य निर्णय घेण्याची त्याची क्षमता वाखाणण्यासारखी होती. फार बुद्धिमान होता तो. शेषफणीकडे जाअून त्याला प्रणाम करत तो म्हणाला, ''पाअूस न झाल्याने इथे पिकं झाली नाहीतच, अन् वर हे लुटारू वारंवार गावकऱ्यांना लुटत असतात.''

लुटारूंचे नाव ऐकताच शेषफणी घाबरला. पण भीती लपवत तो म्हणाला, ''मी इथे वसुलीसाठी आलोय, पाअूस पाडायला नव्हे! अन् या लुटारूंपासून वाचण्यासाठी काय करत असता सांगा पाहू?'' प्रताप अुत्तरला ''चांगले जातिवन्त कुत्रे पाळले आहेत आम्ही.''

शेषफणी जरा कापत कापत विचारू लागला, ''हे कुत्रे आहेत तरी कुठे?''

''माझ्याजवळच आहेत. नवख्या माणसांना पाहिलं की 'हो, हो' करायला लागतात ते.'' प्रताप बोलला. तेंव्हा शेषफणी व्यंगभरल्या स्वरात म्हणाला, ''अरे जातीवन्त कुत्रे 'हो हो' नव्हे, भो भो करून भुंकतात.'' अन् तो स्वतःच थोडा वेळ 'भो भो' करत राहिला. त्याचे नोकर धावतच जमीनदाराकडे गेले अन् त्यांनी जमीनदाराला ही बातमी दिली. दिवाणाला बोलावून जमीनदार म्हणाला, ''शेषफणीला भूतबाधा झाली असावी, किंवा त्याच्यावर कोणी करणी केली असावी. तुम्ही ताबडतोब तिथे जाअून पहा आणि निर्णय घ्या.''

दिवाणाने स्वतः जाअून शेतकऱ्यांची परिस्थिती पाहिली. वामनलाच पुन्हा नोकरी दिली अन् प्रतापला त्याचा सहाय्यक नेमला. शेषफणीला नोकरीवरून काढून टाकला.

**नमूताई गोखले**





'चान्दोबा'
पुरवणी - ९९

आपल्या देशाची
वृक्ष संपदा

# केळ्याचे झाड

आंबा, फणस व केळे ही मुख्य फळे मानली जातात. त्याचप्रमाणे केळे, आंबा, बोर, अुंबर व चिंच हे पाच प्रमुख वृक्ष मानले जात. यांच्यासंबंधी एक विचित्र कथा प्रचारात आहे. एका काळी हे पाच वृक्ष मानवरूपात पाच बहिणी होत्या. खूप वर्षेपर्यन्त त्यांचे विवाह झाले नाहीत. देवाने एक दिवस दर्शन देअून त्यांना 'विवाहाला तयार आहात का?' असे विचारले. चारजणींनी होकार दिला. सर्वात धाकटीने नकार दिला, पण तिला अपत्य मात्र हवे होते. देवाने त्यांना वृक्षरूप दिले अन् सांगितले की जे पुरुष सरकत या झाडांवर चढतील त्यांच्याशी यांचे विवाह होतील.

या कथेवरून आपणाला कळेल, की बाकी चार झाडांवर चढणे शक्य असते, पण केळीवर (सर्वात लहान बहीण) मात्र कोणी चढत नाही.

केळ्याला संस्कृतमधे 'मोचा', 'कदली' म्हणतात. हिन्दीत 'केला', इंग्रजीत 'बनाना', 'प्लेंटेन' किंवा 'अॅडॅम्स अॅपल' म्हणतात. अनेक भारतीय भाषांत केळ्याला 'कदली' म्हटले जाते.

तमिळ व मल्याळीत 'वाळै', तेलुगूत 'अरटि चेट्टु' असे म्हणतात. बौद्ध केळ्याला पवित्र मानतात. बौद्ध साहित्यात अुल्लेखलेले 'मोचापाना' केळ्यापासूनच बनवतात. हनुमान हिमालय प्रान्तातील कदलीवनात (केळ्याची बाग) रहात असल्याचा पुराणात अुल्लेख आहे.

केळ्याचे फूल, फळ व खोडाचा आतील मअू भाग खाद्य पदार्थात अुपयोगात आणले जातात.

कच्च्या फळाचा रंग हिरवा असतो, परंतु काही फळे पिकल्यानंतर हिरवी, पिवळी व लाल असतात. आकारात लहान मोठे असे प्रकार असतात. केळ्यांच्या ५००० जाती आहेत असे म्हणतात. परन्तु सर्वच फळे गोड व स्वादिष्ट असतात.

केळीची पाने चांगली लांब व रुन्द असतात. दक्षिण भारतात जेवण या पानांवर वाढले जाते.

विवाहादि शुभकार्यात मांडव केळीच्या खुंटांनी व पानांनी सजवण्यात येतो. याचे तोरणही बांधले जाते. हे सर्व शुभप्रद समजले जाते.

फळे पिकायला लागून लोंगर काढल्यावर झाड कापून टाकले जाते. कापलेल्या खोडाच्या चारी बाजूंनी पसरलेल्या कन्दांतून नवी झाडे वाढतच असतात.



आपल्या देशातील ऋषि-मुनी

# भरद्वाज

दीर्घकाळ जिवन्त रहाण्याची बहुतेकांची इच्छा असते. मरण जवळ दिसत असतानाही आणखी जगायची इच्छा नैसर्गिक आहे, परन्तु अशी इच्छा एकाद्या अुन्नत कारणासाठी असेल, तर ते अधिक न्यायसंगत होय. पंडित अशी इच्छा 'योग्य' मानतात. सप्तर्षीमधील भरद्वाज मुनींची कथा याचे सुंदर अुदाहरण आहे.

भरद्वाज अत्रिऋषींचे पुत्र, आदिकाव्य रामायणाचे रचयिता वाल्मिकी यांचे ते शिष्य. त्यांच्याजवळ यांनी वेदाध्ययन केले. पण त्यांची ज्ञानपिपासा शमली नाही.

त्यांनी इन्द्रादि देवांचा आशिर्वाद मिळवला अन् सुदीर्घ काळ जिवन्त राहिले. संपूर्ण जीवन त्यांनी अध्ययन व ज्ञान यातच वेचले. मृत्यु समीप दिसल्यावर भरद्वाजांनी पुन्हा इन्द्राचे ध्यान करून आपले आयुष्य वाढवण्याची विनन्ती केली.

इन्द्राने प्रकट होअून भरद्वाजांना आपणाबरोबर चलायला सांगितले. थोडे अंतर गेल्यावर त्यांना तीन अुंच अुंच पर्वत दूरवर दिसले. इन्द्राने भरद्वाजांना आपली मूठ अुघडायला सांगितले व तीन मुठी माती त्यावर घातली. भरद्वाज मौनच राहिले.

''दूर दिसणाऱ्या त्या तीन पर्वतांच्या तुलनेत तुझ्या मुठीतल्या मातीचे प्रमाण काय?'' इन्द्राने विचारले.

''फारच अल्प; तुलनाच नाही होणार.'' भरद्वाज अुतरले. ''मग तू जे वेदज्ञान मिळवलेस तेही असेच आहे. तू केलेलं ज्ञानार्जन मुठभरच आहे. तुला आणखी जे जाणायचंय, ते या पर्वतांसारखं आहे.'' इन्द्र बोलला.

या बोलण्याने घाबरुन जाअून 'मिळवलेले ज्ञान पुरेसे आहे' किंवा अहंकाराने 'मला सर्व काही माहीत आहे' असे तो म्हणेल, अशी इन्द्राची अपेक्षा होती. पण थोडा वेळ मौन राहिल्यानंतर भरद्वाज नम्रतेने म्हणाले. ''ज्ञान इतके अुन्नत असेल, तर मला ते पूर्णरूपानं मिळवायचं आहे. आपला आशिर्वाद असेल, तर या तीन्ही पर्वतांवर विजय मिळवण्याचा मी प्रयत्न करीन.''

भरद्वाजांच्या स्थिर, अविचल आत्मविश्वास आणि अुन्नत ध्येयाचे इन्द्राला अत्यन्त आश्चर्य वाटले, आणि आणखी एका संपूर्ण आयुष्याची देणगी देअून इन्द्र अन्तर्धान पावला.





# तुम्हाला माहीत आहे काय?

१. ताजमहल आग्रा शहरात आहे. 'अग्रवन' वरून हे नाव पडले. याचा अर्थ काय?
२. १९७२ मधे वाघाला 'राष्ट्रीय प्राणी' घोषित केले गेले. त्यापूर्वीचा आपला राष्ट्रीय प्राणी कोणता?
३. मुजिबुर रहमान बांगला देशचे 'राष्ट्रपिता' मानले गेले. त्यांची कन्या 'शेख हसीना'. सध्या प्रधानमन्त्री सुकार्तो - कडून अधिकार प्राप्त करण्यासाठी त्यांची कन्या लढत आहे. तिचे नाव काय?
४. भारताचे प्रधानमन्त्री देवेगौडा कर्नाटक प्रान्ताचे आहेत. पण कोणत्या जिल्ह्याचे?
५. हिरोशिमा, नागासाकीवर बॉम्ब पडल्यावर जपानने पराजय कबूल केला. अन् युद्ध संपले. परन्तु प्रथम नागासाकीवर बॉम्ब टाकायचे ठरले नव्हते. कुठे टाकायचा होता?
६. सामान्यत: स्वयंपाकघरात दिसणारा एक किडा बॉम्बचा आघात सहन करुनही जिवन्त राहू शकतो. तो कोणता किडा?
७. आफ्रिकेत ओवेन धबधबा कुठे आहे?
८. ऑलिंपिक क्रीडा १८९६ मधे सुरु झाल्या, तरी ऑलिंपिक शपथेचा प्रघात नंतर सुरु झाला. केंव्हा?
९. आपल्या देशात एस.टी.डी. सेवा १९६० पासून सुरु झाली. कोणती दोन शहरे त्याद्वारे जोडण्यात आली?
१०. मुलांना खूप आवडणाऱ्या वस्तूचा शोध इटालो मार्सियोनीने लावला. तो शोध कोणता?
११. ही क्रीडा १८७५ मधे अमेरिकेत सुरु झाली व नंतर आशियात पसरली. या क्रीडेचे नाव काय?
१२. 'कॉमनवेल्थ' चे प्राचीन नाव काय?
१३. पहिली 'टेस्ट सेन्चरी' कोणत्या भारतीय खेळाडूने मिळवली?
१४. पद्मश्री, पद्मभूषण, पद्मविभूषण व भारतरत्न हे चारही मान मिळवणारे भारतीय नागरीक कोण?
१५. 'प्लॅनिंग कमिशन' प्रथम कोणत्या वर्षी आयोजित झाले? प्रथम अुपाध्यक्ष कोण?

## उत्तर

१. स्वर्ग अुद्यान.
२. सिंह.
३. मेघावती, सुकर्णोची कन्या.
४. हसन.
५. हिरोशिमाजवळचे कोकूरा.
६. झुरळ.
७. युगांडा.
८. १९२०, अंट्वस ऑलिम्पिकपासून.
९. लखनौ व कानपूर.
१०. आइसक्रीम कोन.
११. व्हॉलीबॉल.
१२. ब्रिटिश एम्पायर गेम्स.
१३. लाला अमरनाथ.
१४. सत्यजित् राय.
१५. १९५० मधे. प्रोफेसर महालनोबिस.

# 'चान्दोबा' च्या बातम्या

### लॉलीपॉप्स आकाशातून

तायवान (फार्मोसा) ची राजधानी तायपीय नगरात अचानक हेलिकॉप्टरचा आवाज ऐकू आला अन् घराघरातून मुले बाहेर येऊन आकाशाकडे पाहू लागली. लॉलीपॉपच्या आकाराचे एक लाल हेलिकॉप्टर फिरत असलेले त्यांना दिसले. ते खाली आले तेंव्हा त्यात कोणी



चालक नसल्याचे दिसले. रेडियो लहरींच्या आधारे रिमोट कंट्रोल द्वारा ते फिरवले जात होते. मुलांना आश्चर्यात टाकणारी आणखी एक गोष्ट नन्तर घडली. ते थोडा वेळ आकाशात फिरल्यानन्तर जाताजाता खरे लॉलीपॉप्स शहरभर खाली टाकत निघून गेले.

### सर्वात मोठा वानर

एड्स् हा भयानक रोग काही वर्षापूर्वीच लक्षात आला. याला औषध अस्तित्वात नाही. त्यापासून वाचण्याचा एकच मार्ग म्हणजे त्याला बळी पडण्यापासून स्वतःला वाचवणे व जरूर ती सावधगिरी बाळगणे. सामान्य लोकांना या भयानक रोगाची माहिती करून देणे अत्यावश्यक आहे. हे सत्य सर्व देशांच्या ध्यानात आले आहे. त्यामुळे एड्स् पासून आपले रक्षण कसे करावे यासंबंधी माहिती टी.व्ही., रेडियो व पत्रिका यांसारख्या प्रचार माध्यमातून मोठ्या प्रमाणावर दिली जात आहे. पण खळबळजनक विषय असा की, दिवसेंदिवस एड्स् व्याधीग्रस्तांची संख्या वाढतच आहे. या रोगाचा प्रसार रोखण्यासाठी जगभर १ डिसेंबर हा दिवस 'एड्स् दिवस' मानला गेला. मुंबईत मागच्या एड्स् दिवसाआधीच्या दिवशी १०,००० लोकांनी एक मोठी मिरवणूक काढली. त्यासाठी एक मोठा वानर पकडून आणून त्यावर एड्सबद्दलचे वर्णन लिहिले व त्याला मिरवणुकीच्या अग्रभागी मिरवले गेले. त्याबरोबरच लोकांनी एड्सबद्दल घोषणाही दिल्या. या वानराची लांबी माहीत आहे? -४.५ मीटर्स! जगात आजपर्यन्त प्रदर्शित करण्यात आलेले हे सर्वात मोठे वानर होय! या वानरामुळे अनेकांना एड्स् संबंधी माहिती मिळाली यात शंकाच नाही.

### धन देणारा सान्ताक्लॉज

बर्लिन विश्व विद्यालयात एका विशेष वर्गाची सोय करण्यात आली. त्यात ज्या ज्या लोकांनी भाग घेतला, ते सर्वजण त्या विश्वविद्यालयाचे विद्यार्थीच होते. पण सर्वजण त्यासाठी सान्ताक्लॉजसारखा वेष करून आले होते. सफेद दाढी लावून म्हातारे बनले होते ते! त्यांनी असे का केले? सान्ताक्लॉजची भूमिका



कशी करावी हे त्यांना शिकायचे होते. खिसमसमधे सान्ताक्लॉजचा (सेंट निकोलस) अभिनय करणारांना युरोपच्या काही संस्था पारितोषिक देतात. अशा प्रकारे काही उत्साही युवक खिसमसमधे थोडासा पॉकेटमनी जमवतात.



# पित्याची इच्छा

समीरला तीन मुलगे व एक मुलगी होती. सर्वात लहान सत्यवती तीन वर्षांची असतानाच मुलांची आई कसल्याशा विषबाधेने मृत्यु पावली. त्यावेळी समीर व्यापाराच्या निमित्ताने बाहेर गावी गेलेला होता. काही दिवसांनन्तर परतलेल्या समीरला जेंव्हा हे समजले तेंव्हा मुलांना कवेत घेऊन तो जोरजोराने रडू लागला. नंतर घरात नोकरचाकर असूनही तो मुलांची देखरेख स्वतः करू लागला. व्यापारात त्याचे लक्षच नसे. त्यामुळे त्याची संपत्ती कमी होऊ लागली. हिऱ्यांच्या व्यापारात माणसाला फार दक्ष रहावे लागते. त्याला आता वाटू लागले की आपण दुर्लक्ष केल्यामुळे आपला व्यापार मागासू लागलाय.

पुन्हा व्यापाराकडे नीट लक्ष द्यावेसे समीरला वाटू लागले. त्यासाठी आवश्यक ती तयारीही त्याने केली. त्यावेळी गोदावरी पुष्कर उत्सव चालू होता. आपली मुलगी सत्यवती हिला बरोबर घेऊन तो पुष्करमधे स्नानाला गेला.

तेथून परत येऊन घरात पाऊल ठेवल्याबरोबर समीर जोराने रडू लागला. तीन्ही मुलांनी सत्यवतीबद्दल विचारल्यावर, ती उत्सवात हरवल्याचे त्याने सांगितले.

यानन्तर काही आठवड्यांनी मुलांची जबाबदारी नोकरांवर सोपवून समीर जहाजातून परदेशी गेला.

दहा वर्षे निघून गेली. तीनही मुलगे मोठे झाले. या दहा वर्षात समीर जास्तीत जास्त दहा दिवसही घरी राहू शकला नाही. रात्रंदिवस त्याला समुद्रावरच रहावे लागे.

एकदा मुलांना भेटायला घरी आलेला समीर त्यांना जवळ बोलावून म्हणाला, ''मुलांनो मी हिऱ्यांच्या व्यापारात फार अडकून गेलोय. मला जास्तीत जास्त काळ

प्रियंवदा रानडे



समुद्रावरच रहावे लागेल. अन् एकाद्या दिवशी समुद्रातच माझा मृत्यूही होईल. तसं घडलं, तर तुम्ही एक काम करा. वरच्या मजल्याच्या अुत्तरेकडच्या दालनात, एक लाकडी जुनी पेटी आहे, ती अुघडून पहा. पण एक लक्षात ठेवा की त्या दालनाचा दरवाजा माझ्या मृत्यूनन्तरच अुघडायचा आहे. आणखी एक गोष्ट नीट ऐका. कोणत्याही प्रकारच्या त्यागासाठी तयार रहाणं हा अुत्तम धर्म मानला जातो.'' इतके सांगून त्याने त्या दालनाची किल्ली मुलांच्या हाती दिली.

काही दिवसांनन्तर तो पुन्हा व्यापारासाठी परदेशी निघून गेला. ज्या जहाजातून तो प्रवास करत होता, ते वादळात समुद्रात बुडाले व सर्वचे सर्व प्रवासी बुडून मेले. केवळ दोनच नावाडी काय ते वाचले. त्यांनी जहाजाच्या लाकडांच्या साह्याने आपले जीव वाचवले होते. त्यांच्याकडून समीरच्या मृत्यूची बातमी मुलांना समजली.

मुलांना फार वाईट वाटले. थोरला बाकी दोघांना म्हणाला, ''असं काही घडेल याची बाबांना आधीच कल्पना होती. म्हणूनच त्या अुत्तरेच्या दालनाची किल्ली त्यांनी आपल्याला दिली. त्या पेटीत काय आहे ते आता आपण जाअून पाहूया. त्यांची इच्छा पुरी करू.''

तिघांनीही त्या दालनात जाअून पेटी अुघडली. ती तर अगदी रिकामी होती! त्यात धन व सोने असेल अशी त्यांची अपेक्षा होती. पण प्रत्यक्षात एका कागदाच्या कपट्याशिवाय त्यात काहीच नव्हते. त्यावर जे लिहिले होते, ते पाहून तिघेही निराश झाले. कागदावर समीरने लिहिले होते, ''सिरपुरमधे माझा बालमित्र भूपती रहातो. त्याच्या कन्येचा विवाह तुम्ही तिघांनी आपल्या कमाईतून करावा. माझी इतकीच शेवटची इच्छा आहे.''

त्या रात्री तीन्ही भावांना झोप आली नाही. थोरला मनोमन रागावून म्हणाला, ''हे काय वडील झाले? एक पैसुद्धा न देता मरून गेले. आपण कशाला कुणा दुसऱ्याच्या मुलीचं लग्न करून द्यावं अन् धाकट्या भावांना अुपजीविकेचा मार्ग दाखवून द्यावा? मी काय इतका निर्बुद्ध अन् कुचकामी आहे?'' असा विचार करून तो घर सोडून कुठेतरी निघून गेला.

धाकट्या दोघांनी ओळखले की थोरला घर सोडून गेलाय. तेंव्हा छोटा मधल्याला



म्हणाला, ''आता आपण दोघांनी का होईना, पण बाबांची इच्छा पुरी करूया. हे घर विकून टाकून त्या पैशातून भूपतीच्या मुलीचं लग्न करून देअू. नंतर कुठे नोकरी पाहून आपलं पोट भरूया.''

त्यांनी घर विकले अन् ते धन घेअून ते सिरपुरकडे निघाले. संध्याकाळपर्यन्त ते एका गावात पोचले. तिथल्या ग्रामाधिकाऱ्याच्या घरासमोर पंचायत बसली होती. दोन तरूण अन् एक म्हातारी प्रमुखाचा निकाल ऐकायला अुभे होते. या दोघांनी गर्दीतल्या एकाला विचारले की, ''काय मामला आहे?''

तो म्हणाला, ''या म्हातारीचे हे दोघं मुलगे. शिवाय तिला एक अुपवर मुलगीही आहे. बाप जिवन्त असेपर्यंत हे सर्वजण एकत्र रहात होते. पण त्याच्या मृत्यूनंतर मुलांनी इस्टेट वाटून घेतली व निरनिराळे राहू लागले. आई अन् बहिणीची कोणीच पर्वा केली नाही. आई मुलांना म्हणाली की, 'तुम्ही वडलांना वचन दिलं की, बहिणीचा विवाह करून देअू. पण आता नकार का देत आहात?' यावर मुलांचं म्हणणं असं की 'लग्नाचा एवढा खर्च केला तर आम्हाला काय अुरेल? आम्ही आपापला संसार कसा चालवावा?' ही अडचण कशी सोडवावी, याचाच पंचायत विचार करत आहे !''

दोघेही भाअू तिथून निघून खानावळीत जेअून तिथेच झोपले. मधला विचार करू लागला, ''म्हातारीची दोन्ही मुलं आपल्या बहिणीचं लग्न करून द्यायला तयार नाहीत. मग मी तरी, जिचं जन्मात तोंडही पाहिलं



नाही, त्या भूपतीच्या परक्या मुलीचं लग्न का करून द्यावं अन् आपला पैसा खर्चावा? त्यापेक्षा या पैशातून मी एकादा व्यापार सुरू करू शकेन ना? पैसा कमाअून आरामात आपलं आयुष्य चालवीन.'' सुकाट्याने धनाची थैली घेअून मधला तेथून पळून गेला.

धाकटा सकाळी जागा झाला तेंव्हा त्याला दिसले की, धनही जाग्यावर नाही, अन् भावाचाही पत्ता नाही! काय घडले असावे हे त्याने ओळखले. आता तो करू तरी काय शकणार होता? सर्व काही भगवन्ताच्या मर्जीवर सोडून तो सिरपुरकडे निघाला.

दोन दिवस पायी चालून तो सिरपुरला पोचला व त्याने भूपतीचे घर शोधून काढले. घर म्हणजे चांगली चार मजली इमारत होती

ती! आश्चर्यात बुडलेल्या त्याच्या मनात आले की, ''इतक्या मोठ्या पैसेवाल्याच्या मुलीचं लग्न माझ्या हातून कसं पार पडावं?''

दरवाज्याजवळ जाअून त्याने हाक दिली, ''भूपतीजी ऽऽ!'' जवळजवळ पन्नास वर्षांच्या एका धट्ट्या कट्ट्या माणसाने दार अुघडून म्हटले, ''मीच भूपती! काय हवं तुला?''

''मी समीरचा धाकटा मुलगा. स्वतःच्या पैशांनी मी तुमच्या मुलीचं लग्न करून द्यावं, अशी माझ्या बाबांची इच्छा होती. जे धन बरोबर घेतलं होतं, ते मधला भाअू अुचलून पळून गेला. आपण थोडा वेळ दिलात, तर एकादी नोकरी करून किंवा मजुरी करून धन मिळवेन अन् आपल्या मुलीचा विवाह करून देईन. आपल्या पित्याची इच्छा पुरी केल्याचं समाधान मिळेल मला.''

मोठ्या प्रेमाने त्याची पाठ थोपटून भूपती त्याला आत घेअून गेला. तो म्हणाला, ''तुझा बाप अन् मी बालमित्र! त्याच्या मृत्यूची खबर ऐकून फार वाईट वाटलं मला. त्यानं तुम्हा तिघांच्या भविष्यासाठी फार सुन्दर योजना आखली. तो स्वतः जास्त करून परदेशात रहात असल्यानं, मुलीचं पालनपोषण कदाचित नीट होणार नाही, असं समजून तुझी बहीण सत्यवती हिला माझ्याकडे सोडलं. ती अजूनही माझ्याकडेच रहात आहे. पण त्यानं तुम्हाला मात्र असं सांगितलं, की ती पुष्कर अुत्सवात हरवली. व्यापारात मिळवलेलं लाखो रुपयांचं धनही त्यानं माझ्याकडे सुरक्षित ठेवलंय. त्यानं दृढपूर्वक मला सांगितलं की, 'माझ्या मरणानन्तर, माझ्या तीन्ही मुलांपैकी जो तुझ्या घरी पोचेल, तोच माझ्या परीक्षेत यशस्वी समजावा. त्यालाच माझी सगळी इस्टेट दे अन् सत्यवतीची खरी हकिकतही सांग.' आपल्या पित्याच्या परीक्षेत तूच अुतीर्ण होअून बापाप्रमाणेच योग्य शाबित झालास. ठीक, आता प्रथम आपल्या बहिणीला भेट. ती फार अुत्सकतेनं वाट पहातेय तुझी!'' इतके बोलून भूपतीने सत्यवतीला बोलावले.

भूपतीचे बोलणे ऐकून धाकटा फारच आश्चर्यात पडला. इतक्यात लक्ष्मीप्रमाणे आभूषणांनी सजलेली आपली बहीण सत्यवती आपल्याकडे येत असलेली त्याला दिसली. तिला पाहून त्याच्या डोळ्यातून आनन्दाश्रू झरू लागले.







# अपूर्वाईची वस्तु

भवानीनगरमधे जयवर्मा नावाचा एक मोठा धनवान माणूस रहात असे. त्याला तीन मुलगे होते - जयपाल, विजय आणि जय. रंग-रूप, विद्या-विनय अन् आचार-विचारात ते अगदी एकसारखेच होते. थोडक्यात म्हणजे तीन्ही भाअू सदाचारी होते. एकमेकांवर त्यांचे फार प्रेम होते. त्यांच्यात आपसात कसलीही गुप्तता नसे. पण फक्त एकच गुप्त गोष्ट होती, की ज्याबाबत तिघेही गप्प असत. तिघांनीही ती गोष्ट आपापल्यापुरतीच सीमित ठेवली होती, कुठेच वाच्यता करत नसत ते.

ती गुप्त गोष्ट म्हणजे तिघांचेही भवानीनगरच्या राजकन्येवर प्रेम होते! तिघांचाही दृढ निश्चय होता की, तिच्याशीच विवाह करायचा. परन्तु तो त्यांनी कोणाजवळही बोलून दाखवला नाही.

संध्याकाळी तिघेही राजवाड्याजवळच्याच अुद्यानात फिरायला जात अन् राजवाड्याच्या व्हराड्यांतून फिरणाऱ्या राजकन्येकडे एकटक पहात रहात. कधी कधी ती करत असलेले वीणा-वादनही कान देअून ऐकत असत. पण त्यांनी राजकुमारीबद्दल आपसात कधी चकार शब्दही काढला नाही.

असाच काळ जात राहिला. एके दिवशी जयवर्माने तीनही मुलांना बोलवून जरा सावध केले, ''मुलांनो, म्हातारा झालो मी आता. मी कमवलेल्या धनातून तुम्ही आपलं आयुष्य आरामात जगू शकाल. पण, हे काही पुरुष-लक्षण नव्हे. लग्नाचं वय झालंय तुमचं. लग्नानन्तर तिघं आपापला निराळा संसार थाटाल, मुलं होतील तुम्हाला. क्रमाक्रमानं पैसा कमी होत जाईल. तेव्हा माझी इच्छा अशी की, तुम्ही देशोदेशी फिरून व्यापार करून धन कमवावं. माझ्या दृष्टीनं हेच पुरुष-लक्षण आहे. नंतर लग्न करून

पंचवीस वर्षांपूर्वी 'चान्दोबा' प्रकाशित झालेली गोष्ट



गृहस्थाश्रमी व्हा.''

पित्याच्या बोलण्याला तिघेही फार मान देत असत. त्यांनी घालून दिलेल्या मर्यादेबाहेर जाण्याचे धाडस त्यांनी आजवर कधीच केले नव्हते. त्याचा सल्ला मानून थोडेसे धन बरोबर घेऊन तिघांनीही एका शुभमुहूर्तावर घर सोडले. संपूर्ण दिवस पायी चालल्यावर ते महावर नावाच्या बाजाराच्या शहरात पोचले. तेथे तिघांनीही बाजारातून मनपसन्त वस्तु खरीदल्या. त्या दिवशी शिवरात्र होती.

दुसऱ्या दिवशी सकाळी तिघे भाऊ तीन दिशांना निघाले. निघण्यापूर्वी शिवरात्रीच्याच दिवशी पुन्हा इथेच भेटायचे त्यांनी ठरवले.

आठवडे अन् महिने लोटले. पुन्हा शिवरात्र आली. महावरच्या बाजाराला पुन्हा बहर आला. त्यावर्षी अगदी अपूर्व अशा वस्तु तेथे विक्रीस आल्या. असे पूर्वी कधीच घडले नव्हते. सर्वात धाकटा जय ठरल्याप्रमाणे बाजारात पोचला. भाऊ येण्यापूर्वी एकादी अपूर्वाईची वस्तु खरेदी करायचे त्याने ठरवले.

अनेक वस्तु राशींनी विकायला ठेवलेल्या होत्या. त्यातल्या एका वस्तूकडे तो फार आकर्षित झाला. ते एक लिंबाचे फळ होते, पण ते साधे लिंबू नव्हते. भयंकर रोगाने ग्रासलेल्या व्यक्तीला रोगमुक्त करायची शक्ती त्यात होती! लिंबू कापून त्याचा रस रोग्याच्या तोंडात पिळला की झाले! तत्क्षण रोग बरा होणार होता ! हजार अशर्फ्या देऊन जयने ते लिंबू खरेदी केले. आणि आपल्या भावांची प्रतीक्षा करू लागला.

विजयही त्याच दिवशी पोचला. त्याने व्यापारात खूप कमाई केली होती. त्यानेही हजार अशर्फ्या खर्चून एक अपूर्व वस्तु खरीदली. तो एक गालीचा होता. तोही सामान्य गालीचा नव्हता. त्यावर बसले की हवे तिथे जात येत असे.

सर्वात मोठा जयपालही त्या दिवशी बाजारात पोचला. त्यानेही अपार धन मिळवले होते. त्याला कित्येक वस्तु आवडल्या व तो त्यांची किंमत विचारत राहिला. शेवटी त्याला एका छोट्याशा दुकानात एक आरसा दिसला. दुकानदाराने त्याची किंमत हजार अशर्फ्या सांगितली.

''एका साध्या आरशाची इतकी किंमत ? यात असं काय विशेष आहे ?'' जयपालने विचारले.



''महाशय, हा नुसतंच सौन्दर्य दाखवणारा आरसा नव्हे. या आरशात तुम्ही स्मरण केलेली कोणतीही व्यक्ती, प्राणी तावडतोब दिसू लागेल. मग ती कोणत्या का स्थितीत असेना!'' दुकानदाराने आश्चर्याचे कौतुक सांगितले.

जयपालला लगेच राजकुमारी निरुपमाची आठवण झाली व तिला एकवार पहायची इच्छा त्याच्या मनात आली. त्याने दुकानदाराला हजार अशर्फ्या देऊन आरसा घेतला अन् निरुपमेचे स्मरण करून त्याने आरशात पाहिले. दुसऱ्याच क्षणी त्याचे हृदय दुःखाने जड झाले!

कारण आरशात त्याला राजकुमारी मरणासन्न अवस्थेत दिसली. वैद्याने तिला तपासून म्हटले, ''राजकुमारी जगू शकणार नाहीत. त्यांचा मृत्यु निश्चित आहे. अगदी थोड्याच वेळात त्यांचं प्राणपाखरू उडून जाईल!'' जयपाल स्वतः इतक्याशा अवधीत तिथे पोचू शकणार नव्हता, कारण पोचायला कमीत कमी एक दिवस तरी लागणारच होता.

जयपालच्या डोळ्यातून अश्रु वाहू लागले. धडपडत तो पुढे जाऊ लागणार, इतक्यात विजय आपल्या भावाला पाहून ओरडला, ''जयपाल दादा!''

भावाचा आवाज ऐकून जयपाल जरासा सावरला. 'पहा' असे म्हणून राजकुमारीची स्थिती त्याने विजयला दाखवली, अन् दुःखाने म्हटले, ''अशा स्थितीत आपण इतके दूर राहिलो. तिला वाचवू शकणार नाही.''

''तू घाबरू नकोस,'' असे म्हणत त्याने आपला गालीचा जमिनीवर पसरत म्हटले, ''यावर बसलो, की क्षणभरात आपल्याला पोचता येईल तिथवर.''





जयपालला खूप अुत्साह वाटला. पसरलेल्या गालीचावर दोघे बसणार, इतक्यात दोघांना हाका मारत जय तिथे पोचला. ''बोलायला वेळ नाही आता. बस पटकन या गालीचावर. मिदान जिवन्त असलेली निरुपमा पहायला मिळेल.'' विजय बोलला.

काही न बोलता जयही गालीचावर बसला अन् दुसऱ्याच क्षणी ते राजकुमारीच्या मृत्युशय्येजवळ पोचले.

जय आणखी जवळ गेला. लिंबू कापून त्याने तिच्या तोंडात रस पिळला.

दुसऱ्याच क्षणी आश्चर्यकारक बदल घडला राजकुमारीत ! ती चटकन् अुठून बसली. अुपस्थित असणाऱ्या सर्वांच्या डोळ्यातून आनन्दाश्रु झरू लागले. राजाने तीन्ही भावांजवळ आपली हार्दिक कृतज्ञता प्रकट केली. त्यांचे हात पकडत तो म्हणाला, ''मुलांनो, माझ्या कन्येला जीवदान देणारे तुम्ही मला स्वर्गलोकातून अवतरलेल्या देवांसारखे आहात. माझ्या कन्येचा विवाह होईपर्यन्त तिघेही माझ्याचकडे राहून माझा पाहुणचार ग्रहण करा.'' तिघांनी त्याला मान्यता दिली.

आता एक गंभीर समस्या अुपस्थित झाली. 'आपल्या कन्येला वाचवणाराशी तिचा विवाह करून देणाची' राजाने घोषणा केलेली होती. त्यानुसार तिघा भावांपैकी एकाशी तिचा विवाह करायला हवा होता. राजाचीही याला तयारी होतीच. त्याने मन्त्र्यावर निवड करायची जबाबदारी सोपवली.

तिघांचे बोलणे ऐकल्यावर, कोणाशी विवाह करावा याचा निर्णय मन्त्र्यालाही करता येईना. तो विचार करू लागला, ''तिघांपैकी खरं कोणी वाचवलं राजकुमारीला ? जयपालने आरसा पाहिलाच नसता, तर तिच्या आजाराबद्दल तिघांना कळलेच नसते. विजयचा गालीचा नसता, तर वेळेवर ते इथे पोचू शकले नसते. अन् वेळेत येअून सुद्धा लिंबाशिवाय ती वाचण्याचा प्रश्नच नव्हता!''

अडचण सोडवण्यासाठी त्याने तिघा भावांना म्हटले की, ''विवाह कुणाशी करून द्यायचा याचा निर्णय तुम्हीच घ्या.''

आजपर्यन्त तिघांच्यात कधी भांडण झाले नव्हते, मतात कधी फरक पडला नव्हता, पण आता मात्र प्रत्येकजण 'राजकुमारी आपलीच पत्नी व्हावी' असा दावा करू लागला.

ही परिस्थिती पाहून मन्त्री राजाला म्हणाला, ''महाराज, ही अडचण कोणी तर्कविज्ञच सोडवू शकेल. सभा बोलावली तर तेच विचार करून निर्णय देतील.' राजाने या गोष्टीला संमती दिली.

थोड्याच दिवसात सभा बोलावण्यात आली. बरेच दिवस वाद-विवाद होअूनही अडचणीचे अुत्तर कोणी शोधू शकला नाही. परिस्थिती तशीच राहिली. शेवटी स्वतः निरुपमाच हस्तक्षेप करत म्हणाली, की ही अडचण सोडवण्याची संधी तिला दिली जावी. सर्वांना आश्चर्य वाटले की, जी अडचण आपण मोठमोठे तार्किक सोडवू शकलो नाही, ती एक स्त्री काय सोडवणार ?

निरुपमा म्हणाली, ''मला वाटतंय की तुम्हा लोकांची विचार करण्याची पद्धत चुकीची आहे. तिघांपैकी कोणा भावामुळे मला जीवदान मिळालं, कोण जास्त जबाबदार हे शोधायचा तुमचा प्रयत्न आहे. पण एक मुख्य विषय आपण विसरलात. जयपालच्या आरशाने, विजयच्या गालीच्याने अन् जयच्या लिंबाने मला प्राणदान दिलं हे मान्य. आता प्रश्न असा की, या तिघांपैकी माझ्यासाठी जास्तीत जास्त त्याग कोणी केला - इकडे आपण लक्ष दिलं नाहीत ? जयपालचा आरसा त्याच्याजवळ अजून सुरक्षित आहे. त्यात अजूनही तो दुसऱ्या कोणाला पाहू शकतो. विजयचा गालीचाही त्याच्या जवळ आहे; त्यावर बसून अजूनही तो हवा तिथे जाअू शकतो. पण जयचं लिंबू मात्र अस्तित्वातच राहिलं नाही! ते खर्च झालं. त्याचा वापर करून तो आता आणखी कोणाला मृत्युपाशातून सोडवू शकणार नाही. आता आपणच निर्णय घ्या, कि तिघांपैकी माझ्याशी विवाह करायची जास्त योग्यता कोणाची ? जास्त हक्क कोणाचा ?''

राजकन्या निरुपमेच्या बुद्धिकौशल्याची सर्वांनी वाहवा केली. तिचा विवाह जयबरोबर मोठ्या थाटामाटात साजरा झाला.

सर्व बाबतीत साथ देणाऱ्या आपल्या भावांचा जयने खूप आदर-सत्कार केला. जयवर्माही आपल्या सुयोग्य पुत्रांना भेटून खूप आनन्दित झाला.



विशेष-समाचार

# अमेरिकेचे अध्यक्ष

अमेरिकेच्या अध्यक्षांचे निवासस्थान व्हाईटहाऊससमये दुसऱ्या वेळी अध्यक्षपदाची शपथ घेतल्यावर क्लिंटन असे म्हणाले की, ''मी वीस आणि एकविसाव्या शतकांच्या मधला दुवा आहे. बिल क्लिंटन हे चालू शताब्दीच्या अखेरचे अध्यक्ष आहेत व पुढील शताब्दीच्या सुरुवातीचे अध्यक्ष असतील-हेच त्यांचे वैशिष्ट्य होय. बिल क्लिंटन हे अमेरिकेचे ४२ वे अध्यक्ष होत आणि दुसऱ्या जागतिक महायुद्धानंतर दुसऱ्यांदा निवडून आलेले डेमोक्रॅटिक अध्यक्ष होत हे ही त्यांचे आणखी एक वैशिष्ट्य.

अमेरिकेत डेमोक्रेट अध्यक्ष पुन्हा दुसऱ्यांदा निवडून येण्याची घटना साठ वर्षांपूर्वी घडली होती. १९३२ मधे फ्रेंकलिन डिलेनो रुझवेल्ट अध्यक्ष निवडले गेले आणि पुन्हा १९३६ मधे तेच निवडून आले. इतकेच नव्हे, तर पुन्हा तिसऱ्यांदा व चौथ्यांदाही (१९४४) त्यांनी हे पद संभाळले. जागतिक महायुद्धाच्या समाप्तीच्या काळात, बारा एप्रिल, १९४५ रोजी पदारूढ असतानाच त्यांचा मृत्यु ओढवला.

रुझवेल्टनंतर हॅरी एस् ट्रूमन १९४५ मधे अमेरिकेचे अध्यक्ष बनले. १९६० मधे आणखी एक डेमोक्रेट नेता-जॉन केनेडी अध्यक्ष निवडले गेले. नोव्हेंबर २२, १९६३ रोजी त्यांची हत्या केली गेली. त्यानंतर लिंडन बी जॉन्सन (डेमोक्रेट) अध्यक्ष बनले. त्यांच्यानंतर निवडून आलेले डेमोक्रेट नेता होते जिमी कार्टर (१९७७-८१).



१९९२ मधे बिल क्लिंटन प्रथम अध्यक्ष म्हणून निवडले गेले. २० जाने. १९९३ रोजी त्यांनी पद ग्रहण केले.

शंभर वर्षांपूर्वी, म्हणजे चालू शतकाच्या सुरुवातीला रिपब्लिकन पक्षाचे नेता विल्यम मॅकिन्ले हे अध्यक्ष होते.

१९९६ च्या डिसेंबरमधे ज्या निवडणुका झाल्या, त्यात क्लिंटनना ४७ टक्के मते मिळाली. त्यांचे मुख्य प्रतिस्पर्धी उमेदवार रॉबर्ट डोल यांना ४१ टक्के आणि स्वतंत्र उमेदवार रॉस पेरट यांना ८ टक्के मते मिळाली.

जानेवारी २१ ला पदग्रहणानंतरच्या आपल्या पहिल्या भाषणात त्यांनी देशाच्या एकीवर जोर दिला. ते म्हणाले की, पुढील चार वर्षांत याच विषयाकडे अधिक लक्ष दिले जाईल. त्यांनी अशी घोषणा दिली की, अमेरिका, ''देश एक आहे, तिची प्रजा एक आहे आणि तिचे ध्येय एकच आहे.'' या पायावरच अमेरिकेची पुनर्रचना केली जाईल. त्यांनी असेही सांगितले की, ''माझ्या सरकारी कामात कसलेही अवडंबर नसेल व ते दृढ असेल.'' त्यांनी असे वचन दिले की, अमेरिकेच्या स्वातन्त्र्य-ज्योतीचा प्रकाश सर्व जगभर पसरेल. क्लिंटन यांना आशा आहे की २१ व्या शतकात 'प्रजातंत्र जगा'ची स्थापना होईल.



# चतुर-गोविन्द

**गो**विन्द गोपाळपुरचा रहिवासी होता. फार बुद्धिमान होता तो. ह्याचे एक वैशिष्ट्य होते- कोणीही जर आपल्या वाक्चातुर्याने किंवा हुशारीने कोणाला फसवले तर त्या फसवणाराला गोविन्द आपल्या चतुराईने चीत करत असे. त्या माणसाला चांगलेच नुकसान सोसावे लागे.

एकदा सुशील पाण्डे नावाच्या एका पुरोहिताने चन्द्रधर गुप्ताच्या घरात केदार-व्रत करवले. व्रताच्या सांगतेनन्तर गुप्ताने दक्षिणा म्हणून पांडेला फक्त सव्वा रुपया देऊन नमस्कार केला.

दक्षिणा कडोसरीला लावत सुशील पांडे म्हणाला, ''गुप्ताशेठ, आपण कमीत कमी चार रुपये दिले असतेत, तर बरे झालं असतं, मी संतोष मानला असता त्यावर. आपण दिलेला सव्वा रुपया आपणासारख्या धनवन्ताला अगदीच क्षुल्लक ना !''

गुप्ता हसून म्हणाला, ''शुभकाम करणं, ही आमच्या घराण्यात चालत आलेली रीत आहे. आमच्या पूर्वजांपासून दरवर्षी हे व्रत केलं जात आहे. आपल्याला आवडेल तितकीच दक्षिणा द्यावी अशी रीत आहे आमची. त्यामुळेच मी तुम्हाला सव्वा रुपया दिला. गैरसमज नका करून घेऊ, पण घराण्याची परंपरा मोडणंही बरं नव्हे ना ?''

परंपरेची सबब सांगून गुप्ता खोटे बोलत असल्याचे पांडेने ओळखले. पण अशा परिस्थितीत करणार तरी काय बिचारा ? तेथून परत येताना आपल्या घराबाहेरच्या कट्ट्यावर बसलेला गोविन्द त्याला दिसला, गुप्ताने दिलेल्या कमी दक्षिणेमुळे तो दुःखी होता, त्यामुळे मुद्दाम होऊन तो गोविन्दकडे जाऊन त्याच्या जवळ बसला. गोविन्दने न विचारताच त्याने 'आपण गुप्ताकडे पूजा आटपून आलो असल्याचे' सांगितले. त्याच्या

उदय रणदिवे

पडेल चेहऱ्याकडे पाहून गोविन्दने विचारले, ''गुप्ता तर हल्ली व्यापारात चांगलीच कमाई करत असतो; त्यानं पुरेशी दक्षिणा नाही दिली का ?''

''तेच तर सांगायला आलो मी तुझ्याकडे, गुप्ता तर अगदी प्रेताच्या टाळूवरचं लोणी खाणारा माणूस आहे. फारच हिशोबी आहे तो. इतका कंजूष प्राणी मी आजवर पहिला नाही. सव्वा रुपयाच दक्षिणा देत मला म्हणाला की, -ही आमच्या घराण्यात परंपरेनं चालत आलेली रीत आहे; ती तोडायची इच्छा नाही माझी !'' अन् घडलेला सारा प्रसंग पुरोहिताने गोविन्दला सांगून टाकला.

त्याच्या बोलण्यावर खदखदून हसत गोविन्द म्हणाला, ''मग तर गुप्तांना सर्व जिनसा आपले आजे-पणजे विकत, त्याच किंमतीत विकायला हव्यात, कारण परंपरागत रीतीचं पालन करणं शुभ मानतो ना तो ? पण बाकी सर्व बाबतीत परंपरेचं उल्लंघन करतोय तो ! किंमती खूप वाढवून विकतो की सर्व जिनसा ? त्याच्या आज्या-पणज्याच्या जमान्यात शेरभर तांदूळ सव्वा रुपयात मिळत असे. पण आता दहा रुपये द्यावे लागतात की नाही ? गुप्ताचं म्हणणं असं की, तुमचे पूर्वजही केदार-व्रत केल्यावर इतकीच दक्षिणा घेत असत, अन् तितकीच घेण्यात तुमचं आणि त्याचंही कल्याण आहे. तेव्हां आता तुम्ही एक काम करा भटजीबुवा...'' अन् गोविन्दने पांडेला काही कानमंत्र दिला.

गोविन्दचा सल्ला ऐकून पांडेला फार आनन्द वाटला. त्या दिवशी संध्याकाळी तो



गुप्ताच्या दुकानात गेला. शेरभर तांदूळ मागून ते पिशवीत घातले आणि गुप्ताच्या हातावर सव्वा रुपया ठेवला. आश्चर्याने गुप्ताने विचारले, ''हे हो काय शास्त्रीबुवा ! बरोबर किंमत द्याना तांदुळाची !''

''गुप्ताशेठ, तुम्ही माझ्याकडून आज्या-पणज्यापासून चालत आलेलं केदारव्रत करवलंत अन् मला त्यांच्याच काळातला पुरोहित ठरवून सव्वा रुपया दक्षिणा दिलीत. तुमचे पूर्वज तेवढीच देत होते ना ? तुमचं म्हणणं असं की तुम्हाला तीच रीत पसंत आहे. आता मीही स्वतःला त्याच काळचा पुरोहित मानून तीच किंमत देऊन शेरभर तांदूळ घेऊन जातोय. आपला पुरोहित धर्म मी तरी का मोडावा ? असं करणंच मला कल्याणकारक आहे !'' पांडे बोलला.



त्यांच्या संभाषणाचा विषय ऐकून तिथे हजर असणारे सर्वजण हसू लागले ! गुमाने शरमेने मान खाली घातली, एका आठवड्याभरातच हा अमूल्य सल्ला देणारा गोविन्दच असल्याचे सर्वांना कळून चुकले. ते सारे गोविन्दच्या अकलेची आणि व्यवहारज्ञानाची स्तुती करू लागले.

पण गोविन्द त्यांना म्हणाला, ''आपण कधी कधी फसवले जातो. या मागे नेमकी कोणती चाल आहे ती समजून घ्यायला हवी. कोणत्या वळणावर आपण फसतो ते समजून घेऊन नेमकी तीच चाल आपण फसवणाऱ्याच्या अंगावर उलटवायला हवी. तीच चाल त्याला अडकवणारा फासा ठरेल.''

एकदा मंगला नावाची विधवा आपल्या दोन मुलींना घेऊन गोपाळपुरला आली. पतिनिधनानन्तर ती आपल्या भावाकडे राहू लागली. पण वहिनी रोज तिला टोचून बोलू लागली, ''घरात आरामात बसून खाताय-पिताय ! तुम्हा दरिद्री भिकाऱ्यांना किती दिवस मला पोसावं लागेल कुणास ठाऊक !'' तिचे हे वाग्बाण सहन न होऊन तिने तिथे खानावळ सुरु केली. गोपाळपुरच्या बाजारासाठी पंचक्रोशीतली माणसं तिथे मोठ्या संख्येने येत असत. मंगलेचा स्वयंपाक रुचकर असल्याने जास्तीत जास्त गिऱ्हाईके तिच्याच खानावळीत जेवायला जात.

पण त्याच गावात आधीपासून किरण नावाचा एकजण खानावळ चालवत असे. मंगलेमुळे त्याचा धंदा बसला. त्याने एक दिवस दोन माणसांना पैसे चारून तिच्या खानावळीत पाठवले.

जेवताजेवता त्यांनी बरोबर आणलेले झुरळ भाजीत टाकले. अन् ते उचलून सर्वांना दाखवत ओरडू लागले, ''अरे वा रे वा ! कसं कलियुग आलंय पहा ! जेवण विकणं हे तर पाप आहेच, अन् वर ही झुरळं !'' नंतर ते दोघें पानावरून उठले. तेथे जेवणाऱ्यांच्यात खळबळ माजली ! मंगलाला रागावून ते म्हणू लागले की, स्वयंपाक करताना नीट काळजी न घेतल्यानंच असं झालंय !

किरण आता गप्प राहिला नाही. त्याने पुन्हा त्याच पद्धतीने भाड्याची माणसं नंतर दोन-तीनदा त्या खानवळीत पाठवली अन् मंगला न् तिच्या खानावळीची बदनामी करत राहिला. एखाद्या दिवशी जेवणात खिळा तर एखाद्या दिवशी शाकाहारी पदार्थात मांसाचा तुकडा सापडे ! या घटनांमुळे मंगलाच्या





खानावळीचे गिऱ्हाईक कमी झाले !

'या खोड्यांमागे नक्कीच कुणाचा तरी हात असल्याचे' तिने ओळखले. तिचा द्वेष करणाराच कोणी हे करत असला पाहिजे. एक दिवस गोविन्दकडे जाऊन तिने सर्व हकिकत तपशीलवार सांगितली आणि त्याचा सल्ला मागितला.

गोविन्द तिला म्हणाला, ''भिकाऱ्याचा शत्रू दुसरा भिकारीच असतो, व्यापाऱ्याचा शत्रू व्यापारीच. आपल्या खानावळीचं नुकसान होत असल्याचं पाहून बहुधा किरणनंच या खोड्या करवल्या असणार, तुम्ही एक काम करा. मोटेरामशी बोलणं करा. त्याला आपलं असं कोणी नाहीय. दहा वीस माणसांना तो एकटा सहज लोळवू शकतो. त्याच्यात तेवढी शक्ती आणि साहसही आहे. मजुरी करून तो प्रामाणिकपणे जगत असतो. त्याच्याकडून पैसे न घेता त्याला तुम्ही जेवण देत जा, तो तुमच्या रक्षणाचा भार उचलेल.''

मंगलाने मोटेरामला निरोप पाठवाला. ती त्याला म्हणाली, ''माझी काळजी घेणारं कोणीही नाहीय. त्यामुळे सर्वांच्या दृष्टीनं मी एक असहाय अबला आहे. मला अन् माझ्या खानावळीला बदनाम करायचं कारस्थान कोणीतरी करतंय. पदार्थात काही ना काही मिसळून इथे येणाऱ्या गिऱ्हाइकांना भिववत आहे. तू माझा आधार बन. मी तुला फुकट जेवायला तर घालीनच अन् शिवाय वर काही पैसेही देत जाईन.''

मंगला आपल्याला 'भाड्याचा गुंड' बनवू पहात आहे, या विचाराने मोटेरामला प्रथम



रागच आला. 'पण गोविन्दच्या सल्ल्यानेच ती आपल्यावर ही जबाबदारी टाकत आहे' हे कळल्यावर तो शान्त झाला. एका आठवड्याच्या आतच मोटेराम मंगलाच्या घरी येऊन तेथेच राहू लागला. मंगलाची थोरली मुलगी करुणा त्याला आवडाली. दिवस जात राहिले तसे ति तीही मोटेरामवर प्रेम करू लागली.

काही दिवसांनी किरणने पुन्हा एकदा दोन माणसे मंगलाला बदनाम करण्यासाठी पाठवली. जेवताजेवता त्यांनी पदार्थातून एक लहानशी पाल काढली, अन् ती लोकांना दाखवून ते काही बोलणार, इतक्यात मोटेरामने त्यांचा गळाच धरला अन् तो त्यांना बदडत विचारू लागला, ''बोला, या प्रकारचा बोलवता धनी कोण आहे ? कोणी

पाठवलं तुम्हाला इथे ? खरं बोला, नाहीतर चामडीच लोळवीन पहा तुमची !'' ते दोघेही खूप घाबरले अन् किरणचे नाव त्यांना सांगावेच लागले.

ताबडतोब चार माणसे किरणला पकडून घेऊन गोविन्दकडे आली. गोविन्दने काही विचारण्यापूर्वीच किरण रडतरडत सांगू लागला, ''गोविन्द, मला समजलंय की, तूच मोटेरामला मंगलाकडे पाठवलं आहेस. ही गोष्ट तर खरीच की माझा व्यापार अलिकडे घटत चाललाय, त्यामुळेच मी भाड्याचे गुंड मंगलाच्या खानावळीत पाठवून तिला बदनाम करत राहिलो. आता तुम्ही जी शिक्षा द्याल, ती कबूल आहे मला.''

''किरण, शिक्षा द्यायला मी गावपाटील थोडाच आहे ? पण एक गोष्ट नीट लक्षात ठेव, दुसऱ्याचं नुकसान करणाराला परमेश्वर कधीच क्षमा करत नसतो. दुसऱ्याचं भलं करणाऱ्याचं स्वतःचंही भलं होतं. जे घडलं, ते पाहून गावकरी तुझी घृणा करू लागतील, तुला दुष्ट समजतील ते. तुझे इतर लहान-मोठे जे व्यापार आहेत, तेही नुकसानीत जातील बघ. गावात तुला पुन्हा बरं नाव हवं असेल, तर एक काम कर, 'मंगलाच्या दुसऱ्या मुलीशी आपल्या मुलाचं लग्न लावून देईन' असं सर्वांना सांग अन् असं जाहीर कर की, 'मंगलानं आपला धंदा नीट जागरूकतेनं करावा हे समजावण्यासाठी आणि भाड्याच्या गुंडांपासून स्वतःला कसं वाचवावं हे शिकवण्यासाठीच मी हा सगळा द्राविडी प्राणायाम केला. असं झाल्यावर मगच सर्व काही ठीकठाक होऊन जाईल. लोक तुझ्या औदार्याची स्तुती करतील.''

किरणने गोविन्दचा सल्ला अंमलात आणला. आता मंगलाच्या दोन्ही मुलींचे विवाहही अगदी सहजपणे पार पडले. मोटेरामने मंगलाच्या थोरल्या मुलीशी विवाह करून खानावळीचा भार स्वतःच्या शिरावर घेतला. विधवा मंगला आता आराम करू शकत होती.

किरणला नवी सून मिळाली अन् स्वतःच्या बदनामीतून अगदी थोडक्यात वाचला. अशा प्रकारे ही गोष्ट सुखान्त झाली. गावात गोविन्दचीही खूप तारीफ झाली.







# भूपालची हुशारी

भूपाल हा भुवनगिरीचा हिशोब-कारकून. एके दिवशी तो घराबाहेरच्या कट्ट्यावर बसून हिशोब पहात असताना त्याची बायको ललिता तिथे येऊन म्हणू लागली, ''आपल्या मुलीच्या ओटीभरणासाठी संध्याकाळी आपल्याला व्याह्यांच्या गावी जायला हवं ना ! मग तिथे बायकांच्यात वाटण्यासाठी मिठाई हवी. आज सकाळीही सांगितलंय मी एकदा, लक्षात आहे ना ?''

''लक्षात नाही कसं ? आत्ताच उरकून टाकतो ते काम.'' असे म्हणून भूपालने ललिताला घरात पाठवले. इतक्यात गल्लीतून जाणारा शाम त्याला दिसला. शाम एक साधा शेतकरी. त्याला बोलावून हलक्या आवाजात भूपालने काहीसे सांगितले. थोड्या वेळाने पुन्हा समोरून जाणाऱ्या रामूला बोलावले अन् त्यालाही असंच काही सांगून पाठवून दिले.

ललिता पुन्हा एकदा बाहेर येऊन म्हणाली, ''आपल्या कामात गुंतून मिठाई खरीदायचं विसरून गेलातसे वाटतंय!''

''नाही, नाही ! तेच काम चाललंय माझं.'' भूपाल उत्तरला.

नंतर रस्त्याने जाणाऱ्या आणखी दोघांना बोलावून भूपालने काहीतरी सांगितले, अन् पुन्हा तो आपल्या कामात गुंतला.

आतून ललिता हे सर्व पहात होती. तिला आता रहावेना; बाहेर येऊन ती नवऱ्याला म्हणाली, ''रस्त्याने जाणारांना बोलावून त्यांच्याशी बोलताय पण मिठाई आणायचा मात्र काही पत्ताच नाहीय ?'' ''दिसत नाहीय तुला ? ज्या ज्या लोकांशी मी बोललो, ते सर्वजण मिठाई आणायच्या कामालाच तर लागलेत !'' भूपाल हसत बोलला.

''मी काही मूर्ख नाहीय ! मिठाई

उषा रेळे

आणायला इतक्या सगळ्यांची काय गरज ? एक माणूस पुरेसा नाही का ? माझा नाही विश्वास बसत तुमच्या बोलण्यावर ! आत्ता माझ्यादेखत कुणावर तरी सोपवा बरं ते काम ! तोवर हलणार नाही मी इथून !'' ललिता हट्टाने म्हणाली.

भूपाल हसत म्हणाला, ''मला मिठाई घ्यायची तर आहेच, पण तो गुरुदास गुप्ता विकायलाच तयार नाहीय !''

''हा तर फारच विचित्र प्रकार झाला ! अरे, आपण त्याचं घर थोडंच मागतोय ? मिठाई विकणं हा त्याचा धंदाच आहे ! त्यासाठीच तर दुकान अुघडलंय नं त्यानं ? तयार नाही म्हणजे काय ? खरं काय ते नीट सांगा नं !'' ललिता बोलली.

''ऐक, काय झालं ते ! मी गुप्ताच्या दुकानात जाऊन मिठाईच्या किंमती विचारल्या, त्यानं स्पष्टच सांगितलं की, कोणतीही मिठाई मणभर घेतली तरी शंभर रुपयांच्या आत मिळणार नाही. मिठाई अुत्तम अन् स्वादिष्टही आहे. किंमत कमी करण्यासाठी मी एक अुपाय योजला. तो अंमलात आणण्याकरता मी या लोकांना त्याच्या दुकानात पाठवलं. कल्पना अशी की, जो जो जाईल, तो सर्व मिठायांची किंमत विचारून काही बोलेल अन् चाखूनही पाहील. त्यानंतर त्यातले निरनिराळे दोष काढून टीका करेल. ते म्हणतील की, 'मिठाईत हलक्या दर्जाचं पीठ मिसळलंय' व 'मिठाई शिळी आहे?' ते असंही म्हणतील की, 'वापरलेलं तूप-शुद्ध तूप-नव्हे, त्याला खवट वास मारतोय' वगैरे, अन् ते सारे मिठाई न घेताच परत फिरतील. सर्वांची टीका ऐकून 'आपल्या मिठाईत खरंच काही दोष आहे' असं गुप्ताला वाटू लागेल. मग ती विकण्यासाठी तो किंमत अर्ध्यावर आणेल. तशी ती कमी झाली, की माझी माणसं जाऊन मिठाई खरेदी करून आणतील'' भूपालने सांगून टाकले.

इतक्यात शाम थैलीभर मिठाई घेऊन आला. तो म्हणाला, ''तुमच्या म्हणण्याप्रमाणे गुप्तानं खरंच मिठाईचा भाव निम्म्यावर आणला. आज मणभराचा भाव पन्नासच !''

नवऱ्यानं बसल्या बसल्या केलेला अुद्योग पाहून ललिता आश्चर्याने जागीच खिळली.







# सम्राट अशोक

## ३

(चाणक्याच्या मदतीने चन्द्रगुप्त मगधचा राजा बनला व त्याने मौर्यवंश स्थापन केला. चन्द्रगुप्तनंतर त्याचा पुत्र बिन्दुसार हा राजा बनला. एके दिवशी एक दरिद्री ब्राह्मण आपली कन्या सुभद्रा हिच्यासह राजधानी पाटलीपुत्र येथे आला. कन्येला राजाच्या हाती सोपवत तो म्हणाला, ''ज्योतिष्यांचं म्हणणं आहे की, माझी कन्या महाराणी बनणार आहे. आता आपण तिच्याशी विवाह करावा.'' राजाने 'हो' तर म्हटले; पण राजकाजात गुंतल्यामुळे तो ही गोष्ट विसरून गेला. दोन वर्षांनंतर योगायोगाने स्मरण झाल्यावर लगेच सूर्यास्तापूर्वीच तिच्याशी विवाह करायचे त्याने ठरवले.) -यानन्तर

राजाच्या आज्ञेने नगरात घोषणा दिली गेली की, 'महाराज बिन्दुसार आजच सुभद्रेशी विवाह करत आहेत.' नगरातले सगळे रस्ते केळीचे खुंट, आंब्याच्या पानांची तोरणे व फुले यांनी सजवण्यात आले.

केवळ भाग्य म्हणूनच, सुभद्राचे वडीलही नेमके त्याच दिवशी मुलीला भेटायला राजधानीत आले. तिचा विवाह केंव्हाच होऊन एव्हाना ती अंतःपुरात आरामात रहात असेल असे त्यांना वाटले होते. पण 'आजच तिचा विवाह होत आहे' या बातमीने त्यांना आश्चर्य वाटले. राजभवनाजवळ पोचताच त्यांना समजले की, ही शुभवार्ता देण्यासाठी शिपाई आताच आपल्या गावाकडे निघत आहेत. त्यांना महाद्वाराशी पहाताच मोठ्या आदराने ते आत घेऊन गेले. थोड्याच वेळात दरबारी ज्योतिष्यांनी निश्चित केलेल्या मुहूर्तावर सुभद्रा व बिंदुसार यांचा विवाह



साजरा झाला. आपल्या वचनाप्रमाणे सूर्यास्तापूर्वी महाराजांनी विवाह घडवून आणला. सुभद्राच्या पित्याने वधुवरांस आशिर्वाद दिले.

सुभद्रेने दोन वर्षे दासीप्रमाणे राजभवनात व्यतीत केली होती. आता ती महाराणी बनली. तिच्या वेषभूषेत कायापालट घडला. तिच्या गरजा पूर्ण करण्यासाठी आता खास दासींची नेमणूक झाली आणि रहाण्यासाठी एका खास महालाचीही व्यवस्था झाली.

परन्तु तरीही ती खूश नव्हती. कारण राजाच्या अन्य राण्या अजूनही, संधी मिळेल तेंव्हा, तिचा पाणउतारा करून तिला त्रास देत. तिच्या समक्ष त्या आपसात बोलत- ''पाहिलंत ? एका भिकाऱ्याची पोर आपल्या भाग्याचा किती डौल मिरवतेय ? ब्राह्मणकन्या आता लाजलज्जा सोडून राजवाड्यात प्रवेश करू लागल्या, तर आम्हा राजकन्यांचा उपयोगच काय ? असल्या बायका आमचे अधिकार बळकावू लागल्या, तर आमचं काय होणार ? आम्ही काय एकाद्या दरिद्राशी विवाह करून तृप्त व्हावं ?'' असेच काहीतरी बोलून त्या तिला हसत रहात.

या बोचऱ्या शब्दांनी सुभद्राचे अंतःकरण विदीर्ण होई. परन्तु ती सर्व काही सहन करी अन् आतल्या आत घुसमटत राही. परन्तु तिने आपल्या पतीजवळ याबद्दल कधी चकार शब्दही काढला नाही. तिचा स्वभावच सहनशील होता. जे भाग्यात असेल, तेच घडेल अशी तिची श्रद्धा असे. राजाही आपल्या राजकारभारात मग्न असे. अन्तःपुरातला तपशील जाणून घेण्याइतका वेळ तरी कुठे होता त्याच्याजवळ ?

अंतःपुरातल्या एका वृद्ध सेविकेचे सुभद्रा-वर प्रथमपासूनच प्रेम होते. एकान्तात तडफडणाऱ्या सुभद्राला ती म्हणाली, ''त्या सर्वजणी जळतात तुझ्यावर मुली ! अन् म्हणूनच अशा सतावतात त्या तुला, तोंडाला येईल ते बडबडत रहातात. त्यांचं ऐकून कष्टी नको होऊस ! या राजवाड्यात तुम्हा सर्वांचे अधिकार सारखेच आहेत. वयाने त्या मोठ्या असल्या म्हणून काय झालं ? मान सर्वांचा सारखाच.'' अशा प्रकारे ती सुभद्राचे सान्त्वन करी. तिचे बोलणे ऐकून सुभद्रा हसून चुप राही. परन्तु तिच्या त्या हसण्यात विषादाची छटाच अधिक असे.

अशा प्रकारे एक वर्ष उलटले. सुभद्रेने







एका सुन्दर पुत्राला जन्म दिला. आपल्या तेजस्वी पुत्राला पाहून ती म्हणे, ''तुझ्या आगमनानं माझं दुःख नाहीसं झालं बाळा ! माझा शोक दूर करणारा 'अशोक' आहेस तू !'' अन् आपल्या हातात अुचलून ती त्याच्यावर चुंबनाचा वर्षाव करी. तिने त्याचे नाव ठेवले-अशोक !

अशोकच्या जन्मापूर्वी बाकी तीन राण्यांचे मिळून पाच पुत्र होतेच. सर्वात 'सुशेम' मोठा होता. लहानपणापासून लोक त्याला युवराज मानत. त्यामुळे राजवाड्यातले नोकरचाकरही त्याच्याबद्दल अत्यन्त आदर बाळगत. पण यामुळे सुशेममधे अहंकारभाव वाढत गेला. आपल्या इच्छेविरुद्ध वागणारांना तो अत्यन्त कडक शिक्षा देई. कोणी थोडासाही विरोध दर्शवला, तर तो त्याच्यावर तुटून पडे. त्यानं सांगितलेले काम केले गेले नाही तर सेवकांना तो मारपीट करी. तरीही सर्वजण त्यालाच अुत्तराधिकारी मानत असल्याने कोणी त्याविरुद्ध शब्द काढत नसे.

सुशेम अशोकपेक्षा तीन वर्षांनी मोठा होता. आता दोघांनीही तारुण्यात पदार्पण केले होते. एकदा दोघेही राजोद्यानात फिरत होते, तेंव्हा तेथून जाणाऱ्या एका माळ्याने अशोकला प्रणाम केला मात्र, लगेच संतापून त्याला खाली पाडून क्रोधाने लाल होत सुशेम बोलू लागला, ''माझा अपमान करू धजलास तू ?'' हळूहळू अुठत माळी म्हणाला, ''पण आपला अपमान का करावा मी प्रभु ?''

''मग या दासी-पुत्राला नमस्कार का केलास तू ?'' सुशेम गरजला.

''ज्येष्ठ बन्धो ! जरा आदरानं बोला. तुमची माता मला मातेसमान आहे अन् माझी माताही तुम्हाला मातेसमान आहे.'' अशोक म्हणाला.

''शीः ! गप बस रे, पुन्हा कधी असलं बोलू नको माझ्यासमोर. तुझी माता माझी माता नव्हे; ती होअूच शकत नाही माझी माता ! माझी माता तुला पुत्र मानेल ही जन्मात तरी अशक्य गोष्ट आहे !'' असे बोलून सुशेमने अशोकची टर अुडवली.

''आपण दोघे ही बिन्दुसार महाराजांचे पुत्र आहोत. माझ्या मातेचा अपमान हा महाराजांचाही अपमान होतो.'' अशोकने संयत आवाजात समजावायचा प्रयत्न केला.

''हुंः, तुझा अन् तुझ्या मातेचा अपमान करायला मला गंमत वाटते. काय करू शकशील रे तू ?'' सुशेमने दर्पभरल्या





आवाजात विचारले.

''तू असल्या अुद्धटपणाची माझ्याजवळ क्षमा मागशील, तेंव्हा आनन्द वाटेल बघ मला'' असे म्हणत अशोकने सुशेमचा हात पकडून जोराने पिरगाळला.

''सोड, सोड !'' म्हणत सुशेम ओरडू लागला, अन् वेदनेने कळवळू लागला. परन्तु अशोक त्याच्या हात सोडेना ! माळी धावत अुद्यानाबाहेर गेला व तेथून जाणाऱ्या मन्त्र्याला त्याने हकिकत सांगितली. मन्त्री ताबडतोब तेथे येऊन ओरडला, ''सोडा, सोडा त्यांना !''

सुशेमचा हात सोडून देऊन अशोक मन्त्र्याकडे पाहू लागला.

''थोरल्या बन्धूशी अशी वागणूक ठीक आहे का ?'' मन्त्र्याने विचारले.

''यानं कुठे थोरल्या भावासारखी वर्तणुक केली ? एकाद्या अविवेकी शत्रूसारखं बोलत राहिला तो. आपल्या मातापित्यांचा अपमान सहन नाही होणार मला ! पुन्हा कधी त्यांच्याबद्दल तो अपमानकारक बोलला, तर नुसता हातच नव्हे, त्याचा गळा पिरगाळून टाकीन मी !'' बोलताना अशोकचे डोळे आग ओकत होते.

अशोककडे रागाने दृष्टिक्षेप टाकून सुशेमही वेगाने तेथून निघून गेला. 'हा याबद्दल केंव्हातरी नक्कीच सूड घेईल' असे मन्त्र्याला वाटले. 'अशोकविरुद्ध नक्कीच तो काही हालचाल करील.'

चन्द्रगुप्तने नन्दवंश नष्ट केला. मौर्यवंशाच्या स्थापनेत त्याला मदत करणारा चाणक्य त्याचा व पुढे बिन्दुसारचाही सल्लागार बनला होता. दोन्ही राजपुत्रांच्यात धुमसणाऱ्या सूडाच्या अग्नीबद्दल मन्त्र्याने एकदा चाणक्यला सांगितले.

''स्तुतिपाठकांच्या समूहात सापडून सुशेम





आपला मार्ग चुकत आहे. अशोक अजून किशोरवयीन आहे. भविष्यात तो चांगला निपजाण्याची चिन्हे तर दिसत आहेत, पण पुढे तो सन्मार्गापासून च्युत होण्याची शक्यताही आहेच. हे सर्वच परिस्थितीवर अवलंबून आहे.'' चाणक्य गंभीरपणे बोलला.

''तुमचं म्हणणं तर ठीकच आहे, पण मला शंका आहे की, खुद्द महाराजच सुशेमचं समर्थन करत असतात. त्यांचा कल त्याच्याकडे आहे. माझं अंतर्मन तर सांगतंय की, हा अहंकारी सुशेम सिंहासनावर बसला, तर मौर्य-साम्राज्य संकटात येईल.'' मन्त्री म्हणाला.

चाणक्य काही वेळ गप्प विचार करत राहिला. नंतर तो म्हणाला, ''तर मग आपल्या ज्येष्ठ पुत्राबद्दलचा राजाचा भ्रम दूर करणं फारच आवश्यक आहे. अशा स्थितीत आपण गप्प रहाणं बरं नव्हे.''

चाणक्याला प्रणाम करून मन्त्री तेथून निघून गेला. एके दिवशी संध्याकाळी भवनाबाहेर फिरत असलेल्या राजाला चाणक्य भेटायला गेला. राजा बिन्दुसारने त्याला प्रणाम करून म्हटले, ''आपण निरोप दिला असता, तर मीच उपस्थित झालो असतो ना आपणासमोर.''

''आपल्या पुत्रांपैकी एकाला सिंहासनावर बसण्यायोग्य घोषित करण्याची अन् त्यासाठी पुढे त्याला विशेष प्रकारे तयार करण्याची वेळ आता जवळ आलेली आहे, महाराज ! या गोष्टीची आठवण देणं, हे आपलं कर्तव्यच समजलो मी !'' चाणक्य बोलला.

राजाने एकदम दचकून विचारले, ''म्हणजे ? माझा ज्येष्ठ पुत्र युवराज सुशेम मौर्य साम्राज्याच्या सिंहासनावर बसायच्या लायकीचा नाहीय ?''

''ज्येष्ठ पुत्र हाच सिंहासनाचा वारस असतो, ही एक आपली रीत आहे. पण सर्वार्थाने ती योग्य नव्हे. जो जास्त योग्य असेल, कर्तव्यदक्ष असेल, त्यालाच राज्याभिषेक व्हावा, हेच योग्य ! यातच राज्याचं कल्याण सामावलेलं असतं.'' चाणक्याने आपला विचार स्पष्टपणे मांडला.

चाणक्य मितभाषी आहे, तो जे बोलतो ते पूर्ण विचार केल्यावरच बोलतो, हे राजा बिन्दुसारला चांगले माहिती होते. आपल्या ज्येष्ठ पुत्राबद्दल त्याने आपल्याला सावध करून राज्याच्या वारसाबद्दल नीट विचार करायचा इशारा दिलेला आहे. चाणक्यच्या या



कथनामागे नक्कीच काही सबळ कारण असावे हे बिन्दुसारने ओळखले.

''राजा, या विषयात घाईगडबड नको. राजा कोण व्हावा, कोणाला नंतर सिंहासनावर बसायचं आहे, याबद्दल अजून आपला निश्चित निर्णय झालेला नाहीय-हे सर्व राजकुमारांना नीट समजावे. आपण त्यांची वर्तणूक व हालचाली पारखतो आहोत, हेही त्यांना कळावे. ज्येष्ठ पुत्र असल्यामुळे आपल्यालाच राजा बनायचा हक्क आहे-असं सुशेमला वाटता कामा नये. कधी कधी त्यांच्या बुद्धिमत्तेची परीक्षाही आपल्याला घ्यायला हवी.'' चाणक्य म्हणाला.

''आपण म्हणता, तसंच घडेल, अशी परीक्षा ताबडतोब घ्यायची असेल तर त्यालाही माझी काहीच हरकत नाही.'' राजा बिन्दुसारने सांगितले.

''मी तोही विचार करून आलोय. उद्या सूर्योदयाबरोबर आपल्या सहाही पुत्रांना नगराच्या उत्तरेकडील शिवालयात हजर होण्यास सांगा. तेथे येताना त्यांनी आपल्या उत्तम वाहनावरून यावे. त्यापूर्वी त्यांनी काही बलवर्धक आहार घेतलेला असावा अन् मंदिरात प्रवेश केल्यानंतर त्यांनी मूल्यवान आसनावर बसावे.'' इतके सांगून चाणक्य तेथून निघून गेला. त्याने सांगितल्याप्रमाणे राजाने आपल्या पुत्रांकडे निरोप रवाना केला. दुसऱ्या दिवशी सूर्योदयापूर्वीच राजा बिन्दुसार, चाणक्य, मन्त्रिगण, काही राजकर्मचारी असे सर्वजण शिवालयाच्या प्रांगणात हजर झाले. सूर्योदय होताच एक एक राजपुत्र तेथे येऊ लागला.



युवराज सुशेम दोन घोड्यांनी सजवलेल्या रथातून आला. दुसरा राजपुत्र दागिने घातलेल्या हत्तीवर बसून आला. तिसरा एका सुदृढ, सुंदरशा घोड्यावरून आला. चौथा व पाचवा राजकुमार पालखीतून आले. सर्वजण आल्यावर त्यांच्यापाठोपाठ कोणतेच वाहन न घेता अशोक पायी चालत ठीक वेळेवर तेथे पोचला.

मंदिराच्या मंडपात राजकुमारांनी आपापली आसने ग्रहण केली. दोन राजपुत्र तर येताना आपल्याबरोबर हस्तिदंती सिंहासने घेऊन येऊन त्यावर बसले. दोन राजकुमार मऊ कापूस भरलेल्या गाद्यांवर बसले. पाचवा राजपुत्र व्याघ्रचर्म पसरून त्यावर बसला. अशोक स्वत:बरोबर काहीच घेऊन आला नव्हता.

अशोकला पाहिल्याबरोबर बाकीचे राजकुमार हसू लागले.

राजकुमारांना संबोधून चाणक्य म्हणाला, ''तुमची वाहनं आणि आसनं आम्ही पाहिलीच. आता सांगा-येण्यापूर्वी सकाळी तुम्ही कायकाय खाऊन आलात ?

राजकुमारांनी जी जी पक्वान्ने खाल्ली होती त्यांची नावे सांगितली.

नंतर चाणक्याने अशोकला विचारले, ''तू राजकुमार आहेस. तुझ्याजवळ कित्येक वाहने असतील. तू त्यांचा अुपयोग का केला नाहीस ? पायीच आलास ?''

''पितामह, आपला आदेश होता की, मी अुत्तम वाहनाचीच निवड करावी. मी 'आपले पाय' हेच अुत्तम वाहन समजतो, माझ्या मते माणसा जवळ यापेक्षा अुत्तम वाहन असणे शक्य नाही.'' अशोक अुत्तरला.

''ठीक, आता सांग, निघण्यापूर्वी काय खाल्लंस तू ?''

''एक पेला दही.'' अशोक बोलला.

''मी तर काही बलवर्धक आहार घेऊन येण्यास सुचवले होते. पण तू तर नुसतं दहीच खाऊन आलास ?'' आश्चर्याने चाणक्यने विचारले.

''मी पुत्र आहे. त्याला केंव्हा, कसला बलवर्धक आहार द्यावा हे फक्त माताच जाणते. माझ्या मातेनं मला दिलेलं दही चुपचाप खाऊन आलो मी.' अशोकने अुत्तर दिले.

पुन्हा आश्चर्याने चाणक्यने आता विचारले, ''अन् हे काय ? या कडक जमिनीवर कोणतंही आसन न घालता का बसलास तू ?''

''महात्मा, आपण मूल्यवान आसनावर बसायला सांगितलं होतं. पण या पवित्र भूमीपेक्षा मूल्यवान असं दुसरं कोणतं आसन या जगात असू शकेल ? म्हणूनच तिला आपलं आसन बनवणं मला अुत्तम वाटलं.'' अशोक अुत्तरला.

''अद्भुत् अुत्तर !'' मंत्री व राजकर्मचारी अुद्गारले.

हसून चाणक्य म्हणाला, ''मी अभिनन्दन करतो तुझं.'' अन् त्याने अशोकच्या पाठीवर प्रेमाने हात फिरवला.

आपल्या पुत्राच्या बुद्धिमत्तेचे राजाला आश्चर्य वाटले व आनन्दही झाला. **क्रमशः**







## जादूविद्या आणि गन्धर्वमाया

**आ**लेल्या अपयशांनी राजा विक्रमला निराश केले नाही. ज्या परीक्षा अुत्तीर्ण झाल्यावरच ध्येयसिद्धी होअू शकते, त्याच त्याच्या दृष्टीने खऱ्या परीक्षा होत्या. दुसरा कोणी असता तर आपली असमर्थता मनोमन कबूल करून आपल्या वाटेने चालू लागला असता. पण दृढनिश्चयी विक्रमने आपले अपयश व वेताळाचे यश यांचा विचारही केला नाही. ध्येय हाच त्याचा केन्द्रबिन्दू होता. तो पुन्हा एकदा त्या झाडाजवळ गेला व प्रेत खाली अुतरवून आपल्या खांद्यावर टाकून तो स्मशानाची वाट चालू लागला. तेंव्हा प्रेतात वास करणारा वेताळ बोलू लागला, ''राजा तुझी दीक्षा आणि व्रत माझ्या मनात कुतूहल जागवत आहेत. तुझे हे कठोर श्रम पाहून मला तुझ्याबद्दल सहानुभूती वाटू लागली आहे. एका देशाचा राजा असूनही एका सेवकासारखं काम तू करत आहेस. असं का

**वेताळ कथा**



करत आहेस, हे खूप डोकं खाजवूनही मला कळत नाहीय. स्वतःची गरज पुरी करण्यासाठी कदाचित माणसं असं करत असतील. पण तू तर गरजांच्या पलिकडला आहेस! चुटकी वाजवताच तुला आवश्यक ते सर्व मिळण्यासारखं आहे. असं तर नव्हेना, कि तू काही क्षुद्र शक्ती प्राप्त करून आपली इच्छा पुरी करायच्या मागे लागला आहेस? पण खरं तर-क्षुद्र शक्तीच काय, पण देव शक्ती प्राप्त केल्यावरही त्यातून मिळणारा आनन्द हा क्षणभंगुरच असतो. माझी खात्री आहे की, या शक्ती शेवटी आपली मनःशांति नाहीशी करतात. अुदाहरणादाखल एका बिनडोक व मूर्ख राजकन्येची गोष्ट माझ्या तोंडून ऐक. जन्मतःच ती अगदी कुरूप होती. अनन्यसुंदर बनायची संधी तिला प्राप्त झाली. पण जाणून बुजून तिनं ते भाग्यही ठोकरून दिलं. तिची गोष्ट ऐकत आपला थकवाही घालव.'' वेताळ सांगू लागला -

यशवर्मा रत्नपुरीचा राजा होता. तो तीक्ष्ण बुद्धीचा होता. महाराणी वसुधादेवी लावण्यवती होती. बऱ्याच वर्षांनंतर या दंपतीला कन्यारत्न लाभले. पण जन्मतःच ही कन्या अगदी कुरूप होती.

अशी कन्या पाहून राजदंपतीला फार वाईट वाटले. तरीही त्यांनी कन्येला खूप लाडाकोडाने वाढवले. तिचे नाव ठेवले मंजिरी. देव दयाळू आहे याचे प्रमाण म्हणजे ही मंजिरी. रूप न दिले, तरी भगवंताने तिला मधुर आवाज बहाल केला. बाराव्या वयापर्यन्त ती संगीतात प्रवीण झाली. तिने वीणावादनही शिकून घेतले. वीणा वाजवत ती जेंव्हा गाअू लागे, तेंव्हा रंक, राव सगळेच तल्लीन होअून ऐकत रहात. आपण जणू दुसऱ्याच लोकात विचरत आहोत, असे त्यांना वाटे.

पहाता पहाता मंजिरीने तारुण्यात प्रवेश केला. राजदम्पतीला आता तिचा विवाह ही मोठीच समस्या बनून राहिली. कोणताही राजकुमार एकाद्या कुरूप राजकन्येशी विवाहाला कसा तयार होणार? कन्येच्या भविष्याबद्दल ते चिन्ताग्रस्त झाले.

एका पौर्णिमेच्या रात्री मंजिरी एकटीच राजोद्यानात वीणा वाजवत गात बसली होती. त्यावेळी तिचे मधुर स्वर आकाशात विहार करणाऱ्या वेदचन्दना नामक गंधर्व-कन्येच्या कानी पडले. मुग्ध होअून ती अुद्यानात अुतरली अन् राजकन्येजवळ जाअून





तिचे अभिनन्दन करत म्हणाली, ''अहाहा! किती गोड गळा लाभलाय तुला? आमच्या गन्धर्वलोकातही इतक्या मधुर स्वरात गायची देणगी कोणालाच मिळालेली नाही!''

अचानक गन्धर्वकन्या आपल्यासमोर अुभी ठाकलेली पाहून मंजिरी बावरून अुभी राहिली. निस्तेज होअून तिने गाणेही थांबवले. सुवर्ण प्रतिमेसारख्या शोभणाऱ्या त्या गंधर्वकन्येकडे मंजिरी अपलक पहात राहिली.

आश्चर्यात बुडालेल्या राजकन्येच्या मनातले भाव वेदचंदनाने ओळखले. हसतहसत आपल्या हातातली प्रवाळाची अंगठी काढून मंजिरीच्या बोटावर चढवत ती म्हणाली, ''राजकन्ये, ही अंगठी महिमामयी आहे. ती धारण करणारी स्त्री इतरांना अगदी माझ्याचसारखी लावण्याकृती दिसू लागेल हां. पण तुला स्वतःला मात्र तू तुझ्यासारखीच दिसशील! आणखी एक गोष्ट कायम लक्षात ठेव. ही अंगठी बोटात असताना तू कधीही, कोणत्याही देवळात जाअू नकोस. तसं केलंस तर अंगठीची शक्ती कायमची नष्ट होअून जाईल.'' मंजिरीला अशा प्रकारे सावध करून वेदचन्दना आकाशमार्गाने निघून गेली.

आपण स्वप्नात आहोत की जाग्या, हे काही वेळ मंजिरीला कळेना, इतक्यात राजाराणी तेथे पोचले. अशोकवृक्षाखाली चमकत्या सुवर्णमूर्तीसारख्या अुभ्या युवतीला पाहून त्यांना आश्चर्य वाटले.

प्रथम या धक्क्यातून सावरून राजा यशवर्माने विचारले, ''पुत्री, तू कोण आहेस? आमची मंजिरी कुठाय?'' जवळ असणारी मंजिरीची वीणा त्याने ओळखली होती.



आपले मौन तोडत मंजिरीने, ''बाबा!'' म्हणून पित्याला मिठी मारली. राजदम्पतीने कन्येचा आवाज तर ओळखला, पण रूपाबद्दल शंका असल्याने काही न बोलता स्तंभित होअून दोघे तिच्याकडे पहातच राहिले.

मंजिरीने गंधर्वकन्येच्या भेटीची वार्ता त्यांना खुलासेवार सांगितली. राणीने आपले कुतूहल न आवरून मंजिरीची अंगठी काढून स्वतःच्या बोटात घातली. आता मंजिरी आणि यशवर्माला राणी गंधर्वकन्येसारखी दिसू लागली! टाळ्या वाजवत दोघेही हसू लागले. राजदम्पतीच्या आनन्दाला पारावार राहिला नाही. कारण राजकन्येच्या कुरुपतेचा प्रश्न आपोआपच सुटलेला होता. महाराणीने अंगठी पुन्हा मंजिरीच्या हातात घातली.

दुसऱ्या दिवशी गंधर्वकन्या वेदचन्दनाच्या



रूपातल्या मंजिरीकडे पाहून तिच्या सख्या आपसात कुजबुजू लागल्या, ''ही सुन्दर तरुणी महाराजांच्या नातेवाइकांपैकीच असेल. मुलगी असावी तर अशी! आमचीही राजकुमारी आहे की, पण काय अुपयोग? हिच्यात अन् तिच्यात आकाशपाताळाचं अंतर आहे!''

सख्यांच्या चेहऱ्यावरचे भाव पहाताच त्यांच्यात काय बोलणी चालली आहेत हे मंजिरीने ताडले. एक थंड श्वास ओढून आपल्या सख्यांना ती म्हणाली, ''अग मल्लिका, प्रफुल्ला! अशा निरखून काय पहाता आहात? मी काय कोणी नवी आहे का तुम्हाला? इकडे या बरं!'' राजकन्येचा आवाज ओळखून त्यांनी आपल्या चुकीबद्दल क्षमा मागितली.

पण आता राजकन्येला एक नवीच चिन्ता लागून राहिली. इतरांना ती जरी सुन्दर दिसत असली, तरी स्वत:च्या डोळ्यांना तिचे तेच जुने खराब रूप दिसे. आरशात पहावे तेंव्हा ही वास्तविकता तिला अशांत करी. आपल्या मनाला दूषणे देई ती.

अशातच तिचा वाढदिवस आला. नेहमीप्रमाणे महाराजांनी त्याही दिवशी करमणुकीच्या कार्यक्रमाची व्यवस्था केली. त्यात शेवटी एक जादूगार आपल्या तांड्यासह जादूचे प्रयोग करायला पुढे आला. त्याच्याबरोबर त्याची तरुण मुलगीही होती. तिच्या गळ्यात एक ढोल लटकत होता.

जादूगाराने आंब्याची एक कोय खाली ठेवून त्यावर एक टोपली झाकली. आणि मंत्र म्हणत तो आपली काठी त्याभोवती फिरवू लागला. मुलगी ढोल पिटू लागली. थोड्या वेळाने टोपली अुचलली तेंव्हा त्या जागी आंब्याचे एक रोप दिसत होते आणि त्याच्या फांदीला लटकत होते एक डाळिंब!

दर्शक टाळ्या वाजवत, 'अरे! ही तर नवीच जादू आहे!' असे म्हणू लागले. जादूगार हसत म्हणाला, ''आंब्याच्या झाडाला डाळिंबाचं फळ आलं. आता याची चवही पहा बरं!'' आणि त्याने डाळिंब फोडून त्याचे दाणे जवळच्या प्रेक्षकांना वाटले. दाणे खाताच 'वा, वा! काय आश्चर्य ! या डाळिंबाची चव तर अगदी पेरूसारखी आहे!' असे ओरडत ते टाळ्या वाजवू लागले. राजाजवळ बसलेली राजकुमारीही आश्चर्यचकित होअून टाळ्या पिटू लागली.

यानंतर जादूगाराने आणखी काही प्रयोग



दाखवले. शेवटी आपल्या मुलीकडे निर्देश करत तो राजाला म्हणाला, ''महाराज, ही माझी एकुलती एक मुलगी आहे. लोकांना ती कुरूप वाटते. विवाहाचा प्रस्ताव केला तर लोक तिला 'कुरूप' म्हणून पळून जातात. महाराज अन् प्रेक्षक हो! आपणच पहा ना, माझी मुलगी किती सुन्दर आहे!'' बोलता-बोलता त्याने मन्त्र म्हणून आपली काठी तिच्या डोक्यावर टेकली.

दुसऱ्याच क्षणी जादूगाराची मुलगी डोळे दिपतील अशी वस्त्रे ल्यायलेली दिसू लागली. तिच्या डोक्यावर नागाच्या फणीच्या आकाराचा सुवर्णमुकुट होता. मुलगी विजेसारखी तळपत होती. सर्वांनी पुन्हा एकदा टाळ्यांचा कडकडाट केला.

नम्रतेने वाकून जादूगाराने सर्वांना प्रणाम केला व पुन्हा एकदा काठीच्या स्पर्शाने मुलीला पूर्वरूपात आणले. नंतर तो बोलू लागला, ''महाराज व प्रेक्षकांनो! मी आतापर्यन्त जे दाखवलं, त्यात खरं काहीच नाही! तो सारा जादूविद्येच्या मदतीनं उत्पन्न केलेला भ्रम होता!''

जादूगाराची भरपूर प्रशंसा करून राजाने त्याला सोन्याच्या हजार मोहोरा बक्षिस दिल्या. मंचावर राजाराणीसमवेत बसलेल्या राजकन्येच्या मनात मात्र एक विचित्रसा भावसंघर्ष अुत्पन्न झाला. प्रयोग संपल्यावर तिने एक निर्णय घेतला व आसनावरून अुतरून ती जादूगाराजवळ आली. आपली महिमावाली अंगठी काढून त्याच्या हाती सोपवत ती म्हणाली, ''ही माझ्या वाढदिवसाची तुला भेट! तुझ्या जादू प्रमाणेच हिच्यात अलौकिक गंधर्वमाया निहित आहे.'' नंतर ती अन्त:पुरात निघून गेली.

इतकी गोष्ट सांगून वेताळ विक्रमला म्हणाला, ''राजा, गंधर्वकन्येनं कुरूप



राजकुमारीला दिलेली अंगठी म्हणजे तिला खरोखरच वरदानच होतं. तिच्या मदतीनं राजकन्या विवाह करून सुखी जीवन व्यतीत करू शकली असती. तसं न करता तिनं अंगठी जादूगाराला देऊन टाकली. हा तिचा मूर्खपणाच नव्हे तर काय! तिची ही करणी पाहून असं वाटतं की, एक तर अचानक तिला वेड लागलं असावं, किंवा एखाद्या भयानक निराशेच्या भोवऱ्यात सापडून ती स्वत:ला विसरून गेली असावी. यामुळेच तिने अशी मूर्खपणाची वागणुक केली. माझ्या या शंकांचं अुत्तर माहीत असूनही गप्प रहायचं ठरवलंस, तर तुझं मस्तक फुटून जाईल.''

अुत्तर देताना विक्रम म्हणाला, ''गंधर्वकन्येनं राजकन्येला दिलेल्या अंगठीतल्या शक्तीला काही मर्यादा आहेत. राजकुमारी मंजिरी हे कठोर सत्य कधीही विसरली नाही की, आपल्या ज्या मनोहर रूपाची लोक स्तुती करत आहेत, ते आपलं स्वत:चं नाहीय; गंधर्वकन्येकडून अुधार मिळालेलं आहे. याशिवाय ती अंगठी घालून राजकन्या देवळात जाऊन देवदर्शन करू शकणार नव्हती. तसं केल्यास अंगठीचा महिमा संपून जाऊन ती कायमची कुरूप बनून रहाणार होती. आता राहिला विवाहाचा प्रश्न! या बाबतीत तिच्यात अन् जादूगाराच्या मुलीत काहीच फरक नव्हता. स्वत:च्या जीवनात ती नागकन्याही नव्हे, अन् राजकन्या गंधर्व कन्याही नव्हे. एक जादूकला तर दुसरी गंधर्वमायाच फक्त आहे. जादूप्रयोग पाहिल्यावर तिला पटले की पोट भरण्यासाठी जादूगार जादू दाखवतो अन् विवाहासाठी, पतीला फसवण्यासाठी आपण गंधर्वमायेचा अुपयोग करणार आहोत. अशा प्रकारे ती मानसिक संघर्षात तडफडू लागली. मंत्र तंत्र किंवा अन्य शक्तीच्या द्वारे मिळवलेलं सौन्दर्य शाश्वत नव्हे, त्यामुळे मानसिक सुख किंवा आनन्द मिळणार नाही. हे तथ्य ओळखून तिने अंगठी जादूगाराला देऊन टाकली अन् आपलं ज्ञान व विशाल हृदयाचं प्रदर्शन केलं. असं कृत्य फक्त निर्मल अन् पवित्र हृदयाची व्यक्तीच करू शकेल.''

अशा प्रकारे राजाचे मौन भंग झाल्यामुळे वेताळ पुन्हा प्रेतासह अदृश्य होऊन झाडावर लटकू लागला.







# मानलेला मुलगा

**गा**वच्या सरहद्दीपलिकडे जंगलाच्या किनाऱ्यावर एक म्हातारी एका झोपडीत आपल्या मुलासह रहात असे. रोज जंगलात जाऊन ती पळसाची पाने व झाडूच्या गवताच्या काड्या आणी. पळसाच्या पत्रावळी बनवून अन् काड्यांचे झाडू बनवून ते विकून ती आपला अुदर-निर्वाह चालवी. कधी कधी ती जंगलातून लाकडाच्या काटक्याही वेचून आणून विकी.

तिचा मुलगा अगदीच निरुद्योगी अन् कुचकामी होता. आईला तो मदत तर करत नसेच; पण अुलट तिलाच सतावून तिच्याकडून पैसे घेई. अुगाचच इकडे-तिकडे भटकत असे तो. म्हातारीने शेवटी त्याच्याकडे लक्षच देणे सोडून दिले अन् तोही कंटाळून एकदा घर सोडून निघून गेला.

हळूहळू म्हातारी क्षीण होत गेली. एक दिवस लाकडे वेचता-वेचता घेरी येऊन ती खाली पडली. तेथून जाणाऱ्या एका तरुणाने तिला पाहून, पानाचा द्रोण करून तलावातून थोडे पाणी आणले. ते तिच्या तोंडावर शिंपडून त्याने म्हातारीला सावध केले.

अुठून बसल्यावर म्हातारीने त्याला विचारले, ''कोण तू बाळा?''

''अनाथ आहे मी. माझं आपलं कोणीच नाही. कधी कोणी मला आपलं म्हणून जवळ ठेवून घेईल या आशेनं फिरत असतो मी.'' तो तरुण बोलला.

म्हातारी अुठून लाकडांची मोळी अुचलून डोक्यावर घेणार, इतक्यात तिला थांबवून ती आपल्या डोक्यावर घेत तो तरुण म्हणाला, ''चला आई, मी पोचवतो तुम्हाला घरी.''

घरी पोचल्यावर म्हातारी त्याला म्हणाली, ''तुला कुठे बरीशी जागा मिळत नाही तोवर रहा ना माझ्याचकडे! मला काही

चान्दोबात पंचवीस वर्षांपूर्वी प्रकाशित झालेली गोष्ट

अडचण नाही होणार तुझी.''

मग तो दुसरीकडे कुठे गेला नाही. म्हातारीकडेच राहून तिची सारी कामं करू लागला. त्याने म्हातारीला कधी; कसला त्रास नाही होऊ दिला.

म्हातारी आता कधीकधी पळसाची पाने अन् गवताच्या काड्या आणायला जाई तेवढीच. बाकी सारी कामे तो तरुणच करी. दोघेही यथाशक्ती कमाई करत असत. थोडीफार बचतही होई आता.

म्हातारीचा मुलगा एक दिवस अचानक येऊन धुमकला! घरची आताची बरी स्थिती त्याने हेरली. पुन्हा तो पैशांसाठी म्हातारीला सतावू लागला. पण म्हातारीने त्याला एक पैसासुद्धा द्यायला नकार दिला.

म्हातारीचा हा सख्खा मुलगा आता वेळोवेळी त्या मानलेल्या मुलाला त्रास देऊ लागला. त्याला वाटे की, या तरुणाला धमकावून, घाबरवून घरातून हुसकून लावता आले की आई पुन्हा आपल्याला जवळ करील, पैसे देत राहील.

एके दिवशी दोघेही घरात नसताना म्हातारीने सगळ्या पैशांची पुरचुंडी करून ती लपवून ठेवली, घरातल्या वस्तु इकडे तिकडे पसरून टाकून स्वतःच जोरजोराने रडू-ओरडू लागली.

इतक्यात म्हातारीचा मुलगा आला. आपले धन चोरीला गेल्याचे तिने त्याला सांगितले. यावर तिला शिव्या देत तो म्हणाला, ''पापी आहेस तू. मी विचारले, तर दिले नाहीस मला पैसे ! आता बरं झालं, छान झालं! भोग आपल्या कर्माची फळं. तुझा चेहरा पाहणंही पाप आहे. मी आता या घरात क्षणभरही राहू इच्छित नाही!'' अन् तो वेगाने तेथून निघून गेला.

तो गेल्यावर म्हातारीचा मानलेला मुलगा तेथे आला आणि जे घडलं ते पाहून म्हणाला, ''रडू नको आई! गेले पैसे तर गेले! त्यासाठी इतकं दुःख कशाला? शेवटी आपण मिळवलेला पैसाच गेला ना? पुन्हा मेहनत करून मिळवू की!''

''अरे पैसे कुठे गेलेच नाहीत रे बाळा! पण हां, तो नालायक मात्र गेला घरातून निघून! पिडा गेली एकदाची! आपले पैसे सुरक्षितच आहेत बघ! असे म्हणून म्हातारीने लपवलेली पुरचुंडी काढून त्याला दाखवली.








समुद्रकिनाऱ्यावर सहल - १६

# कॉरोमोंडेलच्या किनाऱ्या किनाऱ्याने

मन्नार खाडी मागे टाकून, पुढे आपण कॉरोमोंडेलच्या किनाऱ्यावर पोचतो. याचे खरे नाव होते चोलमंडल. ते बदलून कॉरोमोंडेल बनले. श्रीमती सरोजिनी नायडूंच्या 'कॉरोमोंडेल फिशर्स' या सुप्रसिद्ध कवितेने हे नाव अमर केले आहे. कॉरोमोंडेल किनाऱ्यावर अनेक पवित्र धार्मिक ठिकाणे आहेत.



वेलांगणीचे 'चर्च ऑफ अवर लेडी ऑफ हेल्थ'

वेलांगणीचे चर्च यात फारच प्रसिद्ध आहे. हे चर्च 'अवर लेडी ऑफ हेल्थ' नावाने प्रसिद्ध आहे. खूप दूरवरून अनेक रोगी येथे येतात व माता मेरीची स्वास्थ्यलाभासाठी प्रार्थना करतात. बरे झाल्यानन्तर बहुतेक रोगी बऱ्या झालेल्या शरीराच्या त्या विशिष्ट भागाची सोन्याची प्रतिकृती अर्पण करतात. अशा सर्व प्रतिकृती चर्चच्या संग्रहालयात प्रदर्शित केलेल्या आहेत. सध्याच्या चर्चपासून थोड्या अंतरावर समुद्रतटावर मूळचे चर्च आहे. दोन्ही चर्च एका बोळाने एकमेकांना जोडलेली आहेत. या बोळाच्या दोन्ही बाजूच्या भिंतीवर बायबलमधील गोष्टी चित्रित केलेल्या आहेत.

वेलांगणीहून काही कि.मी. उत्तरेकडे आहे नागपट्टिनम्. आता जरी हे एक छोटेसे बंदर असले, तरी एकेकाळी ते फार महत्वाचे बन्दर मानले जाई. पाचव्या शतकापासून इथे चोलराजांच्या नाविकदलाचा मुख्य अड्डा होता.

आपणाला संगीताचे प्रेम असेल, तर तटापासून २४ कि.मी. पलिकडे असणाऱ्या तिरुवारूरला अवश्य भेट द्या. कर्नाटक संगीतचे तीन महान उद्गाते-त्यागराज, मुत्तुस्वामी दीक्षितर् व श्यामस्वामी-हे तिघेही इथेच जन्मले होते. तिघेही समकालीन असून त्यांना 'कर्नाटक संगीताची



कर्नाटक संगीताची त्रिमूर्ती

त्रिमूर्ती' असे म्हणतात.

नागपट्टिनमहून अुत्तरेकडे चार कि.मी. वर नागोर आहे. येथे मुसलमान संत हजरत मिर्या यांचा ५०० वर्षांपूर्वीचा दर्गा आहे. त्याच्या दर्शनासाठीही दूरवरून सर्वधर्मीय भक्त येतात. सोनेरी घुमट व पाच मिनारांनी युक्त अशा या दर्ग्याच्या आवारात एक कुंड आहे. कुंडाच्या पाण्यात रोग निवारणाची शक्ती असल्याचे सांगितले जाते.

नागोरमध्ये ताडाच्या पानांपासून टोपल्या, पिशव्या, डबे व अुघडमीट करण्याचे पंखे वगैरे कलात्मक वस्तु बनवल्या जातात.

येथून पुढे अुत्तरेकडे गेल्यावर आपण कारैक्कल येथे पोचतो. हेही एक प्राचीन तीर्थस्थान असून पांडीचेरी राज्याच्या चार जिल्ह्यांपैकी एकाचे मुख्यालय आहे.

सहाव्या शतकात येथे एक महान् संत-गायिका कारैक्कल अम्मयार होऊन गेली. ती शिवभक्त असून अरुपुतत्त तिरुवंताडी, इरट्टै मणिमालै व मुत्त-तिरुपाटिगळ् या तिच्या प्रसिद्ध रचना होत.

कारैक्कल अम्मयारचा विवाह झालेला होता. पण तिच्यातल्या दैवी शक्तीबद्दल माहिती झाल्यावर तिच्या पतीने तिचा त्याग केला. त्यामुळे दुःखी होऊन भक्तिपदे रचत गात ती गावोगाव फिरू लागली. तिची पदे आजही मोठ्या श्रद्धेने गायिली जातात. कारैक्कलमधे तिचे एक मन्दिरही आहे.



डेन्सबोर्ग प्रासाद

कारैक्कलहून रवाना झाल्यावर आपण लंगर टाकतो, तो तरंगबाडी किंवा ट्रँकिबार येथे. हे शहर एके काळी डेन्मार्कच्या ताब्यात होते. सन १६२० ते १८४० पर्यंत संपूर्ण आशियात डचांचे शासन फक्त इथेच होते. शहराचा मुख्य भाग त्यांनी बनवल्याप्रमाणे अजून तसाच आहे. त्यात प्रेक्षणीय आहेत डेन्सबोर्ग प्रासाद व किल्ला, शहराचे २०० वर्षांपूर्वीचे प्रवेशद्वार व येथील व्हाईसरॉय जोहान्स रेहलिंगचे (१८२३-१८४१) घर 'रेहलिंग्स यार्ड'. ही सर्व तरंगबाडीच्या इतिहासाची स्मृतिचिन्हे आहेत. युरोपियन मिशनऱ्यांनी सर्वप्रथम जेथे जेथे छापखाने अुघडले त्या स्थानांपैकी तरंगबाडी किंवा ट्रँकिबार हे एक होय.

तरंगबाडीच्या अुत्तरेला कावेरीच्या मुखावर पूम्पुहार आहे. हे एके काळी फार समृद्ध असे बंदर होते. याच्या भव्यतेचे वर्णन संघम् काळच्या तमिळ महाकाव्यात आढळते. चोल राजांच्या काळात येथून समुद्रव्यापार मियानमार (ब्रमा), श्रीलंका, मलेशिया, इंडोनेशिया व थेट चीनपर्यंत चाले.

तमिळ महाकाव्य मणिमेखलैमधे एक अशी गोष्ट आहे.-पूम्पुहारमधे दरवर्षी इन्द्रपूजा अुत्सव साजरा होई. एका वर्षी नागरिकांनी हा अुत्सव केला नाही. समुद्रदेवी मणिमेखलै यामुळे नाराज झाली आणि तिने समुद्रात जबरदस्त वादळ अुत्पन्न केले. या वादळाने पूम्पुहार शहर व बंदराचा घास घेतला !

पुरातत्ववेत्त्यांनी सन १९६२ मधे कावेरीपट्टिनम्जवळ किलैयुरच्या आसपास केलेल्या खोदकामातून या गोष्टीला पुष्टि मिळते की पूम्पुहार खरोखरीच समुद्राने गिळले होते. नंतर समुद्रतटावर शोधाशोध केल्यावर





पूम्पुहार कलादालन

पाण्याच्या आत दोन बौद्ध स्तूपांचे अवशेष सापडले. वस्तुतः 'मणिमेखलै' महाकाव्य बौद्ध धर्माच्या प्रसारासाठीच लिहिले गेले होते.

पूम्पुहारवरून आपण नटराजाच्या नगरीत - चिदम्बरम्मधे-पोचतो. नटराज हे भगवान शिवाचेच नाव. त्याचे मन्दिर शहराच्या मधोमध स्थित आहे.

कथा अशी आहे की-एकदा 'आपणा दोघात नृत्यात जास्त प्रवीण कोण' असा शिवपार्वती यांच्यामधे वाद झाला. स्वर्गीय देवदेवतांसमक्ष नृत्यस्पर्धा झाली. जोडी अगदी तोडीस तोड होती-कोणी कमीजास्त नव्हतेच ! जे शिव करून दाखवेल ते पार्वतीही तितक्याच दक्षतेने करून दाखवीत होती, आणि जे पार्वती करेल ते शिवही अगदी हुबेहूब ! शेवटी शिवाने एक मुद्रा करून दाखवली. एका पायावर अुभे राहून आपला दुसरा पाय त्यांनी खांद्यांपर्यन्त वर अुचलला. स्त्रीसुलभ संकोच व शिष्टाचाराच्या बंधनामुळे तसे करून दाखवायला तयार न होता पार्वतीने पराजय कबूल केला.

मंदिराच्या आयताकार गाभाऱ्यात असलेली शिवमूर्ती याच मुद्रेत अुभी आहे. ती पंचधातूची म्हणजे काशाची बनवलेली आहे. गाभाऱ्यात तांबे आणि सोन्याचे पत्रे जडवलेले आहेत.



नटराज शिव

आता आपला पुढला मुक्काम म्हणजे पांडीचेरी. याचे खरे नाव आहे पुदुचेरी. ही केन्द्रशासित पांडिचेरी प्रान्ताची राजधानी आहे. मोठा जुना व रंगित इतिहास आहे या शहराचा. तुमच्या वाचनात असेलच की आपण इंग्रजांचे गुलाम असताना पांडीचेरीवर फ्रेंचांची हुकूमत होती. खरे तर पश्चिमेकडील देशांशी पांडीचेरीचा संबंध पहिल्या शतकापासूनच आहे. तेंव्हा इथे रोमनांचे व्यापारी केन्द्र होते. काही शतकांनंतर पोर्तुगीज, फ्रेंच व डचांनी इथे आपल्या व्यापारी वखारी सुरू केल्या. सन १८१४ मधे फ्रेंचांनी इथला कब्जा

घेतला-तो भारत स्वतन्त्र झाल्यानंतरही १९५४ पर्यंत चालू राहिला.

आपल्या स्वातंत्र्ययुद्धाच्या काळात वेळोवेळी बऱ्याच देशभक्तांनी पांडीचेरीत आश्रय घेतला. महान् तमिळ कवी सुब्रह्मण्य भारती यांनी इथे राहून अनेक देशभक्तिपर कविता रचल्या आणि स्वातन्त्र्यासाठी काम केले. कण्णन् पाट्टु, कुइल पाट्टु, पांचाली शपथम् सारख्या काव्यांनी तमिळ साहित्यात नवे युग स्थापले. त्यांनी रचलेली भावपूर्ण गीते आजही तमिळभाषी मोठ्या प्रेमाने गातात. भारती कवि रहात असलेले ईश्वरन् कोविल स्ट्रीटवरचे १० नंबरचे घर आता राष्ट्रीय स्मारक बनले आहे.



योगी श्री अरविन्द

या फ्रेंच वसाहतीत आश्रय घेणारे एक महान् देशभक्त होते श्री अरविन्द. सन १९१० मधे ते कलकत्त्याहून पांडीचेरीला आले व १९५० मधे आपल्या मृत्युपर्यन्त येथेच आध्यात्मिक साधना व लेखन कार्य करत राहिले. लाईफ डिव्हाइन, सावित्री, गीता, उपनिषदे व वेदांची व्याख्या या त्यांच्या प्रमुख रचना होत.

अरविन्द आश्रम हा आध्यात्मिक साधनेचे मोठे केन्द्र होय. श्रीअरविन्दांची फ्रेंच शिष्या व साधनेत त्यांची सहयोगी असणाऱ्या मीरा अल्फांसा १९२० मधे पांडीचेरीला आल्या व आश्रमाचे संचालन व साधकांना मार्गदर्शन करू लागल्या त्यांना 'मदर' (श्रीमां) असे म्हणत असत. १९७३ मधे त्यांचे देहावसान झाले.

श्री अरविन्दांनी असे म्हटले होते की, ''जगात अशी एक जागा असावी, की जिला कोणी आपली मिळकत म्हणू शकू नये व जिथे सर्व सद्भावनाशील व सदाकांक्षी माणसे परम सत्यरूपी एकाच अधिकाराच्या बळावर विश्वनागरीकाच्या रूपात स्वातन्त्र्यपूर्वक जगू शकतील.'' त्यांच्या या स्वप्नाच्या पूर्तीसाठी १९६८ मधे पांडीचेरीपासून ८ कि.मी. अंतरावर 'ऑरोविल' ची स्थापना झाली. या नावाचा अर्थ आहे-उषानगरी.



ऑरोविलमधील मातृमन्दिर







# घाण्याचा बैल

चपलपुरचा चरण आपल्या नातेवाइकांवर फार प्रेम करी, त्यांना मान देई. त्याची बायको अरुणाही घरी पाहुण्यांचा मनापासून आदरसत्कार करी. त्यांचे नातेवाईकही यामुळे या दोघांची खूप स्तुती करत.

बन्धुभाव दाखवण्यातच नव्हे, तर चरण इतरांशी बोलण्यातही पटु होता. 'त्याच्याशी बोलताना वेळ कसा पट्कन निघून जातो, हेच कळत नाही' असे लोकांना वाटे.

उमापती उग्रनगरचा रहिवासी होता. खूप पैसेवाला असूनही आपलं गाव सोडून तो कधीच कुठे जात नसे. त्याचा असा दावाही होता की, आपल्या आईशिवाय कोणी अन्य महान व्यक्ती अन् उग्रनगरपेक्षा दुसरे चांगले गाव जगात असूच शकत नाही. खूप वर्षे त्याला कोणी मुलगी पसन्तच न पडल्याने त्याचे लग्नही फार उशीरा झाले. त्याची बायको करुणा सुंदर, चटपटीत, हुशार आणि स्वभावाने फार चांगली होती.

विवाहानंतर महिनाभरातच करुणा आपल्या नवऱ्याबद्दल सर्वकाही जाणून चुकली. 'हां, त्याला काही विषयांचं ज्ञान आहे अन् तो त्याचं प्रदर्शनही पुनःपुन्हा करत असतो; नवा कोणताही विषय जाणायची त्याला जिज्ञासा नाही. फक्त स्वतःला मोठा समजून आपलीच तारीफ करतो, इतर कोणाला तो मोजतच नाही' आदि सर्व तिने ओळखले.

करुणाला असे वाटले की, आपला नवरा गाव सोडून कुठे जरा बाहेर गेला, तरच त्याचे जगाबद्दलचे ज्ञान वाढेल. चरण हा तिचा दूरचा नातेवाईक. नात्याने तो तिचा भाऊ लागत असे. आपल्या नवऱ्याबरोबर आपण त्याच्याकडे जावे, असे तिने ठरवले. तोच उमापतीला सुधारू शकेल अशी तिची धारणा होती. एक दिवस तिने दोघांनी मिळून

मारुती व्यास



चरणकडे जावे असे अुमापतीला सुचवले. पण त्याने नकार दिला.

''चपलपूर या अुग्रनगरपेक्षा हजारपट चांगलं अन् सुन्दर गाव आहे. माझा चुलतभाअू चरण तिथे रहातो. जगाबद्दल त्याला जितकी माहिती आहे, तितकी दुसऱ्या कुणालाच नाही - असं लोक म्हणतात. आपण तिथे गेलो की, तुम्हा दोघांमधे कोण मोठा हे आपोआप कळेल.'' असे म्हणून तिने त्याला डिवचले.

अुमापती यामुळे काहीसा रागावला व दुसऱ्याच दिवशी करुणाबरोबर चपलपूरला जायला निघाला.

चरण आणि अरुणाने या दांपत्याचे मोठ्या प्रेमाने स्वागत केले. पाहुण्यांसाठी अरुणाने खास खीर बनवली. करुणाने खिरीची खूप तारीफ केली.

पण अुमापतीने मात्र त्यातून दोष काढत म्हटले, ''खिरीसाठी म्हशीच्या दाट दुधाची गरज असते. त्यात अुग्रनगरमधे मिळणारे काजू घालावे लागतात. माझी आई खीर काय सुंदर बनवते! ज्यानं ती चाखली असेल, त्याला दुसरी कोणती खीर ही खीरच नाही वाटणार!'' त्याच्या या बोलण्याने अरुणाला वाईट वाटले. पण चरणने विषय बदलत म्हटले, ''हांऽ! दाजींची आपण अुग्रनगरला जावं अशी इच्छा दिसतेय. तिथे आपण गेलो की फक्त खीरच काय, पण त्यांच्या आईच्या हातचे इतर स्वादिष्ट पदार्थही मिळणार आपल्याला!''

त्या रात्री चरणने खूप छान मऊ अंथरुण पाहुण्यांसाठी तयार केले. अुमापती त्याची तारीफ न करता अुलट म्हणाला, ''हुंः अुन्हाळ्याच्या दिवसात असल्या बिछान्यात काय सुखाची झोप मिळणार? आमच्या गावात एक नव्या प्रकारचा कापूस मिळतो, त्यामुळे शरीराला गारवा मिळतो.'' असल्या बोलण्याने चरणच्या मनालाही वेदना झाल्याचे करुणाने हेरले. त्याला बाजूला बोलावून ती म्हणाली, ''तू तर इतरांच्या चुकांचीही स्तुती करतोस, पण माझा नवरा इतरांचा फक्त अपमानच करायचं जाणतो. तसा माणूस चांगला आहे, पण काय करू? त्यांचा हा दुर्गुण घालवण्यासाठीच इथे घेअून आलेय मी त्यांना! तूच कर काहीतरी अुपाय बाबा!''

''बरं झालं, आत्ताच सर्व सांगितलंस तू मला! आता पहा, मी काय चमत्कार घडवतो ते!'' चरणने आश्वासन दिले.



दुसऱ्या दिवशी सकाळी चरण आपल्या गावातल्या मुकुन्दबद्दल अुमापतीला सांगत होता - ''मुकुन्दनं आपल्या मुलीचं लग्न केलं, तेंव्हा त्याला मी पाचशे रुपये देअून मदत केली. त्याचं घर पडलं तेंव्हा वासे वगैरे देअून घर पुन्हा अुभं करायला मीच मदत केली. मुकुन्दनं जेंव्हाजेंव्हा कसली मदत मागितली तेंव्हातेंव्हा मी त्याला सर्व प्रकारे मदत केली. त्याबद्दल कधी बरं बोलणं दूरच; पण तो अुलट माझ्याबद्दल अपप्रचारच करत असतो.''

दोघे मुकुन्दच्या घरी गेले. चरणची दखल न घेता मुकुन्द फक्त अुमापतीशीच बोलत राहिला. चरणने मोठ्या नम्रपणे त्याच्याशी बोलायचा प्रयत्न केला, पण त्यालाच अुलट फटकारत मुकुन्द म्हणाला, ''अुद्या मी एक बैलजोडी घ्यायला जाणार आहे. पन्नास रुपये कमी पडतायत मला. अुगीच बहाणे नाही करायचे; तेवढी रक्कम तयार ठेवा. अुद्या घेअून जाईन.''

तेथून बाहेर पडल्यावर चरणने अुमापतीला विचारले, ''तुम्हीच सांगा, मी या कृतघ्नाशी कशी वर्तणुक करावी?''

जरा विचार करून अुमापती अुत्तरला, ''मुकुन्दला पाहून मला माझ्या गावच्या गोविन्दचीच आठवण झाली. मी मुकुन्द आणि तुमच्यात झालेलं बोलणं ऐकलं नाही, गोविन्दचाच विचार करत राहिलो मी. तुमच्यासारख्यांनी गोविन्दबद्दल माझ्याकडे तक्रारी केल्या. पण मला तर गोविन्दमधे कसलाच दोष आढळला नाही. तो माझ्याशी चांगला वागतो. मला असं वाटतंय की, तुम्हालाच लोकांशी कसं वागावं, हे कळत



नाही. लोकांशी कसं वागावं हे मला आपल्या आईनंच शिकवलं. सर्वजण चांगलं वागतात माझ्याशी! माझं कुणाशीच भांडण नाहीय.''

चांगला अुपाय सांगितल्याबद्दल चरणने अुमापतीचे आभार मानले. ''मी अुपाय सांगितला? काय सांगितलं मी?'' अुमापतीने आश्चर्याने विचारले. ''दुसऱ्यांशी तुम्ही जसं वागता, तसंच मी मुकुन्दशी वागावं, म्हणजे कसलीच अडचण अुद्भवणार नाही. असाच होता नं तुम्ही सांगितलेला अुपाय?'' चरणने प्रतिप्रश्न केला.

जरा संकोचून अुमापती म्हणाला, ''हो, हो! बरोबर बोललात तुम्ही!''

नन्तर अुमापतीला आपल्या गावच्या आंब्याच्या बागा दाखवत चरण सांगू लागला, ''इथे गुरांच्या शेणापासून खत बनवतात.

यामुळे इथल्या आंब्यांची चव वर्णनातीत छान असते.'' पण ''असं म्हणतात, की शेणखतामुळे शरीरावर फोड येतात; म्हणून आमच्या गावात कृत्रीम खतंच वापरतात. चवही चांगली असते अन् तब्येतही छान रहाते त्यामुळे.'' असे बोलून अुमापतीने त्याचे बोलणे खोडून काढले.

गावात जे जे विशेष होते, ते सर्व चरणने अुमापतीला दाखवले. पण अुमापतीने कोणतेही स्थान नीटपणे पाहिले नाही. करुणाने सर्व ठिकाणांची स्तुती केली; पण अुमापती मात्र पुन:पुन्हा आपल्याच गावच्या ठिकाणांबद्दल बोलत राहिला.

एक आठवडा लोटल्यावर अुमापती बायकोसह अुग्रनगरला परतला. निघण्यापूर्वी केलेल्या पाहुणचाराबद्दल चरण व अरुणाजवळ करुणाने आपली कृतज्ञता व्यक्त केली. ती म्हणाली, ''तुमचं आतिथ्य खरोखरच फार अुत्तम वाटलं. तुमचं गाव फारच छान आहे. इथे येअून धन्य वाटलं मला!''

तेंव्हा जरा दूर अुभ्या असलेल्या अुमापतीकडे पहात चरण म्हणाला, ''पोचल्यावर आपल्या नवऱ्यालाही सांग हे सगळं. पुन्हा एकदा ये इथे. येताना नवऱ्याला पण घेअून ये हं! विसरू नकोस.''

चकित होअून करुणाने विचारले, ''अरे असं काय बोलतोस ? तेही आलेयत की माझ्या बरोबर?''

जोरजोरात हसत चरण म्हणाला, ''खरं? तोही आलाय तुझ्याबरोबर? मला तर क्षणभरही असं वाटलं नाही, की तो अुग्रनगरची सीमा ओलांडून बाहेर आलाय.''

हे बोलणे ऐकून अुमापती एकदम चमकलाच! त्याच्या आता ही सत्य गोष्ट लक्षात आली की, एकसारखी आपण अुग्रनगरची आठवण काढत राहिल्यामुळे चपलपुरला येअूनही आपण इथे काही पाहिलेच नाही; कसली माहितीही करून घेतली नाही. इथे येअूनही न आल्यासारखेच आहोत आपण!

यानन्तर अुमापती कधी कुठे जाई, तेंव्हा आपल्या गावाबद्दल फार कमी बोले आणि दुसऱ्यांकडले नवे जाणण्याची, शिकण्याची अुत्सुकता दाखवी. त्याने स्वत:ला तशी सवयच लावून घेतली. नवऱ्यात झालेला हा बदल पाहून करुणा फार खूश झाली व मनोमन चरणचे आभार मानत राहिली.





चान्दोबा

# सोनेरी क्षण - १०



१. बर्फाने झाकलेला हा ज्वालामुखी? त्या देशाची प्रजा याला पवित्र मानते. त्याची अुंची आहे ३,७७५ मीटर जास्तीत जास्त फोटो काढण्यात आलेला हा जगातला एकच पर्वत आहे.

## जगात हे कोठे आढळेल?



२.... श्वे डगोन?

- या स्तूपाला गोल्डन पॅगोडा असे म्हणतात. हे चमकते बौद्ध मन्दिर सोन्याच्या ८,८६८ पातळ पत्र्यांनी मढवलेले आहे.

३. ...बिग बेन?

ही जगातली सुप्रसिद्ध घंटा आहे. ज्या माणसाने ही लटकवण्याच्या कामावर देखरेख केली त्याचे नाव या घंटेला मिळाले आहे. काहीजण असेही म्हणतात की एका सुप्रसिद्ध बॉक्सरचे नाव दिले गेले आहे.



४. .... खूप दाट केसांच्या लांब शेपटीचा सस्तन प्राणी लेमूर? -काही लेमूर माकडा सारखे दिसतात; तर काही छोटे लेमूर अुंदरा सारखे वा खारीसारखे दिसतात.



५. ... मानवद्वारा निर्मित सर्वात मोठा व खोल खड्डा? १८७१ मधे येथे हिरे आढळले व नंतर १९१५ पर्यन्त हिऱ्याच्या खाण-मजुरांनी यातून जवळ जवळ २३ मिलियन टन चिखल आणि दगड, व २.७ टन हिरे खणून काढले. यामुळे हा मोठा खड्डा निर्माण झाला.



**गोष्टीचे कोडे**

*काही कुशाग्र बुद्धीचे गुप्तहेरही कधीकधी चुका करतात. शेरलॉक होम्सने इथे काय चूक केलीय, सांगू शकाल?*

# मिस्टर होम्स, तुम्ही चूक केलीय!

ख्रिसमसच्या दुसऱ्याच दिवशी सकाळी मी आपला मित्र शेरलॉक होम्स याला भेटायला गेलो. वेंगणी रंगाचे कपडे घालून सोफ्यावर बसून तोंडात पाईप धरून वर्तमानपत्र चाळत होता तो. जवळच एक लाकडी खुर्ची असून तिला एक जुनी, मळकी, कडक अशी फेल्ट हॅट लटकत होती. जवळ एक दुर्बिण व अन्य काही वस्तूही होत्या. मी ओळखले की टोपीचे निरीक्षण करण्यासाठीच त्याने ती तिथे लटकावली होती.

''तुझ्या कामात काही अडचण तर नाही ना आली माझ्या येण्यामुळे?'' असे विचारतच मी खोलीत प्रवेश केला.

''मुळीच नाही, उलट माझ्या निरीक्षणाचे निकाल तपासण्यात मदत करायला मित्र अगदी वेळेवर आलाय. तशी गोष्ट अगदीच मामुली आहे, पण यात काही गंमतीच्या गोष्टीही आहेत.'' होम्स म्हणाला.

'असं?'

'तुला कमिशनर पीटर्स माहीत आहेत ना?''

''हो तर!''

''ही त्यांच्याशीच संबंधित आहे.''

''काय? ते ही हॅट वापरतात?''

''अहं! पण त्यांनी शोधून काढलीय ही! याचा मालक कोण हे नाही माहीत.

''तो कोण असावा, यासंबंधी काही सूचना?''

''नाही, ती शोधून काढायला हवी.''

''या हॅटच्या मदतीने?''

''होय''

''या जुन्या हॅटमधून काय कळणार आहे?''

हॅट हातात घेऊन जरा फिरवून पहात तो म्हणू लागला, ''एक नक्की, की ही हॅट वापरणारा माणूस चांगला बुद्धिमान आहे.''

''होम्स चेष्टा करतोस काय माझी? मी काय इतका बेअक्कल आहे? तुला काय म्हणायचंय हे कळत नाहीय मला! हॅट वापरणारा मोठा बुद्धिमान असला पाहिजे, हे कसं ठरवलंस तू?'' मी विचारले.

त्या प्रश्नाच्या उत्तरादाखल होम्सने हॅट आपल्या डोक्यावर ठेवली. डोक्यावरून घसरून ती त्याच्या नाकावर येऊन थांबली.

''असल्या बुद्धिवन्ताच्या मेन्दूत काही न काही नक्की असेलच की.'' तो म्हणाला.

(कॅनन डायल रचित 'द ब्लू कार्बुंकल' मधून)





**चित्र कोडे**

विदेशी लोक आपल्या तटावर उतरत असल्याचे एक रेड इंडियन पहात आहे. या चित्रात एक मोठी चूक आहे. कोणती?

## विदेशी आपल्या तटावर आले तेंव्हा





**कूट प्रश्न**

१. खालील चित्र (अ) पॅरट माशाचे (आ) व्हिसलर माशाचे की (इ) आर्चर माशाचे

२. हा तरुण पाण्यावर झोपून पुस्तक वाचतोय. जगात सर्वात अधिक क्षार असणाऱ्या पाण्याच्या तलावावर झोपला आहे तो. तलावाचे नाव (अ) कॅस्पियन समुद्र (आ) मृत समुद्र, की (इ) टॅरेन्स तलाव?





३. हा नकाशा कोणत्या देशाचा?
अ) स्पेन आ) फ्रान्स की इ) पोर्तुगाल?





# चित्र काढायला शिका



## सोनेरी क्षण ९ वी उत्तरे

### जगात कुठे .......

१. काला अस्वले ऑस्ट्रेलियात आढळतात.
२. मत्स्यकन्येचा पुतळा कोपनहेगन बंदराच्या प्रवेशस्थानी आहे.
३. मॅडम टुस्वाइसचे मेणाच्या पुतळ्यांचे संग्रहालय लंडनमधे आहे.
४. सुवर्ण द्वाराचा पुल ओलांडायचा असेल तर अमेरिकेतील सानफ्रान्सिस्कोला जायला हवे.

### प्रश्नावलीची उत्तरे

१. तिघांना सारख्या सारख्या रोट्या मिळायच्या म्हणजे प्रत्येक रोटीचे तीन सारखे तुकडे करायला हवेत. एकूण ८ रोट्यांचे २४ तुकडे झाले व प्रत्येकाने ८ तुकडे खाल्ले. पाच रोट्या असलेल्याने त्याच्या १५ तुकड्यांपैकी ८ खाऊन बाकीचे ७ तिसऱ्या प्रवाशाला दिले अन् तीन रोट्या असणाराने आपल्या नऊ तुकड्यांपैकी स्वतः ८ खाऊन १ च तिसऱ्याला दिला. अर्थात् ८ नाण्यांपैकी पहिल्याला ७ व दुसऱ्याल १ च मिळणे न्याय्य होईल.
२. तेंव्हा पाऊसच पडत नव्हता ना!
३. सर्वजण करतात तेच-म्हणजे फेकून देतात.
४. ५ ठिकाणी.
५. पांढऱ्या रुमालाचे मोकळे टोक लाल रुमालाच्या मोकळ्या टोकाला बांधा.
६. चाबुक त्याचे टोक शब्दाच्या आवाजाच्या गतीपेक्षा जास्त गतीने चालते.
७. ग्लास पाण्याने नव्हे, तर दुसऱ्या कसल्याशा द्रवाने भरलेला आहे.
८. आठ दिवस शिल्लक असताना पाचव्या दिवशी पाणी सांडले पण कसलीही अडचण आली नाही. याचा अर्थ असा की मृत व्यक्तीच्या नावचे बाकीच्या आठ दिवसांचे एकुण आठ लिटर पाणी त्या दिवशी सांडले.
९. बलवन्त शर्माने आपला डावा हात अुचलून दाखवला. त्याने नुकसान भरपाई अुजव्या हातासाठी मागितलीय.





# महाभारत

पांडवांचा वृत्तान्त ऐकून धृतराष्ट्राला आपल्या अकर्मण्यतेबद्दल पश्चात्ताप होत असल्याचे आणि कौरवांच्या भविष्याबद्दल भीती वाटू लागत असल्याचे शकुनीने ओळखले. त्याने याबद्दल कर्णाला सांगितले व दोघे मिळून दुर्योधनाकडे धृतराष्ट्राच्या मनःस्थितीबद्दल बोलायला गेले. सगळी हकिकत ऐकून दुर्योधन चिंताग्रस्त झाला.

कर्ण दुर्योधनाला म्हणाला, ''तुझ्या हुशारीमुळे वनात कष्ट झेलणाऱ्या पांडवांनाच चिन्ता वाटायला हवी. तू तर त्यांचं राज्यही हिसकावून घेतलंयस अन् इथे समस्त सुखं भोगत आहेस. तुला कसली चिन्ता? पांडव सध्या द्वैतवनात आहेत असं ऐकतोय. ही एक अुत्तम संधी आहे. तू त्यांच्यासमोर आपल्या वैभवाचं प्रदर्शन केलंस, तर ते ईर्ष्येनं जळू लागतील बघ. आपल्या कमजोरीबद्दल रडतील ते. तुझ्या अंतःपुरातल्या राण्यांचं ऐश्वर्य पाहून द्रौपदी मनातल्या मनात आपल्या दुर्भाग्याबद्दल कष्टी होईल.''

शकुनीनेही कर्णाला दुजोरा दिला. कर्णाचे सांगणे ताबडतोब अमलात आणावे असे त्याने सुचवले. दोघांचे बोलणे लक्षपूर्वक ऐकून दुर्योधन म्हणाला, ''तुम्हा दोघांचं सांगणं पटलं मला. द्वैतवनात जाऊन पांडवांचे हाल प्रत्यक्ष पहावे अन् त्याचबरोबर आपल्या वैभवाचं प्रदर्शन करता यावं यासाठी तुम्हीच काही युक्ती शोधून काढा. दुःशासनाजवळही याबद्दल बोलणी करून अुद्या सकाळपर्यन्त मला निर्णय कळवा. भीष्म पितामहांचीही संमती मिळाली, तरच आपला तिथे जायचा बेत शेवटाला नेता येईल. तेंव्हा असा काही मार्ग शोधा की ते दोघं त्यात काही विघ्न आणू शकणार नाहीत.''

दुसऱ्या दिवशी शकुनी व दुःशासनाच्या अुपस्थितीत कर्ण दुर्योधनाला बोलला,



''आपल्या गायींची खिल्लारं द्वैतवनात आहेत. त्यांच्या रक्षणाची जबाबदारी तुझ्या शिरावर आहे. ते कर्तव्य पार पाडण्यासाठी आपल्याला द्वैतवनात जायला हवं असं म्हणलास तर धृतराष्ट्र महाराजांची परवानगी नक्की मिळेल. मग आपण मोठ्या थाटामाटाने द्वैतवनात जाऊन पांडवांना आश्चर्यात टाकू.''

कर्णाच्या बुद्धीची तारीफ करत सर्वांनी टाळ्या वाजवल्या. त्यांनी समंग नावाच्या आपल्या पशुपालकाला बोलावून म्हटले, ''तू आमच्याबरोबर येऊन महाराजांना आपली खिल्लारं द्वैतवनात असल्याचं अन् त्यांच्याकडे एकदा पहाणं आवश्यक असल्याचं सांग.''

त्या चांडाळचौकडीसह धृतराष्ट्राकडे जाऊन समंग बोलू लागला, ''महाराज, आपली खिल्लारं सध्या द्वैतवनात आहेत. तिथेच त्यांना खाण्यासारखे उत्तम गवत भरपूर आहे. तशी ती सुरक्षित आहेत, पण क्रूर श्वापदांचं भय तर नेहमी असतंच ना? त्यांच्या रक्षणाची नीट व्यवस्था करणं जरुरीचं आहे. हे सांगण्यासाठीच मी आपणाकडे आलोय.''

तेंव्हा कर्ण व शकुनी धृतराष्ट्राला म्हणाले, ''दुर्योधन स्वतःच जाऊन रक्षणाचं काम करील, तर छानच होईल. तिथे जाऊन त्याला रानटी जनावरांची शिकारही येईल ना करता! एका दगडात दोन पक्षी ! आपल्या गाईंच्या खाण्या-पिण्यात काही सुधारणा ही करता येईल त्याला!''

''आपल्या जनावरांच्या रक्षणासाठी जायचा तुमचा प्रस्ताव योग्यच आहे. पण द्वैतवनात जाणं मला प्रशस्त वाटत नाही. हारलेले पांडव सध्या तिथे रहात आहेत. तुम्ही तिथे गेलात तर नक्कीच काही बखेडा उभा कराल. कदाचित तुमची काही चूक होणारही नाही, पण तुमच्यावर उगीच टीकेची चिखलफेक होईल अन् आपली अपकीर्ती! इतर पांडवांना भ्यायचं कारण नाही, पण भीम सूड घ्यायची संधी पहात असेल. द्रौपदीही अशाच संधीच्या शोधात आहे. तुम्ही मुलंही उतावळ्या स्वभावाची आहात. कसल्या ना कसल्या वादात अडकायची हौसच आहे तुम्हाला. तुमच्यात जर भांडण उद्भवलं, तर नुकसान तुमचंच होणार आहे. नुकताच अर्जुन स्वर्गलोकातून दिव्यास्त्रं घेऊन आलेला आहे. तुम्ही कोणीच त्याच्या बरोबरचे नव्हेत. तेंव्हा, माझा सल्ला असा की, गुरांच्या रक्षणासाठी तुम्ही स्वतः तिथे न जाता दुसऱ्या कुणाला पाठवा.'' धृतराष्ट्र सद्हेतूने म्हणाला.

पण शकुनी म्हणाला, ''आम्ही तुम्हाला खात्री देतो की, आम्ही तिथे कसलाही त्रास देणार नाही. पांडव रहात असल्या ठिकाणी आम्ही जाणारच नाही. थोडे दिवस वनविहार करून, जनावरांच्या रक्षणाची व्यवस्था करून परत फिरू आम्ही! पांडवही धर्मराजानं घातलेली मर्यादा ओलांडत नाहीत. आमच्याशी भांडायला येणार नाहीत ते. धर्मराज खऱ्या अर्थानं धर्ममूर्ती आहे हे तुम्हाला माहीत आहेच.''

त्यांच्या बोलण्यावर विश्वास ठेवून धृतराष्ट्र बोलला, ''ठीक आहे. जा तर मग.'' दुर्योधनाला अतिशय आनन्द झाला. कर्ण, शकुनी, दुःशासन, कित्येक नागरीक व त्यांची कुटुंबे बरोबर घेऊन तो घोष-यात्रेला निघाला. हजारो रथ, घोडे, हत्ती, सैन्य, शिकारी, भाट इत्यादी सर्वजण त्यांच्याबरोबर निघाले. गाड्यांमधे सर्व आवश्यक सामग्री लादण्यात आली.

काही दिवसातच सर्वजण द्वैतवनात पोचले. शिबिरांची व्यवस्था झाली. त्यांनी आपल्या गुरांचे निरीक्षण केले. गायी, बैल व वळू निरनिराळे केले आणि त्यांच्या पुठ्ठ्यांवर चिन्हें अंकित केली, गुराख्यांना योग्य सूचना दिल्या, त्यांना भेटवस्तु देऊन त्यांनी आयोजित केलेल्या मनोरंजन कार्यक्रमात भागही घेतला. गरजेनुसार दूध, दही, लोणी इ. शिबिरात आणवले गेले. शिकारी लोक शिकार करून मांस घेऊन आले. दुर्योधन आपल्या राण्या, पुत्र व मित्रगणांसह वनविहार करू लागला. निसर्ग सौन्दर्य पाहून तो फारच खूश झाला.



द्वैतवनाच्या मधोमध असलेल्या सरोवराजवळ येऊन तिथेच रहाण्याचा त्याने निश्चय केला.

त्या सरोवराच्या दुसऱ्या किनाऱ्यावर धर्मराजाचा आश्रम होता. दुर्योधन तेथे पोचला, तेंव्हा धर्मराज सद्यस्क नावाचा यज्ञ करण्यासाठी आवश्यक ती तयारी करत होता.

दुर्योधनाच्या आज्ञेने त्याचे सेवक सरोवराकिनारी झोपड्या उभ्या करायच्या कामाला लागले. त्यावेळी सरोवराच्या रक्षक गंधर्वांनी त्यांना थांबवत म्हटले, ''आमच्या प्रभुंची अशी आज्ञा आहे की, त्यांच्या परवानगीवाचून कोणालाही इथे राहू देऊ नये. तुम्ही कुठे दुसरीकडे जाऊन रहायची व्यवस्था करा.''

सेवकांनी हे दुर्योधनाला सांगताच तो चिडून



उठला. त्याने मोठ्या गर्वाने, गंधर्वांनाच तेथून हुसकून लावायची आज्ञा दिली. त्यांनी गंधर्वांकडे जाऊन सांगितले, "महाराज दुर्योधन इथे विहारासाठी आलेले आहेत. तेव्हा तुम्ही लोकांनीच इथून निघून जावे. न पेक्षा तुम्हाला आपले प्राण गमवावे लागतील!"

त्यांच्या उद्धटपणाला हसून गंधर्व म्हणाले, "तुम्ही कोणाला घाबरवू पहाताय? आम्हाला तुमची किंवा तुमच्या महाराजांची जराही पर्वा नाहीय. आमचे महाराज आहेत गंधर्वराज चित्रसेन! मुकाट्यानं जागा खाली करून दुसऱ्या किनाऱ्यावर, किंवा धर्मराजाच्या आश्रमाच्या बाजूला तंबू गाडा तुमचे. हे आमच्या महाराजांचे विहारस्थल आहे. इथे आमच्या आज्ञेशिवाय कुणीच काही करू शकणार नाही."

ही हकिकत ऐकून दुर्योधनाचा पारा अधिकच चढला. तो गर्वाने म्हणाला, "मला आज्ञा देणारे हे गन्धर्व असे कोण मोठे लागून गेलेत? आम्ही कौरव किती बलवान आहोत, हे त्यांना माहीत नाहीयसं दिसतंय? त्यांना जाऊन सांगा की, आमची आज्ञा अंमलात न आली तर त्यांचा मृत्यु निश्चित आहे." अन् त्याने लगेच आपले सैन्य लढायला पाठवले.

चित्रसेनची परवानगी घेऊन गन्धर्वांनी दुर्योधनाचे सैन्य पार धुळीस मिळवले. कर्ण दूर उभा राहून हा सारा प्रकार पहात होता. आता दुर्योधनाची मर्जी संपादण्यासाठी तोही गंधर्वांवर तुटून पडला अन् काही गंधर्वांना त्याने ठारही केले. परन्तु इतक्यात हजारोंच्या संख्येने आणखी गन्धर्व तेथे आले व त्यांनी कर्णाला घेरले. त्याला वेढलेले पाहून त्याच्या मदतीसाठी कौरव राजकुमारही रणक्षेत्रात उतरले. लहानशा भांडणाचे पर्यवसान लढाईत झालेले पाहून स्वतः चित्रसेनही रणक्षेत्रात येऊन पोचला.

चित्रसेनने मायायुद्ध सुरू करताच कौरवसैनिक पळून गेले. दुर्योधनाचे भाऊ त्यांना थांबवायच्या प्रयत्नाला लागले. केवळ कर्णच काय तो निर्भयपणे लढत राहिला. परन्तु गंधर्वांनी त्याच्या रथाचे तुकडे तुकडे करून टाकले. कर्ण निरथ होऊन विकर्णच्या रथातून पळून गेला. दुर्योधन गंधर्वांच्या हाती सापडून कैद झाला. पण चित्रसेनने त्यांना न मारता दोरांनी बांधून टाकले. इतर गन्धर्वांनी दुर्योधनाचे भाऊ व त्यांच्या बायकांनाही पकडून जेरबन्द केले.

सर्वांना कैद करून गन्धर्व त्यांना घेऊन





जात असता काही कौरव सेनाप्रमुख धावत धर्मराजाकडे गेले व त्यांनी सांगितले, "महात्मा, कौरव-राजकुमार न् त्यांच्या पत्नींना कैद करून सारे गंधर्व त्यांना गंधमादन पर्वताकडे नेत आहेत. आपणच आता त्यांचे रक्षण करू शकता."

त्यांचे बोलणे ऐकून हर्षित झालेला भीम म्हणाला, "गन्धर्वांनी चांगलंच केलंय. जे व्हायला हवं होतं, तेच घडलंय नेमकं! आपल्या शक्तीचा गर्व मिरवणाऱ्या कर्णाला छान धडा शिकवलाय त्यांनी. आता आपल्याला आणखी युद्ध पातळीवर सैन्य जमवायची गरज नाही राहिली! आपत्तीत सापडलेल्या चांगल्या लोकांना परमेश्वर मदत करतो, ती अशी."

पण भीमाला रागावत धर्मराज म्हणाला, "अरे ही काय असल्या गोष्टी करायची वेळ आहे? कौरव आता आपल्या आश्रयाला आले आहेत. त्यांचं रक्षण करणं हे कर्तव्य आहे आपलं. आपल्या बंधूंच्या पत्नींचा अपमान होत आहे, हा आपलाही अपमानच नव्हे का? मी स्वतः यज्ञदीक्षा घेतलेली असल्याने आता तू, अर्जुन, नकुल सहदेव आपल्या लोकांना घेऊन जाऊन गंधर्वांचा पाठलाग करा अन् कौरवपत्नींना सोडवून आणा. पण गंधर्वांशी लढाई करायचा विचार करू नका! जमेल तितकं सामोपचारानं आपलं कार्य साधा, गोड बोला, त्यांची समजूत घाला. अगदी न जमलं तरच युद्ध करा. पण एक गोष्ट चांगलीमनावर बिंबवा - आपसात लढायची वेळ आली तर ते शंभर अन् आपण पाच आहोत; पण बाहेरचे कोणी शत्रु आपल्याशी लढू पाहतील, तर आपण एकूण एकशे पाच आहोत!"

आज्ञा पाळून कौरवपत्नींना सोडवून आणायचे त्या चौघांनी धर्मराजला वचन दिले. सर्वजण रथात बसून गंधर्व गेल्या दिशेने वेगाने निघाले. कौरव सैनिकांच्या जिवात जीव आला.

गंधर्वांजवळ जाऊन अर्जुन म्हणाला, "गन्धर्वांनो, ज्या दुर्योधनाला तुम्ही पकडून नेत आहात, तो आमचा भाऊ आहे. तुम्ही त्याना ताबडतोब सोडून द्यावे अशी आमचा अग्रज धर्मराज याची इच्छा आहे."

"आम्ही फक्त देवेन्द्राच्या आज्ञेचं पालन केलं आहे. त्याची आज्ञा पाळणं हे कर्तव्यच आहे आमचं."

"बायकांना कैद करून नेणं शोभत नाही गंधर्वराजाला! ते अनुचित आहे. आमचं ऐका, अन् दुर्योधन आदि आणि त्यांच्या पत्नींना सोडून



द्या. तसं केलं नाहीत, तर आम्हाला तुमच्याशी लढावं लागेल. आमच्या लोकांना आम्ही नक्कीच सोडवून घेऊन जाऊ!'' अर्जुन बोलला.

परन्तु अर्जुनाचा हा प्रस्ताव न मानता गन्धर्व लढायला उद्युक्त झाले. दुर्योधन व त्याच्या भावांना जसे त्यांनी घेरून पकडले, त्याप्रमाणेच पांडवांनाही घेरून पकडायचा त्यांचा विचार होता. परन्तु त्यांची ही चाल पांडवांसमोर चालू शकली नाही. अर्जुनाने आपल्या बाणांनी गंधर्व सैनिकांना खूपच घायाळ केले. त्यांनी फेकलेली अस्त्रेही त्याने मधेच सहजपणे तोडून टाकली. युद्ध करता करताच चित्रसेन म्हणाला, ''अर्जुना, ओळखलं नाहीस तू मला? मी तुझा मित्र चित्रसेन! हा दुष्ट दुर्योधन तुम्हाला अन् द्रौपदीला आपलं वैभव दाखवून अपमानित करण्यासाठी घोषयात्रेचं निमित्त करून इथं आलेला आहे. त्याच्यावर यासाठीच रागावून देवेन्द्राने याला पकडून आणायची आम्हाला आज्ञा दिली आहे. आम्ही फक्त त्याची आज्ञा पाळत आहोत.''

अर्जुन म्हणाला, ''हा दुष्ट असला तरी आमचा नातेवाईक आहे. याला सोडवून आणायची आमच्या अग्रज धर्मराजाची आम्हाला आज्ञा आहे. त्यांचं आज्ञापालन करणं हा आमचा धर्म आहे. तुम्ही स्वत: धर्मराजांना भेटून ते म्हणतील तसं केलंत, तर चांगलं होईल. तुमचा मित्र व शिष्य असल्यामुळे माझी तुम्हाला ही विनन्ती आहे.''

चित्रसेन पांडवांना बरोबर घेऊन आश्रमात गेला व घडलेले सर्व त्याने धर्मराजाला सविस्तर सांगितले. सर्व ऐकल्यावर धर्मराज म्हणाला, ''गन्धर्वराज, आपण दुर्योधनाला मारून टाकलेलं नाही, हे आमचे सौभाग्यच! आमचा वंश एका मोठ्या संकटातून वाचलाय यामुळे! आपणाला भेटून मला फार आनन्द झालाय. आपण कृपा करून दुर्योधन आदींना सोडून द्यावं!''

कौरवांना सोडून देऊन चित्रसेन आपल्या परिवारासह परत फिरला.

दुर्योधनाला जवळ बोलावून धर्मराज नंतर त्याला म्हणाला, ''बन्धो! भविष्यात पुन्हा असलं दुस्साहस करू नकोस. यापासून सुख नाही प्राप्त होणार! जे घडलं ते विसरून जा अन् स्त्रियांसह हस्तिनापुरला परत जा.''

क्रमशः



# 'चान्दोबा'च्या बातम्या

### मदर थेरेसाचे पोस्टाचे तिकीट

मदर थेरेसांना १९७९ चे नोबेल शान्ति पारितोषिक मिळाले. भारत सरकारनेही सर्वात अुच्च असणारे 'भारतरत्न' पारितोषिक देअून त्यांचा सन्मान केला. यानन्तर आपल्या सरकारने प्रत्येक किंमतीचे डाक तिकीटही त्यांच्या सन्मानार्थ काढले. नोबेल पुरस्कार मिळाला, तेंव्हा स्वीडननेही त्यांच्या नावाने डाक तिकीट काढले होते. आता मध्य इटलीच्या संपूर्ण जगातल्या अत्यन्त प्राचीन अशा गणतन्त्राच्या नावाने प्रसिद्ध असणाऱ्या शानमरीनोने मदर थेरेसांच्या सन्मानार्थ 'युरोपा' नावाचे पोस्टाचे तिकीट काढले आहे. या तिकिटावर सुप्रसिद्ध




सिने अभिनेत्री गिना लोलोब्रिजिडाने काढलेले मदर थेरेसाचे चित्र अंकित केलेले असून त्यावर तिची सहीही आहे. 'मदर थेरेसा डी कलकत्ता' या नावाने निघालेल्या तिकिटाची किंमत आहे ७५० लिरा. १९७९ मधे अंतर्राष्ट्रीय आहार संस्थे कडून पुरस्कृत सिरिस पदकावरही एका बाजूला मदर थेरेसाचे चित्र अंकित केलेले आहे. 'सर्वांना आहार' हे ध्येय असणारांना हे पदक दिले जाते. हे पदक धारण करणारे लोक भुकेचा प्रश्न सोडवण्यासाठी कसून प्रयत्न करत असतात.

### विद्यार्थ्यांची वाढलेली संख्या

कलकत्त्याची 'साअुथ पॉइंट हायस्कूल' ही शाळा चाळीस वर्षापेक्षा थोडी अधिक जुनी आहे. १९५४ मधे ती सुरू झाली तेंव्हा तिची विद्यार्थीसंख्या फक्त १७ इतकीच होती. पण आज तिथे १२,००० विद्यार्थी शिकत आहेत.

### सिनेमाचे वेड

मुंबईतल्या एका मोठ्या हॉटेलातला स्वयंपाकी मिथुन देवांगण याने नुकताच एक लोकप्रिय हिन्दी सिनेमा एकाच थिएटरमधे लागोपाठ दोनशे वेळा पाहिला. याकरता त्याने किती खर्च केला माहीत आहे? पाच हजार रुपये! अजूनही जमेल तेंव्हा तो हा सिनेमा पहातो.

### विलक्षण ख्रिसमस

पौर्णिमा आणि ख्रिसमस एकाच दिवशी आले, असे क्वचितच घडते. गेल्या डिसेंबरमधला ख्रिसमस असाच एक विलक्षण ख्रिसमस होता. गेल्या वीस शतकात असे ख्रिसमस केवळ सत्तर वेळाच आले. विसाव्या शतकात पाच वेळा, म्हणजे १९०१, १९२०, १९३१, १९७७ व १९९६ मधे ख्रिसमस व पौर्णिमा एकत्र आले. आता आणखी एकदा पौर्णिमेच्या रात्री ख्रिसमस साजरा करण्यासाठी आपल्याला एकोणीस वर्षे, म्हणजे २०१५ पर्यन्त वाट पहावी लागेल.







# काजू

संपूर्ण जगात आज काजू व काजूच्या तेलाच्या व्यापारात भारत अग्रस्थानी आहे. नव्वद टक्के व्यापार आपल्या देशाच्या हातात आहे.

जवळजवळ चारशे वर्षांपूर्वी पोर्तुगीज ब्राझिलमधून आपल्या देशात काजू घेअून आले. दक्षिणेकडील प्रान्तात काजूची लागवड जास्त असली, तरी मुंबईपासून कन्याकुमारीपर्यंतच्या किनारपट्टीत काजूचे पीक जास्त येते. देशभराच्या अुत्पन्नात सत्तर टक्के अुत्पन्न तेथेच मिळते. जेथे जास्त अुष्णता किंवा जास्त थंडी नसेल अशा वातावरणात रेताड जमिनीत काजूचे अुत्पादन होअू शकते.

पंधरा मीटर अुंच वाढणारे हे दाट वृक्ष तीस-चाळीस वर्षे जगू शकतात. यांची पाने रुंद व जाड असतात. पिवळ्या व लाल रंगांची फळे डिसेंबर ते मार्च पर्यंत गुच्छांनी लटकतात. मार्चमधे ती पिकतात. फळे पिकायला साधारण ६०-७० दिवस लागतात. काजूचे बी फळाच्या बाहेर असणे हा वृक्षशास्त्रातला एक चमत्कार मानला जातो. बीजावर सर्व बाजूंनी जाड कवच असते. कोमल असताना त्याचा रंग हिरवा असतो. पण जसजसे ते पक्के होते, तसतसा त्याचा रंग अुदी होअू लागतो. काजूची पिकलेली फळेही लोक खातात. साधारणतः हे झाड एका ऋतून ३०-३५ किलोचे अुत्पन्न देते. काजू मधे लोह, ए व्हिटॅमिन आदि पोषक तत्वे भरपूर प्रमाणात असतात. काजू कच्चा किंवा भाजूनही खाल्ला जातो.

बंगालीत काजूला 'हिजली बादाम' हिन्दी-मराठी व गुजराथीत 'काजू', तमिळमधे 'मुन्द्री', तेलगूत 'जीडिमामिडी' व मल्याळीत 'काषुअंडी' म्हणतात.

काजूच्या कवचापासून काढले जाणारे तेल व्यापारी दृष्टीने फार मूल्यवान असते. काजूच्या लाकडाचा अुपयोग जहाज निर्मितीसाठी व पेट्या बनवण्यासाठी केला जातो.



आपल्या देशातील ऋषि-मुनी

# वालखिल्य

सप्तऋषींपैकी क्रत नावाच्या ऋषिचे वालखिल्य हे पुत्र होत. तपोबलाच्या प्राप्तीसाठी देहाचे प्रमाण, हा अडथळा नव्हे. अंगठ्या-एवढ्या आकाराच्या या देहधारींची संख्या वीस हजार आहे. हे सर्व मुनिकुमार एकाच वेळी झाडाच्या फान्दीला अुलटे लटकून तपस्या करत असत.

एकदा कश्यप प्रजापतीने यज्ञ करायचे ठरवले. तो यज्ञ सफल करण्यासाठी मुनी व इन्द्रादि देव तेथे आले व त्यांनी यथाशक्ती मदत केली. वालखिल्यही आपणाकडून होईल तितकी मदत करायला आले. यज्ञासाठी आवश्यक अशा वाळलेल्या समिधा व फुले गोळा करून ते घेअून आले. अंगुष्ठमात्र आकाराच्या या कुमारांना ते साहित्य आणताना खूप त्रास होत होता. ते पाहून इन्द्र खदखदून हसला. यामुळे वालखिल्यांना फार दु:ख झाले. चिडून त्यांनी या गर्विष्ठ इन्द्राविरुद्ध आणखी एका इन्द्राचे सृजन करायचा संकल्प केला व त्यासाठी घोर तप आरंभले.

हे पाहून इन्द्र घाबरला. त्यांचे तप कसेही करून थांबवायची त्याने कश्यपांना विनन्ती केली. कश्यपाने इच्छा व्यक्त केल्यावर वालखिल्यांनी तपस्या थांबवली. परन्तु तोपर्यंत त्यांच्या तपस्येमुळे प्राप्त झालेले तपोबळ विनतापुत्र गरुडाने स्वीकृत केले.

पुढे गरुड जेंव्हा अमृत आणण्यासाठी स्वर्गात गेला, तेंव्हा इन्द्राने त्याला रोखण्याचा जबरदस्त प्रयत्न केला, परन्तु तो सफल झाला नाही. अशा प्रकारे इन्द्राला काही मर्यादिपर्यन्त पदच्युत करण्यात वालखिल्य सफल झाले.

एके दिवशी गरुड एका वृक्षावर अुतरला. त्याच वृक्षाच्या फांद्यांना लटकून वालखिल्य तपस्येत मग्न होते. गरुडाला ते माहीत नव्हते. फान्दी तुटली व त्याच क्षणी गरुडाच्या ही गोष्ट ध्यानात आली. वालखिल्य जमिनीवर पडण्यापूर्वीच भरारी मारून गरुडाने फांदी पकडली व ती घेअून तो आकाशात अुडत राहिला. शेवटी कश्यपाच्या आज्ञेवरून वाल्यखिल्यांचे तप भंग न करता ती फांदी गरुडाने मोठ्या सावधगिरीने गंधमादन पर्वतावर पोचवली.





# तुम्हाला माहीत आहे काय?

१. रशियावर तीनशे वर्षांपेक्षाही अधिक राज्य करणाऱ्या राजघराण्याचे नाव काय?
२. कोणत्या देशाची प्रजा शिंटो धर्माची अनुयायी आहे?
३. संयुक्त राष्ट्रसंघाच्या झेंड्यात कोणकोणते रंग आहेत?
४. देवमाशाच्या तोंडात किती दात असतात?
५. अधिकृत 'पवित्र बायबल' ग्रन्थ प्रथम कोणत्या वर्षी अुपयोगात आला?
६. डॅन्यूब नदी कोणत्या सागराला मिळते?
७. आपल्या देशातली सर्वात अधिक अुंचीवरील सडक कोणती?
८. पक्ष्यांना दात असतात का?
९. सप्तर्षींची नावे कोणती?
१०. आर्यभट्ट कोण होते? ते कशाबद्दल प्रसिद्ध आहेत?
११. भारतातील पहिली स्त्री-राज्यपाल कोण?
१२. भारताचे पहिले व्हाइसरॉय कोण?
१३. तिरुवल्लुवर रचित 'तिरुक्कुरळ' नावाच्या ग्रन्थाचे तीन भाग आहेत. ते कोणते?
१४. फ्रेंच राज्यक्रान्तीचे घोषवाक्य काय होते?
१५. विंबल्डनमधे पुरस्कार मिळवणाऱ्या पहिल्या स्त्री निग्रो खेळाडूचे नाव काय?

## अुत्तरे

१. रोमनोव्ह.
२. जपान.
३. निळा व पांढरा.
४. २००
५. १६११
६. काळा समुद्र
७. जम्मू-काश्मीरच्या लेहपासून नेब्रा दरीपर्यन्तचा रस्ता. समुद्रसपाटीपासून हा १८,३०० फूट अुंचीवर आहे.
८. नसतात.
९. अत्री, अंगीरस, क्रत, मरीचि, पुलह, पुलस्त्य व वसिष्ठ.
१०. आर्यभट्ट हे चन्द्रगुप्त विक्रमादित्याच्या काळचे सुप्रसिद्ध गणिती व खगोलशास्त्रज्ञ होते. त्यांनी 'शून्य' या आकड्याचे महत्व दाखवले व बीजगणित विषयाची स्थापना केली.
११. सरोजिनी नायडू, अुत्तरप्रदेश
१२. लॉर्ड कॅनिंग.
१३. धर्म, अर्थ, काम.
१४. स्वेच्छा, समानता व भ्रातृभाव.
१५. अमेरिकेची अल्थिया गिब्सन. हिने विम्बल्डन सिंगल्स चे पद १९५६ व १९५७ मधे मिळवले.



# मान्त्रिक महंकाली

भरतपुरमध्ये मालती नावाची एक बाई रहात असे. तिचा नवरा एक सामान्य शेतकरी होता. तीन मुलं होती तिला. नवऱ्याला ती परमेश्वर मानी आणि सासू-सासऱ्यांची मनापासून सेवा करी. कसलीही काळजी नसल्याने आरामात दिवस जात होते तिचे.

एकदा अचानक मालती आजारी पडली. अुपास हाच सर्वोत्तम अुपाय मानून घरच्यांनी तिला पलंगावर झोपवून ठेवले पण त्यामुळे ती खूपच अशक्त झाली, तिच्या प्रकृतीत सुधारणा होईना. जवळच्या गावातल्या गंगाराम वैद्याला बोलावण्यात आले. त्याच्या काढ्यांनी किंवा गोळ्यांनीही काही फरक पडला नाही.

अशा स्थितीत न बोलावताच एकदा महंकाली नावाचा मान्त्रिक तिथे आला. काहीवेळ मालतीकडे एकटक पाहून तो तिच्या नवऱ्याला म्हणाला, ''तुझ्या बायकोला भुतानं झपाटलं आहे. ही पिशाचीण दुसऱ्या कुठल्या गावची नसून आपल्या गावची सखूच आहे ! हा कसला रोगबीग नसल्यानं औषधांचा काहीच अुपयोग होणार नाही हिला !''

सखूचं नाव घेतल्याबरोबर तिथे हजर असणाऱ्या सर्वांसह मालतीच्या नवऱ्याचाही भयानं थरकाप झाला ! ही सखू सहा महिन्यांपूर्वी रात्रीच्या अंधारात तलावावर पाणी आणायला गेली होती अन् नन्तर ती परत आलीच नाही. सकाळी तलावात तरंगत असलेलं तिचं प्रेत सर्वांना दिसलं ! गावच्या काही लोकांनी 'ही आत्महत्या आहे' असं म्हटलं, तर काहीजण म्हणाले की, 'ती शेवाळावरून घसरून पाण्यात बुडाली असावी.'

मालतीचा नवरा थरथरत म्हणाला, ''म्हणजे काय सखू भूत बनली ?''



''मग काय करील ती ? शास्त्रात लिहिलेलंच आहे की, पूर्वेकडे असणाऱ्या तलावात बुडून मरणारांचं नक्कीच भूत बनतं.'' असे बोलून महंकाली वळूनही न पहाता तिथून भराभरा चालता झाला.

मान्त्रिकाने 'मालतीला भुतानं पछाडलं आहे' असं म्हटल्यापासून सर्वांना तिच्यात तशीच लक्षणं दिसू लागली.

हे सर्व ऐकल्यानन्तर गावचा एक मास्तर रमानाथ याने मालतीच्या नवऱ्याला सल्ला दिला, ''भूत अन् वैद्यांच्या विचित्र गोष्टींवर विश्वास नका ठेवू ! त्यात खरं असं काहीच नसतं ! तिला तीन्ही वेळा नीट जेवायला घाला अन् पहा-थोड्याच दिवसात हिंडूफिरू लागेल ती !''

पण हा सल्ला कोणालाच पटला नाही. एका नातेवाइकाने सांगितले, ''आंजनेयाचं नाव घेतलं की पिशाचीण कित्येक कोस दूर पळून जाईल. मग एका दिवशी रात्री घरासमोर कठपुतळ्यांचा खेळ करवला गेला. तो रामायणावर आधारित होता. थोडा वेळ खेळ पाहिल्यानंतर आंजनेयाचा भाग सुरू होण्यापूर्वीच मालती घरात निघून गेली. दुसऱ्या दिवशी एक डोंबाऱ्याला बोलावण्यात आले. त्यानं आपली माकडं तीन तास नाचवली. आजारी मालती त्यांचा खेळ पहात खूप हसली. तिचं हसणं पाहून लोक म्हणाले, ''ही मालती नव्हे, तिच्यातलं भूत हसतं आहे !''

नंतर मालतीचा एक शुभचिंतक आणि तिचा नवरा असे दोघं महंकाळीला भेटायला त्याच्या झोपडीत गेले. 'मालतीवर कोणी अुपाय करू शकेल तर तो महंकालीच' असा त्यांना विश्वास वाटत होता. त्यांना पहाताक्षणी महंकाली म्हणाला, ''एक ना एक दिवस तुम्ही माझ्याकडे येणार, हे माहीत होतं मला!





तुम्ही आला नसता, तर आता मीच येणार होतो. इतका मोठा मी मान्त्रिक गावात असून अगदी डोळ्यासमोर पिशाच्च कोणाला सतावत असेल, तर यापेक्षा मला अधिक अपमानकारक ते दुसरं काय ?''

''काली, बाहुल्यांच्या खेळात हनुमानाला भिऊन माझी बायको पळून गेली नाही.'' मालतीच्या नवऱ्यांने काळजी व्यक्त केली.

''इतक्या लहान बाबतीत हनुमानाचं नाव घेणं बरं नव्हे. तो पिशाच्चांवर आपल्या शक्तीचा प्रयोग करतो, आपली शेपूट वळवून त्यांना दूर पळवतो. पण आपल्या गावच्या डाकीण सखूवर तसा प्रयोग कसा करील ? तुमच्या अज्ञानाची तर हद्दच !'' असे म्हणून खांद्यांवर एक थैली लटकावून महंकाली त्यांच्या मागोमाग चालू लागला.

घरी पोचताच मान्त्रिक जोरजोरात मन्त्र पढू लागला. थैलीतून त्यानं हळद, कुंकू आणि लिंबं काढली, जमिनीवर कसलीशी रांगोळी काढली, पाट मांडून त्यावर मालतीला बसवले, अन् नन्तर लोकांना अनाकलनीय असे कसलेसे मन्त्र म्हणू लागला. लिंबं कापून त्याची छकलं मालतीच्या डोक्यावरून त्यानं इकडे-तिकडे फेकली आणि निंबाच्या डहाळ्या घेऊन तो मालतीच्या डोक्यावर आणि पाठीवर मारू लागला.

आपल्या ताईच्या तब्येतीची खबर मिळून शहरात शिकणारा मालतीचा भाऊ अर्जुन नेमका त्याच वेळी तिला भेटायला आला आणि हे सारे कांड पाहून 'थांबा, थांबा' असे ओरडू लागला.

अर्जुनच्या ओरड्यानं घाबरलेल्या महंकालीनं निंबाच्या डहाळ्या खाली टाकल्या अन् त्याच्याकडे गुरकावून पहात म्हणाला, ''शहरचं शिक्षण तरुणांना बिघडवतं, याचंच हे उदाहरण ! ठीक आहे, मी पुन्हा उद्या याच वेळी येईन'' नंतर मालतीच्या नवऱ्याला तो म्हणाला, ''उद्या दक्षिणा पाठवताना अगदी काळी-कुळकुळीत कोंबडी पाठवायला विसरू नकोस. एकही पीस कुठे पांढर नसलं पाहिजे.'' थैली खांद्यावर टाकून तो निघून गेला. तो गेल्यावर अर्जुनने सारी हकिकत मेहुण्याला नीट विचारून घेतली. गावातली सखू भूत बनून मालतीला सतावत असल्याची गोष्ट गावकऱ्यांनी त्याला सांगितली. त्या रात्री महंकाली पुन्हा आला. त्याने आपल्याबरोबर



कडुनिंबाच्या मोठ्याल्या डहाळ्याही आणल्या होत्या. आल्याबरोबर थैलीतलं सगळं साहित्य जमिनीवर ओतत तो जोराने म्हणू लागला, ''सखूताई ये ! राख बनलेली सखू, निघून जा इथून ! माझी लाडकी सखू, मालतीला सोडून दे बाई !'' असे बोलत तो मालतीला डहाळ्यांनी मारतही होता.

दुसऱ्याच क्षणी अर्जुनाने वेगाने तेथे प्रवेश केला. त्याच्या दोन्ही हातात चिंचेचे मोठे फोक होते. तो उड्या मारत म्हणाला, ''अरे काली, तू ज्या भूत-पिशाच्यांना बोलवत आहेस, त्यातलं नव्हे मी ! मी आहे अम्बा ! सखू माझी बहीण आहे. ती तलावात बुडत असताना तू मजेत पहात होतास, ते पाहिलंय मी ! सखू आता तुझ्या झोपडीला आग लावायला गेलीय. पहाटेचा तारा निघायच्या आधी तू गाव सोडून पळाला नाहीस, तर या चिंचेच्या जळत्या लाकडांनी तुला भाजून खाऊन टाकीन बघ !''

अर्जुनचं हे बोलणं ऐकून महंकाली थरथर कापू लागला आणि दाराकडे सरकत म्हणू लागला, ''नमस्कार अंबे, नमस्कार ! माफ कर मला !'' अन् तो बाहेर पळत सुटला !

त्याला थांबवून चिंचेच्या फोकांनी अर्जुननं चांगलं बडवलं, अन् पाठलाग करून त्याला पळवून लावलं.

तिथे हजर असणारांना आश्चर्य वाटलं. त्यांना हा प्रकार समजेचना ! दमलेल्या अर्जुननं परत येऊन पाणी प्यायलं आणि तो आपल्या ताईजवळ बसला. त्याच्या मेहुण्यानं विचारलं, ''अरे अर्जुन, सखूबरोबर तिची बहीण अंबाही भूत बनली की काय ? तिनं तुला का झपाटलं सांग बरं ?''

''दाजीबा ! विश्वास ठेवणारे मूर्ख असतील ना, तर मेलेले सर्वजण भुतंच बनतात, घरातलं इतकं सारं काम माझ्या ताईला निभेनासं झालं. शिवाय नीट आहार न घेतल्यानं ती आजारी पडली. अशक्तपणानं रोग झाला तिला. आपल्या थोरल्याचं लग्न करून घरात मदतीला सून आणा आता. ती पाहील सारी कामं. मी ताईला उद्याच शहरात घेऊन जातो. चांगले वैद्य आहेत तिथे. एका महिन्यात टुणटुणीत होऊन येईल ती इथे परत !''

''हं ! तू अन् तुझी ताई ! करा हवं ते आता !'' प्रेमानं मालतीचा नवरा म्हणाला.





# प्रगल्भशास्त्रीचे पंचांग

**खू**प जुनी गोष्ट जमीनदार भूपती राय बहादुरने आपल्या पुत्राच्या राज्याभिषेकाची घोषणा केली. हा अुत्सव चार दिवस चालला. भेटी मिळवण्याच्या आशेने कित्येक कवि, पंडीत, पुरोहित, कलाकार इ. सहकुटुम्ब तेथे आले.

जमीनदाराने त्यांच्या-त्यांच्या योग्यतेप्रमाणे व प्रसिद्धीप्रमाणे एक यादी बनवली व कोणालाही न सोडता सर्वांचा योग्य प्रकारे आदर-सत्कार केला. परन्तु पुरोहितांची यादी प्रसिद्ध झाल्यावर पवनपुरच्या प्रगल्भशास्त्रीला असे वाटले की, आपले नाव यादीत दाखल केलेच गेले नसावे, आपल्याला वास्तविक खूपच पुरस्कार मिळायला हवेत! मनातल्या मनात त्याला याचा राग येअू लागला.

त्याचे नाव घोषित झाले, तेंव्हा युवराजाजवळ जाअून त्याने मिळणारी चार रुपये दक्षिणा हाती घेतली व युवराजाला म्हटले, "महाराज, आपण मला काही भेट द्यावी, म्हणून काही मी इथे चार दिवस वाट पहात राहिलेलो नाही! आपल्याच गावात पंचांग घेअून तिथी, वार, नक्षत्रं सांगत फिरलो, तर मला यापेक्षाही अधिक दक्षिणा मिळेल. वाईट वाटून घेअू नका, पण आपल्याच एका गावचा पुरोहित म्हणून आपण जी दक्षिणा दिलीत, ती मी आपणालाच भेट म्हणून देत आहे. - शतायु व्हा!" आशिर्वाद देत त्याने रक्कम युवराजाच्या हातावर ठेवली!

तेथे हजर असणाऱ्या सर्वांना प्रगल्भ-शास्त्रीच्या गर्वाचा राग आला. परन्तु जमीनदार शान्तपणे म्हणाला, "जमीनदार हा नदीसारखा असतो. नदी ज्याप्रमाणे प्रत्येकाला त्याने आणलेल्या पात्राच्या प्रमाणात पाणी देते, त्याप्रमाणेच आम्ही ऐकलेल्या प्रत्येकाच्या योग्यतेच्या आधारे दक्षिणा दिली. आपणाला याहून मोठी भेट मिळायला हवी असा दावा असेल तर तो व्यक्त करायची ही पद्धत नव्हे. पाणी कमी समजून ते कोणी परत नदीत ओतले, तर नदीचं काय नुकसान? काही असो, पण आपली ही वर्तणूक अत्यंत अनुचित व अक्षम्य आहे."

आता प्रगल्भशास्त्री लज्जित झाला व सर्वांसमक्ष त्याने क्षमा मागितली. जमीनदारानेही त्याची परीक्षा घेअुन, योग्य ठरवून त्याचा अुचित आदर-सत्कार केला. राज्याभिषेक समारंभ संपल्यावर शास्त्री पवनपुरला परतला.

गर्विष्ठ शास्त्रीबुवांनी चूक केली असली, तरी युवराजाला दक्षिणा परत करून त्याने मोठेच साहस केले याचे सर्वांना कौतुक वाटले. सर्वजण त्याची प्रशंसा करू लागले. तो गावचा एक प्रमुख व्यक्ति मानला जाअू लागला. पण त्यामुळे त्याचा गर्व अधिकच वाढला व जमीनदाराचा धिक्कार करून त्याच्याकडून आदरसत्कार करून घेअून आपण कृतकृत्य झालो असे तो मानू लागला.

त्या दिवसापासून गरीब-श्रीमंत फरक न करता सर्वांकडून सारखीच दक्षिणा घेअू लागला. लग्न असो वा कुठले व्रत असो, जास्त रक्कम अुपटू लागला. आपण पुरोहित असून आपल्या काही मर्यादा आहेत, हे ही तो विसरला.

अशातच पवनपुरमधल्याच कवि आनन्दच्या पित्याचे देहावसान झाले. आनन्द जमीनदाराचा दरबारी कवि असल्याने अकराव्या दिवसाच्या कर्मकांडासाठी स्वतः जमीनदार तेथे आला.

कार्य समाप्तीनंतर आनन्दच्या चिंताग्रस्त चेहऱ्याकडे पहात तो म्हणाला, "पंडीत



आहात आपण. ज्ञानी आहात! पित्याचा अभाव भरून येणार नाही. तरीही आपण इतकं दुःखी होणं बरं नव्हे!'' आनन्द यावर म्हणाला, ''प्रभु, माझ्या पित्यानं मोठ्या कष्टानं हे घर अुभं केलं; म्हणूनच मी त्यांना इथेच अखेर पर्यन्त ठेवून सेवा केली. पण त्यांच्या मृत्युसमयी नक्षत्र चांगले नसल्याने शास्त्री बुवांचं म्हणणं असं की, चार महिने आम्ही या घरात राहू नये. 'जे घर कष्टानं बांधलं त्यात या बऱ्याबाईट नक्षत्रांच्या प्रभावामुळे मरायचाही माणसाला हक्क नसावा' या विचारानं चिंतित आहे मी.''

प्रेमाने त्याच्याकडे पाहून जमीनदाराने प्रगल्भशास्त्री व गावच्या काही प्रमुखांची एकत्र सभा बोलावली. तो म्हणाला, ''मला तुम्हा लोकांची मदत हवीय. वास्तुशास्त्राच्या दृष्टीनं आनन्दचं घर ठीकच आहे. मला काही दिवस इथे रहायचंय. इथे येअून मला मन:शान्ती मिळालीय. माझ्यातली अशांती अन् अतृप्ती नाहीशी झालीय.'' नंतर तो शास्त्रीबुवांना म्हणाला, ''आपण आनन्दला इथं रहायला मनाई केल्याचं ऐकलंय. याला काही वैकल्पिक अुपाय असेल तर सांगा ना!''

प्रगल्भशास्त्री बोलला, ''शास्त्र, आचार आणि संप्रदाय आदिचे मूलकारक अपस्तंभ मुनी आहेत. 'देशकाल स्थितीप्रमाणे या सर्वात आपण बदल करू शकतो' हे त्यांचे म्हणणे आम्हाला मान्य आहे. कवि आनन्दने अुदकशांत केली, तर घराचा दोष नाहीसा होईल अन् ते रहाण्यायोग्य बनेल.''

हसत-हसत त्याच्याकडे पाहून जमीनदाराने त्याच्याकरवीच अुदकशान्त केली व परतण्यापूर्वी तो प्रगल्भशास्त्रीला म्हणाला, ''आपल्या रीतीरिवाजात काही अनागरीक अन् आजच्या काळाच्या पद्धतीविरुद्ध असेल, तर त्यातून सुटका होईल अशा मार्गाचा आपल्या पंचांगात प्रवेश करा, त्याचं स्पष्टीकरणही द्या. तसं केलंत, तर मी आपला मोठ्या प्रमाणावर सत्कार करून पुरस्कार देईन.''

अशा प्रकारे कवि आनन्दला घर सोडावे लागले नाही. प्रगल्भशास्त्रीने अन्य पंडितां-बरोबर दीर्घ चर्चा करून शुभ-अशुभ कार्यामधे सोप्या परिवर्तनाला आपल्या पंचांगात स्थान दिले. जमीनदारानेही आपल्या म्हणण्याप्रमाणे त्याचा अुत्तम सत्कार केला.







# समस्या

**भू**पेन्द्र कुबेरपुरचा मोठा प्रसिद्ध कापड-व्यापारी होता. त्याची पत्नी विमला खऱ्या अर्थाने धर्मपत्नी होती. त्यांची मुलगी लक्ष्मी हिचा विवाह शेजारगावचा धान्य-व्यापारी सीताराम याच्या मुलाशी मोठ्या थाटामाटाने साजरा झाला.

या विवाहानन्तर भूपेन्द्रने व्यापार आपला पुत्र राधेश्याम याच्या हवाली केला. लक्ष्मीही आपल्या सासरी सुखाने नान्दू लागली. राधेश्याम व्यापारात लक्ष केन्द्रित करून तो यशस्वीपणे चालवू लागला. अशा प्रकारे भूपेन्द्र आपल्या जबाबदारीतून मुक्त झाला, आयुष्यात यशस्वी झाला.

भूपेन्द्र अशाप्रकारे निश्चिंत झाला होता. आता त्याने आरामात हातावर हात ठेवून जगायला हवे होते. पण तो अुलट दुःखी होता. चिंताग्रस्त अवस्थेत तो एका खोलीत बसून राहू लागला.

हळुहळू त्याची भूक मन्दावली. तो वेळेवर जेवेनासा झाला. रात्री न झोपता तो काहीबाही बडबडत राही. बायको किंवा मुलगा त्याच्याशी काही बोलू लागले तर तो त्यांच्यावर चिडे. त्याची अवस्था पाहून विमला घाबरून गेली. बोलावलेल्या सर्व वैद्यांनी त्याला तपासून त्याला कसलाही रोग वगैरे नसल्याची ग्वाही दिली. त्याला एखाद्या भुताने पछाडले असावे अशा शंकेने विमलाने मांत्रिकही बोलावले. त्यांनी मंत्र-तंत्र करून त्याला ताईत, गंडेदोरे इ. बांधले. पण काहीच फायदा होईना.

आपल्या तीर्थयात्रा अुरकून भूपेन्द्रचा व्याही रतन हा एकदा सहज त्याला भेटायला आला. त्याला पहाताच विमला रडत म्हणाली, ''पहाना, हल्ली तुमच्या व्याह्यांची तब्येत पार बिघडून गेली आहे. मला तर ते जुने दिवसच बरे होते असं वाटू लागलंय.

केसकर



आम्ही या गावात नव्यानं आलो, तेंव्हा ते कापडाचे तागे डोक्यावर घेऊन रस्तोरस्ती फिरून कापड विकत असत. एका लहानशा घरात आम्ही भाड्याने रहात असू. मिळकत कमी पडली तरी आम्ही संतुष्ट असू. पुढे भाग्यानं हात दिला. कापडाचं दुकान उघडलं त्यांनी. खूप कमाई केली. आता मुलानं व्यापार संभाळलाय अन् चांगली प्रगतीही केलीय. मुलगी तुमच्याकडे सुखी आहे. खरं तर आता कसली समस्याच नाहीय त्यांच्यापुढे! कसली कमतरता नाहीय.'' अशा प्रकारे विमलाने सारी परिस्थिती व्याह्यांना स्पष्ट सांगितली.

रतननेही विहिणीचे बोलणे लक्षपूर्वक ऐकून म्हटले, ''तुम्ही चिन्ता नका करू. धीर सोडू नका. सध्या तुमचं ग्रहमानच ठीक नसावं. पण माझी खात्री आहे की लवकरच सर्व काही ठीक होईल.'' नंतर भूपेन्द्रशी थोडे बोलून तो आपल्या गावी निघून गेला.

यानंतर पंधरा दिवसही लोटले नाहीत; तोच एक दिवस आपली मुलगी लक्ष्मी, रडत रडत माहेरघरी प्रवेश करत असलेली विमलाला दिसली.

पट्कन पुढे होत, ''काय झालं बाळा? काही न कळवताच अचानक आलीस? काय झालं सांग तर खरं? आपलं सासर सोडण्या सारखी काय चूक घडली तुझ्या हातून?'' असे विचारत आईने लेकीला जवळ घेतले.

''काय सांगू आई! तुझ्या जावयाला व्यापारात मोठी खोट बसली! कर्जदारांच्या दबावामुळे घरातून निघून जाऊन ते बैरागी बनलेत! परत कधी घरी येणार नाही, असं लिहून ठेऊन निघून गेले ते.'' असे सांगत लक्ष्मी स्फुंदून रडू लागली.

खोलीत बसलेल्या भूपेन्द्रने हा सगळा संवाद ऐकला आणि रागाने भरकन् बाहेर येऊन तो गरजू लागला, ''तुझा सासरा काय हातावर हात ठेवून बसून राह्यलाय की काय? तो काय म्हणतोय शेवटी?''

''काय सांगू बाबा तुम्हाला तरी? ते म्हणतायत की, मी तुझ्या बापाला तोंड दाखवायच्या लायकीचा राहिलो नाही! त्या दिवसापासून आपल्या खोलीत तोंड लपवून बसलेत ते! बाहेरच येत नाहीत.'' असे सांगत ती जास्तच रडू लागली.

''रडू नको लक्ष्मी! घरात जा, तुझ्या नवऱ्याला धुंडून आणायचं माझ्याकडे लागलं!'' असे म्हणून भाड्याची गाडी घेऊन



भूपेन्द्र व्याह्याच्या गावी जायला निघाला.

रतनच्या घरी पोचताच त्याचे नाव घेऊन भूपेन्द्र ओरडू लागला. खोली-बाहेर आलेल्या व्याह्याकडे तो पहातच राहिला. ''लक्ष्मीनं सांगितली सारी करतूत तुमची! पुढे जे करायला हवं, ते विसरून कांबळं ओढून नुसते पडून काय रहाता खोलीत? अशानं काम होईल का? चला दोघं मिळून शोधूया त्याला!'' असे म्हणून रतनला बरोबर घेऊन तो जावयाच्या शोधाला निघाला.

जवळपासच्या गावांतून जितके आश्रम, मठ वगैरे होते, तितक्या सगळीकडे त्यांनी शोध घेतला. शेवटी बैरागी बनलेला जावई त्याला एका मठात सापडला.

रतन आपल्या मुलाला काही बोलणार, इतक्यात मधे दखल देत भूपेन्द्र जावयाला म्हणाला, ''आश्रम, मठ या जागा भक्त लोकांसाठी असतात; व्यापारात सर्वस्व गमावलेल्यांसाठी नव्हेत! व्यापारात नफा-नुकसान होणं नैसर्गिकच असतं; म्हणून काय कोणी घरदार, बायको सर्व सोडून पळून जातं? पुन्हा धान्य खरीदून व्यापार सुरू करा. जे धन पाहिजे, ते देतो मी! कर्ज समजा हवं तर!'' असे समजावून त्या बापलेकांना भूपेन्द्र आपल्या घरी घेऊन आला.

बैराग्याच्या वेषात का होईना, पण परत आलेल्या आपल्या नवऱ्याला पाहून लक्ष्मी फारच खूश झाली. भूपेन्द्रने जावई व मुलीला नवीन वस्त्रे दिली अन् रतनच्या हातावर रोख पंचवीस हजार ठेवत तो म्हणाला, ''व्याहीबुवा, हे धन घेऊन आपल्या मुलाला पुन्हा व्यापार सुरू करून द्या. तुम्हीही गप्प राहू नका. माझ्या जावयाला मार्गदर्शन करत रहा. त्याला एक यशस्वी व्यापारी बनवा. अजून तो कच्चा आहे व्यापारात असं वाटतंय मला.''

हसत हसत रक्कम भूपेन्द्रला परत करत रतन म्हणाला, ''माझ्या मुलाचं व्यापारात नुकसान वगैरे मुळीच झालेलं नाहीय. तुम्ही मुलाला व्यापार सोपवल्यानंतर चिंतेत दिसू लागलात, शब्दाशब्दावर चिडू लागलात. तुमची बायको बिचारी घाबरून गेली. तुमच्यात बदल घडवून आणण्यासाठी आम्ही तिघांनी मिळून हे नाटक केलं आणि त्यात यशस्वीही झालो बघा!''



विशेष समाचार

# बांगला देशाचे राष्ट्रपिता

पंचवीस वर्षापूर्वी बांगला देश अस्तित्वात आला. त्या निमित्ताने त्या देशात रौप्य महोत्सव साजरा करण्यात आला. अुत्सव संपल्यावर दोन महिन्यांनी देशाच्या स्थापनेसाठी लढलेले नेता शेख मुजिबूर रहमान यांना 'राष्ट्रपिता' म्हणून घोषित करण्यात आले. आपल्या देशाच्या स्वातन्त्र्यासाठी आन्दोलन करून मुजिबूर त्यात यशस्वी झाले. साऱ्या जगात त्यांची कीर्ती पसरली.

१९४७ मधे आपल्या देशाचे विभाजन झाले. या प्रान्तात मुसलमानांची संख्या अधिक होती, म्हणून हा प्रान्त पाकिस्तानचा भाग बनला. याला 'पूर्व-पाकिस्तान' असे म्हणत असत. परन्तु पहिल्यापासूनच ''आपण पाकिस्तानपासून निराळे व्हावे व 'सोनार बांगला' ची स्थापना व्हावी'' असे तेथील जनतेला वाटत असे.

परन्तु पाकिस्तानने त्यांची ही इच्छा ठोकरून दिली. पाकिस्तानविरुद्ध केलेल्या या आन्दोलनाचे नेता होते शेख मुजिबूर रहमान. अशा नेत्यांना पाकिस्तान सरकारने तुरुंगात कोंबले. आणि त्यांची चळवळ दाबून टाकायला सुरुवात केली. पण त्यांच्या या प्रयत्नांमुळे प्रजा वैतागली अन् स्वतःच्या बचावासाठी प्रजा प. बंगाल, त्रिपुरा, मेघालय, आसाम आदि प्रान्तांकडे शरणार्थी म्हणून कूच करू लागली. भारताने त्यांना आश्रय दिला. परन्तु त्यांची संख्या दिवसेंदिवस वाढत गेली आणि ही समस्या सोडवण्यासाठी शाश्वत अुपाय शोधणे आवश्यक झाले. शरणार्थींना परत त्यांच्या देशात पाठवायचे तर तेथे योग्य वातावरण असणे आवश्यक होते. यासाठी भारताने बांगला देशच्या मुक्ति सेनेशी हातमिळवणी केली आणि पाकिस्तानशी लढा दिला. नाइलाजाने बळाचा वापर करावा लागला.

१९७१ मधे झालेल्या पंधरा दिवसांच्या या भारत-पाकिस्तान युद्धात १६ डिसें. रोजी पाकिस्तानला आपला पराभव कबूल करावा लागला. पूर्व पाकिस्तान, पाकिस्तानपासून स्वतन्त्र होअून बांगला देशाची स्थापना झाली. शेख मुजिबूर रहमान यांना मुक्त करण्यात आले. १९७२ मधे ते देशाचे अध्यक्ष बनले. परन्तु १९७५ मधे त्यांच्या कुटुम्बीयांसह त्यांची हत्या केली गेली. त्यावेळी जर्मनीत रहात असलेल्या त्यांच्या दोन कन्या तेवढ्या वाचल्या. दोघींपैकी थोरली शेख हसीना वाजेद १९८१ मधे स्वदेशी परत आली व राजकारणात अुतरली. पित्याने स्थापलेल्या अवामी लीग पार्टीची सूत्रे तिने आपल्या हाती घेतली. १९९६ जूनमधे तेथे सार्वत्रिक निवडणुका झाल्या. अवामीलीगचा जय झाला व त्यांना प्रधानमन्त्री पद मिळाले.

बांगला देशच्या संविधानाच्या चौथ्या संस्करणात शेख मुजिबूर रहमान यांना 'राष्ट्रपिता' घोषित करण्यात आले. परंतु १९७९ मधे लष्करी सरकारने हे संस्करण रद्द ठरवले. तरीही जनतेच्या मनात अजूनही ते वंगबन्धु होते व जनता त्यांना 'राष्ट्रपिता' च मानत होती. बांगला देशच्या संविधान सभेने १९ फेब्रु. ला घोषित केले की त्यांना देण्यात येणारी अनादराची वागणूक म्हणजे 'संविधानचा धिक्कार' मानला जाईल.

बांगलादेशने मागच्या १६ डिसें. ला स्वातन्त्र्याचा रौप्यमहोत्सव साजरा केला. १९७५ मधे ज्या ठिकाणी शेख मुजिबूर रहमान यांनी स्वातन्त्र्याची घोषणा केली, त्याच स्थानावर वर्तमान प्रधानमन्त्री शेख हसीना वाजेदने स्वतंत्रता स्मारक स्तूपाची स्थापना केली.




त्याच दिवशी आपल्या देशात 'विजय दिवस' साजरा केला गेला. राष्ट्रपती डॉ. शंकरदयाल शर्मा यांना लष्करी सलामी देण्यात आली.



# सद्बुद्धीची गोळी

चतुर, विदुर, व प्रवर या नावांचे तिघे भाऊ होते. पित्याच्या मृत्यूनंतर आपल्या विशाल घराचे तीन भाग करून ते आपले आयुष्य कंठू लागले. दिवस जात राहिले पण या तिघांच्या आयुष्यात कसलीही सुधारणा झाली नाही; त्यांची काही प्रगतीही झाली नाही. अर्थात्, त्या दिशेने त्यांनी प्रयत्नही केले नव्हते. 'कसेतरी दिवस निघाले, म्हणजे पुरे', इतकीच त्यांची अपेक्षा होती. कोणाच्या बायकोने आपल्या नवऱ्याला, ''अमुक केल्याने लाभ होईल' असे सांगितले, तरी तो तिकडे दुर्लक्ष करी. बायका बिचाऱ्या आपल्या विवशतेमुळे मनातल्या मनात दुःखी होत. पण यामुळे सर्व 'जसे होते तसेच' राहिले.

एके दिवशी एक बैरागी त्यांच्या घरासमोर उभा राहून 'भिक्षांदेही' म्हणत ओरडू लागला.

त्यावेळी तिघेही भाऊ काही कामासाठी शेजारच्या गावी गेलेले होते. तिघी जावा बसून आपसात गप्पा मारत होत्या. आवाज ऐकून त्यांना वाटले की, 'हा कोणी नवा भिकारी असावा; नाहीतर या घरासमोर उभा राहून तो असा ओरडलाच नसता. घर कोणाचं आहे, हे याला माहीत नसावं.'

इतक्यात बैरागी 'भिक्षांदेही' म्हणून पुन्हा एकदा ओरडला. तिघी बाहेर येऊन त्याला म्हणाल्या, ''हे घर कुणाचं आहे, ते माहीत नाही का तुम्हाला? इथे भिक्षा नाही मिळायची.''

जराही निराश न होता बैरागी म्हणाला, ''पण मी कोण हे तुम्हालाही माहीत नसावं. म्हणूनच तुम्ही असं बोलताय, मला भिक्षा द्यायला नकार देताय. तुमचं भाग्य आज चांगलं आहे, म्हणूनच मी तुमच्या दारी आलोय. सर्वांकडे भिक्षा मागायला जात

मालती पुंडलीक



नसतो मी! मला भिक्षा दिलीत, तर कल्याण होईल तुमचं.''

तिघींना असे वाटले की हा कोणी सामान्य बैरागी नसावा. पण मनातल्या भीतीमुळे त्या काहीच बोलल्या नाहीत. कुणास ठाऊक, कोणत्या बिळात, कसला साप आहे - या विचाराने थोरली म्हणाली, ''तुझ्यासारखे भिकारी कित्येक असतील. जे 'कल्याण' म्हणतोयस, ते काय हे सांग बरं! भिक्षा मिळावी, म्हणून खोटं तर नाही बोलत आहेस?''

''तुमच्या घरामागे धन सापडेल, असा उपाय सांगेन बघा!'' बैरागी बोलला.

धनाचे नाव काढताच तिघी जावांच्या मनात आशा उत्पन्न झाली! आता बैराग्याला भिक्षा देण्यात त्यांनी उत्साह दाखवला.



बैराग्याने त्यांची सगळी माहिती विचारून घेतली अन् म्हणाला, ''घर तिघा भावांचं म्हणजे पर्यायानं तुम्हा तिघींचंही आहे. तुमचे अधिकार सारखेच आहेत. आता एक काम करा. एकीनं घरात भात शिजवा, दुसरीनं भाजी, तर तिसरीनं दह्याची व्यवस्था करा, आपापल्या घरात. तिघी मिळून मला पोटभर खायला घाला. नंतर सांगेन तुम्हाला धन कुठे अन् कसं मिळेल ते!''

मोठ्या आतुरतेने तिघींनी एकदमच विचारले, ''पण धन कुणाच्या घरामागे सापडेल?

बैरागी उत्तरला, ''तिघींनाही आपापल्या हिश्याच्या घरामागे धन मिळेल.'' तिघींनी बैराग्याला भरपूर जेवण दिले. ढेकर देत तो म्हणाला, ''मी खूप संतुष्ट झालोय. तुमचे पती परत आल्यावर त्यांना सामान्य माणसाचं भलं होईल, असं एकादं चांगलं काम करायला सांगा. तिघं जेंव्हा अशी भली कामं करतील, तेंव्हा त्यांना आपल्या घरामागे आपल्याला आवडेल तिथे खणल्यावर धन मिळेल. मी अजून तीन दिवस याच गावात असेन माझ्या म्हणण्याप्रमाणे धन न मिळालं, तर भेटा मला.''

त्याचे बोलणे ऐकून तिघी जावांचे चेहरे निस्तेज झाले. त्यांना असे चिंतित पाहून बैराग्याने कारण विचारले.

''तिघा भावांचा स्वभाव एकसारखाच आहे. परोपकारापासून दूरच रहातात ते. तुमच्या म्हणण्याप्रमाणे त्यांच्याकडून एकादं भलं काम करवून घेणं अशक्यच! नुसतं आम्ही तुम्हाला भोजन दिल्याचं कळलं तरी



आकाशपाताळ एक करतील ते! आम्हाला शिव्या देतील, तोंडाला येईल ते बडबडून चांगला अुद्धार करतील आमचा! ते कुठं बाहेर गेलेत, म्हणून इतकं तरी धाडस करू धजलो आम्ही!'' थोरली जाऊ म्हणाली.

क्षणभर विचार करून बैरागी म्हणाला, ''माझ्याजवळ सद्बुद्धीच्या गोळ्या आहेत. तुम्हा तिघींना एक-एक देतो मी. रात्री झोपण्यापूर्वी गोळी पाण्यात विरघळवून आपापल्या नवऱ्याला द्या. सकाळी अुठल्या-अुठल्या त्यांच्यात सद्बुद्धी जागी होईल. त्या गोळीचा परिणाम सूर्यास्तापर्यन्त टिकेल.'' प्रत्येकीच्या हातावर एकएक गोळी ठेवून बैरागी तेथून निघून गेला.

तिघे भाअू परत आल्यावर रात्री त्यांच्या बायकांनी त्यांना न कळत पाण्यातून गोळी दिली.

दुसऱ्या दिवशी चतुर खूप लवकर अुठला. दरवाजा अुघडल्याबरोबर त्याला असे दिसले की, तिथे काही शिपाई अन् राघव अुभे आहेत. राघवला जोरजोरात रडताना पाहून चतुरने त्याला कारण विचारले.

शिपाई म्हणाले, ''यानं खूपजणांकडून कर्ज घेअून शेत आणि घर घेतलं. घर बायकोच्या नावे अन् शेत मुलांच्या नावे. ते कर्ज चुकवायला आता याच्याजवळ काही अुरलंच नाहीय. सावकारांनी तक्रार केल्यावरून आम्ही याला तुरुंगाकडे नेत आहोत.''

''अरे पण तुरुंगात डांबलंत, तर कर्ज कसं चुकवू शकेल तो? बाहेर राहिला, तर काही मार्ग शोधेल, प्रयत्न करील होय ना?'' चतुर बोलला.

''कर्ज घेणाराला बाहेर रहायचं असेल, तर शंभर अशर्फ्यांचा जामीन द्यायला हवा. त्याची बायको अन् मुलगा द्यायला तयार नाहीत. याच्या स्वतःजवळ तर तितकं धनही नाहीय. मग आम्ही तरी काय करावं? म्हणूनच आता तुरुंगात नेतोय याला.'' एका शिपायाने सांगितले.

चतुर ताबडतोब म्हणाला, ''केवळ शंभर अशर्फ्यांसाठी एका सज्जन माणसाला तुरुंगाची कोठडी? सोडा राघवला; हवं ते धन मी देतो.'' अन् आत जाअून शंभर अशर्फ्या आणून शिपायांच्या हवाली करत तो म्हणाला, ''माझीही आर्थिक स्थिति विशेष चांगली नाहीय. मी दोन बैल घेण्यासाठी हे पैसे जमवले होते. बाजारात जाअूनही





मनासारखी खरेदी होअू शकली नव्हती. राघवचं भाग्यच म्हणायचं हे!''

अशर्फ्या घेअून अन् राघवला सोडून देअून शिपाई निघून गेले. नंतर चतुरने राघव, त्याची बायको, त्याचे मुलगे अन् सावकार अशा सर्वांना एकत्र बसवून अुपदेश केला; राघवच्या कुटुंबाला आपल्या कृत्याचा पश्चात्ताप झाला. सावकारांनी चतुरचे जामीनकीचे धन परत केले अन् संतुष्ट होअून निघून गेले. तेंव्हा राघवची बायको चतुरला म्हणाली, ''तुम्ही अन् माझे पती बऱ्याच काळापासून एकमेकांचे शत्रू आहात. यात दोष माझ्या पतीचाच असल्याचं मला छान ठाअूक आहे. असल्या आपल्या शत्रूला आज तुम्ही मोठीच मदत केलीत. तुम्ही फार अुत्तम माणूस आहात. पती तुरुंगात जाताना मी चूप राहिले याबद्दल मला दोष नका देअू, त्यातली खरी गोष्ट जाणून घ्या. यांचा हट्ट होता की, 'तुरुंगात जाईन, पण कर्ज चुकवणार नाही.' आमच्याकडूनही त्यांनी तसं वचन घेतलं; म्हणूनच आम्ही गप्प राहिलो. शत्रूलाही आज तुम्ही जी चांगली वागणूक दिलीत, त्यामुळे आज यांच्यातही परिवर्तन झालंय. आता यांच्या इच्छेप्रमाणे आम्ही कर्ज परत करू. आमच्या चुकीबद्दल आम्हाला पश्चात्ताप वाटतोय. ऋणी आहोत आम्ही तुमचे!''

राघवही चतुरला म्हणाला कि, 'आजपासून शत्रुत्व संपवून आपण दोस्त बनू.' चतुरही संतोषाने घरी परतला.

त्याच दिवशी विदुरलाही दुसऱ्याला मदत करायची संधी मिळाली. तिघा भावात तोच अधिक बलवान होता. समोरच्या घरी विहीर खणायचे काम चालू होते. एक मोठा दगड अडचण बनून राहिला होता. तो फोडणंही शक्य होत नव्हते. काही लोकांचा असा सल्ला होता की, पाच माणसांची शक्ती एकवटलेल्या माणसाच्या हातूनच हातोड्याच्या दणक्याने तो फोडता येईल. विदुरच्या कानी ही गोष्ट पडली. पण त्याला तर ताबडतोब शेजारगावी जायचे होते. त्याच्या जवळचे नारळ त्या गावचा माणूस चांगल्या किंमतीला खरीदायला तयार होता. नारळ ताबडतोब दिले नाहीत तर संधी हातची जाणार होती; अन् कमीत कमी शंभर अशर्फ्यांचे नुकसान होणार होते.

समोरच्या घरच्यांची अडचण दुसरीच होती. चार मजूर तीन दिवस ही विहीर



खणायचे काम करत होते. आजचा शेवटचा दिवस होता काम सोडून ते निघून गेले, तर खणलेली विहीर पुन्हा मातीने भरून जायची शक्यता होती, अन् आतापर्यन्तचा सारा खर्च वाया जाणार होता. त्यामुळे घरमालक चिन्तित होता. काय करावे हे कळत नव्हते त्याला.

विषय कळल्याबरोबर विदुर तेथे गेला. पुऱ्या बळाने चारपाचदा हातोड्याचा प्रहार केल्याबरोबर पत्थर फुटला अन् ताबडतोब विहिरीला पाणी लागले. हे काम संपल्याबरोबर नारळ घेऊन तो शेजारगावी गेला अन् चांगल्या किंमतीला नारळ विकूनही आला.

प्रवरच्या हाती आणखी एक निराळी संधी आली. मेहनती वरुणला साप डसला. गाववैद्याने औषध सांगून म्हटले की, 'या औषधाने तो वाचेल.' एक दिवसाच्या आत याला अुरगंध लेह खायला घालायला हवा. तसं न केल्यास याचे पाय कामातून जातील. अन् नंतर ते कधीच बरे करता येणार नाहीत.''

हे औषध शहरातल्या प्रमोदजवळच मिळण्यासारखे होते. तेथे जाण्यायेण्यात कमीतकमी एक दिवस जाणार होता. अन् त्या अवधीत जे घडायला नको, ते घडून जाणार होते.

गावपाटलाकडे एक अुत्तम घोडा होता. त्यावर बसण्यासारखा घोडेस्वार सुट्टी घेअून सासुरवाडीला गेला होता. आता एकटा प्रवरच काय तो शहरातून औषध घेअून येण्यासारखा घोडेस्वार गावात होता. पण महिन्यापूर्वी झालेल्या पोटदुखीमुळे वैद्याने त्याला घोड्यावर बसायला मनाई केली होती, त्यामुळे त्याच्या जिवाला अपाय होता.

तरीही वरुणला वाचवण्यासाठी प्रवर घोड्यावरून प्रमोदकडे गेला. जाताना वरुणलाही त्याने बरोबर नेले. प्रमोदने वरुणला औषध दिले अन् प्रवरच्या परोपकार-बुद्धीची तारीफ करून त्यालाही कायाकल्प नावाचे औषध देअून 'हे औषध घेतलंस तर तुझी तब्येत अगदी ठणठणीत होईल' असे सांगितले. वरुणला सुखरूप शहरातून परत आणल्यावर गावकऱ्यांनीही प्रवरची खूप स्तुती केली.

आपल्या नवऱ्यांच्या या सत्कार्यामुळे तिघी जावाही फार खूष झाल्या. बैराग्याच्या सांगीनुसार आपापल्या घरामागे खणल्यावर प्रवरला तांब्याच्या नाण्यांनी भरलेला घडा, विदुरला चांदीच्या नाण्यांचा, तर चतुरला सोन्याच्या नाण्यांचा घडा मिळाला.

चतुरची बायको आनन्दाने वेडीच झाली, पण बाकी दोघांच्या बायका मात्र मन मारून गप्प झाल्या. त्या बैराग्याला शोधायला गेल्या.

बैरागी भेटल्यावर प्रवरच्या पत्नीने सगळी हकिकत सांगून रडत विचारले, ''तुझ्यामुळेच तिघांच्यात सद्भाव जागा झाला. मग तिघांना फळं मात्र निरनिराळी कशी मिळाली?''

''माझ्या गोळीचा प्रभाव तात्पुरता असतो. पण फळ मात्र ज्याच्या त्याच्या बुद्धीवर अवलंबून असतं.'' बैरागी अुत्तरला.

''पण सर्व भावांची बुद्धी तर सारखीच आहे!'' विदुरची बायको बोलली.

बैरागी म्हणाला, ''नाही, प्रवरनं काम तर चांगलं केलं; एका माणसाचा जीव वाचवला. पण गोळीचा प्रभाव नाहीसा झाल्याबरोबर त्याला वाटलं की आपण केलं, ते बरं नव्हे! पुन्हा कधी असं काही चांगलं काम न करायचा निर्धारही केला त्यानं! त्यामुळेच त्याच्या परिश्रमानुरूप फळ त्याला मिळालं. चांगलं काम केल्यानंतर विदुरला वाटलं की, असल्या कामात आपण आपला वेळ का वाया घालवावा? त्यानं ठरवलं की, असली कामं पुढे कधीकधीच करायची. त्यामुळे त्याला थोडं अधिक फळ मिळालं. पण चतुरला मात्र ते काम करण्यात आनन्द वाटला अन् पुढेही अशी कामं करत रहायचं ठरवलं त्यानं. त्यामुळे त्याला सोन्याची नाणी मिळाली.''

इतके सगळे बैराग्याने सांगूनही त्या दोघी जावा काहीशा असंतुष्टच राहिल्या. त्या जेंव्हा आपापल्या घरी पोचल्या, तेंव्हा त्यांच्या नवऱ्यांनी आपल्याजवळची सोन्याची नाणी दाखवत त्यांना म्हटले, ''चतुरचं असं म्हणणं आहे की या घरात जे काही मिळेल ते तिघांनी सारखं वाटून घ्यावं. त्यानं आम्हालाही त्याच्या नाण्यांत सारखा वाटा दिला.''

आता सिद्ध झाले की तीन भावात चतुरच सर्वात सुशील व सद्भावना राखणारा आहे. विदुर व प्रवरच्या बायकांनाही कळून चुकले की सद्बुद्धिवाल्या व्यक्तीलाच सोन्याची नाणी कशी मिळाली.



# प्रोत्साहन - पारितोषिक

कुसुमपुर गावात दरवर्षी चित्रकला स्पर्धा होत असत. देशातले अनेक चित्रकार या स्पर्धेत भाग घेत. विजेत्यांना मूल्यवान पारितोषिके दिली जात. प्रत्येकाला वाटे की हे पारितोषिक त्याच्या प्रतिष्ठेचे चिन्ह आहे.

या वर्षीही चित्रकलास्पर्धा आयोजित झाल्या. देशातल्या सर्व प्रान्तांमधून चित्रकारमंडळी आपापल्या चित्रांसह कुसुमपुरला पोचली.

सुगंधपुरचा विश्वास नावाचा एक तरुण चित्रकारही आपल्या चित्रांसह स्पर्धेसाठी कुसुमपुरला पोचला. तो जेंव्हा परत सुगंधपुराला गेला, तेंव्हा त्याच्या मित्रांनी विचारले, ''काय रे, मिळालं का तुझ्या एकाद्या चित्राला पारितोषिक?''

जरा चिन्ता प्रकट करत विश्वास म्हणाला, ''मला फक्त 'प्रोत्साहन-पारितोषिक'च मिळालं.''

यावर मित्र म्हणाले, ''अरे प्रोत्साहन - पारितोषिकच मिळाल्याबद्दल वाईट वाटायचं काय कारण? कित्येक असेही चित्रकार असतील, की त्यांना हे पारितोषिकही मिळालं नाही.'' अशा प्रकारे त्यांनी विश्वासचे सान्त्वन केले.

''अरे, पण मला त्याबद्दल वाईट नाही वाटत आहे! मला पुरस्कार म्हणून मिळालेलं पुस्तक पाहून वाईट वाटतंय!'' विश्वासने सांगितले.

''कसलं पुस्तक आहे पाहू!'' मित्रांनी विचारल्यावरून त्याने पुस्तक दाखवले.

त्या पुस्तकाचे नाव होते - 'चित्र कसे काढावे?'

रामचन्द्र भंडारी







# सम्राट अशोक

३

(चन्द्रगुप्तने चाणक्याच्या मदतीने नन्दांना पराजित केले आणि मगध राज्य हस्तगत केले. पाटलीपुत्रला आपली राजधानी बनवून मौर्य वंशाची स्थापना केली. त्याच्यानन्तर त्याचा पुत्र बिन्दुसार सिंहासनावर बसला. बिन्दुसारने मोठ्या दक्षतेने राज्यकारभार चालवला. तीन राण्या असताना एक ब्राह्मणकन्या सुभद्रा हिच्याबरोबरही विवाह केला. तिने अशोकला जन्म दिला. विद्या अन् विवेक-संपन्न अशोक, ज्येष्ठ पुत्र सुशेम याला मुळीच आवडत नसे. दोघांतली तेढ हळूहळू वाढतच गेली.) - यानन्तर

एक दिवस अशोक आपल्या आईच्या इच्छेनुसार सूर्योदयाच्या वेळी फुले, फळे इ. घेऊन नगर-मध्यावरील मन्दिरात गेला अन् पूजा अुरकून तो बाहेर आला. पक्ष्यांची किलबिल अन् मन्दिरांतल्या घंटांचा नाद त्याच्या कानात गुंजत होता. आकाशात विहरणारे पक्षी, अुदयभानुचे किरण अन् त्यामुळे सोनेरी आभा प्राप्त झालेल्या ढगांची शोभा न्याहाळत तो महालाच्या दिशेने चालत होता. इतक्यात पाठीमागून अचानक दौडत येणाऱ्या घोड्याने त्याला खाली पाडले अन् खूप वेगाने तो पुढे जाअू लागला. घोडेस्वार होता सुशेम.

दुसऱ्याच क्षणी अुठून अशोकनेही वेगाने धावत घोड्याचा पाठलाग केला अन् तो टप्प्यात आल्याबरोबर अुसळी मारून अशोक घोड्यावर चढला. सुशेमच्या हातून लगाम खेचून त्याने घोडा थांबवला. सुशेम खाली



अुतरला.

"मी आपल्या वाटेनं मुकाट्याने जात होतो तू मला खाली का पाडलंस? अशोकने विचारले.

"मी नाही, घोड्यानं पाडलं तुला." असे म्हणून सुशेम घोड्यावर चढू लागला.

त्याचे मनगट घट्ट पकडून, "माणसांची अजिबात रहदारी नसणाऱ्या या मोठ्या रस्त्यावरून तुला नीट जाता येत नाही. असल्या अयोग्य माणसाला घोड्यावर बसायचा अधिकार कोणी दिला?" अशोकने असे ओरडून विचारले.

"तू कोण माझा अधिकार विचारणारा? मी कोण, माझं पद काय, हे माहीत आहे तुला?" सुशेम गरजला.

"माहीत कसं नसेल? नालायक घमेंडखोरा! तू माझा ज्येष्ठ बन्धू आहेस. म्हणून सोडून देतोय या खेपेला. नाहीतर असा धडा शिकवला असता, की जन्मभर आठवण राहिली असती!" अशोकने ठणकावले.

"पुढे राजा बनणाऱ्याला धमकी देतो आहेस?" क्रोधाने सुशेमने विचारले. "राजा कोण होणार, याचा निर्णय झालेला नाहीय अजून!" अशोकने माहिती पुरवली. "नीट माहिती नसताना अुगीच काहीच्या काही बकू नकोस. महाराज अन् अन्य प्रमुखांचा निर्णय कळलेला आहे मला. मीच होणार आहे राजा." गर्वाने खदाखदा हसत सुशेम बोलला.

"हेच जर खरं असेल, तर तुला जास्तच सावधगिरी बाळगायला हवी. तू खोटं बोलत आहेत, हे मला चांगलं ठाअूक आहे. अन्



तसा निर्णय झालाच असेल, तर मीही जोरदार विरोध करीन त्याला!" अशोक गंभीरपणे म्हणाला. "तू महाराजांच्या निर्णयाला विरोध करणार?" म्हणत सुशेमने त्याला मारण्यासाठी हात अुगारला.

अशोकने तो हात पकडून आवळला. सुशेमने हात सोडवून घ्यायचा खूप प्रयत्न केला, पण त्याला ते जमेना. दोघांच्यात ताणाताणी सुरु झाली. त्यांच्या ओरड्याने मंदिराचे आवार दणदणू लागले. प्रजाजनही इकडून तिकडून येअून भोवती जमू लागले.

दोन्ही राजकुमार काही दूध पिणारी मुलं नव्हती! चाणक्याने काही वर्षांपूर्वी त्यांची परीक्षा घेतली होती. आता तो जिवन्त नव्हता. राजा बिन्दुसार वृद्ध झाला होता. त्याचे स्वास्थ्यही हरवत होते. दोन्ही



राजकुमारांचे शत्रुत्व जनतेला ठाअूक होते, पण आज ते मर्यादेबाहेर जाअू पहात होते. कुणी मनातही आणले नव्हते की, मौर्य वंशाच्या संस्थापक चन्द्रगुप्तचे नातू अन् त्याचाच योग्य अुत्तराधिकारी असणाऱ्या बिन्दुसारचे दोन पुत्र सुशेम व अशोक असे अुघड्यावर एकमेकांशी भांडतील! त्यांच्या आवाजामुळे प्रजा धावत तेथपर्यन्त आली, पण त्यांच्या जवळ पोचायचे धाडस मात्र कुणाच्यातही नव्हते! दुरूनच सर्वजण आश्चर्य व भयाने पहात राहिले!

भाग्यवश त्याच वेळी भल्लाटक घोड्यावरून तेथून जात होता. चाणक्यानंतर भल्लाटक मगध राज्याचा प्रधानमन्त्री बनला होता. त्याला पाहिल्याबरोबर दोघा राजपुत्रांनी एकमेकांना सोडले अन् ते दोन बाजूंना अुभे राहिले. "असं सार्वजनिक रस्त्यावर, जनतेसमक्ष तुम्हा दोघांचं एकमेकांशी झगडणं ही दुर्भाग्याची गोष्ट आहे. तुमच्या पित्याला - महाराजांना - हे कळलं, तर त्यांचा किती क्षोभ होईल! तुम्ही याची काही कल्पना तरी केलीत?" मन्त्र्याने त्यांना विचारले.

अशोक यावर गप्प राहिला. पण सुशेमने चवताळून "कुणाला भिअून पळून जायची गरज नाहीये मला! आपणच सांगा, मीच भावी राजा आहे ना इथला?" असे मन्त्र्याला विचारले.

"राजकुमार, मलाइतकंच माहीत आहे, की याबाबत अजून कोणताही निर्णय घेण्यात आलेला नाहीय. राजाचे ज्येष्ठ पुत्र आहात तुम्ही! तेंव्हा त्या नात्याने अुदात्ततेनं वागणं हा तुमचा धर्म नव्हे का?" मन्त्र्याने काहीशा कडकपणे विचारले, "पण यानं माझ्या पदाचा आदर करावा, यावर मी जोर दिला; यात काही चूक आहे माझी?" सुशेमने विचारले.

"दुसऱ्यावर जोर देअून किंवा त्याचा अपमान करूनच तुम्हाला कोणी आदर नाही देणार! आपल्या सद्व्यवहार अन् सदाचाराने सर्वांचा मान मिळवायचा प्रयत्न करायला हवा त्यासाठी; दुसऱ्यांवर दया दाखवायला हवी, सहनशक्तीची सवय करून घ्यायला हवी. ते सर्व सोडून बारीक-सारीक गोष्टींवरून भांडण करणं बरं नव्हे! याला कोणी सद्व्यवहार नाही म्हणत; दुर्व्यवहार म्हणतात!" प्रधानमन्त्री गंभीरपणे बोलला.

"केवळ योगायोगानेच वाचला हा माझ्या





हातून. नाहीतर आज या घमेंडखोराची चामडीच लोळवली असती मी. या पोरट्यानं माझ्यावर हात अुचलायच्या केलेल्या साहसाबद्दल त्याला शिक्षा मिळाली." सुशेम तरीही गर्वाने म्हणाला.

"राजकुमार, आपल्याच भावाबद्दल असं बोलणं अयोग्य आहे. तेही तुमच्याचप्रमाणे युवराज आहेत; तुमच्याच पित्याचे पुत्र आहेत." मन्त्र्याने त्याला समजावायचा प्रयत्न केला.

"शक्य आहे की, हा माझ्या पित्याचा पुत्र आहे, पण याच्या आईनं विवाहापूर्वी अंतःपुरात माझ्या आईच्या सेविकेचं काम केलंय. बाकीच्या राण्यांचीही दासी होती ती! म्हणून मी याला युवराज मानायला तयारच नाही." सुशेमने आढ्यता प्रकट केली.

त्याच्या या बोलण्यामुळे मात्र अशोक त्याच्यावर तुटूनच पडणार होता. पण मन्त्र्याने त्याला अडवले.

"युवराज मी, की तू, हे काळच ठरवील! माझ्या आईचा अपमान केला आहेस तू. मी याचा कधीतरी सूड घेईनच पहा! प्रधानमन्त्री अन् इथे अुपस्थित असलेल्या जनतेला साक्षी ठेअून प्रतिज्ञा करतोय मी! मगध सिंहासनावर बसणारा तू नव्हेस, पण..." वाक्य पुरं होण्यापूर्वीच मन्त्र्याने अशोकच्या तोंडावर हात ठेवला. तो मधेच म्हणाला, "महाराज बिन्दुसार यांचा प्रतिनिधी म्हणून मी तुम्हा दोघांना इथून निघून जायची आज्ञा देत आहे. अगदी या क्षणी, ताबडतोब राजवाड्यात निघून जा!" अन् मग त्याने सर्व लोकानाही तेथून निघून जायला सांगितले.

तेथून मन्त्री सरळ आपल्या घराकडे निघाला. घोड्यावरून अुतरून राजभवना-समोरून जताना मुख्य द्वारातून बिन्दुसारचा मुख्य सल्लागार बाहेर येअून नमस्कार करत म्हणाला, "महाराज, आपणाला भेटू इच्छितात."

"ठीक आहे, चला." म्हणत मन्त्री त्याच्यामागोमाग राजवाड्यात गेला. राजा ज्या एकान्त दालनात आराम करत होता, तेथे मन्त्री पोचला. राजा बिन्दुसार त्या विशाल दालनातल्या मोठ्या मसनदीवर बसलेला होता. समोर दुसरा एक अधिकारी अुभा होता. मन्त्र्याने प्रणाम करताच त्याला अेका आसनावर बसायचा राजाने संकेत केला.

मन्त्री बसल्यावर राजा म्हणाला,



"भल्लाटक, एक वाईट बातमी कानी आलीय. त्याचं विवरण तक्षशिलेहून आलेले हे अधिकारी सांगतील."

मन्त्र्याला प्रणाम करून अधिकारी म्हणाला, "मन्त्रिवर, महाराज चन्द्रगुप्तांनी तक्षशिला प्रान्त जिंकून घेतला होता हे आपणाला विदित आहेच. त्यांनी आपला एक अधिकारीही तेथे तैनात केला होता. तेंव्हापासून आजपर्यन्त कसलीही अडचण न येता तेथला राज्य-कारभार सुरळित चालू आहे. पण आता मौर्य-अधिकाराला धिक्कारून तक्षशिलेत बंडाची ज्वाळा भडकू लागली आहे. मगध राज्यातून निराळे होण्याचे प्रयत्न चालू झाले आहेत."

प्रधानमन्त्री म्हणाला, "ही तर मोठी विचित्र अन् ताबडतोब हालचाल करायला लावणारी बातमी आहे!"

"आपण तक्षशिलेच्या जनतेवर कसला अन्याय केला नाही, त्यांचं कसलं नुकसानही न केल्यानं आपणाला त्यांचे हे प्रयत्न विचित्र वाटतील. पण आपल्या राजप्रतिनिधींना त्यात कसला विचित्रपणा वाटत नाहीय. कारण आम्हाला असं कळलं आहे की या बंडामागे ग्रीकांचा हात आहे. चन्द्रगुप्त महाराजांनी त्यांना व त्यांच्या सैन्याला तेथून हाकलून देऊन तिथून घालवलं. पण आता ते आपल्यावर आक्रमण करायच्या तयारीला लागले आहेत. मगध राज्य विच्छिन्न होत असल्याची स्वप्नं दिसतात त्यांना!" अधिकाऱ्याने तपशीलवार सांगितले.

प्रधानमन्त्र्याने विचारले, "बंड कशा प्रकाराने सुरू होणार आहे?" "बंडाचे नेते भूमिगत आहेत. ते अुघड्यावर येअू इच्छित नाहीत. व्यापारी आणि प्रमुख नागरीकांना ते बंडासाठी प्रवृत्त करत असतात. मगध राज्याच्या अधिकाऱ्यांची घरं जाळणं, लुटालूट करणं यासाठी सामान्य जनतेला प्रोत्साहन देत असतात. आमच्या काही सैनिकांना ठार केलं जनतेनं. दिवसें दिवस प्रकरण चिघळत चाललंय." अधिकाऱ्याने एकूण परिस्थिती कथन केली.

"ते जर हिंसामार्गावर अुतरले असले, तर आता अुशीर करण्यात अर्थ नाही. सर्व शक्तीनिशी त्यांना दाबून टाकायला हवं. तोच एकमेव मार्ग आहे." राजाला संबोधित करून मन्त्री म्हणाला, "महाराज, सेनापतीला आज्ञा द्या कि तक्षशिलेवर ताबडतोब सैनिक कारवाई करा."



"असामान्य शक्तिमान अन् पराक्रमी अशा माझ्या पित्यानं स्थापलेलं मौर्य साम्राज्य माझ्या नजरेसमोर छिन्नभिन्न होणं कधीच शक्य नाही. माझ्याच्यानं ते पहावलं जायचं नाही, सहन व्हायचं नाही. त्या बंडखोरांचा बीमोड करायचा मीच विडा अुचलत आहे. माझ्या नेतृत्वाखाली बंडखोरांचा विनाश केला जाईल." बिन्दुसार आवेशाने फुसफुसत बोलला.

"जशी आपली इच्छा, पण एक विनन्ती आहे. आपल्या सहा पुत्रांपैकी कोणीतरी हे नेतृत्व करावं. हे काम पित्यानं केलं काय, अन् पुत्रानं केलं काय, सारखंच नं?" प्रधानमन्त्र्याने सुचवले.

"कशी क्लिष्ट परिस्थिती अुत्पन्न झालीय! सुशेमला राज्याभिषेक करावा असा विचार करत होतो, तर नेमकी आताच ही अडचण अुद्भवली." राजा स्वतःशीच पुटपुटू लागला.

"राज्याभिषेक आणखी काही दिवस लांबणीवर टाकणंच अुचित होईल महाराज. आपण तो विचार तात्पुरता स्थगितच करावा. प्रथम सुशेमनं सैन्याचं नेतृत्व करून बंड मोडून परत यावं. म्हणजे जनतेचाही युवराजांबद्दल आदरभाव अन् विश्वास वाढेल." मन्त्र्याने सल्ला दिला. राजाही गप्प राहिला. मन्त्री पुढे म्हणाला, "महाराज, माझी एक लहानशी विनन्ती आहे. प्रथम युवराजांना नेतृत्व करायला आपण सांगू नये. त्याऐवजी आपण अशी परिस्थिती निर्माण करावी, की ते स्वतःच त्यासाठी पुढे येतील! म्हणजे माझ्या म्हणण्याचा अर्थ असा की आपण सहाही



युवराजांना इथे बोलावं; त्यांना तक्षशिलेतल्या बंडाळीबद्दल तपशीलवार सांगू. त्यांच्यापैकी कुणीतरी सेनेचं नेतृत्व करून बंडखोरांना नेस्तनाबूत करायची गरज कशी आहे, हे सांगू. ज्येष्ठ पुत्र असल्यामुळे सुशेमच बहुधा पुढे येईल. मगध राज्याचे भावी राजे आपणच आहोत अशी त्याची पूर्ण खात्री आहे. तेंव्हा अगदी आनन्दानं तो हा भार अुचलेल."

बिन्दुसारला मन्त्र्याची ही कल्पना आवडली. ती अमलात आणायचे त्याने ठरवले.

त्याच दिवशी सर्व राजकुमारांना राजापुढे बोलावण्यात आले. राजाने सर्वांना संबोधित करून म्हटले, "आता तुम्हापैकी कोणी किशोरवयीन नाही; सर्वांनी तारुण्यात पदार्पण केलेलं आहे. राज्यकारभारासंबंधीचं

ज्ञान सर्वांना असायला हवं. शासन क्रमवार अन् क्षमतेनं कसं चालवावं हे कळायला हवं. त्या दिशेनं तुम्हा लोकांच्या काय काय जबाबदाऱ्या आहेत आदि गोष्टींची माहिती करून घेणं आवश्यक आहे. राज्यात कायकाय चाललं आहे याविषयी नीट माहिती करून घेणं तुमचं कर्तव्य आहे. आता यासाठी योग्य संधीही तुमच्यासमोर चालून आली आहे. अशी बातमी मिळालीय की, तक्षशिला भागात बंडाची भावना उत्पन्न होत आहे. तिथली शांती भंग होत आहे. बंडखोरांना ताबडतोब दाबून टाकणं आवश्यक आहे. यानन्तर पुन्हा तेथे शांति व सुव्यवस्था स्थापन करावी लागेल. हे काम करायला तुम्हापैकी कोण तयार आहे बोला.''

बिन्दुसारला वाटले होते की सुशेम ताबडतोब पुढे येईल अन् जबाबदारी संभाळेल. परंतु तो तर तोंडात गुळणी घेतल्यासारखा चुप होता! बाकी चारांपैकीही कोणी पुढे होईना. शेवटी एक पाऊल पुढे होत अशोक म्हणाला, ''महाराज! आपलं आज्ञापालन करायला तयार आहे मी. आपण सोपवलेलं हे काम सहज व्यवस्थित करीन असा आत्मविश्वास आहे माझा! आज्ञा द्या. अगदी या क्षणीच सैन्यासह तक्षशिलेकडे निघेन मी! बंडखोरांचा नायनाट करून मी तिथं शान्ति व सुव्यवस्था स्थापन करीन.''

''फार प्रसन्न झालो मी पुत्रा तुझ्यावर! तुझ्या साहस अन् आत्मविश्वासाबद्दल अभिमान वाटतोय मला.'' असे म्हणून बिन्दुसारने प्रेमाने अशोकची पाठ थोपटली. नन्तर आपल्या बाकी पुत्रांकडे वळून तो म्हणाला, ''भ्याड कुठचे! आपापल्या निवासस्थानी जाऊन लपंडाव खेळत बसा. उंदीर जसं लोणी चोरून खात बसतात, तसे नुसते पोटभर खात बसा.''

पाचही राजपुत्र तेथून निघून गेले. अशोकने पित्याच्या पायांना स्पर्श करून नमस्कार केला व त्याचा आशिर्वाद घेऊन तेथून निघून गेला.

''पूज्य गुरुदेव चाणक्यांचे शब्द खरे झालेत. त्यांनी त्या पहिल्या परीक्षेच्या दिवशीच सांगितलं होतं की माझ्या सर्व मुलांच्यात अशोकच समर्थ अन् लायक आहे.'' राजाच्या मनात आले.

क्रमशः







# स्वार्थ-निस्वार्थ

राजा विक्रम निश्चयाने पुन्हा झाडाकडे आला. फान्दीवरील प्रेत त्याने आपल्या खांद्यावर टाकले अन् नेहमीप्रमाणे मौन स्वीकारून तो स्मशानाची वाट चालू लागला. तेंव्हा शवातील वेताळ बोलू लागला, ''राजा, जगात सर्वत्र दुष्ट, लबाड अन् कावेबाज लोक भरलेले आहेत. विवेकी माणसाला नाइलाजाने त्यांच्याशी बोलावं लागलं किंवा काही काम पडलं, तर नक्कीच खूप सावधगिरी बाळगायला हवी. खरं तर त्यांच्यापासून चार पावलं दूर रहाणंच बरं, पण गरज पडली की नाइलाजानं संबंध जोडावा लागतो त्यांच्याशी. आपण सावधगिरी न बाळगली तर त्यांच्या चिकण्याचुपड्या बोलण्यात अडकायची अगदी खात्रीच! तो पुरुष असो, वा स्त्री; जरा जरी बेपर्वाई बाळगली तरी ते आपली करतूत दाखवून तुम्हाला बोटावर नाचवतील! स्मशानातल्या दाट काळोखात इतके अगणित कष्ट करत आहेस; म्हणून अशा दुष्ट शक्तींपासून

## वेताळ कथा



बचाव व्हावा यासाठी तुला जागरूक करणं हे कर्तव्य समजतो मी आपलं! राजकुमारी मृणालिनीचा एका लबाड गन्धर्वाच्या हातून सर्वनाश झाला. तिची गोष्ट सांगतो मी तुला.'' वेताळ गोष्ट सांगू लागला-

माणिकण्ठ नावाच्या गंधर्वाला एकदा भूलोक पहायची इच्छा झाली. एका पौर्णिमेच्या रात्री तो आकाशमार्गाने भूमीवर अुतरला. त्या वेळी त्या अुद्यानात वैदेह देशची राजकुमारी मृणालिनी आपल्या सख्यांसह विहार करत होती. तिचे सौन्दर्य पाहून मणिकण्ठ अवाक् झाला. इतकी सुन्दर स्त्री त्याला आजवर गन्धर्व लोकातही दिसली नव्हती.

मणिकण्ठला रहावेना. तिच्याजवळ जाअून विचारले, ''हे सुन्दरी, कोण आहेस तू?''

त्याला पाहून आश्चर्यचकीत झालेली राजकन्या म्हणाली, ''मी वैदेहची राजकन्या मृणालिनी. या अुद्यानात आपण प्रवेश कसा केलात? इथे आत यायला मनाई आहे. शिवाय याची रचनाच अशी आहे की, कोणी आत येअूच शकणार नाही!''

''मी गन्धर्व आहे. नाव मणिकण्ठ. आकाशात विहार करत असताना तुझ्या सौंदर्याने भुरळ घातली मला! स्वत:वर ताबा न राहून मी इथे अुतरलो'' मणिकण्ठ अुत्तरला.

त्याचे बोलणे ऐकून युवराणी बावरून म्हणाली, ''आपण तावडतोब निघून जा इथून. शिपायांनी पाहिलं, तर ते कैद करतील तुम्हाला!''

''गन्धर्व आहे मी! माझी शक्ती अद्भुत अपार आहे. तुला माहीत नसल्यानं घाबरत आहेस तू. निश्चिन्त रहा माझ्याबाबत.'' असे म्हणून त्याने हवेत आपला हात फिरवला.

दुसऱ्याच क्षणी मृणालिनीच्या सख्या अन् बरोबरचे सारे शिपाई बेशुद्ध होअून पडले. युवराणी हसत बोलली, ''अद्भुत, महाअद्भुत!''

तिच्या शाबासकीने मोहोरून जात मणिकण्ठ म्हणाला, ''मी अचानक इच्छा प्रदर्शित करतोय म्हणून रागावू नकोस. पण तुझ्याशी विवाह करावा अशी इच्छा आहे माझी! ती प्रकट केल्यावाचून रहावत नाहीय मला.''

आपादमस्तक त्याला न्याहाळून अन् मस्तक झुकवून मृणालिनी म्हणाली, ''माझे तात बऱ्याच दिवसांपासून माझ्या विवाहाच्या प्रयत्नातच आहेत, पण अजून कोणी योग्य वर त्यांना आढळला नाही. आता मीच पती म्हणून तुमची निवड करत आहे. पण विवाहापूर्वी आपणाला



एक फार कठीण काम करावं लागेल.''

अुत्सुकता दर्शवत मणिकण्ठने विचारले, ''काय काम आहे ते?'' ''वीरसेन हा आमच्या शेजारचा राजा माझ्याशी विवाहाला अुत्सुक आहे. पण मला तो आवडत नाही. तो तर युद्ध करूनही मला जिंकायच्या प्रयत्नात आहे. तो आमच्यापेक्षा बलवान असून त्याचं सैन्यही अफाट आहे. आपण त्याला पराजित केलंत, तर मी अगदी आनन्दाने आपणाशी विवाह करीन.''

''हा तर माझ्या हातचा मळच की! मी आत्ताच गन्धर्वलोकी जाअून राजा चित्रवर्णला सर्व सांगून परत येतो.'' असे म्हणून मणिकंठ अदृश्य झाला.

मणिकण्ठ भूलोकीच्या एका स्त्रीशी विवाह करू पहात आहे, हे जाणून चित्रवर्णला अतिशय राग आला. त्याला अधिकात अधिक शिक्षा द्यायचा विचार करत असतानाच राजाला समजले की, आपली कन्या कान्तीमयी मणिकंठवर प्रेम करत असून त्याच्याशी विवाहित होण्याचे स्वप्न पहात आहे.

तेंव्हा चित्रवर्ण मणिकंठला म्हणाला, ''गन्धर्व मानवांशी असा संबंध जोडू शकत नाहीत; अन् ते योग्यही नव्हे. तू माझ्या कन्येशी विवाह केलास तर छान होईल. तिला नाकारू नकोस.''

परन्तु मणिकंठ या प्रस्तावाला तयार होईना. मृणालिनीशीच विवाह करण्याबाबत तो अडून राहिला. आपला निर्णय अटळ असून त्यात बदल होणे अशक्य असल्याचे त्याने स्पष्ट सांगून टाकले.

रागाने चित्रवर्ण आता शाप देत म्हणाला, ''तुझा निर्णय अटळ असेल, तर तुला यापुढे गंधर्वलोकात जागा नाही. तुला भूलोकातच



रहावं लागेल अन् या क्षणापासून तुझ्या साऱ्या मन्त्रशक्तीही नाहीशा होत आहेत.''

आपण शापग्रस्त झाल्याचे मणिकण्ठला जरासेही दु:ख वाटले नाही. भूलोकी पोचून तो मृणालिनीला भेटला. मृणालिनीने आपला पिता चन्द्रकेतू याला सगळी हकिकत सांगितली. त्याने मनापासून आपली संमती दर्शवली. 'आता मन्त्रशक्ती नाहीशी झालावर मणिकंठ वीरसेनला कसे जिंकू शकेल' याबद्दल मृणालिनीने त्याला विचारले.

''मन्त्रशक्ती गेली, तरी माझ्यात अपार बळ आहे. तुझ्याशी विवाह करण्यासाठी मी आपले प्राणही पणाला लावीन; युद्ध करून त्या वीरसेनचा सर्वनाश करीन.'' मणिकण्ठ पौरुष प्रकट करत म्हणाला.

महिन्याच्या आतच युद्धाची तयारी सुरु

झाली. मणिकंठ चन्द्रकेतुचा सेनापती बनला. त्याच्या नेतृत्वाखाली सैन्याने वीरसेनच्या किल्ल्याला वेढा दिला.

वीरसेनही चांगला पराक्रमी होता. दोघात घनघोर युद्ध झाले. दोन्ही सैन्ये आपापल्या राजासाठी निकराने लढली. युद्ध चालू असताना वीरसेनने फेकलेली एक बर्छी मणिकंठच्या शरीरात घुसणार इतक्यात एक सैनिक विजेच्या वेगाने मधे आला व बर्छी त्याच्या दंडात घुसली. त्याला पाहिल्यावर 'याला आपण कुठेतरी पाहिलं आहे' असे मणिकंठला वाटले.

आता मणिकण्ठनेही मोठ्या आवेशाने रथातून बाण काढून वीरसेनवर त्यांचा वर्षाव केला. एक बाण थेट त्याच्या छातीतच घुसला अन् जोरात ओरडून तो रथावरून खाली कोसळला. राजाच पडलेला पाहिल्यावर त्याचे सैन्य घाबरून विस्कळित झाले. सैनिक रणावरून पळू लागले.

रथावरून तावडतोब अुरून मणिकण्ठ आता आपणाला वाचवणाऱ्या सैनिकाला शोधू लागला. जखमी सैनिकांच्या शिबिरात त्याला तो सापडला. त्याला पहाताच मणिकण्ठ अवाक् झाला! तो दुसरा कोणी नसून गन्धर्वराजाची कन्या कान्तीमयीच होती! शिपायाच्या वेषात येअून तिनेच आपल्याला वाचवल्याचे त्याने ओळखले.

मणिकण्ठने भरपूर सेवा केल्यावर ती सावध झाली. डोळे अुघडल्याबरोबर त्याला पाहून तिने मान खाली घातली. मणिकण्ठ म्हणाला, ''हे काय केलंस कान्तीमयी? ज्यानं तुला लाथाडलं, त्याच्यासाठी एवढा मोठा त्याग? आपल्या प्राणाशी खेळलीस?''

क्षीण स्वरात ती अुत्तरली, ''तू नसलेल्या लोकात मी तरी कशी राहू शकणार? निदान तुला पहाता तरी यावं, म्हणून स्वेच्छेनं मी या लोकात आले. आपल्या मन्त्रशक्ती नाहीशा झाल्यावरही तू बलवान वीरसेनशी लढायचं





ठरवलंस. तुझ्यावर कसलं संकट येअू नये, तुला सर्व प्रकारची मदत करता यावी म्हणून मी हरक्षण युद्ध क्षेत्रातही तुझ्या आसपास राहिले. आपल्या मन्त्रशक्तीनं मी वीरसेनचा नाश करू शकले असते. पण आपल्या बाहुबळानं युद्ध जिंकून तुला आपली प्रेयसी मिळवता यावी; त्यात जो आनन्द तुला मिळेल, तो हिरावून घ्यायची माझी इच्छा नव्हती. तुला मी वाचवू शकले, यातच सर्वकाही मिळालं मला! त्यागात जे सुख आहे, ते स्वार्थात कुठे? आता जा आणि मृणालिनीशी विवाहित होअून सुखानं रहा.'' कान्तीमयीच्या डोळ्यात अश्रु तरारले.

तिच्याजवळ आपली कृतज्ञता व्यक्त करून निघून मणिकण्ठ मृणालिनीला भेटायला गेला. राजा चन्द्रकेतुने त्याचे अभिनन्दन केले. मृणालिनी मोठ्या आनन्दाने म्हणाली, ''आता आपला विवाह झालाच म्हणून समजा. विवाहानन्तर माझी आणखी एक इच्छा पूर्ण करावी लागेल तुम्हाला.''

''कसली इच्छा?'' मणिकण्ठने विचारले.

''काही फार मोठी इच्छा नव्हे. आपलं बाहुबळ अचाट आहे, आपला पराक्रम असामान्य आहे, आपण अुच्च कोटीचे धनुर्धारी आहात. माझी इच्छा अशी की, आसपासचे जेवढे म्हणून राजे असतील, त्या सर्वांना हरवून आपण चक्रवर्ती बनावं. तेंव्हाच मी महाराणी बनून सर्वांच्या आदराचं स्थान बनेन.''

यावर तीव्र स्वरात मणिकण्ठ म्हणाला, ''क्षमा करा युवराज्ञी, मी तुमच्याशी विवाह करायला तयार नाही.'' अन् झट्कन् तो तिथून निघून गेला.

गोष्ट संपवून वेताळ विक्रमला विचारू लागला, ''राजा, अखेरच्या क्षणी मणिकण्ठची ही वर्तणुक विचित्र नाही वाटत? आपल्या सख्यांसह अुद्यानात विहरणाऱ्या मृणालिनी-समोर आकाशातून अचानक तो अुतरून आला.



मी श्री मणिशंकर यांचा शिष्य आहे. आपल्या बाबतीत त्यांच्याकडून मी ऐकलंय. आपण दोघं एकाच गुरुकुलात शिकलात ना?''

आपल्या सहाध्यायाचे नाव ऐकताच राजवैद्याचे डोळे चमकू लागले. तो उत्साहाने म्हणाला, ''ओहो! अजूनही मणिशंकरला आठवण आहे माझी? त्यानंच तर नाही पाठवलं तुला माझ्याकडे?''

''नाही. एक महिन्यापूर्वीच शिक्षण संपलं माझं. माझं गाव इथून दोन कोस दूर आहे. तिथे मी आपला व्यवसाय सुरू करणार, इतक्यात आपण आजारी असल्याचं ऐकलं. बास, ताबडतोब इथे आलो मी!''

दयानन्दच्या बोलण्यावर हसत राजवैद्य म्हणाला, ''म्हणजे मी तुझ्या पहिलाच रोगी म्हणायचा! काही हरकत नाही. जी काही परीक्षा करायची, ती करून उपाय सुरू कर. माझ्या इतक्याच प्रतिभावान मणिशंकरचा शिष्य ठरलास तू; तुझ्यावर पूर्ण विश्वास आहे माझा!''

शर्माच्या उपायाने राजवैद्य इतक्या लवकर ठणठणीत बरा होईल, असं कुणाला वाटलंही नव्हतं! एका आठवड्यातच तो छान बरा झाला.

ही बातमी ऐकून राजा मन्त्र्याला म्हणाला, ''या तरुण वैद्यानं, आपल्या राजवैद्याची चिकित्सा करून आठवड्यात बरं केलं त्यांना. स्पष्टच दिसतंय, की हा आपल्या दरबारी वैद्यापेक्षा जास्त हुशार आहे. आपण आता आपल्या वैद्याला विश्रांती घ्यायला सांगून त्या जागी या तरुण वैद्याला नेमलं तर कसं होईल?''

''फारच छान महाराज!'' मन्त्री म्हणाला, अन् ताबडतोब त्यांनी शर्माला बोलावून घेतले.

पण त्यांचा प्रस्ताव नाकारत शर्मा म्हणाला, ''असं कोणतंही रहस्य किंवा कोणती चिकित्सा-पद्धत नव्हे, की जी आपल्या वैद्यराजांना माहीत नसेल! साधारणतः असं पहाण्यात आहे की, जे वैद्य दुसऱ्यांना औषधं देतात, ते स्वतः स्वतःवर उपचार करायला घाबरतात. राजवैद्यांच्या बाबतही असंच घडलं आहे.''

दयानन्द शर्माची समज अन् नम्रता या गुणांवर प्रसन्न झालेल्या राजाने राजवैद्याचा सहायक म्हणून त्याची नेमणूक केली.








## समुद्रकिनाऱ्यावर सहल - १७

# दक्षिणेचे महाद्वार

शब्दांकन : मीरा नायर ✲ चित्र : के.एस. गोपकुमार

कोरोमोंडेल किनाऱ्यावरून सहल करत आपण मामल्लपुरम्ला पोचतो. पल्लव राजांच्या काळात हे एक मोठे बन्दर होते. ई.स. च्या सातव्या शतकात पल्लव राजा नरसिंहवर्मन्ला एक पदवी होती - 'महामल्ल' - म्हणजेच महान् योद्धा. त्याने वसवलेले शहर 'महामल्लपुरम्' हे तमिळमध्ये. मामल्लपुरम् बनले, काही काळापासून लोक याला चुकीने 'महाबलिपुरम्' असे म्हणतात.

मामल्लपुरम् हे एक समृद्ध शहर होते. पल्लवांच्या वेळचे बंदर तर आता नष्ट झाले आहे, परन्तु खडक तासून बनवलेल्या मंदिरे आणि मूर्तींमुळे आजही हे स्थान प्रेक्षणीय आहे. खूप दुरवरूनही कलाप्रेमी व पर्यटक येथे येत असतात.

येथील सर्वात भव्य अशी कलाकृती अर्जुनाची तपस्या किंवा गंगावतरण नावाने ओळखली जाते. हे एका खडकात कोरलेले २९ मीटर लांब व १३ मीटर उंचीचे उठावाचे चित्र जगातले सर्वात मोठे उठावाचे चित्र मानले जाते. या खडकाचे वरचे टोक चिरले गेलेले असल्याने पावसाचे पाणी त्यातून झरते आणि खरोखरच स्वर्गातून गंगा उतरत असल्याचा आभास होतो.

विशाल शिलाखंड कोरून बनवलेली मंदिरेही मामल्लपुरम्मध्ये आहेत. यातल्या काहींना 'रथम्' असे म्हणतात



अर्जुनाची तपस्या किंवा गंगावतरण



पांडव रथ

यांचा आकार रथासारखा आहे. पाच रथ धर्मराज, भीम, अर्जुन, नकुल-सहदेव व द्रौपदीच्या नावाने ओळखले जातात. सर्वांना मिळून 'पांडव रथ' असे म्हणतात.

'गंगावरण' अथवा 'अर्जुन तपस्या' च्या पूर्वेकडे वराह व महिषासुरमर्दिनी गुंफा आहेत. त्यात पुराणकथा कोरलेल्या आहेत.

वराह गुंफेतल्या एका पॅनेलमध्ये विष्णु वराह-अवतार धारण करत असल्याचे आणि हिरण्याक्ष राक्षसापासून पृथ्वीचे रक्षण करत असल्याचे दृश्य कोरलेले आहे.

महिषासुरमर्दिनी गुंफेत दोन चित्रे कोरलेली आहेत. एकात दुर्गेचे महिषासुराशी युद्ध व असुरवधाचे दृश्य आहे. हा महिषासुर अत्यन्त बलवान होऊन त्याने इन्द्रादि देवतांना स्वर्गातून घालवून दिले. त्याच्या अत्याचारांमुळे त्रासून देव-देवतांनी आपसात विचार करून आणि आपापल्या दिव्यशक्ती एकत्र करून अंबिका किंवा दुर्गा नावाच्या एका देवीची निर्मिती केली. या देवीला त्यांनी आपापले सर्व श्रेष्ठ गुण आणि हत्यारे दिली. देवीने महिषासुराला आव्हान दिले. त्यांच्यात घनघोर युद्ध झाले व देवीच्या हातून महिषासुर मारला गेला. झेपावणाऱ्या सिंहावर बसलेली देवी रेड्याचा चेहरा असणाऱ्या असुराला मारून टाकत असल्याचे दृश्य येथे दाखवलेले आहे. ते पहाताना असे वाटते की जणू काही देवींच्या शरीरातून तिचे बळ व वेग प्रस्फुटित होत आहे!

समोरच्या पॅनेलमधे क्षीरसागरात शेषनागावर पहुडलेले विष्णु भगवानाचे चित्रण दिसते.

जवळ समुद्राला लागूनच एक 'जलशयन' मन्दिर आहे. इंग्रजीत याला 'शोअर टेम्पल' म्हणतात.



जलशयन मन्दिर

याचे द्वार पाण्याच्या इतके जवळ आहे की, मंदिरात मागील दाराने प्रवेश करावा लागतो. हे एक शिवमन्दिर असून त्याच्या चारी बाजूच्या घेऱ्याच्या भिंतीवर ठिकठिकाणी नन्दीच्या मूर्ती आहेत.

मामल्लपुरम् हे पाचव्या शतकातल्या महान् वैष्णव संतकवि भूत्तताळवार यांचे जन्मस्थान होय.

मामल्लपुरम्च्या कलासौन्दर्याचा विचार करत आपण पुढे जातो व आणखी एका कलात्मक ठिकाणी पोचतो. याचे नाव आहे - चोलमंडलम् आर्टिस्ट्स् व्हिलेज. कलाकारांनी मिळून ते वसवलेले आहे. अनेक कलाकार आपली घरे तेथे बनवून आपल्या कलाकृती विकून आपली गुजराण करतात. रंगित चित्रे, रेखाटने, मातीच्या मूर्ती आणि कला कौशल्याच्या वस्तुंचे एक स्थायी स्वरूपाचे संग्रहालय येथे आहे. कवितापठन व नृत्याचे कार्यक्रम ही येथे नियमितपणे होत असतात.



भारतातला सर्वात उंच ध्वजस्तंभ

आता आपला पुढला पडाव म्हणजे भारताचे चौथ्या नंबरचे महानगर आणि तमिलनाडुची राजधानी चेन्नै. अगदी अलिकडेपर्यन्त याला मद्रास असे म्हणत असत. हे शहर बंगालच्या खाडीच्या किनाऱ्यावर १७ कि.मी. लांब पसरलेले आहे. अन् यालाच 'दक्षिणेचे महाद्वार' असे म्हणतात.

१७ व्या शतकात इंग्रजांच्या ईस्ट इंडिया कंपनीने भारताच्या पूर्व तटावर आपली व्यापारी कोठी बनवायचे ठरवले आणि आजच्या चेन्नैच्या उत्तरेला ४० कि.मी. वर आर्मागाम नावाचे गाव यासाठी निवडले. परंतु व्यापारासाठी ती जागा ठीक नसल्याचे लवकरच उमगून आले आणि आर्मागामच्या कोठीचा अध्यक्ष फ्रान्सिस डे हा एकादी जागा पहाण्यासाठी नावेत बसून दक्षिणेकडे निघाला. २२ जुलै १६३९ रोजी चन्द्रगिरी राजाचा सामंत दामर्ला वेंकटाद्री नायक याच्या कडून मद्रास कुप्पम नावाचे गाव खरीदण्यात सफल झाला. त्यावेळी ती एक



फोर्ट म्युझिअम

उजाड आणि पडीक असलेली जागा होती. आसपासचे लोक या जागेला 'नरिमेडु' म्हणजे 'कोल्ह्यांचे टेकाड' असे म्हणत. पुढे हीच जागा मद्रास महानगराच्या रूपाने विकसित झाली.

डे याने येथे ईस्ट इंडिया कंपनीची कोठी स्थापित केली व नंतर कोठी व आसपासच्या इंग्रजांच्या वस्तीच्या संरक्षणासाठी तेथे एक किल्ला बनवला. किल्ल्याचे बांधकाम २३ एप्रिल १६४० रोजी पूर्ण झाले. इंग्लंडचा रक्षक सेंट जॉर्ज याच्या पुण्यतिथीचा हा दिवस असल्याने किल्ल्याचे नाव ठेवले - फोर्ट सेंट जॉर्ज.

किल्ल्याच्या आत 'चर्च ऑफ सेंट मेरी' नावाचे चर्च आहे. हे अँग्लो इंडियन संप्रदायाचे भारतातले पहिले चर्च होय. १६८० त ते बांधले गेले. भारतात पुरण्यात आलेल्या इंग्रजांच्या कबरींच्या दगडांनी याचे प्रांगण तयार झालेले आहे.

या चर्चमधे पहिला विवाह झाला गव्हर्नर एलिहु येल याचा. याच्याच दानातून नंतर अमेरिकेतील सुप्रसिद्ध येल विश्वविद्यालयाची स्थापना झाली. मद्रास फ्युसिलिअर्सचा झेंडा या चर्चमधे ठेवलेला आहे. ईस्ट इंडिया कंपनीने तयार केलेली हीच पहिली इंग्रजी रेजिमेंट.

फोर्ट म्युझिअममधे ऐतिहासिक दस्तावेज, नाणी, ताम्रपट, हत्यारे मूर्ती व मद्रास शहराच्या प्रारंभिक दिवसातल्या अन्य बऱ्याचशा वस्तु संग्रहित करून ठेवलेल्या आहेत. ही इमारत १६८३ मधे बनली. त्यात मद्रास बँकेची कचेरी होती. ही भारतातली पहिली आधुनिक बँक पुढे हिलाच इंपीरियल बँक व आता स्टेट बँक म्हणण्यात येते. या इमारतीच्या छतावर एक प्रकाशस्तंभ होता. शेअर-बाजारही येथेच भरत असे.

फोर्ट सेंट जॉर्जचा सागवानी ध्वजस्तंभ ५० मीटर उंचीचा असून भारतात इतका उंच ध्वजस्तंभ अन्यत्र कोठेही नाही. किल्ल्यातल्या इतर मुख्य इमारती म्हणजे - सचीवालय व तमिळनाडुचे विधान-भवन .

फोर्टपासून थोड्याच अंतरावर मरीना बीच असून ३.५ कि.मी. लांबीचा हा भारतातला दुसऱ्या क्रमांकाचा लांब वालुकामय समुद्रकिनारा आहे. संध्याकाळी ताजी हवा खाण्यासाठी हजारो लोक येथे येतात. तमिळनाडुचे भूतपूर्व मुख्यमन्त्री सी.एन. अण्णादुरै यांची समाधीही येथेच आहे.

१९६७ मधे तमिळनाडुत द्राविड मुन्नेत्र कळघम (डी.एम.के.) चे पहिले सरकार बनले, तेव्हा अण्णादुरै त्याचे पहिले मुख्यमन्त्री होते. तमिळ जनतेत त्यांनी नवीन चेतना जागवली आणि डी.एम.के. ला अखिल भारतीय राजनीतीत स्थान बनवून दिले. तमिळ जनता प्रेमाने त्यांना 'अण्णा' (मोठा भाऊ) म्हणत असे. मुख्यमन्त्री-पदावर असतानाच त्यांचे निधन झाले व अंत्येष्टी मरीना बीचवर झाली. लाखोंच्या संख्येने अश्रुभरल्या डोळ्यांनी लोकांनी त्यांना निरोप दिला. ही समाधी आता तीर्थस्थान बनली आहे. तिच्या दर्शनाला रोज हजारो लोक येत असतात.



अण्णा समाधी





# तोट्यातला फायदा

मंगा शहरातली अन् शेखर खेड्यातला. दोघांचं लग्न झालं. शिक्षणानंतर शेखर नोकरी शोधायला लागला. वडील अचानक वारल्यामुळे गावात परत येऊन तो कौटुम्बिक जबाबदाऱ्या संभाळू लागला. आई जास्त करून आजारीच असे. एक बहीण होती, तिच्या लग्नाची जबाबदारीही होतीच. त्यामुळे नोकरीचा विचार सोडून देऊन तो शेतीवाडीत लक्ष घालू लागला.

मंगाला खेड्यात रहाणं मुळीच आवडेना. सासरी येऊन चार महिनेही झाले नाहीत, तोच ती ''हे घर की तुरुंग? हवाही नाही अन् पुरेसा प्रकाशही नाही या घरात! घरभर सगळीकडे माशा अन् झुरळं! पाहू तिथे उंदीर! संध्याकाळी कुठे बाहेर जावं म्हटलं, तर राममंदिराशिवाय कुठली जागाच नाही! इथं सहा महिने राहिले तरी वेडच लागेल मला.'' असे नवऱ्याजवळ बोलून ती आपली असंतुष्टता प्रकट करू लागली.

''चांगली पंचवीस वर्षं मी तर इथे आरामात रहातोय. तू शहरातनं आलीयस ना, म्हणून नव्या परिस्थितीशी जुळवून घ्यायला थोडा वेळ तर लागेलच ना!'' शेखर समजूत घाली.

परन्तु दिवसेदिवस मंगाची भुणभुण वाढतच राहिली. कसंही करून शहरात आपला संसार हलवायची तिची तीव्र इच्छा होती. माहेरी जाऊन वडिलांना ती म्हणाली, ''बाबा, कसंही करून आपल्या जावयासाठी शहरातच एकादी नोकरी शोधा. त्या भिकारड्या गावात रहाणं अशक्य आहे मला!'' रडून-भेकून वडिलांजवळ ती तक्रार करत राहिली.

एका मित्राकरवी वडिलांनी जावयासाठी एक नोकरी शोधून काढली. शहराजवळच एका मोठ्या गावात त्यांनी शेखरसाठी नोकरी

साधना अष्टपुत्रे



मिळवली.

या बातमीनं मंगा फारच खूश झाली. रात्री जेवण वाढताना ती नवऱ्याला म्हणाली, ''आता आपलं बाड-बिस्तर बांधा. दोन दिवसात या घाणेरड्या गावातून मुक्त होणार आपण!'' काय प्रकार आहे, हे शेखरला समजेना. तेंव्हा सर्व स्पष्ट करत मंगा म्हणाली, ''माझ्या बाबांनी उद्धार केलाय तुमचा, इथे माती मळायच्या दुर्भाग्यातून वाचवलंय तुम्हाला!'' ती हे सर्व अशा कुर्च्यात् म्हणाली की, जणू काही आपल्या बापानं एकादी अगदी अशक्य गोष्ट शक्य करून दाखवलीय!

जरासा विचार करून शेखर म्हणाला, ''घडतं ते आपल्या भल्यासाठीच घडतं. असं म्हणतात. शहरात आईचं औषधपाणीही नीट होऊ शकेल. आपण ज्या गावात जाणार आहोत, ते शहराला लागूनच असल्यामुळे आपल्या ताईलाही कदाचित् बरंसं स्थळ मिळून जाईल. शेत कुणाच्या हाती सोपवून आपण जाऊया इथून!''

त्याच्या बोलण्यानं मंगा तर सर्दच झाली! पण कसंतरी सावरून म्हणू लागली, ''वा, वा! तुमच्या बुद्धीची तारीफ करावी तितकी थोडीच! शेत कुणाच्या हाती सोपवलं, तर आपल्याला काय मिळेल? ठेंगा? आपली मिळकत कमी नाही व्हायची? तुमची आई अन् बहीण इथं राहून शेतीचं काम कुणाकडून करून घेत राहिल्या तर ती अडचण दूर होईल ना? ताईच्या लग्नालाही शेवटी पैसा हवाच नं!''

शेखरला ही व्यवस्था विशेष आवडली नाही, पण नाइलाजानं त्याला मंगाबरोबर जावं लागलं, तिच्या हट्टापुढे वाकावंच लागलं. शेतीचा भार आई आणि बहिणीवर सोपवून तो मंगाबरोबर निघून गेला.

नवं गाव मंगाला फारच आवडलं. शेखरही नव्या नोकरीत लक्ष घालू लागला. एकदा गणेशचतुर्थीला गावाला जाऊन परत येताना शेखरची बहीण त्याला म्हणाली, ''दसऱ्याच्या उत्सवाला आम्ही दोघी तुझ्याकडे येऊ अन् दिवाळी करून परत येऊ. शहर पहावंसं फार वाटतं मला!''

सासू-नणदेनं इथे येऊन इतके दिवस रहावं हे मंगाला पसन्त नव्हतं. त्यामुळे दसऱ्यापूर्वीच आपली तब्येत फार बिघडल्याचं तिनं नाटक केलं. नाइलाजानं शेखरला गावाकडे निरोप द्यावा लागला की, 'त्या दोघींनी आत्ता न येता फक्त दिवाळीलाच यावं.' आता दिवाळीही आली. मंगा शेखरला म्हणाली, ''दसऱ्यालाच साडी घेतल्यामुळं आता मला रेशमी साडी नको. मला आपल्या चार हजाराच्या बांगड्याच करून द्या सोन्याच्या!''

शेखर हसून म्हणाला, ''हो, हो! घेईन की! आई अन ताई प्रथमच आपल्याकडे येत आहेत, तेंव्हा त्या दोघीना एकएक रेशमी रेशमी साडीही घेऊया.''

''अं? साडी घ्यायची म्हणालात प्रत्येकीला? आत्ताच इतका खर्च कशाला म्हणते मी? ताईंना साडी लग्नात घेऊया. मला वाटलं होतं की, तुमच्याजवळ जास्त पैसे नसतील, म्हणून मी फक्त चार बांगड्याच मागितल्या. आता साड्यांना लागणारी रक्कम जोडून बांगड्याऐवजी मला हारच हवा. बांगड्या नकोत!'' हट्टाने मंगा म्हणाली.

शेखरनं तिला समजावायचा खूप प्रयत्न केला पण तिच्यावर जराही परिणाम होईना. त्याच दिवशी ती शेखरबरोबर भाड्याच्या गाडीनं शहरात गेली.

दागिन्यांच्या एका दुकानात काचेमागे ठेवलेला एक हार मंगाला फार आवडला. दुकान गिऱ्हाइकांनी खूप भरलेलं होतं. हार दाखवून मंगानं किंमत विचारली. वजन करून दुकानदार म्हणाला, 'गिन्नी हजार रुपये. हार सात गिन्नींचा आहे. सात हजार रुपये किंमत याची.'

किंमत खूपच जास्त होती, पण मंगानं हट्ट धरला की, 'घ्यायचा, तर तो हारच घ्यायचा!' थोड्याच अंतरावर कामात गढलेल्या एका नोकराला दुकानदार म्हणाला, ''हार, सात गिन्नींचा!'' अन् तो पेटीत ठेवून



त्याने मंगाच्या हाती दिला.

हाराचं वजन बहुधा त्या नोकरानं नीट ऐकलं नाही. 'तीन गिन्नी' असं समजून त्यानं तीन हजार रुपये घेऊन पावतीही दिली. शेखर दुकानदाराला ही चूक दाखवून देणार, इतक्यात मंगा पट्कन म्हणाली, 'वेड लागलय का? दिवाळीच्या मुहूर्ताला कोणी लक्ष्मी नाकारतं काय? मुकाट्यानं तीन हजार देऊन भरकन् बाहेर पडूया इथून ! उरलेल्या चार हजारात आता बांगड्याही घेऊया.''

तीन हजार देऊन शेखर बाहेर आल्यावर मंगाला म्हणाला, ''आता पैसे आहेत आपल्याजवळ यातून त्या दोघींसाठी साड्या घेऊया.''

''हे बरंय की? मी अडवलं नसतं, तर हे चार हजार दुकानदाराच्या तिजोरीत गेले

असते. ही रक्कम तर माझीच आहे ना! त्यावर तुमचा काय अधिकार?'' मंगा नाराजी दाखवून म्हणाली. शेखर काही बोलू शकला नाही.

घरी पोचल्यावर त्यांना आढळलं की हाराचा फासा अगदी तुटायला झाला आहे. दुसऱ्या दिवशी ते सोनाराकडे गेले. जरा घुमवून फिरवून पाहून दुकानदार म्हणाला, ''सोन्याच्या हाराला काय फासा लावतात? विचित्रच आहे सगळं!''

आपल्यावर वीजच कोसळल्यासारखं वाटलं मंगाला! शहरच्या दुकानदारानं अगदी दिवसाढवळ्या लुटलं होतं त्यांना! त्याच दिवशी ती नवऱ्याबरोबर शहरात गेली. दुकानदाराला पहाताच रागानं थरथरत, ''किती लबाडी ही! तुम्हाला पोलीसच्या हवालीच करायला हवं!'' असं म्हणत तिनं हार त्याच्या हाती दिला.

दुकानदारानं हाराचं वजन करून म्हटलं, ''हा सात गिन्नीचा हार आहे. आम्ही तीन गिन्नीचा हार विकला तुम्हाला. तुम्हीच फसवताय आम्हाला. मीच बोलावतो पोलीसला आत्ता!''

आता दोघा नवराबायकोंच्या लक्षात आलं की, अशा प्रकारानं फसवण्यासाठीच वजन कमी लिहून कमी पैसे घेतले जातात इथे. पण आता करणार तरी काय? मुकाट्यानं घरी परतले ते. गाडीत चढत मंगा म्हणाली, ''कष्टाचे पैसे चोरापोटी गेले. ती फसवेगिरी आठवून आग होतेय शरीराची. वाटतंय की जाऊन त्याचा गळा घोटावा!''

शेखर हसत म्हणाला, ''हे पहा मंगा, तू आपली चूक समजून घ्यायचा प्रयत्न करत नाहीयेस. तूच तर प्रथम त्या दुकानदाराला फसवू पहात होतीस. आता त्याची गैरबुद्धी पाहून चिडते आहेस त्याच्यावर! पण तू तर हेही विसरते आहेस की आपली सासू अन् नणंदे बाबत तुझी वागणूक किती गैर आहे! दुकानदाराबद्दल तुझ्या मनात असलेले विचार मी तुझ्याबाबत केले तर आपण एकमेकांबरोबर राहू शकू का नवरा बायको म्हणून?''

आता मंगाचेही डोळे खाडकन् उघडले! तिनं आपली चूक कबूल केली. बायकोत झालेलं परिवर्तन पाहून शेखरला आनन्द वाटला. दागिन्यांच्या दुकानात तीन हजाराचं नुकसान झालं, पण आता त्याला वाटू लागलं, की झालेला लाभच जास्त किंमतीचा आहे!





# चांदोबा सोनेरी क्षण - ११



## जगात हे कोठे आढळेल?



**१....हे अद्भुत बौद्ध महाकाय-मन्दिर?**
इ.स. च्या आठव्या शतकात हे बांधले गेले. बौद्धधर्माच्या दोन शाखांपैकी अुदारपंथी महायान पंथाचे हे सर्वात विशाल बौद्धमन्दिर होय. हा पंथ इ.स.पू. च्या पहिल्या शतकात अस्तित्वात आला.

**२....आज जिवन्त असणारा हा अतिप्राचीन वृक्ष?**
बायबलमधे म्हटले गेले आहे की मेथुसेल। ९०० वर्षे जगले, या वृक्षाला त्याचेच नाव दिले गेले आहे. पण सुईसारख्या टोकदार शाखा असलेला हा देवदार वृक्ष मात्र ४,६०० वर्षांचा आहे.



**३.... क्लिओपात्राची सुई?**
हा भव्य काळ्या ग्रेनाईटचा स्तंभ जवळजवळ ३,५०० वर्षांचा आहे. हे सूर्यमन्दिर इजिप्तचा तिसरा फारो तुट्मोस याने इ.स.पू. १४७५ मधे बांधले.



**४.... सुस्काऱ्यांचा पुल?**
पुलापलिकडे असलेल्या तुरुंगात कैद्यांना डांबले जात असे. पुल पार करता- ना मागे पडलेल्या आपल्या शहरा- कडे पाहून कैदी तुरुंगवासा- पूर्वीचे आपले शेवटचे सुस्कारे येथे सोडत असत.



# चित्र कोडे



हे चित्र लक्षपूर्वक पाहून त्यातली चूक ओळखा.

## साहसी समुद्रयात्रा

हे सान्ता मारिया जहाजाचे चित्र आहे. क्रिस्तोफर कोलंबस यातूनच आपल्या शोधयात्रेला निघाला होता.

# कूट प्रश्न



१. शेजारच्या आकृतीत ३० हून अधिक त्रिकोण आहेत. तुम्ही बरोबर आकडा सांगू शकाल?



२. आगपेटीच्या सतरा काड्यांनी वरील सहा एकसारखे चौरस बनले आहेत. त्यापैकी पाच काड्या काढून टाकून फक्त तीन चौरस धुरवून दाखवा.

३. यांपैकी कोणत्या जनावरापासून आपणाला मूल्यवान दन्त प्राप्त होतात?








# बुद्धि कौशल्याचे प्रश्न



१. एका चाकात अजिबात हवा नाही, हे ध्यानात न घेऊन एकाने आपली मोटरगाडी दिल्लीपासून आग्र्यापर्यन्त चालवली. हे कसे शक्य झाले?

२. एक मीटर लांबीची दोरी कुत्र्याच्या गळ्यात बांधली. पण तीन मीटर अंतरावरच्या हाडकापर्यन्त तो सहज पोचला. कसे काय?




३. एका चोराने पळून जाण्यासाठी वापरलेली कार उभ्या असलेल्या काही गाड्यांच्या ओळीत मधेच उभी करून सोडून दिली. इन्स्पेक्टर प्रताप ने त्याला ती सोडून जाताना पाहिले तर नाही. पण कार त्याने बरोबर ओळखली. हे कसे शक्य झाले याची काही कल्पना करू शकता?



४. एक मुका-बहिरा हातोडी खरेदीसाठी दुकानात गेला. बोलता येत नसल्याने त्याने ठोकायचा अभिनय केला व दुकानदाराने ताबडतोब त्याला काय हवे हे ओळखले. नंतर दुसरा एक मुका-बहिरा स्क्रू-ड्रायव्हर खरीदायला गेला व त्याचा अभिनयही दुकानदाराने बरोबर ओळखला. नंतर एक आंधळा तेथे करवत खरीदायला गेला. आपल्याला हवी असलेली वस्तु मिळवण्यासाठी तो कसा अभिनय करेल?

## हे करून पहा

## अंकुरणारा हत्ती



**साहित्य**

मध्यम आकाराचा बटाटा, प्लॅस्टिसिन, आइस्क्रीमच्या चार पट्ट्या, स्पंजचा एक लहान तुकडा, धन्याचे काही दाणे.

**कृति**

१. प्लॅस्टिसिनच्या लहान लहान गोळ्यांनी हत्तीची सोंड, डोळे व कान बनवून चित्रातल्याप्रमाणे बटाट्याला चिकटवा.

२. आइस्क्रीमच्या पट्ट्या पायांच्या जागी खोचा.

३. पाठीवर बटाट्यात एक बारीक खड्डा बनवून त्यात पाण्याने भिजवलेला स्पंजचा तुकडा आणि धने टाका.

४. थोड्याच दिवसात हत्तीच्या पाठीवर कोथिंबीर उगवताना दिसेल.

## L अक्षरापासून सिंह




## सोनेरी क्षण १० - ची उत्तरे



**जगात कोठे आढळेल?**

१. जपानमधे फुजियामा
२. मियन्मार (ब्रह्मदेश)
३. लंडनमधे (इंग्लंड)
४. मादागास्कर
५. किंबर्ले (द. आफ्रिका)

**गोष्टीचे कोडे**

हॅटचा आकार मोठा असल्याने, ती वापरणाराचे डोके मोठे असावे इतपर्यन्त होम्सचे म्हणणे बरोबर आहे. पण त्याचे डोके मोठे, त्याची बुद्धीही मोठी ही त्यांची कल्पना बरोबर नव्हे. माणसाची बुद्धी डोक्याच्या आकारावर अवलंबून नसते. वर्णन पाहून हे स्पष्ट होते की हॅटधारकापेक्षा होम्सचे डोके लहान आहे. पण त्याचा असा अर्थ नव्हे की होम्स त्याच्यापेक्षा बुद्धीने कमी आहे.

**चित्रकोडे**

रेड इंडियन्सजवळ घोडे असणे शक्य नाही. स्पेनच्या लोकांनीच नंतर घोडे अमेरिकेत नेले

**कूट प्रश्न-**

१. आर्चर मासा, पाणी मारून तो कीटकांना खाली पाडतो २. मृत समुद्र नाव समुद्र असले तरी खरा तो एक तलावच आहे. ३. पोर्तुगाल





# महाभारत

दुर्योधन अगदी मरता-मरता वाचला. इतका घोर अपमान त्याला सहन होईना. तो हस्तिनापुरकडे निघाला. वाटेत एका सरोवर-किनारी तो विश्रान्तीसाठी थांबला.

युद्धक्षेत्रातून पळालेला कर्णही तेथे येऊन पोचला. आपण पळून गेल्यानंतर काय काय घडले हे त्याला ठाऊक नव्हते. तो बोलू लागला, ''दुर्योधना, तुझ्या पराक्रमाची कितीही प्रशंसा केली तरी कमीच. त्या गंधर्वांना जिंकून तू आता हस्तिनापुरकडे परतत आहेस? मी तोंड देऊ न शकल्यानं विकर्णच्या रथातून पळून जाऊन लपून बसलो. आत्ताच तिथून परत आलोय. तुझ्या सारखा वीरपुरुष या जगात दुसरा कोणी नसेल.''

कर्णाची प्रशंसा ऐकून दुर्योधनाच्या मनाची जखम वाहू लागली. त्याने कर्णाला सर्व काही सांगितले आणि म्हटले, ''युद्धात मी जिंकलो असतो तर मला कीर्ती मिळाली असती, मेलो असतो तरी वीरगती मिळाली असती. या अपमानाचं ओझं घेऊन मी हस्तिनापुरला जाऊ शकणार नाही. मी कोणालाही तोंड दाखवायच्या लायकीचा राहिलो नाही. मला जीवनाची विरक्ती आलीय. इथेच प्रायोपवेशन करून प्राणत्याग करीन मी. तुम्ही सर्वजण हस्तिनापुरला परत जा. या दुःशासनाला राजमुकुट घाला अन् सर्व मिळून राज्यकारभार सांभाळा'' अन् त्याने दुःशासनाला आलिंगन दिले.

कर्ण म्हणाला, ''अरे तुम्ही दोघं कसला शोक करताय? पांडवांनी तुम्हाला सोडवले, याबद्दल इतकं दुःखी व्हायचं काय कारण? ते तर तुमची प्रजाच आहेत. तुमची सेवा करणं हे कर्तव्य आहे त्यांचं! अपमान वाटण्यासारखं काय आहे त्यात? मरायची भाषा करतोयस तू? ही गोष्ट तुझ्या सामंतांना



कळली, तर ते तुला भ्याड, भित्रा समजतील. तू पांडवांचं सर्वस्व हिरावून घेतलंस, तेंव्हा त्यांनी केलं प्रायोपवेशन? असल्या विचारांना मनात स्थान देऊ नकोस.''

शकुनीही त्याचे सांत्वन करत म्हणाला, ''हे काय करतो आहेस तू? मी द्यूतात पांडवांना हरवून त्यांच्याकडून सर्व हिरावून घेतलं, त्यावर बोळा फिरवणार तू? मी मिळवून दिलेलं सारं काही मातीला मिळवणार? प्रायोपवेशनाचा विचार सोडून चांगला आरामात, सुखानं जग बाबा!''

पण दुर्योधनाला कोणाचेच बोलणे बरोबर वाटत नव्हते; उलट कडू वाटत होते सारे काही! त्याने कुश पसरली, वल्कले धारण केली आणि तो प्रायोपवेशनाला बसला.

देवांच्या हातून हरलेले दानव पाताळात लपले होते. दुर्योधनाने प्रायोपवेशन दीक्षा घेतल्याचे कळल्यावर त्याला आपल्याकडे बोलावून घ्यावे असे त्यांना वाटले. त्यासाठी त्यांनी अग्नि प्रज्वलित करून अथर्ववेदाचे मन्त्रोच्चारण सुरू केले दुधाच्या आहुती सुरू केल्या. तेंव्हा त्या अग्नीतून कृत्या नावाची शक्ती आळस देत बाहेर आली. दानवांसमोर उभी राहून तिने विचारले, ''काय करू मी तुमच्यासाठी?''

''भूलोकात दुर्योधनाने प्रायोपवेशन दीक्षा घेतली आहे. त्याला या पाताळ लोकात घेऊन ये.'' दानवांनी तिला आज्ञा देताच ती दुर्योधनाला घेऊन आली.

रात्रभर दानवांनी दुर्योधनाला आपल्याजवळ बसवले. त्याचे मनोरंजन करून ते म्हणाले, ''तुझे सामन्त महाशूर आहेत. तू एक उत्तम क्षत्रीय आहेस. आपला धर्म सोडून हे प्रायोपवेशन का करत आहेस? यामुळे तुला आत्महत्येचं पाप लागेल. या पापाशिवाय दुसरं काहीच मिळणार नाही तुला. ना सुख मिळणार, ना कीर्ती. पण हां, इतकं मात्र खरं, की तुझ्या या उपासामुळे शत्रूला खूप आनन्द वाटेल. आमच्या बोलण्यातलं तथ्य जाणून घे. ईश्वराच्या वरामुळे तुझं शरीर वज्रासारखं कठीण बनलेलं आहे. तुझ्या शरीराचा खालचा भाग आम्ही सर्जित केला आहे. तू काही कोणी सर्वसामान्य माणूस नव्हेस. तूही देवांसारखाच आहेस. युद्धात तुझ्या बाजूने जे लढतील, ते सगळे आमचेच अंश आहेत. तुझा मित्र कर्ण हा नरकासुराचा अंश आहे. तेंव्हा आता काळजी सोड आणि



निर्भयतेनं आपला राज्यभार संभाळ. पांडवांचा पराभव होईल, त्या दिवसाची प्रतीक्षा कर.'' तप्त दुर्योधनाच्या मनाला या उत्साहभरल्या शब्दांनी शांत करून त्यांनी त्याला परत पाठवले. कृत्या त्याला भूलोकी कुशासनावर निजवून निघून गेली.

दुर्योधन सकाळी जागा झाला तेंव्हा त्याला हे सर्व स्वप्नासारखे वाटत होते. म्हणून याबाबत तो कोणाशीच काही बोलला नाही.

या वेळी मात्र दुर्योधनाचे मन बदलण्यात कर्ण यशस्वी झाला. अन् दुर्योधन आपल्या परिवारसह वैभवाने हस्तिनापुरला परतला.

भरसभेत भीष्म दुर्योधनाला म्हणाले, ''आम्ही मनाई करत असूनही तू घोषयात्रेच्या निमित्तानं जाऊन शेवटी पराजित होऊन परतलास. मानखंडना झाली तुझी. धर्मराजाने तुझी प्रतिष्ठा रक्षण करून तुझ्याशी औदार्याची वागणूक केली. कर्णाच्या बोलण्यावर विश्वासून तू इतक्या थोर माणसाशी शत्रुत्व पत्करलेस. ज्या कर्णाला तू मित्र मानतोस, तो तर तुम्हाला गंधर्वाशी झगडायला सोडून देऊन, स्वतः मात्र रणक्षेत्रावरून पळून आला. अजूनही वेळ गेलेली नाहीय. पांडवांशी स्नेहसंबंध स्थापन करून वंशाचं रक्षण कर.''

दुर्योधन यावर विकटपणे खदाखदा हसला आणि कर्ण, शकुनी, दुःशासन यांना बरोबर घेऊन तो सभाभवनातून निघून गेला. भीष्मांचे बोलणे ऐकून कर्ण मात्र लज्जित झाला व त्याने मान खाली घातली. जाणूनबुजून आपला घोर अपमान करण्यात आलेला



आहे, असे त्याला वाटले. दुर्योधनाला तो म्हणाला, ''राजा, मला सैन्य दे. भीम, अर्जुन, नकुल, सहदेव या सर्वांनी मिळून जितके देश जिंकले, त्यापेक्षा अधिक मी एकटाच जिंकून तुला समर्पण करीन. मग हा वृद्ध भीष्म माझ्याबद्दल असं बोलू धजणार नाही. त्याच्याही मनात माझा मान वाढेल अन् स्वतःला 'लायक' शाबित करायची संधी मला लाभेल.'' दुर्योधनाने त्याला होकार दर्शवला.

कर्ण ससैन्य दिग्विजयासाठी बाहेर पडला. सर्वात अगोदर त्याने द्रुपदाला हरवले, त्याच्याकडून कर-वसुली केली. नंतर तो उत्तरेकडे वळला. अंग, वंग, कलिंग, मगध, मत्स्य, कोसल आदि देशांच्या राजांना हरवून त्यांच्याकडूनही खंडणी घेतली. यानन्तर त्याने



दक्षिणेकडे मोहरा वळवला. अन् अनेक राज्ये जिंकली. कुंडिननगरचा राजा रुक्मि याने युद्ध न करता कर्णाशी हातमिळवणी केली. अशा प्रकारे आपली विजययात्रा करून काही दिवसांनी कर्ण पुन्हा हस्तिनापुरला दाखल झाला.

दुर्योधनाने कर्णाचे अभिनन्दन केले. तो म्हणाला, "भीष्म, द्रोण, बल्हिक असे कितीतरी जण माझ्या पक्षात आहेत पण तू मला केलेली मदत यांपैकी कोणीच करू शकले नाहीत. तूच माझा खरा मित्र विश्वभरात तुझ्यासारखा तूच."

कर्णाच्या दिग्विजयामुळे दुर्योधनालाही राजसूय यज्ञ करायची दुर्बुद्धी झाली. त्यासाठी आवश्यक ती तयारीही त्याने केली. ऋत्विजांना बोलावून त्याने यज्ञ सुरु करायला सांगितले.

परन्तु ऋत्विजांनी अडचण सांगत म्हटले, "पांडवांना जिंकलंत, तरच तुम्हाला हा यज्ञ करायचा अधिकार प्राप्त होईल. याशिवाय अजून तुमचा पिता जिवन्त आहे. ते जिवन्त असेपर्यन्त तुम्हाला चक्रवर्ती बनायचा अधिकार नाही. राजसूय यज्ञासारखाच एक वैष्णव नावाचा यज्ञ आहे. हवा तर तुम्ही तो यज्ञ करू शकाल."

ही गोष्ट आपले बंधु, कर्ण व शकुनीला सांगितली तेंव्हा त्यांनी दुर्योधनाला ऋत्विज सांगत असलेला यज्ञ करायचा सल्ला दिला. त्यासाठी आवश्यक ती व्यवस्था सुरू झाली. नगराबाहेर एक यज्ञशाला बांधली गेली. त्यावेळी पांडव द्वैतवनात रहात होते. एका दूताकरवी दुर्योधनाने यज्ञाची खबर त्यांना कळवली.

धर्मराज त्या दूताला म्हणाला, "ही फार महत्वाची गोष्ट आहे की आमचा बंधु दुर्योधन यज्ञ करत आहे. आम्हालाही त्यात भाग घेण्यासाठी तेथे यायला आवडले असते, पण त्यामुळे आमची वनवास-दीक्षा भंग होईल; म्हणूनच आम्हाला येता येणार नाही."

भीम त्या दूताला म्हणाला, "आमचा वनवास आणि अज्ञातवास पूर्ण झाल्यावर आमचा अग्रज धर्मराज दुर्योधन आणि त्याच्या भावांना बलिपशु म्हणून राखून आमच्या शस्त्रांनीच यज्ञ पूर्ण करेल. दुर्योधनाला जाऊन सांग की त्या यज्ञाला मात्र मी नक्की अुपस्थित राहीन."

दुर्योधनाने वैष्णवयज्ञ शास्त्रोक्त पद्धतीने पार पाडला. त्याचे अभिनन्दन करत कर्ण





म्हणाला, "येत्या युद्धात मी पांडवांना मृत्युलोकी पोचवीन. आणि तुझ्याकरवी राजसूययज्ञ करीन. पहातच रहा, ही प्रतिज्ञा मी कशी पार पाडतो ते!"

पांडव बराच काळ द्वैतवनात राहिले. त्यांच्या शिकारीमुळे तिथली पशुसंख्या बरीच घटली. त्यामुळे युधिष्ठिर आपल्या बंधुंसह परत काम्यकवनात गेला. तेथे कन्दमुळे व फळे खाऊन ते काळ कंठू लागले.

वनवासाची अकरा वर्षे पूर्ण झाली. कधी-कधी 'आपण द्यूत खेळलो नसतो तर आपले बंधु व द्रौपदी यांना इतका त्रास सहन करावा लागला नसता.' असे विचार त्याच्या मनात येत. भविष्याचा विचार केला तर याहीपेक्षा जास्त दुःखी होई त्याचे मन. पांडवांना मारून टाकण्याचे वचन कर्णाने दुर्योधनाला दिले होते. या साऱ्या आठवणी झाल्यावर त्याचे मन दुःखभाराने दबून जाई. त्या रात्री मग त्याला झोपही येत नसे.

एकदा व्यास त्यांना भेटण्यासाठी काम्यकवनात आले. पांडव बलहीन झाल्याचे त्यांच्या लक्षात आले. त्यांना धैर्य देत त्यांनी भविष्यवाणी केली की, तेरा वर्षांचा काळ सफलतापूर्वक पूर्ण होऊन त्यांना त्यांचे राज्य नक्कीच परत मिळेल.

अशा प्रकारे इकडे पांडव अरण्यात तऱ्हेतऱ्हेची संकटे झेलत होते, तर तिकडे दुर्योधन, शकुनी, कर्ण आदि त्यांना जास्त कसा त्रास द्यावा, त्यांच्या हातून नियम-भंग होण्यासाठी काय करावे यासाठी नेहमी योजना बनवत रहात.

अशातच एकदा आपल्या दहा हजार शिष्यांनिशी दुर्वास हस्तिनापुरी अवतरले! ते फारच तापट होते. त्यांच्या आतिथ्यात थोडीही कसर राहिली, तरी ते शाप देत असत. म्हणून दुर्योधनाने मोठ्या श्रद्धा व भक्तीने त्यांची सेवा केली. खूपच विनय व नियमबद्धतेने वर्तणुक केली.

दुर्वासांनीही दुर्योधनाची अनेक प्रकारे परीक्षा घेतली. "राजा, मला भूक लागलीय. आत्ता स्नान करून येतो." असे सांगून दुर्वास निघून जात व खूप अुशीरपर्यन्त परतही येत नसत. आल्यावर म्हणत, "आता मला भूक नाहीय."

एकदा मध्यरात्री अुठून ते म्हणाले, "आम्हा सर्वांना भूक लागलीय. जेवण वाढले, तर म्हणाले, "आमच्यातल्या कोणालाच भूक नाहीय." कधी-कधी तर



''अरे, हे काय भोजन आहे?'' असे म्हणून उठून जात.

अशा प्रकारे दुर्वासांनी अनेक प्रकारे सतावूनसुद्धा दुर्योधनाने मनावर ताबा ठेवून त्यांची सर्व प्रकारची सेवा केली. खुशीने दुर्वास त्याला म्हणाले, ''राजा, तुझ्या सेवेनं खूप प्रसन्न झालोय मी. बोल काय देऊ तुला?''

दुर्वासांनी आपल्याला शापले नाही याचा दुर्योधनाला फार आनन्द वाटत होता. त्याने शकुनि, कर्ण, दुःशासन यांचा सल्ला घेतला व तो दुर्वासना म्हणाला, ''स्वामी, परम धर्मात्मा धर्मराज सध्या अरण्यात आहे. त्याच्याबरोबर त्याचे भाऊ, द्रौपदी आणि अनेक ब्राह्मण आहेत. द्रौपदी या सर्वांना पोटभर अन्न देऊन अन् नंतर स्वतः भोजन करून झोपली असेल, अशा अगदी नेमक्या वेळी आपण आपल्या शिष्यगणांसह तेथे पोचावं. अन् आतिथ्याची मागणी करावी. बास, हाच वर हवा मला.''

दुर्योधनाची मागणी पूर्ण करण्यासाठी दुर्वास आपल्या शिष्यगणांसह काम्यकवनाकडे निघाला. दुर्योधनाच्या आनन्दाला आता पारावार नव्हता. तो म्हणाला, ''आता पांडवांना नक्की दुर्वासांकडून शाप मिळेल. त्यांचा सर्वनाश ओढवलाच आता. इतक्या दीर्घ काळानन्तर माझी इच्छा पूर्ण होणार.'' शकुनी, दुःशासन यांनाही आनन्द वाटला.

काम्यकवनात त्या दिवशी द्रौपदीने आपले पति, ब्राह्मण इत्यादींना भोजन दिले आणि नंतर स्वतः भोजन करून ती झोपली.

त्याच वेळी आपल्या दहा हजार शिष्यगणांसह दुर्वास तेथे पोचले. आपल्या बंधूंसह सामोरा जाऊन युधिष्ठिराने त्यांचे स्वागत केले; आणि पाद्यपूजा केली. तो दुर्वासांना म्हणाला, ''महात्मन् आपल्या शिष्यपरिवारासह आपण माझे आतिथ्य ग्रहण करावं.''

या महारण्यात रहात पांडव इतक्या सर्वांना भोजन कसे देऊ शकतील याचाही दुर्वासांनी विचार केला नाही. त्याने सहजपणे त्यांचे आतिथ्य स्वीकारले. आपल्या शिष्यांसह प्रथम ते गंगास्नानाला गेले.

इकडे 'आता इतक्या साऱ्यांना भोजन कसे द्यावे' हे द्रौपदीला कळेना. दुसरा काही मार्ग न उरल्याने तिने श्रीकृष्णाचे स्मरण केले.

**क्रमशः**



# 'चान्दोबा' च्या बातम्या

## सर्वांत मोठे खिसमस भेटकार्ड

केरळच्या लेखा एस् बाबू नावाच्या एका चित्रकला-शिक्षिकेने आपल्या शाळेच्या व्यवस्थापकांना खिसमस शुभकामना एका भेट-कार्डद्वारे पाठवल्या. या कार्डद्वारे तिने गेल्या वर्षी नोकरीवरून काढलेल्या अकराजणांची कैफियत मांडली. खिसमसचा क्षमा, प्रेम-भाव हा संदेश सर्वविदित आहे. कार्डात लेखाने विनन्तीकेली की, या सर्वांना परत कामावर घेतले जावे - हाच कार्डाचा मूळ उद्देश होता. कार्डाचे आणखी एक वैशिष्ट्य असे - याची लांबी १,३३२ अंगुळे (१११ फूट) असून रुन्दी आहे ११ अंगुळे. वजन (७० ग्रॅम.) हे कार्ड तयार करायला लेखा



एस.बाबू हिला दहा दिवस लागले.

## खूप लांबीचा केक

युनायटेड अरब एमिरेट्स्‌ची स्थापना पंचवीस वर्षांपूर्वी झाली. रजतोत्सवाच्या या प्रसंगी एक केक बनवण्यात आला. त्याची लांबी २.५ कि.मी. व वजन ७४ टन होते. २,००,००० लोक तो खाऊ शकतील अशी कल्पना होती परन्तु प्रत्यक्षात तो ५०,००० लोकांनाही पुरला नाही. दुबई समुद्रकिनाऱ्यावर औपचारिक रीत्या तो कापण्यात आला. पण जमलेली जनता इतक्या अुत्साहाने त्यावर तुटून पडली की काही क्षणातच केक होता की नव्हता अशी स्थिती झाली! याचे एक मुख्य कारण असे होते की, यापूर्वी एक अशी अफवा पसरली होती की या केकमधे सोन्याची नाणी आणि सहा बेंझ मोटरकार्सच्या किल्ल्या दडवण्यात आल्या आहेत. खरे पहाता हा संपूर्ण एकच एक केक नसून ५,१७५ केक्स् एकाशेजारी एक ठेवून तो बनवण्यात आला होता. त्यात ३०,८०० कि. फळे, ५,७०० कि.खजूर, ८,६०० कि. आटा, ७६,३०० अंडी व टनों तूप- साखर इ. पदार्थ वापरण्यात आले होते. केक तयार करण्याकरता २८ हॉटेले २५ दिवस रात्रं-दिवस काम करत होती.

## विक्री चा अुचांक

गेल्या वर्षी अमेरिकेची सुप्रसिद्ध सिने-अभिनेत्री मेरिलिन मन्रो हिच्या स्मरणार्थ तिच्या चित्राचे पोस्टाचे तिकीट काढले गेले. एका वर्षातच ४६,०००,००० तिकिटांची विक्री झाली. १९९६ मधे सुप्रसिद्ध पॉप सिंगर एल्विस पीसली च्या गौरवार्थ डाक तिकिट निघाले होते. तीन वर्षात १२४,०००,००० तिकिटांची विक्री झाली. डाक-तिकिटांच्या या विक्रीने नवा अुच्चांक प्रस्थापित केला आहे.



चांदोबा पुरवणी १०१



आपल्या देशाची सौन्दर्य स्थळे

# जुना मजबूत किल्ला

असे मानले जाते की आपली राजधानी दिल्लीच्या मध्यावर पांडवांचे निवास-स्थल इन्द्रप्रस्थ वसले होते. येथेच एक जुना किल्लाही आहे. १५३३ मधे दुसरा मोगल बादशहा हुमायून याच्या जमान्यात या किल्ल्याला 'दीन पन्ना' नावाने संबोधले जात असे. हुमायूनन्तर बादशहा बनला शेरशाह सूरी. अुंच अुंच तटांनी घेरलेल्या या भवनाला त्याने आपला किल्ला बनवला. आणि चारी बाजूंना आणखी काही इमारती निर्माण केल्या. १५४०-१५४५ च्या काळात शेरशाहने किल्ला आणखी मजबूत बनवून त्याचे नाव ठेवले 'शेरघर', १५४१ मधे त्याने 'किला ए कुन्हा' ही मशीद बनवली. लांब चार प्राकार असणाऱ्या या किल्ल्यात प्रवेश करायचा, तर तलीखी दरवाजातून नजावे लागते. किल्ल्याच्या अुंच भिंतीसमोर विचित्र जनावरांनी भरलेले सुन्दर प्राणीसंग्रहालय आहे. किल्ल्यात पुरातत्व खात्याने खोदाई केली असता दगडी मूर्ती व स्वयंपा- काची भांडी सापडली. त्या द्वारे असे सिद्ध होते की या स्थळाच्या संस्कृतीचा इतिहास दोन हजार वर्षे जुना आहे.



आपल्या देशाचे ऋषि-मुनी

# जैगीषव्य

एका सुंदरशा अरण्यप्रान्तात एका डोंगरपायथ्याशी देवल नावाच्या मुनिने एक आश्रम स्थापला अन् आपल्या शिष्यांसह तो तेथे राहू लागला. एके दिवशी 'जैगीषव्य'' नावाचा एक अतिथि त्यांच्याकडे आला.

देवल व त्याच्या शिष्यांनी भक्ति व श्रद्धेने त्याची सेवा केली. परन्तु अतिथीच्या गरजा फारच मर्यादित होत्या. ते नेहमीच शान्त व हसरे दिसत. मुखावर चिन्तेची एक रेषाही कधी दिसत नसे त्यांच्या!

एकदा जैगीषव्य ध्यानमग्न असताना देवल समुद्रस्नानाला गेले. तेंव्हा त्यांना असे दिसले की जैगीषव्य स्नान आटोपून तटावर येत आहेत. त्यांना असे वाटले की कदाचित जैगीषव्यांना एकादा जवळचा मार्ग माहीत असल्याने आपल्या अगोदरच येथे पोचून त्यांनी स्नानही अुरकले. परंतु ते आश्रमात पोचले तेव्हा त्यांना दिसले की जैगीषव्य आपण अगोदर पाहिलेल्या अवस्थेतच अजून ध्यान करत आहेत! दुसऱ्या दिवशी आणखी एका मुनीच्या आश्रमात ते गेले असतं, तेथेही त्यांना जैगीषव्य दिसले! यानन्तर एकदा पुन्हा त्यांना ते नदीतटावर दिसले. यानन्तरही देवल जिथे-जिथे जात तिथे-तिथे नुसते स्मरण करताच त्यांना जैगीषव्य मुनि दिसू लागले! हा अनुभव तर त्यांना फारच विचित्र वाटला.

आता त्यांना रहावेना. एके दिवशी त्यांनी जैगीषव्यांना भेटून याबाबत विचारले. परन्तु 'आपण या बाबत काहीच जाणत नाही' असे अुत्तर त्यांना मिळाले.

यानन्तर देवलने आपली शंका अनेक महान् लोकांजवळ त्यांनी प्रकट केली. शेवटी एका महान् व्यक्तीने त्यांना सांगितले, 'ब्रह्मत्व हे चराचर सृष्टींत भरलेले असते. प्रत्येक ठिकाणी, प्रत्येक वस्तूत हेच एक ब्रह्मत्व असते. ब्रह्मत्वाबाहेर जगात काहीही नाही. जैगीषव्याने आपल्या समस्त इन्द्रियांवर ताबा मिळवला आहे. एकाग्रचित्त होअून ध्यान करत असतानाच ते ब्रह्मस्वरूपात लीन झालेले असतात. विश्वात असे कोणतेच ठिकाण नव्हे, की जिथे ब्रह्मत्व नाही. यामुळेच जिथे स्मरण करावे तिथे जैगीषव्य दिसतातच!





# तुम्हाला माहीत आहे काय?

## विलक्षण नववर्ष

यूमाश हे स्वित्सर्लडचे एक छोटेसे गाव. तेथे दरवर्षी तेरा जानेवारीला नववर्ष दिन साजरा केला जातो. त्या दिवशी माणसे झाडांचा वेष घेतात. हसत खेळत एकमेकांच्या घरी जाअून त्यांना नववर्षाच्या शुभकामना देतात. काही लोक शेवाळे, वाळकी पाने व गोगलगायींपासून बनवलेले पोशाख घालतात, तर दुसरे काहीजण गवत, झाडांची साले इ. नी बनवलेले पोशाख घालतात.



# इन्द्रधनुष्य



## सुगन्ध पसरणाऱ्या अुदवत्त्या

अेक अुदवत्ती पेटवा, की बस, सारी खोली सुगंधाने भरून जाते. इतका सुगंध भरलेला असतो त्यात. देवाची तसबीर आणि मूर्तींसमोरही या जाळण्यात येतात. विशेषत: पूजेच्या वेळी यांचा अवश्य अुपयोग केला जातो. आपल्या देशात जवळजवळ ४,९८,०० कुटुम्बे दर वर्षी ७९० करोड रुपये या अुदवत्त्यांवर खर्च करतात. पूर्वी गुलाब, चमेलीची फुले आदींचा अुपयोग करून अुदबत्त्या बनवल्या जात. पण आता या 'मचिलासमकरन्द' वृक्षांपासून बनवल्या जात आहेत. हल्ली युरोपांतील सुगंधी द्रव्यांची खूप मागणी असते. असे अत्यन्त आधुनिक सुगंध बनवण्यात फ्रान्सचे स्थान पहिले आहे.



# आरोग्याची गुरुकिल्ली

गुरुनाथला पडसं झालं. गळा जड होऊन आवाजही नीट निघत नव्हता. पुन्हा-पुन्हा नाक शिंकरावं लागत होत. अन् डोळे पुसावे लागत होते. डोकंही दुखत होते. त्यामुळे कपाळ दोन्ही बाजूंनी दाबावं लागत होतं. जेवण तर केलं, पण ताप आल्यासारखा वाटत होता.

हे सारं सहन होईनासं झाल्यामुळे त्यानं आपल्या मुलाला वैद्याकडे पाठवलं. वैद्यानं काही गोळ्या दिल्या. त्या खाल्ल्यावर ताप कमी झाल्या सारखं वाटलं, पण बाकीच्या लक्षणांत काहीत फरक पडला नाही.

संध्याकाळी तो स्वतःच वैद्याला भेटायला निघाला. वाटेनं तो शिंकत होता; वारंवार खोकलाही येत होताच. दोन-ठिकाणी कट्ट्यांवरही विश्रान्तीसाठी थांबला तो.

त्याची अवस्था पाहून अनेकांनी सहानुभूती दाखवली. वैद्याकडे पोचताच तो म्हणाला, "अरे, तुम्हीच चालत आलात?" अन् नन्तर त्यानें आजाराबद्दल विचारुन घेतलं. "तुमच्या मुलानं संगतवार सांगितलं नाही !" असं म्हणत त्याने नाडी-परीक्षा केली. एक नवे औषध सांगून मात्रा देत म्हटले, " आता एक आठवडाभर पोटभर जेवा आणि विश्रान्ती घ्या. पडसं कमी होण्यासाठी ही मात्रा खात रहायला हवी."

पडसं कमी झालं नाही तोच गुरुनाथ पाय घसरुन पडला अन् गुडघ्यात लचक भरली. बायकोनं गरम फडक्यानं शेक दिला, वैद्यानं लेप लावला. गावच्या गणाचाऱ्यानं येऊन सहानुभूती दाखवत सांत्वन केले.

या घटनेनंतर पंधरा दिवसांनी गुरुनाथच्या कानात दुखू लागलं. तीन दिवस ठणका लागला होता. नंतर पोट दुखू लागलं अन् छातीतही वेदना होऊ लागल्या. त्याला तर वाटलं की आपल्याला हृदयविकाराचा

सुदाम पाटील

झटका आलाय. पण वैद्यानं तपासून 'तसं' काही नसल्याचं सांगितलं. वातामुळे तसं झाल्याचं म्हणाला वैद्य. आता कुठ सर्वांना 'हुश्य' झालं !

वर्षभर अधून मधून असंच काही-काही होत राहिलं. गावचे लोक गुरुनाथला सहानुभूती दाखवत राहिले. ही बातमी त्याचा मेहुणा शंकर याच्या कानी गेली. अन् तो गुरुनाथला भेटायला आला. त्याने म्हटले मेहुणूनच वयामुळेच असे आजार होसायत मला ! दिवसेंदिवस माझी तब्येत बिघडत चाललीय."

" अरे, असं काय बोलताय तुम्ही? म्हातारे थोडेच झालायत्? पन्नास वर्षांचे तर आहात ! साठीची माणसंसुद्धा कित्ती ठणठणीत असतात! आरामात फिरत असतात ती. तब्येतीच्या विचारानं इतकी चिन्ता का करता?" असे म्हणून शंकरने गुरुनाथला धीर दिला.

"चिन्ता करु नका, असं सहज म्हणालास खरं ! पण मी किती अडचणींना तोंड देतोय, हे तुला काय माहीत? मला तर त्या सहन होत नाहीयेस, काय करावं हेच सुचत नाहीय मला ! या रोगांपासून वाचणं शक्य नाही असं वाटू लागलंय मला ! अन् सगळं सहन तर करत रहावं लागणार नं !" त्याच्या बोलण्यात विषाद होता. असं वाटत होतं की तो आपली असहायता तीव्रपणे सोसतोय.

"माझ्या बोलण्याचा असा अर्थ नव्हे की तुम्ही या रोगांची पर्वाच करु नका. बेपर्वाई तर फार वाईट. एक माणूस विषबाधेनं चाळिशीतच मेला. एक बाई दम्यानं वारली, ती तर तीसचीही नव्हती ! दोन्ही आमच्याच



गावचे बरं ! पण आजार केवळ औषधानंच बरे होत नसतात, जीवनात काही आरोग्य-नियमांचं पालन करावं लागतं." शंकर म्हणाला. "सांग तर खरं-कोणत्या नियमांची माहिती आहे तुला?" गुरुनाथनं विचारलं. "मी कधी बाहेरचं काही खात नाही. एकाद्या सणाला जास्तकमी खाल्लंच, तर दुसऱ्या दिवशी उपास करतो मी ! दररोज खूप दूरवर पायी फिरायला जातो; स्वतःची सगळी कामं स्वतःच करतो. जी कामं करतो, ती घाईगडबडीनं न करता सावकाश करतो. कसलीही काळजी करत बसत नाही. जे काही करतो, ते देवाचं नाव घेऊन करतो. आसपासच्या माणसांवर विश्वास ठेवतो. कोणी एकादं भलं काम केलं तर आनन्द वाटतो मला. कोणी माझं काही



वाकडं केलं, तर त्यांच्यापासून दूर रहातो, पण त्यांच्याबद्दल मनात सूडभावना नाही बाळगत मी. माझ्या दृष्टीनं हीच तर सगळी आरोग्य-सूत्रं! यामुळे मी आजवर कधी आजारी पडलो नाही. मला वाटतं की, ज्या मार्गानं जातोय, तो शुभदायक, सुखकारक आहे.'' शंकरने आपले विचार व्यक्त केले.

''पण तू जे जे करतोस, त्या सर्वांचं मीही पालन करत असतोच की! कळत नाही, हे रोग माझ्यामागेच का लागलेत!'' गुरुनाथ त्रासून बोलला.

क्षणभर थांबून गुरुनाथ म्हणाला, ''नीट विचार करून पहा, की मी जे-जे करतो, त्यातलं तुम्ही काय करत नाही.''

खूप विचार करूनाही आपण शंकरच्या आरोग्य सूत्रांचं पालन बरोबर करतो. असंच गुरुनाथला वाटलं. तो म्हणाला, ''आपल्या दोघांच्या आरोग्य-नियमांच्या पालनात काहीच फरक नाहीय. तरीही आणखी काही विशेष असेल तर सांग.''

''तुम्ही मोठे आहात माझ्याहून. माझे सख्खे मेहुणे आहात. तुमच्या चुका काढणं बरं नव्हे, असं वाटतं मला. मर्यादा सोडणं बरं नव्हे ना. तेव्हा आणखी कोणाला विचारुन पहा.'' शंकर बोलला.

गुरुनाथने प्रथम बायकोलाच याबद्दल विचारलं. नवऱ्याच्या चुकांवर बोट ठेवणं तिलाही अुचित वाटलं नाही. मुलालाही विचारून पाहिलं, तर तो बोलायला कचरत होता. आपल्या नोकराला विचारलं, तर त्यानेही आपल्या वाक्-चातुर्यानं स्वतःचा बचाव केला.

हे सारं पाहून शंकर म्हणाला, ''या लोकांना विचारलंत, तर कोणी खरं सांगणार नाहीत, कारण ती सगळी आपलीच ना! जे वयानं तुमच्यापेक्षा मोठे असूनही ज्यांची प्रकृति अुत्तम असेल अन् तुम्हाला भीत नसतील अशांना विचारा. वयानुसार आरोग्य नियमही बदलत रहातात, हे तर सर्वांना ठाअूक आहे. मी पाळत असलेले नियम कदाचित् तुम्हाला आवडणार नाहीत; तुमच्या इच्छे विरुध्द असतील. तेव्हा कोणा वडीलधाऱ्यांनाच विचारणे अुत्तम.

अशा माणसाबद्दल गावच्या वैद्याशिवाय कोणाला माहिती असणार बरं? म्हणून गुरुनाथ वैद्याकडे गेला. ''वैद्यराज, आपल्या गावात कोण सर्वात अधिक आरोग्य-शील, हे सांगू शकता तुम्ही?''



जराही न संकोचता वैद्यानं सांगितलं, ''या गावात शत्रुघ्नपेक्षा जास्त निरोगी कोणीही नाही. तो एक दिवसही कसल्या औषधासाठी माझ्याकडे आलेला नाहीय.

शत्रुघ्नने तर साठी ओलांडलीय; पण अजूनही तो एकाधा दगडासारखा टणटणीत दिसतो. कुठे जायचं तर नेहमी पायीच जातो. लोक म्हणतात की त्याला कधी साधं पडसेही झालेलं नाहीय. वैद्यानं त्याचं नाव सुचवेपर्यन्त आपल्याला शत्रुघ्न कसा आठवला नाही, याची गुरुनाथला शरम वाटली. तो त्याला भेटायला गेला.

शत्रुघ्न गल्लीसमोर पारावर बसला होता अन् त्याला घेरून गावची काही प्रमुख माणसं बसलेली होती. त्यांच्यातला एक जण शत्रुघ्नला म्हणाला, ''माझ्या घरी गाण्याचा कार्यक्रम झाला, तुम्ही नाही आलात? तुमच्या वहिनीला फार वाईट वाटलं पहा.''

''नक्की आलो असतो, पण त्या दिवशी खूप खोकला येत होता. गाण्याला येअून तिथे खोकत राहिलो असतो, तर इतरांना गंमत राहिली नसती ना! मनातल्या मनात शिव्या नसत्या दिल्या त्यांनी? म्हणून मुद्दामच नाही आलो. मधात तुळशीची पानं बुडवून खाल्ली-बास, खोकला गेला सुद्धा पळून!''

आणखी एका माणसानं तक्रार केली, ''शेजारगावी माझ्या भावाचं लग्न होते. तुम्ही का नाही आलात?'' शत्रुघ्न ने सांगितलं, ''मला जोरदार पडसं झालं होते शिंकाही येत होत्या खूप. लग्नासारख्या ठिकाणी शिंकणं अशुभ वाटतं ना, म्हणून नाही आलो.'' पुढं त्यानं आपण मिऱ्याचा



काढा पिअून पडसं बरं केल्याचंही सांगितलं.

शत्रुघ्न अशा प्रकारे तिथे अुपस्थितांच्या प्रश्नांना अुत्तरं देअून त्यांच्या शंका दूर करत राहिला. अुत्तरं ऐकून गुरुनाथला वाटलं. ''अरे, आपल्यासारखेच सारे आजार शत्रुघ्न-लाही घेतातच की! पण फरक इतकाच की, आपण वैद्याकडून औषधं आणून घेतो, अन् हा घरगुती औषधं घेत रहातो.

सर्वजण निघून गेल्यावर शत्रुघ्ननं गुरुनाथला म्हटलं, ''हं, आता तुला कसली कैफियत देअू?''

''मला कसलीही कैफियत नकोय. मी तर तुझ्या बाबत जाणून घ्यायला आलोय खरोखरच तुला इतके रोग झाले? की आलेल्या लोकांपासून स्वतःला वाचवण्या-साठी खोटी कारणं देत राहिलास?''

गुरुनाथनं विचारलं.

"अरे, आत्ता-आत्ताच तूच तर म्हणालास की तुला खोकला, पडसं, कानाचं दुखणं, पायात लचक वगैरे आजारांचा त्रास झाला? मी ते सर्व आपल्या कानांनी ऐकलंय. खरं सांग, तू कधी आजारी नाही पडलास?" आश्चर्यानं गुरुनाथनं विचारलं.

"अरे हे माणसाचं शरीर आहे बाबा! शरीर असेपर्यन्त लहानमोठ्या कटकटी तर असतात-देवी, विषबाधा, हृदयविकार इत्यादी! हेच तर खरे रोग." शत्रुघ्न म्हणाला.

त्याला प्रणाम करत गुरुनाथ म्हणाला, "माझी शंका दूर झाली. तुझ्या आरोग्याचं रहस्य हेच की, तू या लहानसहान आजारांना 'आजार' म्हणत नाहीस. मी अुगीच पराचा कावळा करून काळजीत पडतो, दुखण्याचा 'बाअू' करतो. माझी चूक कळली मला!"

शत्रुघ्न म्हणाला, "माझं जरा डोके दुखतंय. एक झोप काढली की ठीक होईल सगळं काही." इतकं बोलून तो घरात निघून गेला.

गुरुनाथ मोठ्या अुत्साहानं घरी परतला. यानन्तर कधी-कधी त्याला डोके-दुखी, पडसं, खोकला, दातदुखणं वगैरेंचा त्रास झाला, पण त्यानं त्याची कधी पर्वा केली नाही. त्याबाबत कधी कुणाला सांगितलंही नाही. त्यामुळे सर्वजण म्हणू लागले, "गुरुनाथची तब्येत सुधारलीयसं वाटतंय."

शत्रुघ्नच्या अुदाहरणावरून गुरुनाथने आरोग्याचे नियम बनवून टाकले.

१. बारीक - सारीक दुखण्यांचा कधी 'बाअू' करायचा नाही.

२. कधी - कधी या दुखण्यांकडे दुर्लक्ष करून आपले रोजचे व्यवहार चालू ठेवणं फायद्याचं असतं.

३. जरूर तिथे घरगुती औषधांचा वापर करून थोडी विश्रान्ती घ्यायची.

४. वयानुसार मानव-शरीराच्या काही तक्रारी चालू रहाणारच. त्यांना फार महत्व देअून 'आजार' असं म्हणायचंय नाही.

५. लचक वगैरे भरली तर लेप लावणं, चोळणं, शेकणं या अुपायांनी बरं वाटू शकतं. लगेच वैद्याकडे धावायची गरज नाही.

६. मुख्य म्हणजे आपलं 'तारतम्य' बाळगायचं.







# अर्धा आणा

एका गावात रतन नावाचा एक गरीब माणूस रहात होता. त्याची अदम्य इच्छा होती की, आपण खूप कमाई करून एक शेतकरी बनावं; इतर शेतकऱ्यांप्रमाणेच आपलं सामान घेअून बाजारात नेअून विकावं. पण बिचाऱ्याची इच्छा पूर्ण होत नव्हती. ती केवळ एक स्वप्नच बनून राहिली होती. खूप मेहनत करत असे तो, पण ती कमाई रोजचं पोट भरायलाच फक्त पुरेशी होत असे.

रतननं ठरवलंच की, काहीही करून बाजारात जाअून माल विकून येईनच. त्याच्याजवळ पोतंभर लोकर होती. मनात आणलं तर ती एवढीशी लोकर तो गावातच विकू शकला असता. बाजारात नेअूनही त्याला यापेक्षा जास्त पैसेही नसते मिळाले. अुलट लोकर बाजारात नेली असती तर लोकांनी त्याची टरच अुडवली असती.

त्यामुळे रतन एक दिवस जंगलात गेला आणि त्यानं एका पोत्यात वाळकी पानं भरून आणली. त्या पानांवर त्यानं लोकर पसरली. आणि गाठोडं बांधून तो बाजाराकडे चालू लागला.

मगन नावाचा असाच एक माणूसही त्या दिवशी बाजारात आला. त्याच्या जवळही एक पोतं होतं. त्याच्या पोत्यात एक तृतीयांश कसलीशी कच्ची फळं होती. त्यांच्यावर त्यानं न सोललेली सुपारी पसरली.

रतनला बाजारात प्रवेश करायचं धाडस होत नव्हतं. त्यामुळे तो थोड्या अंतरावर आपलं पोतं घेअून बसला. मगनही तिथेच येअून बसला. दोघांनी एकमेकांशी गप्पा मारल्या; एकमेकांना 'तू काय आणलं आहेस' असंही विचारलं. आपल्या पोत्यातून लोकर काढून दाखवत रतन म्हणाला, "अुत्तम माल आहे!" मगननंही आपल्या पोत्यातून सुपारी काढत म्हटलं, "पाहिलंस, लिंबासारख्या



मोठमोठ्या सुपाऱ्या आहेत.''

''बाजार खूप जोरात चाललाय ना? आपल्याशी कोणी ना बोलायला तयार होणार, ना कोणी आपला माल घ्यायला तयार होणार. त्यापेक्षा आपणच एकमेकांशी आपापल्या वस्तु बदलून घेतल्या, तर कसं होईल?'' मगननं विचारलं.

''लोकरीच्या बदल्यात सुपारी?'' रतननं आश्चर्य दाखवलं. मगनची ही अदलाबदली व्हावी अशी इच्छा असल्यानं तो म्हणाला, ''पण सुपारी काही तुझ्या लोकरीपेक्षा कमी मोलाची नव्हे. खूपच चांगला माल आहे. ठीक आहे, तू मान्य केलंस तर अर्धा आणा मी निराळा देईन तुला.'' मगन म्हणाला.

रतननं ते मान्य केलं. दोघांनी पोती बदलून घेतली, 'अच्छा, निघतो मी!'' म्हणून मदन पुढे जाअू लागला.

पण रतन 'कबूल केल्याप्रमाणे अर्धा आणा दे नं!'' असं बोलत त्याच्या मागे लागला.

''हो हो, द्यायचे आहेत तुझे पैसे. पण आता तर माझ्याजवळ फुटकी कवडीही नाहीय. भिऊ नकोस. पैसे नक्की देईन मी. माझा पत्ता सांगतो तुला.'' असे म्हणून पत्ता सांगून मगन निघून गेला.

काही दिवसांनी आपला अर्धा आणा वसूल करायला रतन मगनच्या गावी गेला. मगन गावच्या सावकाराकडे काम करत असे. रतनला पाहिल्याबरोबर त्यानं आरोप केला, ''तू फसवलंस मला. बुडवलंस!'' रतनही म्हणाला, ''तू तरी काय कमी आहेस? तूही फसवलंसच की!'' मगन म्हणाला, ''मग हिशोब झाला बरोबर.'' ''नाही नाही, असं नाही होणार! तू मला अर्धा आणा द्यायलाच हवास. तू कबूल केलं होतंस. आधी चुकव आपले पैसे.'' रतनने आग्रह धरला.

''आत्ताही काहीच नाहीय माझ्याजवळ. पण आपला दोघांचाही लाभ होईल असा अुपाय सांगतो बघ मी तुला. माझ्या सावकाराच्या घरामागे एक खोल खड्डा आहे. मी स्वतः सावकाराला एकदा त्यात अुतरताना पाहिलंय. नक्कीच त्यानं सोनं किंवा काळा पैसा लपवला असला पाहिजे तिथे. आज मध्यरात्री आपण खड्ड्यात अुतरू अन् मिळेल ते वाटून घेअू. कबूल?'' मगननं विचारलं. रतनने ताबडतोब होकार दिला.

त्याच रात्री मगन एक पोतं आणि मोठा दोर घेअून आला. दोघं सावकाराच्या आवारात पोचले. रतननं दोर घट्ट पकडला.





मगन पोतं घेअून दोराच्या साह्यानं खड्ड्यात अुतरला. खूप शोधलं तरी मातीशिवाय काहीच आढळलं नाही तिथे.

''रतन तर चांगला पोचलेला माणूस आहे. इथे काहीच नाहीय म्हटलं तर दोर खड्ड्यात टाकून कदाचित पळून जाईल. तेंव्हा सावधगिरी बाळगायला हवी. मला वर जाता येईल असा काही अुपाय करायला हवा.'' स्वतःशी मगननं असा विचार केला अन् पोतं दोराला बांधून तो ओरडला - हे पोतं वर खेचून घे, अन् मग पोतं सोडवून मला काढण्यासाठी पुन्हा दोर खाली सोड.'' रतननं मोठ्या अुत्साहानं पोतं वर खेचून घेतलं.

''हा मगन काही मोठा विश्वसनीय माणूस नाहीय. त्याला का यात हिस्सा देअू? राहू दे नं त्याला खड्ड्यातच पडून! त्यातच कल्याण आहे माझं!'' असा विचार करून पोतं आपल्या पाठीवर लादून त्या भराभरा आपल्या गावाकडे निघाला. पण तो पोत्यात खुद्द मगनच बसला असल्याचं त्याला काय माहीत?

थोडं दूर गेल्यावर पोत्याच्या ओझ्यामुळे त्यानं ते खाली ठेवलं. त्याबरोबर ते अुघडून मगन बाहेर आला.'' बदमाष! पुन्हा फसवलंस की मला!'' रतन त्याला पाहून ओरडला.

''मग तू काय कमी आहेस? जी सज्जनता दाखवत होतास, ती कुठे गेली आता? मला हिस्सा न देता आपणच सर्व हडपावं असाच विचार होता न तुझा? मग बरोबर हिशोब झाला, गप्प बस आता.'' मगन म्हणाला.

''मी का गप्प राहीन? माझा अर्धा आणा तर द्यावाच लागेल तुला! तू शपथ घेतली होतीस.''

''मी देणार नाही असं थोडंच म्हटलं? माझ्याजवळ असेल तेंव्हा देईनच.'' मगन म्हणाला, नंतर दोघं आपापल्या गावाला रवाना झाले.

काही महिन्यांनी मगनचं लग्न झालं. बायको बरोबर थोडं धनही घेअून आली. त्यानं नोकरी सोडून दिली व शेत खरीदून तो स्वतः शेती करू लागला. थोडंफार धन कमवून गावाबाहेर त्यानं एक छोटंसं घरही बांधलं.

रतन तर इकडे नेहमीप्रमाणेच मेहनत करून पोट भरत होता. अचानक एक दिवस त्याला मगनकडून अर्धा आणा येणं असल्याची



आठवण झाली. तो वसुलीसाठी मगनच्या गावी गेला.

मगन आपल्या घराजवळच बसला होता. रतन आपल्याच घराकडे येत असल्याचं त्याला दिसलं. लगेच घरात शिरून तो बायकोला म्हणाला, ''अग, कर्जवसुलीसाठी रतन येतो आहे. मी इथं मेल्या माणसासारखा पडून रहातो अन् तू माझ्याजवळ बसून रडायला लाग. संध्याकाळपर्यन्त अशीच रडत राहिलीस तर याच्यापासून कायमची सुटका होईल आपली. बायकोनं मगननं सांगितल्याप्रमाणे सर्व केलं. रतननं घरात येऊन सारा प्रकार पाहिला.

''मगन कसं तुमचं कर्ज फेडू शकतील आता? सारी ऋणबंधनं सोडून ते निघून गेले. तुमच्याबद्दल ते कधीकधी माझ्याजवळ बोलत असत. दोघं खूप चांगले मित्र होता ना तुम्ही? तुमची स्वतः जमीन घेऊन शेती करायची इच्छा होती ना? स्वतःचा माल घेऊन बाजारात जायचं होतं तुम्हाला! सुद्धा आमची स्थिती बरी असल्यानं तुमचा अर्धा आणा व्याजासकट द्यायची त्यांची इच्छा होती.'' असं म्हणत ती रडत राहिली.

''कशाचं काय घडलं हे! मदन माझा कायमचा दोस्त आहे. त्याची अन्त्यक्रिया करूनच जाईन मी! आम्ही मिळून काय काय करायचं सोडलंय?'' रतन दुःखानं म्हणाला. नंतर बाहेर जाऊन स्मशानात नेण्यासाठी काही शववाहक घेऊन आला.

मगनची बायको म्हणाली, ''माझे नातेवाईक येईपर्यंत मी प्रेत नेऊ देणार नाही.''

सूर्यास्त झाला, तरी रतन तेथून जाईना. आसपासची माणसंही गोळा होऊन म्हणाली, ''प्रेत अुचललं जाईपर्यन्त आमच्या घरात तरी चुली कशा पेटणार? प्रेत आपण एकाद्या ओसाड देवळात नेऊन ठेवू.''

त्याप्रमाणे मगनला अुचलून देवळात ठेवण्यात आलं.

मध्यरात्र झाली. मंदिराबाहेर लोकांच्या पावलांची चाहूल आली. रतन लगेच गर्भागारात लपून बसला. थोड्या वेळात चोर देवळात आले. त्याच्या सरदारानं गाठोडं खाली ठेवलं; त्यातून किंमती दागिने, पैसे इ. काढले अन् त्याचे चार वाटे केले. त्यात एक सुराही होता. चोरांच्या सरदारानं विचारलं, ''हा कोण घेणार?'' तिघेही म्हणाले की, तो कोणाच्याच कामाचा नाही.



''नाही, हा चांगला तीक्ष्ण आहे. पहा तुमच्या समोर मी या प्रेताचे दोन तुकडे करतो'' असे म्हणून सरदार मगनजवळ आला.

आता मगन ताबडतोब अुठून ओरडू लागला, ''अरे भुतांनो, तुम्ही सर्व कुठे धडपडायला गेलात रे? चोरांना भिऊन पळालात काय?'' आता रतनही बाहेर आला. चोर भुतं पाहून पळून गेले.

''पाहिलंस? भाग्य फळफळलं आपलं! चल आता हे सारं वाटून घेऊ आपण.'' असं म्हणून लुटीचा माल त्यांनी वाटून घेतला.

''झालं ते छानच झालं. पण तू अजून माझा अर्धा आणा दिलाच नाहीस!'' रतननं विचारलं अन् पुन्हा दोघ भांडू लागले.

एवढ्यात दूर पळालेले चोर एका ठिकाणी थांबले. सरदार आपल्या साथीदारांना म्हणाला, ''फार भ्याडपणा दाखवला आपण. मोठ्या योध्यांनाही टक्कर देणारे आपण असे भिऊन शेपूट आत घालून सारा माल सोडून पळून आलो. ज्याच्यात हिंमत असेल, त्यानं तिथं जाऊन काय चाललंय ते हळूच पहावं.

बाकीच्या तिघांनी नकार दिल्यामुळे खुद्द त्यांच्या सरदारालाच जावं लागलं. मोठं धैर्य एकवटून तो देवळाजवळ आला अन् आत काय चाललंय ते ऐकू लागला. आत मदन रतन जोरजोरात ओरडत होते. रतन 'माझा अर्धा आणा देतोस की नाही?'' असं ओरडत होता अन् 'तुझं धन तुला व्याजासहित मिळालंय' असं सांगत होता.

त्यांचं बोलणं ऐकून चोरांचा सरदार घामाघूम झाला. बाकी साथीदारांजवळ जाऊन तो म्हणाला, ''तिथं किती भुतं आहेत याची आपण कल्पनाच नाही करू शकत. आपला लुटीचा माल त्यांनी वाटून घेतलाय. एकेकाला फक्त अर्धा-अर्धा आणाच मिळालाय. काहींना तोही न मिळाल्यानं ती आपसात भांडत आहेत. आजचा दिवस शुभच म्हणायचा की आपले प्राण तरी वाचले! चला जाऊया इथून!'' चोर तिथूनही दूर पळून गेले.

शेवटी रतन आणि मगन यांच्यात समजोता झाला. आपल्या अर्ध्या आण्याच्या बदल्यात रतननं सुरा घेतला. गावी आल्यावर रतननं त्या धनातून एक शेत घेतलं लग्न करून आता तो शेतकरी बनला. बाजारात माल घेऊन जाण्याची त्याची इच्छाही आता पुरी झाली.



विश्व समाचार

# जुने मित्र, नवे सहकार्य

एक देश जेंव्हा दुसऱ्या देशाशी चांगले संबंध स्थापित करतो, आणि ते संबंध वाढवण्यासाठी आपले पूर्ण सहकार्य देतो, तेंव्हा प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे जगाचे कल्याण साधले जाते. जगाची प्रजा अुन्नती आणि प्रगति साधण्यात महत्वाची भूमिका बजावते. आपल्या सहकारी संस्थांद्वारा कित्येक देश अन्य देशांशी व्यापाराच्या वाढीसाठी नवनवीन मार्ग शोधून काढत आहेत. याच अुद्देशाने हिन्दी महासागर प्रान्तांमधे एका सहकारी संस्थेची नुकतीच स्थापना झाली आहे. संस्थेचे नाव आहे - इण्डियन ओपन रिम असोसिएशन. हिन्दी महासागराचे तटवर्ती - द. आफ्रिका, मादागास्कर, मॉरिशस, मोझांबिक, टांझानिया, केनिया, एमेन, ओमन, भारत, श्रीलंका, मलेशिया, सिंगापूर, इण्डोनेशिया व ऑस्ट्रेलिया - हे चौदा देश या संस्थेचे सभासद आहेत.

चार वर्षापूर्वी द.आफ्रिकेचे परराष्ट्रमंत्री पिक बोध हे आपल्या देशाला भेट देण्यासाठी आले होते. त्यावेळी त्यांनी हिन्दी महासागर प्रान्तांमधे सहकाराचा प्रस्ताव मांडला होता. १९९५ मधे मॉरिशसच्या प्रयत्नांचे फळ म्हणून मुख्यत: ऑस्ट्रेलिया, भारत, केनिया, मॉरिशस, ओमन, सिंगापुर व द. आफ्रिका यांनी या सहकारी संस्थेचे संघटन केले. या सात देशांबरोबर बाकीच्या देशांनीही नंतर या संस्थेत प्रवेश केला.

मॉरिशसची राजधानी पोर्ट लुई मधे पाच मार्च रोजी या चौदा देशांच्या विदेशी व वाणिज्य मन्त्र्यांची बैठक घेतली गेली व त्यांनी या संस्थेचा चार्टर बनवला. चार्टरमधे असे नोन्दले गेले की, 'संस्थेच्या सदस्य देशांमधे सत्संबंध स्थापित करणे' हा या सहकारी संस्थेचा मुख्य अुद्देश आहे. त्यांचे ध्येय असेल - परस्पर प्रायोजनीय सहकाराला प्रोत्साहन देणे. चार्टरमधे असेही सांगितले गेले की, परस्पर प्रायोजनाची वृद्धि व्हावी असे वातावरण निर्माण केले जावे. आर्थिक सहयोग हा केन्द्रबिन्दु असेल.

या संस्थेने असा निर्णय घेतला की, वाणिज्य विषयक सोयी आणखी वाढवल्या जाव्या; अत्यन्त आधुनिक वैज्ञानिक आणि तान्त्रिक ज्ञानाची वाढ व्हावी, मानवांची सोय होईल असे अधिकाधिक स्रोत शोधून काढले जावेत आणि पर्यटन शाखा आणखी विस्तृत केल्या जाव्या. अशा एकूण दहा प्रणालींद्वारा ही संस्था आपले अुद्दिष्ट साधेल आणि या संस्थेचे मुख्य कार्यालय असेल मॉरिशसमधे.

या संस्थेचे महत्व लक्षात घेअून आता आणखी काही देशही सदस्य होअू इच्छित आहेत. एका बैठकीत भारताने सुचवले की, ही संस्था शक्तिशाली व सुदृढ ठेवण्यासाठी सदस्य देशांची संख्या कमी असणेच बरे. पोर्ट लुईत झालेल्या या सभेत भारताने मुद्दा मांडला की या दृष्टीने संयम बाळगणे आवश्यक आहे.या वेळी भारताचे विदेश मन्त्री. ए.के. गुजराल म्हणाले की, प्राचीन काळापासूनच हिन्दी महासागर तटीय प्रदेशांमधे समुद्री मार्ग होते. ते पुढे म्हणाले की हे जुने मित्र वाणिज्यात भागीदार होअून पुन्हा एकत्र येत आहेत.





# अुत्तम काव्य

कनकसेन चित्रदुर्गचा राजा होता. त्याच्या दरबारात कवि व पंडितांचा खूप आदर होई.

चित्रदुर्गचा दरबारी कवि पंडित नरसिंह शर्मा हा एक अुत्तम दर्जाचा विद्वान होता. कित्येक सुन्दर काव्ये रचून तो राजाचा आदरपात्र बनून राहिला होता.

एके दिवशी कवि-पंडितांनी भरलेल्या सभेत नरसिंह शर्माकडे वळून राजा म्हणाला, ''महाकवि, गेल्या सहा महिन्यात आपण काही नवी रचना नाही केलीत? कारण विचारू शकतो मी?''

जरा वेळ गप्पच राहून शर्मा म्हणाला, ''काही खास असं कारण नाही महाराज! आता म्हातारपण शरीराचा ताबा घेअू लागलंय म्हणायचं! लिहायची इच्छाच कमी होत चाललीय दिवसेंदिवस!''

कनकसेन म्हणाला, ''तुमचं नवीन काव्य ऐकलं नाही, की सगळं कसंनुसं वाटू लागतं. आता या महिन्यात शिवरात्रीचा अुत्सव येतोय. त्या दिवसापर्यन्त एका अुत्तम काव्याची रचना करा कविवर; अन् ते सभेत ऐकवून तुमच्या काव्याच्या रस-माधुरीत स्नान करायचं भाग्य मिळू दे आम्हाला. बास! इतकीच माझी तीव्र इच्छा आहे.''

दीर्घ श्वास घेत नरसिंह शर्मा म्हणाला, ''राजा, कोकिळा वसंत ऋतूत गाते. मोर वर्षा ऋतूतच ढग पाहून नाचू लागतो. सकाळी सूर्यकिरणं पडल्यावर कमळं अुमलतात. चन्द्राच्या शीतल स्पर्शानं रात्री कुमुदं विकसित होतात. त्याचप्रमाणे कविच्या हृदयात कंपनं अुमटली की आपोआपच अुत्तम कविता जन्मते. माझा असाच दृढविश्वास आहे.''

इतक्यात राजीव नावाचा एक तरुण कवि अुठून अुभा रहात म्हणाला, ''प्रभु, नरसिंह शर्मांच्या म्हणण्याप्रमाणे कविला स्फूर्ती, स्पंदन वगैरे अत्यन्त आवश्यक आहे. परन्तु त्या शिवाय कविता लिहीली जाअूच शकत नाही, हे मात्र पटत नहीं मला! मला वाटतं की, कवीला कविता रचण्यासाठी स्वतःच आपल्याला आवश्यक ते वातावरण बनवून घ्यायला हवं. आपला आळस किंवा असमर्थता झाकण्यासाठी कवींनी स्पंदन, प्रेरणा इ. सुन्दर नावं निर्माण केलीयत. मानवाला भगवन्तानं बुद्धी दिली आहे. ती शक्ती अतुलनीय असूनही तिची पक्ष्यांशी तुलना करणं बरं दिसतं का? पक्षी असोत किंवा फुलं असोत, मानवानं त्यांना कितीही शिकवलं, तरी ते काय काव्य रचू शकतील?''

नरसिंह शर्माचा द्वेष करणाऱ्या काही दरबारी कवींना राजीवचे बोलणे फार गोड वाटले. त्याची स्तुति करण्यासाठी त्यांनी टाळ्या वाजवल्या, अभिनन्दन केले. पण शर्माच्या मनाला मात्र राजीवच्या बोलण्याने धक्का बसला. त्याचे मन तापले. राग व अपमानामुळे त्याचा चेहरा लाल झाला. ताबडतोब आपल्या आसनावरून अुठून तो म्हणाला, ''राजीव, वेळ घालवण्यासाठी प्रेमकविता रचणाऱ्या तुझ्यासारख्या सामान्य कवीला 'कविता' कशाशी खातात, हे तरी माहीत आहे का? अुत्तम काव्य बुद्धीतून नव्हे, तर मनातून हृदयातून प्रस्फुटित होतं.''

हसतच राजीव म्हणाला, ''म्हणजे कविता रचण्यासाठी मेन्दूची जरुरी नाही, फक्त हृदय असलं म्हणजे पुरे असंच ना?'' त्याच्या प्रश्नात खोडसाळपणा होता.



दुसऱ्या कवींनी यावरही कुत्सितपणे हसून टाळ्या वाजवल्या. शर्माला त्यांची ही वागणूक राजीवच्या बोलण्यापेक्षाही जास्त बोचली. तो राजीवला रागाने विचारू लागला, ''शेवटी तुला म्हणायचंय काय? असंच ना, की एक महिन्याच्या आत अुत्तम काव्य रचणं सहज शक्य आहे?''

''हो, हो! नक्कीच शक्य आहे.'' राजीव अुत्तरला.

''मग ते काव्य तूही रचू शकशील ना?'' नरसिंह शर्माने विचारले. आतापर्यन्त त्यांच्यातली वादावादी लक्षपूर्वक ऐकणाऱ्या राजाने हस्तक्षेप करत म्हटले, ''कवि-वरांनो, मी जी मुदत जाहीर केलीय, त्या अवधीत जो कोणी सुन्दर काव्य रचेल, त्याला भरसभेत सुवर्णाभिषेक करण्यात

मालती हेडगेवार



येईल अन् सिंहासनाचा अर्धा भाग देऊन मी त्याचा गौरवही करीन.''

दोन्हीं कवींनी राजाचे हे आव्हान विनयपूर्वक स्वीकारले.

घरी आलेल्या आपल्या पतीला व्यग्र अवस्थेत पाहून नरसिंह कवींची पत्नी शान्ति घाबरून गेली. त्याने रात्रीचे भोजन केले तेही जसे काही एक रिवाज म्हणूनच केले. जेवणात त्याचे मुळीच लक्ष नव्हते. राजीवचे व्यंगपूर्ण बोलणे त्याच्या कानात घुमत होते. त्याला दुःखी पाहून शान्ति जवळ बसून त्याला पंख्याने वारा घालू लागली. हळुवारपणे तिने विचारले, ''कसलं तरी दुःख होत आहेसं वाटतंय तुम्हाला! सभेत महाराज तुम्हाला वाईट वाटेल असं काही बोलले काय?''

त्याच वेळी तेथे पोचलेली त्यांची कन्या माधवी खळखळून हसत म्हणाली, ''बाबांना वाईट वाटेल असं बोलण्याचं साहस महाराज करतील? सभेत बाबा ऐकवतील त्याला 'काव्य' च म्हटलं जातं! बरोबर ना बाबा?''

सोन्याच्या बाहुलीप्रमाणे चमकणाऱ्या आपल्या कन्येकडे हसून पहात शर्मा मोठ्या प्रेमाने म्हणाले, ''तू म्हणालीस ते अगदी बरोबर हं माधवी! पण आज राजीव नावाच्या एका युवकानं मला आव्हान दिलं अन् काव्य रचायला कटिबद्ध झालाय तो!'' अन् दरबारात घडलेले सारे त्याने सविस्तर सांगितले.

राजीवचे नाव ऐकताच माधवीच्या चेहऱ्यावर प्रसन्नता झळकू लागली. ती जेंव्हा-जेंव्हा पित्याबरोबर दरबारात जायची, तेंव्हा त्याच्या शीघ्रकविता ऐकून ती मुग्ध होत असे. त्याच्या सुन्दर रूपाचेही तिला आकर्षण वाटे. पण एका कालच्या तरुणानं आपल्या पित्यासारख्या महान् कवीला आव्हान द्यावे हे तिला कदापि आवडण्यासारखे नव्हते. त्याच्या साहसाचा तिला फार राग आला अन् मोठ्या बेपर्वाईने ती म्हणाली, ''बाबा, तुमच्यासमोर त्याची काय किंमत? चन्द्रकोरीपुढं काजव्यानं चमकण्यासारखंच नव्हे का?''

नरसिंह शर्मांनि गंभीरपणे डोके हलवले. भोजनानन्तर तालपत्र घेऊन त्यांनी नवीन काव्य-रचनेचा श्रीगणेश केला. त्यांनी काव्याचे नाव ठेवले, 'जीवनवलय'. त्यात त्यांनी मानवाच्या निरनिराळ्या अवस्थांची



तुलना निसर्गाशी केली होती. बाल्यकाल अुदयाची वेळ, यौवन मध्यकाल आणि वृद्धावस्थेची संध्यासमयाशी तुलना केली होती. अद्भुत शैलीत त्यांनी सगळे चित्रीकरण केले होते.

रात्रं-दिवस परिश्रम करून निर्धारित वेळेत त्यांनी काव्य रचले अन् आता ते खूप संतुष्ट दिसू लागले.

पत्नी व कन्येला बरोबर घेऊनच शिवरात्रीच्या दिवशी नरसिंह शर्मा दरबारात पोचले. त्या अगोदरच राजीव, अन्य पंडित व नगरातल्या प्रमुख व्यक्ति दरबारात आसनस्थ झालेल्या होत्या. माधवीकडे पाहून राजीव गालात हसला. माधवीनेही संकेतानेच त्याची खुशाली विचारली अन् हसत राहिली.

इतक्यात राजाही दरबारात आला अन् सर्वांनी अुभे राहून त्याला प्रणाम केले. सर्वांवर धावती नज़र फिरवून राजाने त्यांना एकदा पाहून घेतले आणि म्हटले, ''आज शिवरात्रीचा पर्वदिवस आहे. आता नरसिंह शर्मा आणि राजीव आपापले काव्य पठन करून आपले कान तृप्त करतील.''

नरसिंह शर्मांनि अुठून आपला घसा साफ केला आणि मोठ्या मधुर स्वरात तो आपले काव्य-पठन करू लागला. एक एक पद्यांश तो जेंव्हा भावपूर्ण आवाजात वाचत होता, तेंव्हा तेथे अुपस्थित कवि, पंडीत आणि नगरप्रमुख मन्त्रमुग्ध होऊन ऐकत होते. काव्य-पठन समाप्त होताच टाळ्यांच्या आवाजाने दरबार दुमदुमला.

आता राजीवची पाळी होती. शैलीतून



त्याने तालपत्रांचा गठ्ठा काढला अन् राजाला समर्पित केला. राजाने अुघडून पाहिले, तो सगळी तालपत्रे कोरीच! राजाने राजीवला विचारले, ''हे तू रचलेलं काव्य होय?''

काही न बोलता राजीव हसत अुभा राहिला. ते पाहून राजा क्षणभर विचारात पडला, अन् सर्व काही अुमगून मोठ्या प्रेमाने राजीवकडे पहात तो म्हणाला, ''काही असो, नरसिंह शर्मांकडून एक अुत्तम रचना करवून घेण्यात सिंहाचा वाटा तुझाच!''

मन्त्री धीरमती आश्चर्य प्रकट करत म्हणाला, ''महाराज, आपण काय म्हणताय, ते समजत नाहीय मला! राजीवनं महाकवींकडून काव्य लिहवून घेणं कसं शक्य आहे?''

गालात हसत राजा म्हणाला, ''राजीवला

स्वतःची रचना-शक्ती छान माहीत आहे. तरीही त्यानं नरसिंह शर्मासारख्या महाकवीला आव्हान दिलं. माहीत आहे, असं का केलं त्यानं? नरसिंह शर्मांच्या कविता-सरस्वतीला जागवू पहात होता तो ! शर्मांना आव्हान दिलं, त्यांच्या कविताशक्तीवरच टोमणे मारले, तेंव्हा त्यांच्या मनात काव्य आकार घेऊ लागलं. अन् त्यांनी आपल्याला आनन्दसागरात बुडवलं. आपण त्यात डुबक्या घेऊ लागलो!''

नरसिंह शर्मा आता राजीवजवळ आला. ''मी गैरसमज करून घेतला तुझ्याबद्दल! वाईट नको वाटून घेऊस!''

''आपणाकडून उत्तम काव्य रचून घेण्यासाठी, काव्यशक्तीवर चढलेला गंज काढून टाकण्यासाठीच मी आपल्याला आव्हान दिलं. आता सभेच्या माध्यमातून क्षमा मागतो मी आपल्या औद्धत्याबद्दल!'' राजीव विनयपूर्वक बोलला.

मोठ्या वैभवाने नरसिंह शर्माला कनकाभिषेक करण्यात येऊन राजाने त्याला अर्ध्या सिंहासनावर बसवून घेतले.

राजाने राजीव व माधवीचे आपसातले संकेत पाहिले होते. दोघांचे आपसातले आकर्षण हेरून तो शर्माला म्हणाला, ''या मंगलप्रसंगी आपण एक निर्णय जाहीर केलात तर बरं होईल!''

''सांगा, काय आज्ञा आहे?'' नरसिंह शर्मांनी विचारले.

''राजीवला आपला जावई बनवून घेतलंत तर दुग्ध-शर्करा योग होईल नं! तो बरोबर राहून तुम्हाला प्रेरणा देत राहील.'' राजाने हसत म्हटले.

शर्मांनी कन्येला विचारले, तेंव्हा माधवीने लाजत आपला होकार भरला. ''बोल, तुला काय म्हणायचंय?'' त्याने राजीवलाही विचारले.

''मी तर अनाथ आहे. मला आईवडील नाहीत. या योगाने माधवीच्या मातापित्यांच्या रूपात मलाही आईवडलांचे प्रेम प्राप्त होईल. माझ्यासारख्या एका सामान्य कवीचं भाग्य असं फळफळणार असेल, तर मी 'नाही' थोडंच म्हणेन?'' राजीव हर्षातिरेकाने म्हणाला.

भावी वधु-वरांचे कवि-पंडितांच्या सभेने टाळ्या वाजवत अभिनन्दन केले!







# सुलतानाचे प्रश्न

सुलतान आपला दोस्त हुसेन याच्यासह अरण्यमार्गाने चालला होता. तो स्वतः सुलतान आणि हुसेन एक मामुली माणूस असूनही दोघांची दाट मैत्री होती. सुलतानाला हुसेनच्या हुशारीची कदर होती. या दोघां-पासून थोड्या अंतरावरून आणखी एक माणूसही चालला होता.

सुलतानाने आपल्या दोस्ताला विचारले, ''हुसेन, जो माणूस, आपल्या पुढे चालतो आहे, त्याच्या बाबतीत काही सांगू शकशील? त्या माणसाकडे निरखून पाहून हुसेन उत्तरला, ''तो सुतार असावा, खाविन्द.''

''त्याचं नावही सांगू शकशील?'' सुलतानाने विचारले.

''त्याचंही नाव हुसेनच आहे मालक!'' हुसेनने पटकन सांगितले.

''म्हणजे याचा अर्थ असा की, तुला तो माणूस पूर्वीपासूनच माहीत आहे. होय ना?'' सुलतानाने विचारले.

''नाही मालक, मी तर त्याला आत्ताच पहातो आहे!'' दोस्त बोलला.

''मग त्याचं नाव कसं सांगितलंस तू?'' सुलतानाने आश्चर्याने विचारले.

''आपण मला माझ्या नावानं संबोधलंत ना, तेंव्हा मला असं दिसलं की, तोही वळून आपल्याकडे पाहू लागला. त्यामुळे मला वाटलं की त्याचं नावही हुसेनच असलं पाहिजे!'' मित्राने स्पष्टीकरण केले.

''हे तुझं उत्तर बरोबर असेल. पण तो सुतार असावा असं कशावरून म्हणालास तू?'' सुलतानाने विचारले.

''मालक, रस्त्यानं चालताना फळा-फुलांच्या झाडांकडे न पहाता, तो फक्त त्या उंच, विस्तारलेल्या, मजबूत खोडंवाल्या झाडांकडेच पहात होता. त्याचं लाकूड चांगलं

प्रज्ञा देसाई

काम देतं ना! म्हणूनच मी अन्दाज केला की हा सुतार असावा.'' दोस्त बोलला.

''तुझी नजर चांगलीच तीक्ष्ण आहे. अव्वल दर्जाचा हुशार प्राणी आहेस तू. आता असं सांग, या पुढं चालणाऱ्या माणसानं या अगोदर काय खाल्लं असावं?'' सुलतानाने आणखी प्रश्न टाकला.

प्रवाशाकडे पुन्हा एकदा बारकाईने पाहून हुसेन म्हणाला, ''थोड्या वेळापूर्वी यानं मध किंवा एकादा गोड पदार्थ खाल्ला असला पाहिजे.''

''अच्छा ठीक आहे. चल, आता त्यालाच जाअून विचारू या.'' सुलतानाने टाळी वाजवली अन् प्रवाशाला आपल्याजवळ बोलावले. तो आल्याबरोबर आपल्या दोस्ताकडे निर्देश करत सुलतानाने त्याला विचारले, ''याला ओळखतोस तू?''

प्रवासी अुत्तरला, ''नाही बाबा! मी नाही ओळखत!''

''प्रवाशा, आता मी तुला तीन प्रश्न विचारतो, संकोच न करता अुत्तरं दे.'' सुलतान म्हणाला.

''हं विचारा.'' प्रवासी बोलला.

''तुझं नाव काय? तुझा व्यवसाय काय? अन् आत्ता थोड्या वेळापूर्वी तू काय खाल्लंस?'' सुलतानाने प्रश्न विचारले.

''माझं नाव हुसेन. मी सुतार आहे आणि अर्ध्या तासापूर्वी मी अुत्तम प्रतीचा मध प्यायलो होतो.'' प्रवाशाने अुत्तरे दिली.

''तुझ्या अुत्तरांवर खूश आहोत आपण!'' असे म्हणत सुलतानाने आपल्या मनगटावरची पोची काढून त्याला दिली.

ती घेअून प्रवासी मोठ्या खुशीने आपल्या वाटेने निघून गेला. तो गेल्यावर सुलतानाने दोस्त हुसेनला विचारले, ''त्यानं मध प्यायल्याचा अंदाज कसा केलास तू?'' ''तो एकसारखा हातानं ओठ पुसत होता. तोंडाजवळ येणाऱ्या माश्या वारत होता तो सारखा. ते पाहून त्यानं काही गोड खाल्लं असल्याचं ताडलं मी. अन् या भागात मोठ्या प्रमाणावर अुंची मध मिळतो, म्हणून मला वाटलं की त्यानं मधच प्यायला असावा.'' हुसेनने स्पष्ट केले.

''दोस्त, तुझ्या नजरेची तारीफ करायला हवी. तुझ्या बुद्धीला दाद देतो मी.'' असे म्हणत सुलतानाने त्याला प्रेमाने मिठी मारली.







# सम्राट अशोक

## ४

(वृद्ध बिन्दुसार आजारी पडला. त्याला असे समजले की ग्रीकांच्या प्रोत्साहनाने तक्षशिलामधे बंडाळी सुरू झाली आहे. प्रधानमन्त्र्याच्या सल्ल्यावरून राजाने आपल्या सहाही पुत्रांना बोलावून त्यांना विचारले की, ''तक्षशिलेतली बंडाळी मोडण्यासाठी सैन्याचे नेतृत्व करायला तुम्हापैकी कोण तयार आहे?'' त्यावेळी आज्ञापालनासाठी अशोक पुढे सरसावला.)

- पुढे

**त्या** संध्याकाळी अशोक सेनापतीला भेटायला गेला. तक्षशिलामधे मगध साम्राज्याविरुद्ध हालचाली सुरू झाल्याचे तोपर्यन्त सेनापतीला कळले होते. या स्थितीत महाराज हातावर हात ठेवून गप्प बसणार नाहीत, हे त्याला पक्के ठाअूक होते. ते बंड मोडण्यासाठी नक्कीच काही कारवाई करतील मगध साम्राज्य ते मोडू देणार नाहीत. ऐक्य संरक्षणासाठी ते आपला प्राणही देतील अशी त्याची खात्री होती. त्यामुळे राजाज्ञेची वाट न पहाता तो आपले सैन्य संघटित करायच्या कामाला लागला होता. अशोकला पाहिल्याबरोबर त्याला प्रणाम करून सेनापती म्हणाला, ''युवराज, मी ही येणार तुमच्याबरोबर तक्षशिलाकडे.''

''तुमची तयारी पाहून आनन्द वाटतोय मला. पण मला वाटतं की तुम्ही इथेच रहाणं बरं; कारण तात आजारी आहेत. तुम्ही स्वत:



इथेच रहा अन् माझ्याबरोबर फक्त दोन विश्वासपात्र पथकप्रमुख द्या !'' अशोक म्हणाला.

''तुमचं म्हणणंही अुचितच आहे. प्राप्त परिस्थितीत मी महाराजांबरोबर असणं अुचित ठरेल. तुमचा निर्णय कौतुकास्पद आहे. आपल्या सैन्यातील अुत्तम सैनिक आणि समर्थ पथकप्रमुख मी तुमच्याबरोबर देतो. त्यासाठी सर्व व्यवस्था आताच करून देतो मी.'' सेनापती बोलला.

तावडतोब तक्षशिलाकडे सैन्य रवाना करायची सोय करण्यात आली. राजभवनासमोरील प्रांगणात हत्ती, घोडे ओळीने अुभे केले गेले. सैनिक प्राणपणाने हत्यारे आणि आवश्यक साहित्य जुळवू लागले. युद्धाची तयारी मोठ्या प्रमाणावर सुरु झाली. हे सर्व पाहून राजाचा ज्येष्ठ पुत्र सुशेम द्वेषाने जळू लागला. लपूनछपून तो सेनापतीकडे गेला आणि म्हणाला, ''कुठे एका कोपऱ्यात काही लहानसं आन्दोलन सुरू झालं अन् त्याचं दमन करायला एवढ्या मोठ्या प्रमाणावर तुम्ही तयारी सुरू केलीत? जसं काही महायुद्धच सुरू होणार आहे! सुईच्या कामासाठी तलवार?''

त्याच्या प्रश्नावर आश्चर्यचकित होअून सेनापती म्हणाला, ''युवराज ! शत्रुबळ सामान्य समजणं कोणत्याही दृष्टीनं योग्य नव्हे! लहान साप मारायचा असला, तरी काठी मोठीच वापरावी. या बंडाळीमागे ग्रीकांचा हात आहे. ते चतुर, धोरणी आहेत. स्थानीय लोकांना आपल्या विरुद्ध भडकवण्याचं सामर्थ्य त्यांच्यात आहेच, यात रत्तीभरही शंका नाही. याशिवाय राजकुमार अशोक प्रथमच सेनेचं नेतृत्व संभाळणार आहेत. त्यांच्या विजयासाठी आवश्यक तयारी व सोयी अुपलब्ध करून देणं हे माझं कर्तव्य आहे, जबाबदारी आहे. राज कुटुम्बाच्या गौरवाचा प्रश्न आहे न हा!''

''कुणाच्या गौरवाबद्दल बोलताय तुम्ही? मगध साम्राज्याच्या भावी महाराज अशोकबद्दलच ना?'' सुशेम व्यंग्यपूर्ण स्वरात बोलला.

''मी तर अैकलं होतं की तुम्हीच या राज्याचे राजा होणार, अशोक नव्हे! खरं तर तक्षशिलाकडे सैन्य घेअून तुम्हीच गेला असता तर बरं झालं असतं. आपल्या भावी राजाच्या विजयाबद्दल मगधच्या प्रजेला केवढा हर्ष झाला असता! हा विजय प्रजेचं प्रेम







मिळवायला अुपयोगी पडला असता. तुम्ही एक सुवर्णसंधी हातची घालवलीत!''

''सेनापती, तुम्ही माझ्याबरोबर राहिलात, तर मी नक्कीच विजयी होअून परतेन.'' सुशेम आपला आवाज काहीसा कमी करत बोलला.

''युवराज, तुम्हाला काय म्हणायचंय कळत नाहीय मला?'' सेनापतीने विचारले.

''सेनापती, पित्याच्या मृत्यूनन्तर मीच गादीवर बसणार, हे तर तुम्हाला चांगलं ठाअूक आहे नं! तातांचीही तशी इच्छा आहे. जनतेला माझ्याबद्दल आदर वाटणं, प्रेम वाटणं हे सर्व तुमच्याच सहकार्यावर अवलंबून आहे. तुमची तशी जबाबदारीही आहेच.'' सुशेम बोलला.

''तुम्हाला काय म्हणायचंय, हे अजूनही समजत नाहीय मला राजकुमार! एक गोष्ट विचारू मी तुम्हाला? सेनेचं नेतृत्व करायची जबाबदारी तुम्ही का नाही स्वीकारलीत?'' सेनापतीने सरळपणे विचारले.

''घडून गेलेलं पुन्हा बोलण्यात काय अर्थ? झालं ते झालंच; पण अजूनही काही बिघडलं नाहीय! सेनेचं नेतृत्व मीच करीन. त्यासाठी मला तुमचं सहाय्य हवं. मी सांगेन ते अैकलंत, तेच केलंत तर राजा झाल्यावर मी तुमच्या सर्व इच्छा पुऱ्या करीन सेनापती! यासाठी आत्ता फक्त एकच काम करायचं तुम्ही! या आताच्या कार्यात अशोकचा पराभव व्हायला हवा. यानंतर माझ्या नेतृत्वाखाली सैन्य तक्षशिलाला नेअून तुमच्या मदतीनं विजयी होअून मी परत येईन. तसं झालं, की त्या दासी-पुत्र अशोकचा गर्व नाहीसा होईल. त्यासाठी तुम्ही बल-हीन सैन्य अशोकच्या दिमतीस द्यावं. तुम्ही स्वतः त्याच्याबरोबर जाअू नये; जे दोन पथकप्रमुख जातील तेही अकर्मण्य आणि असमर्थ निवडा. आपली योजना सफल करण्यासाठी इतकंच फक्त करा! त्याबद्दल विश्वास आहे मला तुमचा! ही गोष्ट आपल्या दोघांच्यात गुप्तच रहावी.'' सुशेम बोलला.

सेनापती आश्चर्याने पहात राहिला. त्याच्या तोंडून शब्दच फुटेना! सेनापतीची मानसिक अवस्था समजून सुशेम म्हणाला, ''तुम्ही हे काम केलंत, तर मी योग्य पारितोषिक देईन तुम्हाला. पुढे राज्यात तुम्हाला वापरता येणार नाही, असा एकही अधिकार नसेल! महाराजाखालोखाल अर्थात्



माझ्या खालोखाल तुमचाच अधिकार सर्वात अधिक असेल. बोला तुमचा निर्णय काय आहे?''

''युवराज, तुम्ही बहुधा माझी राजनिष्ठा आणि इमानदारीची परीक्षा घेत आहात?'' सेनापतीने संशयाने विचारले.

''तसं काही नाही. अशोकचं गर्वहरण करायला हवं इतकाच माझा अुद्देश आणि ध्येय आहे. मी जे काही बोललो, त्यातलं अक्षर न अक्षर खरं आहे, यात कणभरही शंका नाही.'' सुशेम दृढ स्वरात बोलला.

''तुम्ही तुमच्या मनची गोष्ट बोललात. आता माझ्या मनची गोष्टही ऐकून घ्या. तुमच्या इच्छेमुळे माझं मन ढवळून गेलं. देशद्रोह करणं अन् पाठीकडून सुरी भोसकणं हे मी मोठे अपराध मानतो. कोणत्याही परिस्थितीत हे कुकर्म मी करणार नाही. राजपरिवाराच्या कीर्तीचं रक्षण करणं हा माझा परमधर्म आहे. तो निभावणं हे माझं ध्येय आहे, पुढेही असेल.'' सेनापती दृढपणे बोलला.

सुशेमचा चेहरा पांढरा पडला. जरा दम घेत तो म्हणाला, ''माझ्या आज्ञेचं पालन नाही करणार तुम्ही?

सेनापती गंभीरपणे अुत्तरला, ''कदापि नाही!''

''ठीक आहे. मला दुसऱ्या सेनापतीची नेमणूक करावी लागेल.'' सुशेमने धमकी दिली.

''हु! तो तर तुम्ही महाराज झाल्या-नन्तरचा प्रश्न आहे! राजपरिवारातच अशी कारस्थानं होअू लागली, तर सिंहासन तरी कसं सुरक्षित राहील? युवराज, कृपा करून माझा सल्ला.....'' सेनापती पुढे काही बोलणार, इतक्यात ''तुमचा सल्ला स्वतः जवळच ठेवा; मला गरज नाही त्याची!'' असे म्हणत सुशेम पाय आपटत निघून गेला.

सुशेमच्या कपटनीतीमुळे, त्याच्या कुत्सित विचारांमुळे सेनापती फार दुःखी झाला. नंतर तो आपल्या कर्तव्यपूर्तीसाठी निघून गेला. त्याने स्वतःसमक्ष सैन्यदले तयार केली.

दुसऱ्या दिवशी सकाळीच अशोक सैन्य घेअून तक्षशिलाकडे रवाना झाला. थोडे दूरपर्यन्त त्याच्याबरोबर गेलेला सेनापती निरोप घेताना म्हणाला, ''युवराज, तुमच्या प्रयत्नात तुम्हाला यश मिळो. अंगावर





घेतलेल्या कामात यशस्वी व्हाल असा आशिर्वाद आहे माझा. तुमचं ध्येय सिद्ध होईल. आता आणखी एक मुख्य गोष्ट! बारा सैनिक योद्धे तुमचे अंगरक्षक असतील. तरीही स्वतःच्या सुरक्षिततेविषयी सदैव जागरूक रहा. विजयी होऊन परत आलात म्हणजे आणखी काही सांगेन मी तुम्हाला.'' इतके बोलून सेनापती परत फिरला.

त्या दिवशी संध्याकाळी जरा अंधार झाल्यावरच सैन्य तक्षशिलाच्या सीमेजवळ पोचले. डोंगरपायथ्याशी सैनिकांनी तळ ठोकले. दुसऱ्या दिवशी सकाळी अशोकने आपले काही दूत बंडखोरांकडे पाठवून संदेश दिला. तोपर्यन्त बंडखोरांनी नगरातील सर्व राजप्रतिनिधींना बाहेर हाकलून दिले होते. काही प्रतिनिधींना मारूनही टाकले होते. आता तक्षशिला पूर्णतः बंडखोरांच्याच हाती होते.

अशोकने पाठवलेले दूत बंडखोरांना भेटून म्हणाले, ''महाराज आजारी आहेत. अडचण कितीही गंभीर आणि विवादास्पद असली, तरी ती शांति पूर्वक मार्गानं सुधारली जाईल. महाराज चौकशी करतील, करणीय करतील.'' बंडखोरांनी आपल्या इच्छा व्यक्त करण्यासाठी मुदत मागितली. दूतांनी ते मान्य केले.

दूत जेंव्हा बंडखोरांना भेटायला गेले, तेंव्हापासूनच अशोकच्या आज्ञेने व्यापारी, भिकारी, प्रवासी अशा वेषात सैनिकांनी चुपचाप नगरात प्रवेश केला. बंडखोरांच्या हालचालीवर ते बारीक नज़र ठेवून होते.

दररोज़ अंधार पडल्यावर बंडखोर त्यांना चिथावणी देणाऱ्या ग्रीकांना एका इमारतीत भेटून पुढील कार्यक्रमाची आखणी करत. ती त्यांची नेहमीची पद्धत होती. त्या दिवशीही नेहमीप्रमाणे सर्वजण त्या इमारतीत भेटणार होते. अशोकला ही बातमी कळली अन् त्याच्या सल्ल्यावरून सैनिकांनी इमारतीला वेढा दिला. यानन्तर नगराबाहेर उभी मगध सेना वादळासारखी आत घुसली.

बंडखोर व ग्रीकांनी इमारती बाहेर पडायचा खूप प्रयत्न केला. पण ते असफल झाले. इमारतीबाहेर ते येऊच शकले नाहीत. थोडा वेळ लढून ते अशोकच्या सेनेच्या स्वाधीन झाले.

बंडखोरांचेही आपले लहानसे सैन्य होते; परन्तु सैनिकांना पद्धतशीर लढायचे प्रशिक्षण



मिळालेले नव्हते. स्वतःचा कसा बचाव करावा हे ही त्यांना ठाऊक नव्हते. अशोकच्या सैन्याबरोबर नगरात निरनिराळ्या ठिकाणी ते लढले; पण अशोकच्या सैन्याला ते तोंड देऊ शकले नाहीत. काही पळून गेले, तर काही मारले गेले.

सकाळ होता-होता बंडखोरांचे सारे प्रयत्न फसले. अन् नगर परत अशोकच्या ताब्यात आले. बंडखोरांचे नेता आणि त्यांच्या मित्रांना कैद करून, त्यांचे हात मागे बांधून नगराच्या मध्यावर आणण्यात आले. नगराच्या मध्यावर एक समतल अन् उंच चबुतरा होता. संपूर्ण शहरातल्या जनतेने तेथे जमावे अशी दवंडी पिटण्यात आली. काय चाललेय हे पहायला प्रजा उत्सुक होती. चबुतऱ्याभोवती सर्वजण गोळा झाले.

घोड्यावर आरूढ झालेला अशोक थोड्याच वेळात तेथे पोचला. माना खाली घालून उभ्या असलेल्या बंडखोरांना संबोधून तो म्हणाला, ''तुम्हाला कसला त्रास होता, तर त्याबद्दल तुम्ही अधिकाऱ्यांजवळ बोलायला हवे होते. पण तसं न करता, तुम्ही बंड केलंत, मगधच्या अधिकाऱ्यांना मारून त्यांची मालमत्ता लुटलीत. ही दुर्बुद्धी तुमच्यात कशी उपजली सांगा बरं!''

सर्वच गप्प होते. थोड्याच वेळात एकजण म्हणाला, ''आम्ही इथल्या राजप्रतिनिधींना तक्रारी सांगितल्या होत्या, पण त्यांनी लक्ष दिलं नाही; आमची पर्वा केली नाही.''

''अच्छा! मी मानतो की प्रतिनिधींनी तुमच्याकडे दुर्लक्ष केलं. पण राजधानीत येऊन तुम्ही स्वतः राजा किंवा मन्त्र्यांशी बोलू शकला असतात ना! तसं का नाही केलंत तुम्ही?'' अशोकने विचारले.

बन्दी याचे काही उत्तर देऊ शकले नाहीत. ''राजाकडे तक्रार केली नाहीत, ही



चूक विसरून जा. पण आता हे सांगा कि, तुम्ही परक्या देशातल्या लोकांशी याबद्दल चर्चा का केलीत? त्यांच्याशी हातमिळवणी का केलीत? अशी काय जरूर पडली होती? आपल्या राज्यातल्या विषयात त्यांनी लक्ष का घालावं? का लुडबूड करावी?'' अशोक प्रश्न विचारत राहिला.

कैदी यावरही काही बोलले नाहीत. ''आता हे स्पष्ट झालंय की, ग्रीक आणि स्थानीय काही स्वार्थी प्रमुखांनी मिळून हे कारस्थान रचलंय. बंडखोरांचे हेच मूळ! एका काळी ग्रीक साम्राज्याचा हा भाग होता. मौर्य साम्राज्याचे संस्थापक चन्द्रगुप्त यांनी ग्रीकांना इथून पळवून लावलं; ग्रीक तो अपमान अजून विसरलेले नाहीत. त्यांच्या प्रयत्नांवरून हे स्पष्ट होतंय. पण त्यांच्याशी हातमिळवणी करून हे बंड सुरू करणारांबद्दल काय बोलू मी? त्यांच्या वागण्याचं समर्थन आपण कसं करावं? आपला देश दुसऱ्यांच्या हाती सोपवण्याची त्यांची प्रवृत्ती नीच आहे. क्षमा करायच्या लायकीचे नाहीत ते! त्यांना शिक्षा मिळायलाच हवी.'' अशोक गंभीरपणे म्हणाला.

बंडखोरांना कसली शिक्षा मिळणार हे जाणायला जनता अुत्सुक होती. मौन तोडत आता अशोक म्हणाला, ''आपल्या राज्यात परकीय लोकांना ज्यांनी प्रोत्साहन दिलं, त्या सर्वांना फाशी दिलं जाईल! त्यांना मदत करणाऱ्या राजद्रोह्यांनाही मृत्युदंड मिळेल.'' घोषणा करून अशोकने चेहरा वळवला.

त्याबरोबर ''क्षमा करा युवराज! अजाणतेपणे चूक घडली आमच्या हातून! भविष्यात असं घडणार नाही! आम्ही पुढे सावध राहू! आम्हाला प्राणभिक्षा द्या!'' असे म्हणत कैदी रडू लागले.

पुन्हा त्यांच्याकडे वळून अशोक म्हणाला, ''द्रोह्यांना दया दाखवणं, त्यांना क्षमा करणं हे अुचित नव्हे असं म्हणतात. ही शिक्षा इतर सर्वांना जागरूक ठेवील. त्यांना ही एक प्रकारे धमकीच आहे.'' नंतर एकवार अधिकाऱ्यांकडे पाहून, आपल्या घोड्यावर टांग मारून अशोक शिबिरात निघून गेला.

त्याच क्षणी कैद्यांची कत्तल केली गेली. तिथलं वातावरण भयानक बनलं.

**क्रमशः**







# करावे तसे भरावे

दृढनिश्चयी विक्रमादित्य पुन्हा झाडाजवळ गेला. प्रेत खाली काढून त्याने ते खांद्यावर आडवे टाकले आणि तो स्मशानाकडे वळला. ताबडतोब वेताळ बोलू लागला, ''राजा, मध्यरात्रीच्या दाट अंधारात हे स्मशान कसं भीषण वाटतंय! पण तू मात्र बेडर होअून सरळ चालू लागला आहेस. इतके कष्ट कशासाठी अुपसत आहेस, ते तर कळू दे मला! कसल्या अद्भुत, मायावी शक्ती मिळवण्यासाठी तर ही धडपड नव्हे? पण अशा शक्ति मिळवायला दुसरे अनेक अुपाय आहेतच की! त्यातलाच एक आहे - तपस्या! तपोसंपन्न ऋषी विलक्षण अशा शक्ति मिळवू शकतात. पण असे महापुरुष आपल्या शक्तींचा अुपयोग स्वतःच्या फायद्यासाठी कधीच करत नाहीत आपली स्वप्नं खरी करण्यासाठी त्यांचा अुपयोग करू इच्छिणारे अपेशी होतात. कारण अशा स्वार्थ-प्रेरित शक्ति लक्ष्य साधू शकत नाहीत. परन्तु

# वेताळ कथा



या सामान्य नियमाविरुद्धही एका साधूने वर दिला, अन् तो सफलही झाला. भविष्यात तुला या अुदाहरणावरून मार्गदर्शन व्हावं, म्हणून तुला मी ती कहाणी सांगतो.'' अन् वेताळ गोष्ट सांगू लागला. -

पद्माकर व रत्नाकर हे दोघं भाअू. पद्माकर व्यापारात अुत्तम कमाई करत होता. आपल्याच व्यापारात भावानंही भागीदार व्हावं अशी इच्छा त्यानं व्यक्त केली; पण रत्नाकरनं त्याचा प्रस्ताव नाकारला. तो म्हणाला, ''मला दूर देशी जायची इच्छा आहे. तिथे जाअून काही शिकेन मी. तेंव्हा इस्टेटीत माझा जो काही वाटा असेल तो देअून टाक मला!

पद्माकरने पंचांच्या समक्ष पित्याने दिलेल्या इस्टेटीचे दोन सारखे भाग केले आणि एक भाग रत्नाकरच्या हवाली केला. ती संपत्ती घेअून तो निघून गेला. नंतर तो देशभर फिरला, सर्व सुखं अुपभोगली, जवळ होते ते सर्व घालवले आणि पुन्हा आपल्या गावात परत आला. सर्व संपत्ती चोरांनी लुटल्याचे भावाला सांगितले.

पद्माकरने भावाचे सांगणे खरे मानले आणि त्याला आपल्याबरोबर रहायला सांगितले. पण रत्नाकरने त्याचे आमन्त्रण नाकारत म्हटले, ''मी आत्माभिमानी आहे, स्वतःच्या पायांवर अुभं रहायची इच्छा आहे माझी! माझ्यावर विश्वास असेल, तर थोडे पैसे कर्ज म्हणून दे. व्यापार करून आपली स्थिती सुधारीन.''

या बोलण्यावर हसून पद्माकर म्हणाला, ''अरे वा, आत्माभिमानी म्हणवतोस अन् माझ्याकडे कर्ज मागतोस? तुला तर स्वतःच्या कर्तृत्वावर अवलंबून असायला हवं. चांगला लायक आहेस तू. तुझी लायकी सिद्ध व्हावी म्हणून तुला आपली जबाबदारी ओळखायला हवी. लग्न केलंस की कळेल जबाबदारी म्हणजे काय असतं ते! गावातल्या धनवर्धनची मुलगी हेमा सर्वतोपरी तुझ्यालायक आहे. तिच्याशी लग्न कर. तिचे दागिने विकून आपला व्यापार सुरू कर. लग्नानन्तर नवराबायकोत तुझं-माझं असं काही नसतं. तेंव्हा त्या धनात तुझा आत्माभिमान आड नाही येणार.'' एक महिन्याच्या आतच रत्नाकरचे हेमाशी लग्न झाले. व्यापार करण्यात त्याला रुचि नव्हतीच. पण त्याचे दिवस मजेत जात होते. त्याला तीन मुलगेही झाले.



पद्माकरचा एकुलता एक मुलगा होता श्रीमुख. वयाच्या दहाव्या वर्षी त्याची आई वारली. पद्माकरचे बायकोवर प्राणापेक्षा अधिक प्रेम होते. तिच्या मृत्यूनंतर त्याच्या जीवनात विरक्ती आली. आपली सारी संपत्ती आणि आपला मुलगा श्रीमुख यांना आपल्या भावाहाती सोपवून तो हिमालयात निघून गेला. रत्नाकर आता खूपच धनवान बनला. हेमाही चांगली बुद्धिमान होती, त्यामुळे तिने नवऱ्याला धन व्यर्थ खर्चू दिले नव्हते.

परन्तु हे दांपत्य आता श्रीमुखच्या बाबतीत काळजीत पडले. पित्याची सगळी इस्टेट एक ना दिवस त्याच्या हाती द्यावीच लागणार होती. पण या दोघांनाही त्याची इस्टेट घशात घालायचा लोभ सुटला होता. त्यांनी एक युक्ती करायची ठरवली. ती म्हणजे - गोड गोड बोलून श्रीमुखला आपलंसं करून त्याला कुचकामी, निरुद्योगी बनवायचे.

एक दिवस रत्नाकर श्रीमुखला म्हणाला, ''शिक्षणामुळे मी व्यसनात अडकलो. आपल्या वाटची सगळी इस्टेट निकालात काढली. तुझ्या पित्यानं मग माझं शिक्षण थांबवलं अन् तेंव्हापासून मी चांगला माणूस बनलो. तूही न शिकण्यातच तुझं कल्याण आहे.''

श्रीमुखने शिक्षण सोडून दिले. ''या गावात इतर कित्तीतरी माणसं आहेत; पण तुझ्या बापानं तुला माझ्याच स्वाधीन केलं की नाही? त्याचं बहुधा असंच मत असावं की, फक्त माझ्यामुळेच तुझं कल्याण होईल. तेंव्हा इथून पुढं तू माझंच सर्व काही ऐकायला हवं. दुसरं कोणी काहीही म्हणालं, तरी तिकडं



कानाडोळा करायचा. काय?'' रत्नाकर गंभीरपणे बोलला. अन् तेंव्हापासून श्रीमुख काकाचंच सारं ऐकू लागला, त्याप्रमाणे वागू लागला.

''धन शाश्वत नसतं. माणसानं खरं पाहता मेहनत करून आयुष्य कंठावं. आजपासून घरचं सगळं काम तू संभाळायला लाग.'' रत्नाकरने सांगितले. आणि तेंव्हापासून श्रीमुख घरच्या नोकरापैकीच एक बनला.

''तुला कदाचित् असं वाटत असेल की सगळं काम आम्ही तुझ्यावर टाकलं आहे, अन् बाकीचे आम्ही सारेजण काही कामच करत नाही. पण असल्या विचारांनी माणसाचं भलं होत नाही, त्याचं नुकसानच होतं. तुझी आई वारल्याबरोबर वडील स्वतःला



विचारातच हरवून बसले अन् घरदार सोडून निघून गेले. विचार करणं सोडून दिलं असतं, तर आज ते आपल्यात राहिले असते. तेंव्हा विचार करायचा भार तू माझ्यावर सोपव. समज, की आम्ही तुझे मालक आहोत. आमची सेवा करणं हाच आपला धर्म समज. तुझा अुद्धार होईल बघ.'' रत्नाकरने त्याला अुपदेश दिला.

जे लोक हे सारे पहात, ऐकत होते त्यांना याबद्दल फार वाईट वाटले. श्रीमुखबद्दल ते सहानुभूती दाखवू लागले. काही लोकांनी रत्नाकरजवळ तो अन्याय करत असल्याबद्दल बोलायचेही धाडस केले. पण त्यांना विरोध करत रत्नाकर म्हणाला, ''याचा बाप आहे संन्यासी. हाही संन्याशासारखा वागू पहातोय. गुरू शंकरनंतर आमच्या या श्रीमुखलाच हे शक्य झालं. आम्हालाही असंच जगावंसं वाटतंय, पण आम्ही काही तितके भाग्यवान नाही आहोत. आमची इच्छा तर आहे, की त्याला आमचं भाग्य मिळावं. पण नुसतं मनात आणून काय तसं घडत असतं? प्रत्येकाचं भाग्य निराळं!''

बोलणे ऐकून श्रीमुखला तर 'आपण किती भाग्यवान!' असे वाटले. अन् हे भाग्य काकामुळे मिळालंय; काकाही आपल्यासारखे भाग्यवान बनू इच्छित आहेत, पण त्यांना मात्र ते जमत नाहीय' असेही वाटले. हळूहळू हा विचार त्याच्या मनात पक्का रोवला गेला.

अशीच पाच वर्षे निघून गेली.

हिमालयात गेलेला पद्माकर मनःशान्तीसाठी तपस्या करत राहिला. त्यामुळे त्याला काही शक्ती प्राप्त झाल्या. आता मुलाला भेटायला अुत्सुक होअून तो गावी परत आला.

दाढीमिश्या वाढल्या असल्यामुळे रत्नाकर त्याला ओळखू शकला नाही. त्यानेही ओळख दिली नाही. साधू घरासमोर अुभा पाहून रत्नाकरने त्याला आत बोलावले.

रत्नाकरने श्रीमुखला साधूच्या सेवेला लावले. श्रीमुख मोठ्या श्रद्धाभक्तीने सेवेला लागला, त्याच्या गरजा पुरवू लागला. थोड्याच वेळात आपल्या मुलाचे घरातले स्थान पद्माकर समजून चुकला. आपल्या दुःखावर ताबा मिळवणे त्याला कठीण जाअू लागले. श्रीमुखला तो म्हणाला, ''मुला, अरे तू तर या घराचा मालक! नोकर बनायची अशी दुःस्थिती कशी अन् का तुझ्यावर येअून पडली?''

''हे माझं दुर्भाग्य नव्हे, सौभाग्यच आहे की!'' श्रीमुख स्पष्ट म्हणाला. ''अरे, तुझा काका दुष्ट आहे. फसवलंय त्यानं तुला!'' पद्माकर सूडभावनेने भरत बोलला.

साधूकडे नाराजीचा कटाक्ष टाकत धावत आत जाअून श्रीमुख रत्नाकरला म्हणाला, ''तो साधू तुम्हाला दुष्ट, धोकेबाज म्हणतोय काका! मला सहन नाही होत ते! मी नाही त्यांची सेवा करणार!''

श्रीमुखला बरोबर घेअून रत्नाकर साधूजवळ येअून म्हणाला, ''मला वाटलं होतं की आपण खरेच श्रेष्ठ साधू आहात. पण आपणही या बाकी लोकांप्रमाणेच मला दुष्ट, धोकेबाज म्हणताय! मला तुमचा संशय येतो आहे. माझा हा पुतण्या माझ्यावर प्राणापेक्षा जास्त प्रेम करतो. तो माझ्या अंगावर माशीही बसू देत नाही हे सत्य तुम्हाला कळलं तर बरं होईल.''

पद्माकरही नाराज होत म्हणाला, ''मी खराच साधू आहे. तुझी दगाबाजी ओळखलीय मी. तुला माझ्याबद्दल जो संशय आहे, तो दूर करण्यासाठी श्रीमुखला एक वर द्यायची माझी इच्छा आहे.' नंतर मुलाकडे पहात तो म्हणाला, ''दुसऱ्या कोणाचं नुकसान होणार नाही, अशी दक्षता घेअून तू वर माग.''

श्रीमुख रत्नाकरच्या तोंडाकडे पाहू लागला रत्नाकरने त्याला मानेने 'होय' म्हणायला सुचवले.

''मी मोठा भाग्यवान आहे. माझ्याबाबत सर्व विचार माझे काकाच करतात. त्यामुळे माझी स्वतःची अशी काही इच्छाच नाही.'' श्रीमुख बोलला. रत्नाकर गर्वाने हसत म्हणाला, ''पाहिलंत? श्रीमुखला



स्वतःसाठीही काही विचार करायची गरज नाहीय.''

आता सर्व परिस्थिती पद्माकरच्या लक्षात आली. भावाने आपल्या मुलाला पूर्णतः कुचकामी बनवलं आहे, हे त्याच्या लक्षात आले. अशा मुलाचं आता आपण कसं कल्याण करू शकू - या विचारात पडला तो.

रत्नाकर म्हणाला, ''श्रीमुख, साधु-महाराज इतका जोर देत आहेत, तर काही न मागणंही बरं नव्हे. तुझी स्वतःसाठी काही इच्छा नसेल, तर माझ्यासाठी असा वर माग की, मी नेहमी सुखी, संतुष्ट रहावं. हे महाराज तो वर नक्की देतील!''

क्षणाचाही विलंब न करता श्रीमुख बोलू लागला, ''माझी अशी इच्छा आहे की, माझं सारं भाग्य काकांचं होवो. त्यांचं भाग्य माझं

होतो. त्यांना संतुष्ट ठेवायचा हाच एकमेव मार्ग समजतो मी.'' पद्माकरने यावर 'तथास्तु!' म्हटले. तो वर फलित झाला. त्या दिवसापासून श्रीमुख घराचा मालक झाला अन् रत्नाकर त्याच्या कुटुम्बासह नोकर बनला. स्वतःबद्दल काहीच न बोलता पद्माकर हिमालयात निघून गेला.

गोष्ट सांगून वेताळने विक्रमला विचारले, ''राजा, तान्त्रिकांशिवाय कोणीही साधु शक्तींचा अुपयोग स्वार्थासाठी करत नाही. ते साधुलक्षण नव्हे! तसं केल्यानं फळही मिळत नाही. पण पद्माकरनं स्वार्थानं आपल्या मुलाच्या भल्यासाठी वर दिला; आपल्या भावाचं नुकसान करणारा वर दिला. अन् आश्चर्य म्हणजे तो सफल झाला! तुला हे विचित्र नाही वाटत? धर्मविरुद्ध दिसत नाही?

विक्रम अुत्तरला, ''रत्नाकरची नियत खराब होती. अति लोभ त्याच्या मनात घर करून होता. त्यानं इतकाही विचार केला नाही की हा आपला सख्या भावाचा मुलगा म्हणजे स्वतःच्या मुलासारखाच आहे. त्याने श्रीमुखला पंगु, अकर्मण्य बनवले. विचारशक्तीही काढून घेतली त्याची! एकाद्या जड पदार्थासारखा बनवला त्याला! त्याची चेतनाच जणू काढून घेतली. नुसताच 'होयबा' बनवला त्याला ! पण असं करून स्वतः खणलेल्या खड्ड्यात तो स्वतःच पडला. धोकेबाज रत्नाकरच्या गोड गोड बोलण्यामुळे श्रीमुख स्वतःला भाग्यवान समजू लागला होता. आपला काका भाग्यहीन आहे, असे त्याला वाटू लागले त्याचा हा विश्वास दृढ होत गेला. वर मागण्यात कुणाचं नुकसान करण्याचा त्याचा हेतु नव्हताच. अुलट परोपकार बुद्धीनंच त्यानं वर मागितला. त्यामुळे तो फलितही झाला. साधु संन्यासीच नव्हे, तर दुष्टांना जे कोणी दंड देतात तो धर्मसम्मतच असतो. पद्माकरची इच्छा असती, तर तो स्वतःच सर्व शक्तीनिशी रत्नाकरला शिक्षा करू शकला असता. पण त्यानं तसं केलं नाही. दुष्टांना दंड देण्यात प्रजाहित असतं, ते धर्मसम्मतही असतं. हा स्वार्थ नव्हे अन् धर्मविरुद्ध ही नव्हे!''

आता राजाचे मौन भंग करण्यात सफल झालेल्या वेताळाने त्याच्या हातावर तुरी दिली अन् प्रेतासह तो अदृश्य झाला!





# भट्टचे वाक्चातुर्य

खूप जुनी गोष्ट. राजदरबारात नारायण भट्ट नावाचा एक खुशमस्कऱ्या होता. आपल्या समयसूचकतेने आणि वाक्चातुर्याने दरबारी मंडळींना अन् राजाला तो खूश करत असे. राजाने आपल्या किल्ल्याच्या दुसऱ्या बाजूला त्याला एक सुंदर घर बक्षिस म्हणून बांधून दिले होते.

कसलाही त्रास न होता नारायण भट्ट त्या घरात अनेक वर्ष आनन्दाने राहिला. पण नुकतेच काही दिवसांपूर्वी बहुमल नावाच्या एका मल्लाने त्याच्याजवळचे घर विकत घेतले अन् त्यात तो राहू लागला. बास! तेंव्हापासून भट्टची झोप अुडाली!

याचे कारण होता बहुमलचा पाळीव कुत्रा! तो रात्रभर भुंकत राही. त्याचा आवाजही फार मोठा होता. त्यामुळे भट्टला झोप येत नाहीशी झाली. त्याचा त्रास दिवसेंदिवस वाढतच चालला. थोडे दिवस त्याने सर्व सहन केले. पण परिस्थिती हाताबाहेर गेल्यावर तो बहुमलशी याबाबत बोलला. बहुमलला त्याने असे सुचवले की रात्री कुत्रा भुंकू नये अशी काही व्यवस्था त्याने करावी.

यावर जोराने हसत बहुमल म्हणाला, ''मी कुत्रा पाळल्यामुळे चोराचिलटांची भीती नसते मला. यात तुझंही कल्याणच आहे नं!''

''कल्याणाची गोष्ट देवाला ठाअूक ! तू आपल्या कुत्र्याला असं प्रशिक्षण दे, की तो नवीन माणसांना-चोरांना पाहूनच भुंकेल. तू जर तशी व्यवस्था न केलीस तर तुझ्या कुत्र्याचं तोंड कायमचं बन्द करायची अुत्तम व्यवस्था मी करीन!'' नारायण भट्ट धमकीच्या आवाजात बोलला.

त्याच्या बोलण्यावर व्यंगाने हसत बहुमल म्हणाला, ''तुला कदाचित वाटत असेल, की मी एक आपला गावठी कुत्रा.

नंदिता चव्हाण

ठेवलाय आणून! पण तो आहे शिकारी कुत्रा माणूसच काय, पण वाघ जवळ आला, तरी तो त्याचं नरडं पकडील.'' अन् त्याने घराचे दार बन्द केले.

यानन्तरही चारपाच दिवस भट्टने कुत्र्याची कटकट सहन केली. पण राहवेनासे झाल्यावर एका रात्री कुत्रा भुंकायला लागल्याबरोबर एक जाडशी लाठी घेऊन कुत्र्याजवळ जाऊन त्याने एक जोरदार प्रहार कुत्र्याच्या कमरेवर केला, त्यामुळे त्याचे पेकाटच मोडल्यासारखे झाले.

कुत्रा वेदनेमुळे जास्तच जोराने भुंकू लागला. बहुमल बाहेर येऊन म्हणाला, ''वा रे वा! इतक्या दिवसांनंतर माझ्या कुत्र्यानं चोर पकडला तर!'' अन् तो नारायण भट्टवर झडप घालू लागला.

इतक्यात ''थांब, मी चोर नव्हे! कुणाला पाहून भुंकावं, केव्हा भुंकावं हे समजण्यासाठीच मी आत्ता कुत्र्याच्या पेकाटात लाठी मारलीय.'' भट्ट बोलला.

ते ऐकून रागाने धुमसत बहुमल म्हणाला, ''माझ्या कुत्र्याला मारायचं धाडस केलंस? काहीही झालं तरी मी सहन नाही करणार ते! पुन्हा कधी माझ्या कुत्र्याला असं मारलंस, तर तुझं कंबरडंही मोडीन मी'' बोलताना दातओठ चावत होता तो.

''तसं असेल तर मी त्याच्या डोक्यावर मारीन. बघ, पहात रहा.'' नारायण भट्ट बोलला.

बहुमल पायाखालच्या जमिनीवर पाय आपटत म्हणाला, ''तू डोक्यावर मारलंस, तर मी तुझं डोकं फोडीन; पायावर मारलंस, तर तुझे पाय कापून टाकीन समजलं?''

''होय छान समजलं! यापुढे रात्री तुझ्या कुत्र्यानं माझी झोप मोडली, तर मी त्याची शेपूट पिरगाळीन, त्याचे मऊ केस भादरून ते तुला दिसू नयेत म्हणून त्याचं चूर्ण करीन. तो वेदनेनं विव्हळत राहील, अन् तुलाच चावायला येईल.'' असे म्हणून भट्ट तिथून निघून गेला.

भट्टचे पांडित्य आणि बुद्धिमत्ता पाहून बहुमल अवाक् झाला. राजाने त्याला इतका सुन्दर बंगला बांधून का दिला हे ही त्याला समजले.

बहुमल भट्टच्या वाक्चातुर्यावर खूश झाला! त्याने कुत्रा रात्री भुंकू नये, असं प्रशिक्षण त्याला द्यायचे ठरवले.








समुद्रकिनाऱ्यावर सहल - १८

# चेन्नै मधे

**शब्दांकन - मीरा नायर ☆ चित्रकला : के एस गोपकुमार**

सेण्ट जॉर्ज किल्ला तर बनला. परंतु ही नैसर्गिक बन्दर असलेली जागा नसल्यामुळे फ्रान्सिस डे ला चांगलेच फैलावर घेतले गेले. जहाजांना समुद्रात दूरवर लंगर टाकावा लागे आणि प्रवासी व माल लाकडी फळ्या जोडून बनवलेल्या चपट्या तराफ्यांवरून किनाऱ्यावर आणावे लागे. परन्तु १८८१ पर्यन्त मरीना बीचच्या उत्तरेला एक असे उत्तम कृत्रिम बन्दर बनवण्यात आले, की जे आज जहाजांच्या आवागमनाचे एक प्रमुख केन्द्र बनून आहे.

मरीना बीचच्या दक्षिण टोकावर सेंट थॉम बॅसीलिका (मोठे चर्च) आहे. येशूच्या बारा प्रमुख शिष्यांपैकी एक सेंट थॉमस दिदीमसच्या समाधीवर हे बनवलेले आहे. असे मानले जाते की सेंट थॉमस सन ५२ मधे भारतात आले होते. चर्चच्या झरोक्याच्या रंगीत काचांमधे या संताच्या भारतात पोचण्याच्या व ख्रिश्चन धर्माचा इथे प्रसार करण्याच्या प्रसंगांची चित्रे बनवलेली आहेत. सेंट थॉमच्या जवळच अड्यार नदीच्या किनाऱ्यावर थिऑसॉफिकल सोसायटीचे विश्वकेन्द्र आहे. सोसायटीची स्थापना मादाम ब्लावट्स्की व कर्नल ऑल्कोट यांनी अमेरिकेत केली होती. अड्यारच्या या विश्वकेन्द्राची स्थापना डॉ. ॲनी बेझंट यांनी केली. त्या एक इंग्रज स्त्री होत्या. परन्तु त्यांनी आपल्या स्वातन्त्र्य संग्रामात अहमहमिकेने भाग घेतला.



सेण्ट थॉम बॅसिलिका



थिऑसॉफिकल सोसायटीचे ग्रन्थालय पौर्वात्य संस्कृति संबंधीच्या साहित्याचे सर्वात सुन्दर संग्रहांपैकी एक आहे. त्यात १,६०,००० छापील पुस्तके व ताडपत्रावर लिहिलेल्या सुमारे २०,००० पोथ्या आहेत.

सोसायटीच्या अुद्यानात सर्व धर्मांची अुपासनागृहे आहेत. आणि २०० वर्षांचा जुना मानला जाणारा एक विशाल वटवृक्ष आहे. याच्या छायेत ३,००० माणसे एकाच वेळी सामावली जाअू शकतात.

कलाक्षेत्र सभामंडप

शास्त्रीय संगीत व नृत्याचे विश्वप्रसिद्ध केन्द्र 'कलाक्षेत्र' ही या सोसायटीपासून फार दूर नाहीय. याची स्थापना श्रीमती रुक्मिणीदेवी अरुंडेल यांनी सन १९३६ मधे केली. त्या स्वतः भरतनाट्यम्‌च्या सुप्रसिद्ध नर्तकी व थिऑसॉफिस्ट होत्या.

द. भारतातील प्रसिद्ध भारतनाट्यम् हा नृत्यप्रकार १९३० च्या दशकापर्यंत केवळ मंदिरातून देवदासीं द्वाराच सादर केला जाई. कुलीन घरातील मुली भरतनाट्यम् शिकतील अशी कल्पनाही अशक्य कोटीतील वाटे. पण श्रीमती अरुंडेल ही मनोवृत्ती बदलण्यात सफल झाल्या आणि आपल्या कलेच्या द्वारे त्यांनी चेन्नैला भरतनाट्यम्‌चे महान केन्द्र बनवले.

येथून जरासे दक्षिणेला गिंडी राष्ट्रीय अुद्यान आहे. आपल्या देशातील नैसर्गिक अुद्यानांपैकी हे एक असून येथे अजूनही काळवीट (काळी हरणे) आढळतात. तमिळनाडूचे राजभवन, इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ टेक्नॉलॉजी (आय. आय. टी) व भारतातील सर्वात जुने इंजिनिअरिंग कॉलेज - गिंडी इंजिनिअरिंग कॉलेज - याच अुद्यानाच्या आवारात आहेत. भारतातच येअून राहिलेले अमेरिकन सर्पप्रेमी रोम्युलस व्हिटेकर यांनी आपले सर्पोद्यानही येथेच बनवले आहे. यात आपण भारतातील विविध जातीचे साप पाहू शकतो, त्यांना स्पर्श करू शकतो व त्यांचे फोटोही काढू शकतो.

अशी एक कथा आहे की, शिव-पार्वती एकदा आपसात गप्पा मारत बसले होते. पार्वतीचे लक्ष दुसरीकडेच कुठे होते. शंकराला वाटले की, 'ती आपले बोलणे ऐकत नाहीय.' त्यांनी शाप देअून पार्वतीला लांडोर बनवले. पार्वतीने लांडोर (मयिल) रूपात तपस्या करून शिवाला प्रसन्न केले व आपले





पहिले रूप परत मिळवले. तिने तप केलेल्या स्थानाला मैलापुर (मयूरपुर) म्हणतात.

कपालीश्वर मन्दिरात पुन्नै वृक्षाच्या छायेत बनलेल्या देवकुळात आजही लांडोर रूपातल्या पार्वतीची पूजा केली जाते. हा वृक्ष चेन्नैमधील सर्वात जुन्या वृक्षांमधे गणला जातो.

कपालीश्वर मन्दिरापासून थोड्या अंतरावर लूज चर्च आहे. हे चेन्नैमधील सर्वात जुन्या चर्चेस्‌पैकी एक असून ते १५४७ ते १५८२ च्या काळात पोर्तुगीजांनी ज्योतिर्मयी माता मरियमच्या सन्मानार्थ बांधले आहे. कथा अशी की एक पोर्तुगीज जहाज समुद्रात बुडाले. त्यातले काही नावाडी पोहत राहिले. त्यांना एक तीव्र प्रकाशाची ज्योत दिसली व त्या दिशेने पोहत ते किनाऱ्यावर सुरक्षित पोचले. परन्तु तिथे पोचताच ज्योत मात्र अदृश्य झाली! कृतज्ञतेने ज्योत दिसल्याजागी त्या नाविकांनी हे चर्च बांधले.

पार्थसारथी मन्दिर

ट्रिप्लिकेन ही १४०० वर्षांची जुनी वस्ती असून, येथे एक पार्थसारथी मन्दिर आहे. हेही चेन्नैमधील सर्वात जुन्या बांधकामांपैकी एक होय. येथे श्रीकृष्णाची पार्थाच्या (अर्जुनाच्या) सारथीच्या रूपात पूजा केली जाते.

ट्रिप्लिकेनच्या पुढे चेन्नैच्या पूर्वभागात वल्लुवर कोट्टम् आहे. हा एक विशाल सभामंडप असून तो ई.स.पू. च्या पहिल्या शतकातील तमिळ संत कवि तिरुवल्लुवरच्या स्मृतिप्रीत्यर्थ नुकताच बांधण्यात आला आहे. तिरुवल्लुवरचा १,३३० तमिळ सूत्रे असणारा महान् नीतिग्रन्थ या मंडपाच्या खांबांवर कोरलेला आहे. खांब ग्रेनाइट दगडाचे बनवले आहेत.

हे मंदिर म्हणजे ३३ मीटर अुंच असा रथच आहे. यात तिरुवल्लुवरचा पूर्णाकृति पुतळा स्थापन केलेला आहे. रथ ज्या चबुतऱ्यावर बनला आहे, त्यावर तिरुकुरळच्या १३३ अध्यायांची अुठाव चित्रे

बनवलेली आहेत. या मंडपात एकाच वेळी ४,००० माणसे बसू शकतात. आशियातील हा सर्वात मोठा सभामंडप मानला जातो. आणखी एक अुल्लेखनीय अुपासना स्थल म्हणजे अण्णा सालै (माअुंट रोड) च्या एका कोपऱ्यावर असणारी थाअुजंड लाईट्स् मशीद. या मशिदीत १००० दिवे लावले जात असत.

चेन्नैचे कोडम्बाक्कम् अुपनगर 'दक्षिणेचे हॉलिवुड' म्हणवले जाते. येथे अनेक फिल्म स्टुडियो आहेत. यात दक्षिण भारतातील सर्व भाषांतून आणि हिन्दीतूनही फिल्मस् बनतात. विदेशी फिल्मस्चे डबिंगही येथे केले जाते.

चेन्नैचा सर्वात जुना व प्रसिद्ध औद्योगिक भाग आहे पेरम्बूर. येथील इण्टिग्रल कोच फॅक्टरी पूर्ण देशात प्रसिद्ध आहे. येथे आगगाडीचे डब्बे बनवले जातात. फॅक्टरीचे हॉस्पिटल हृदयाच्या शस्त्रक्रियेसाठी प्रसिद्ध आहे. पेरम्बूर जवळच काशी विश्वनाथ मन्दिर आहे. दरवर्षी तिरुपतीच्या भगवान वेंकटेश्वराला अर्पण केल्या जाणाऱ्या छत्र्या एक रात्र इथे ठेवून नंतर तिरुपतीला रवाना होतात.



संत कवि तिरुवल्लुवर

मंदिराबरोबरच तावकर धर्मशाळा नावाची एक धर्मशाळा आहे. १७६० च्या आसपास प्रथम चेन्नैमधे रहायला आलेल्या गुजराथी परिवारातील एक असणाऱ्या तावकर परिवाराने ही धर्मशाळा बांधलेली आहे. एके काळी तावकर हे चेन्नैमधील एक प्रसिद्ध जव्हेरी होते. १८०४ मधे या परिवारातील दोन स्त्रियांनी एक ट्रस्ट स्थापन केला. यांच्या दानातून हे मन्दिर बांधण्यात आले.



वल्लुवर कोट्टम्







# दिवा-स्वप्न

रतनपुर गावच्या एका शेतकऱ्याचा राही नावाचा एक तरूण मुलगा होता. शेतीच्या कामात आपल्या बापाला तो मुळीच मदत करत नसे. राजकन्येशी लग्न करून राजा बनायचे दिवास्वप्न तो सदा न् कदा पहात असे. बापाने त्याच्या या तऱ्हेवाईकपणाला कंटाळून त्याला घरातून हाकलून दिले.

राहीला बापाचे हे कृत्याही शुभसूचकच वाटले. सरळ राजधानीला जाअून तो आपला मामा कालू याच्याकडे पोचला. या मामाने पूर्वी राजाच्या सेनेत काम केले होते. साहस व धैर्य या गुणांबद्दल राजाकडून त्याला पारितोषिकही मिळाले होते. त्याची मुलगी मल्लिका ही राजकुमारी प्रियंवदा हिची प्रमुख परिचारिका होती.

सुंदर व धष्ट-पुष्ट राही कालूला खूपच आवडला. त्याला पाहून कालूला आनन्द वाटला. अशा तरुणाला राज-दरबारात सहजपणे नोकरी मिळून जाई. म्हणून कालूने विचार केला की, याला अगोदर नोकरी लावून देअू अन् नंतर आपल्या मुलीशी त्याचे लग्न लावून देअू. घरजावई बनून आपल्याच घरी राहील तो.

आपला हा विचार त्याने राहीला सांगितला. राजदरबारात नोकरी मिळण्याच्या कल्पनेने तो खुश तर झाला. पण मल्लिकाशी लग्न मात्र त्याला पसंत नव्हतं. आपला हा विचार त्याने प्रकट होअू दिला नाही. मनात त्यानं विचार केला - गड तर जिंकू, मग पाहू लग्नाचे काय ते! त्याने मामाला होकार दिला.

अगोदर राहीला सैनिकाची नोकरी मिळवून द्यायचा कालूचा विचार होता. पण त्याने या नोकरीला नकार दिला. त्याने स्पष्टच सांगितले की, 'ढाल-तलवार बर्ची घेअून नगरापासून दूर डोंगराळ भागात फिरणं

धरणीधर गुर्जर



आपल्याला आवडणार नाही.' यावर कालू म्हणाला, ''तर मग पहारेकऱ्याचं काम घे आणि रात्री नगरातल्या रस्त्यांवर पहारा दे.'' त्याने हे कामही नाकारले. 'रात्री नगरातल्या रस्त्यांवर फिरून दमछाक करणं आपल्याला मुळीच आवडणार नाही' असे त्याने सांगून टाकले.

दोघांचे बोलणे ऐकून राहीला न विचारताच मल्लिकाने त्याला एक नोकरी मिळवून दिली. आता त्याचे काम होते - रात्री किल्ल्यात राहून प्रत्येक प्रहराची घंटा वाजवून वेळ सूचित करणे.

नोकरी करायला लागून दिवस, आठवडे अन् महिनेही निघून गेले. पण राजकुमारीचे नुसते दर्शनही त्याला लाभले नाही.अगदी रहावेनासे झाल्यावर त्याने एका माळ्याला 'राजकुमारी या बाजूला केंव्हा केंव्हा येते' याबद्दल विचारले.

म्हातारा माळी हसून म्हणाला, ''अरे, राजकुमारीला इकडे यायची काय गरज? समोर भिंत आहे नं, त्याच्या पलिकडे ती उद्यानात आपल्या सख्यांसह खेळते, तिथल्या तलावात जलक्रीडा करते आणि नंतर अंत:पुरात निघून जाते. राजकन्येला पहायची तुझी इतकी तीव्र इच्छा असेल, तर एक-दोन महिने धीर धर. राजा तिच्यासाठी वरसंशोधन करत आहे. विवाहाच्या वेळी तर आपल्यासारखे सर्वचजण तिला पाहू शकू.''

राजकुमारीच्या विवाहाबद्दल ऐकून राही फार चिंतेत पडला. आपले हृदय बंदच पडेल असे त्याला वाटले. उशीर झाला तर ती हातची निसटेल असे वाटून तिला भेटायचा एक उपाय त्याने शोधून काढला. दुसऱ्या दिवशी राजकुमारीसाठी फुले घेऊन जाणाऱ्या दासीला तो भेटला. बोलण्यात गुंतवून तिला न कळत बरोबर लिहून आणलेली चिठ्ठी त्याने फुलांच्या परडीत लपवली.

पत्रात त्याने लिहिले होते, ''आपणासाठी मी फार दूरच्या गावाहून इथे आलो आहे. त्यासाठी मी एक जंगल पार केले, दोन नद्या ओलांडल्या आणि डोंगराळ मुलुखातून चालत आलो. इतके कष्ट मी केवळ आपणासाठीच केले. रात्री घंटा वाजवण्याचं कामही मी आपणासाठीच स्वीकारलंय. आपला - राही.''

दासी परडी घेऊन निघून तर गेली; पण आता इकडे राहीला भीती वाटू लागली. त्याने ऐकले होते की राजा शासनाच्या बाबत फार



कडक आहे. कोणावर खप्पा मर्जी झाली, तर तो स्वत:वर ताबा ठेवू शकत नाही. गुन्हेगाराला अत्यन्त कडक शिक्षा देतो. किल्ल्यातले इतर नोकर यासंबंधी निरनिराळ्या गोष्टी सांगत असतात. त्याच्या मनात आले, ''माझं नशीब बरं नसेल, तर ती चिठ्ठी वाचून राजकुमारी चांगलीच भडकेल अन् ती चिठ्ठी आपल्या पित्याला दाखवेल. मग भरलीच की आपली कंबक्ती! राजा आपली चांगलीच चामडी लोळवेल, आपले तुकडे तुकडे करून कोल्ह्या-गिधाडांपुढे टाकेल.''

विचार करता करता त्याची काळजी वाढत गेली अने त्याचे मानसिक संतुलन बिघडले. उन्माद झाल्यासारखा वागू लागला तो. पहिल्या प्रहराची घंटा त्याने वाजवलीच नाही. आणि दुसऱ्या प्रहराला एकदम तीन टोल वाजवले!

तीन टोल ऐकून राजा दचकून आपल्या बिछान्यावर उठून बसला. दररोज तिसऱ्या प्रहरी जागायची त्याची सवय होती. दासी येऊन त्याला उठवत असत. पण आज तसे घडले नाही .त्याला याचे आश्चर्य वाटले आणि नाराज होऊन त्याने टाळी वाजवली. आवाज ऐकून दासी धावत आल्या. राजाने त्यांना चांगलेच फैलावर घेतले. नंतर आन्हिके उरकून तो न्याहारीसाठी मुदपाकखान्याकडे वळला. पण तिथे तर अंधारच अंधार होता. हताश झालेल्या राजाला 'असे का होत आहे' हे समजेना. विचार करत तो बसून राहिला. बराच वेळ झाला, तरी चौथी घंटा वाजलीच नाही. तेंव्हा पहारेकऱ्याला बोलावल्यावर राजाला समजले की अजून तिसरा प्रहर संपायला पुष्कळ अवकाश आहे. हे



समजल्यावर राजा संतापला व त्याने राहीला बोलावून घेण्याची आज्ञा दिली.

राजाकडून बोलावणे आल्यावर आपल्या पत्राबद्दल त्याला कळले असल्याची राहीची खात्री झाली. आता आपल्याला नक्कीच फाशी दिली जाणार असे वाटून तो घाबरत, थरथर कापत शिपायांबरोबर जाऊन राजासमोर कसाबसा उभा राहिला.

त्याला पाहिल्याबरोबर राजाने विचारले, ''अरे, रात्री घंटा तूच वाजवतोस ना?''

राहीच्या तोंडून शब्द फुटत नव्हता. कापत-कापत त्याने होकारात्मक मान हलवली.

त्याची दयनीय अवस्था पाहून राजाला खरोखरच त्याची दया आली. आता काहीशा आश्वासक आवाजात त्याने विचारले, ''तू

किती वर्षं हे काम करत आहेस?'' ''तिसरा महिना चाललाय महाराज!'' राहीं भीत-भीत अुत्तरला. एकवार त्याच्याकडे आपादमस्तक नजर टाकून राजा हसत म्हणाला, ''तू चांगला धष्टपुष्ट अन् बलवान दिसतोस. तुला तर सैनिक म्हणून नोकरी मिळायला हवी होती.पण कोणी तुला हे घंटा वाजवायाचं काम दिलं, कुणास ठाअूक! आता एक आठवडभर नीटपणे हे काम संभाळ. नंतर सेनापतीला सांगून तुला सैन्यात भरती करवीन.''

पण अजूनही त्याचे थरथरणे संपले नव्हते. बचावल्याच्या आनन्दात तो तेथून हळूहळू निघाला. पण अजूनही डोक्यावर काळजी होतीच की राजाला पत्राची गोष्ट कळेल अन् मग आपली खैर नाहीच!

मान खाली घालून तो किल्ल्याच्या प्रवेश द्वाराकडे जाअू लागला, अन् मल्लिका समोरून आली. ती म्हणाली, ''अरे माझ्या भोळ्या साजणा! मला माहीत आहे की, आपलं कुग्राम सोडून तू माझ्यासाठीच इथे आला आहेस? पण आपल्या मनची गोष्ट सांगायला तुला ती फुलांची टोपलीच मिळाली? मी त्या माळा राजकुमारीसाठी बनवते. बरं झालं ती चिठ्ठी माझ्याच हाती लागली. राजकुमारीच्या हाती पडली असती, तर तुझं डोकं कापून किल्ल्याच्या द्वारावरच लटकावलं असलं तिनं. तिला वाटलं असतं की, तू प्रेमपत्र तिलाच लिहिलं आहेस! बाबा दोन-चार दिवसातच आपल्या दोघांचं लग्न करून देणार आहेत. अन् चिठ्ठीवर माझं नाव लिहायचीही लाज वाटली तुला? शेवटी खेडवळच ना तू?'' अन् हसत हसत ती अंतःपुराकडे निघून गेली.

मल्लिकाचे बोलणे ऐकून पहाडाचे ओझे डोक्यावरून दूर झाल्यासारखे वाटले राहीला. आता जरा निचिन्त होअून तो विचार करू लागला, ''मूर्ख बनून केवढी मोठी चूक केली होती मी? जरा इकडं-तिकडं झालं असतं तर फाशी झाली असती मला. बरं झालं, वाचलो! माझ्यासारख्यानं दिवसा स्वप्न पहाणं बरं नव्हे. आपल्या मर्यादेतच रहावं आपण, अन् शक्तीनुसार काम करावं. जमिनीवर अुभा राहून आकाशाला स्पर्श करू पाहीन, तर असंच फळ मिळेल. मल्लिकानं वाचवलं नसतं, तर काय झालं असतं माझं? मला राजकुमारी नकोच. मल्लिकाच बायको म्हणून योग्य आहे आपल्याला!''







# सोनेरी क्षण - १२



१. ... विषुववृत्ताजवळ पेंग्विन पक्षी?
जगात फक्त या द्वीप समूहातच अुष्ण कटिबंधातील कासवे, मोठ-मोठ्या इग्वाना पाली यांच्याबरोबरच पेंग्विन पक्षीही सहजीवन जगतात.



## जगात हे कोठे आढळेल?

२. .... सर्वात लहान देश?
हा फक्त अर्धा वर्ग कि.मी. क्षेत्र असणारा देश असून त्याची लोकसंख्या हजारभरच आहे. हा सर्वात लहान देश असूनही त्यांचा आपला स्वतन्त्र ध्वज असून आपले राष्ट्रगीत ही आहे.



३. ... सर्वात अुंचावरचे सरोवर?
टिटिकाका सरोवर समुद्रसपाटीपासून ३८११ मीटर्स अुंचीवर असून त्याची लांबी १९० कि.मी व खोली ३७५ मी. इतकी आहे. याने ०९६५ वर्ग कि.मी. इतके क्षेत्र व्यापलेले आहे.





४. ... सर्वात रुंद असणारा लांबच लांब पुल?
याला त्या प्रदेशात 'ओल्डकोट हँगर' असे संबोधतात. यावरून रहदारी १९३२ मध्ये सुरु झाली. पुलाची रुंदी ४८.८ मी. असून एकाच वेळी एकाला एक समान्तर अशी आठ वाहने त्यावरून जाअू शकतात.



५. ... अुंदरांना मान देणारे मन्दिर?
पांढऱ्या संगमरवराने बनवलेल्या कर्णीमातेच्या या मन्दिरात अुंदरांना मान दिला जातो. भक्तिपूर्वक त्यांना खायला दिले जाते व त्यांचे रक्षण केले जाते.

## कथा कोडे



डॅनियल डेफोने लिहिलेल्या सुप्रसिद्ध रॉबिन्सन क्रुसो या कादंबरीतला हा एक परिच्छेद आहे. त्यातली चूक शोधून काढता येईल? शोधा बरे! ...''मध्यान्ह वेळेनंतर थोड्याच वेळात समुद्र अगदी शान्त दिसू लागला. फार शुकडू लागल्यामुळे मी अंगावरचे कपडे अुतरवले आणि समुद्रात शिरलो. पण बोटीजवळ आल्यावर अडचणीत भरच पडली. बोटीवर चढायचे कसे? नंतर बोटीवरून लोंबणारा एक दोर मला दिसला. त्याच्या साह्याने मी बोटीच्या पुढील भागावर चढलो. बोटीवरील खाद्य पदार्थ पाण्याने भिजले नव्हते अन् अुत्तम खाण्यायोग्य अवस्थेत होते. मी ब्रेडच्या खोलीत गेलो. आणि बिस्किटे आपल्या खिशात भरून घेअून आरामात खाअू लागलो.''

हस्तव्यवसाय

## पक्षी पिंजऱ्यात पकडा



कार्डबोर्डचा ४ x ४ सें. मी. चा तुकडा कापा.

पुठ्ठ्याच्या समोरासमोरील दोन बाजूंच्या मध्यांवर बोटे आत घालता येतील अशी दोऱ्याची लूप्स बांधा

पुठ्ठ्याच्या एका बाजूवर पक्ष्याचे व दुसऱ्या बाजूवर पिंजऱ्याचे चित्र काढा.

पुठ्ठ्याची लूप्स धरून पुठ्ठा गोल फिरवून दोऱ्याला पीळ देअून नंतर लूप्स खेचा. पुठ्ठा गरगरा फिरू लागेल व पक्षी पिंजऱ्यात बंद असल्यासारखे भासेल.





## बुद्धीला खाद्य देणारे प्रश्न

१. घोड्याला सहा पाय केव्हा असतात?

२. लहानसा अुंदीर आणि हत्ती यांचे वजन सारखेच केव्हा असते?



३. ९+९+९+१+१ ची बेरीज केव्हा २० होईल?

४. ''मी आपल्या मित्राकडे गेलो होतो. तिथून निघणार, इतक्यात त्याचा भाअू बाहेरून आला व सांगू लागला, ''मधल्या रस्त्याने जाअू नका हं ! तिथे एक साप झोपलेला आहे. विषारी साप असावा असं वाटतंय.'' मी त्याला विचारले, ''तू कसा सुरक्षित आलास?'' ''मी येत असताना तो डोळे मिटून झोपलेला होता. पण आता जागा झाला असेल.'' तो अुत्तरला.

मी ओळखले की तो माझी चेष्टा करत आहे. म्हणून मी त्या रस्त्यानेच गेलो. मला वाटल्याप्रमाणेच साप तिथे नव्हता. मित्राचा भाअू खोटे बोलत असल्याचे मी कसे ओळखले हे सांगू शकाल?



५. हत्तीला आठ पाय केव्हा असतात?

६. दोन हात असूनही आपले तोंड कधीही धुवू शकत नाही असे काय?



७. गळा आहे, पण गिळू शकत नाही असे काय?

८. युद्धात एका सैनिकाचा एक हात कापला गेला. तो नेपोलियन बोनापार्टकडे आला. नेपोलियनने त्याच्या साहसाची स्तुती केली अन् एक पदक देत त्याला म्हटले, ''तू जो हात घालवलास त्यासाठी हे पदक!'' ''माझा दुसरा हातही गेला असता, तर आपण मला काय दिले असते?'' सैनिकाने विचारले, ''तुला एक मोठे अधिकाऱ्याचे पद दिले असते.'' नेपोलियने सांगितले.



दुसऱ्याच क्षणी त्या सैनिकाने म्यानातून तलवार काढून आपला धडका हात कापून टाकला!

तुम्ही ही घटना खरी मानाल? मग ती खोटी असल्याचे कसे ओळखलेत?

## कथा कोडे



डॅनियल डेफोने लिहिलेल्या सुप्रसिद्ध रॉबिन्सन क्रुसो या कादंबरीतला हा एक परिच्छेद आहे. त्यातली चूक शोधून काढता येईल? शोधा बरे! ...''मध्यान्ह वेळेनंतर थोड्याच वेळात समुद्र अगदी शान्त दिसू लागला. फार उकडू लागल्यामुळे मी अंगावरचे कपडे उतरवले आणि समुद्रात शिरलो. पण बोटीजवळ आल्यावर अडचणीत भरच पडली. बोटीवर चढायचे कसे? नंतर बोटीवरून लोंबणारा एक दोर मला दिसला. त्याच्या साह्याने मी बोटीच्या पुढील भागावर चढलो. बोटीवरील खाद्य पदार्थ पाण्याने भिजले नव्हते अन् उत्तम खाण्यायोग्य अवस्थेत होते. मी ब्रेडच्या खोलीत गेलो. आणि बिस्किटे आपल्या खिशात भरून घेऊन आरामात खाऊ लागलो.''

हस्तव्यवसाय

## पक्षी पिंजऱ्यात पकडा



कार्डबोर्डचा ४ x ४ सें. मी. चा तुकडा कापा.

पुठ्ठ्याच्या समोरासमोरील दोन बाजूंच्या मध्यांवर बोटे आत घालता येतील अशी दोऱ्याची लूप्स बांधा.

पुठ्ठ्याच्या एका बाजूवर पक्ष्याचे व दुसऱ्या बाजूवर पिंजऱ्याचे चित्र काढा.

पुठ्ठ्याची लूप्स धरून पुठ्ठा गोल फिरवून दोऱ्याला पीळ देऊन नंतर लूप्स खेचा. पुठ्ठा गरगरा फिरू लागेल व पक्षी पिंजऱ्यात बंद असल्यासारखे भासेल.





# महाभारत

दुर्वास आणि त्याच्या हजार शिष्यांची भोजनाची व्यवस्था कशी करावी हे द्रौपदीला सुचत नव्हते. कोणताच उपाय न सापडल्याने शेवटी तिने श्रीकृष्णाचा धावा सुरु केला. कृष्ण लगेच तिच्या समोर उभा ठाकला. त्याच्या पावलांना स्पर्श करत द्रौपदी म्हणाली, ''दुर्वास गंगास्नान करून आता कोणत्याही क्षणी इथे हजर होतील अन् भोजन वाढावे लागेल. अक्षय-पात्रात तर आत्ता थोडेही अन्न नाहीय. काय करू आता मी ?''

''दुर्वासाची गोष्ट देवालाच ठाऊक. पण आत्ता मला मात्र फार भूक लागली आहे. माझी भूक भागव आधी !'' कृष्ण बोलला.

संकोचत द्रौपदी म्हणाली, ''जोपर्यंत मी जेवत नाही, तोपर्यन्तच त्यातून अन्नपदार्थ मिळतात, पण मी तर आता भोजन करून चुकलेय. तूच माझी परीक्षा पाहू लागलास, तर माझं काय होईल बाबा ?''

''मी इथं भुकेनं मरतोय अन् तुला चेष्टा सुचतेय ? तुझ्या अक्षय पात्रात असेल, तितकंच दे ना. घेऊन ये ते पात्र.'' कृष्ण बोलला.

द्रौपदी पात्र घेऊन आली. त्यात तळाला एका बाजूला एक अन्नकण चिकटलेला होता. तो कण काढून कृष्णाने आपल्या मुखात घातला अन् ढेकर देऊन म्हणाला, ''भरलं माझं पोट !''

आता भीमाला कृष्ण म्हणाला, ''गंगातटाकी जाऊन दुर्वासांना सांग की लवकर या, भोजन तयार आहे.''

भीम तेथे पोचण्यापूर्वीच दुर्वास व त्याच्या शिष्यांची पोटे भरली होती. त्यांना ढेकर येत होते. शिष्य गुरुकडे जाऊन म्हणाले, ''गुरुजी असं वाटतंय की आम्ही जरा जास्तच खाल्लं आहे. आपण उगीचच धर्मराजाला भोजन तयार ठेवायला सांगितलंय. या परिस्थितीत

सिंधुराजाचा पराभव - ३५



आम्ही क्षणभरही अन्न खाऊ शकणार नाही.

दुर्वास त्यांना म्हणाला, ''आपण धर्मराजावर अन्याय केलाय. तो कोणी सामान्य माणूस नव्हे. आपल्याकडे त्यानं नुसता रागाचा कटाक्ष टाकला, तरी आपली राख होईल ! माझ्या हातून एकदा अंबरीषचा असाच अपमान झाला. आता आपल्या समोर एकच अुपाय आहे. धर्मराजाला न सांगता आपण इथून पळून जाऊया.'' सर्वजण ताबडतोब तेथून निघून गेले.

एकदा अंबरीषाने द्वादशी व्रत केले आणि समाप्तीनंतर ब्राह्मणांसह तो भोजनासाठी बसला. इतक्यात दुर्वास तेथे आला. अंबरीषाने त्यालाही भोजनाचे आमन्त्रण दिले. दुर्वास स्नानाला गेला अन् परत आलाच नाही. खूप वेळ गेला. द्वादशीच्या दुसऱ्या दिवशी अुपास सोडल्याने फलप्राप्ती झाली नसती. पण अतिथि आल्याशिवाय आपण भोजन करणेही पाप असल्याने अंबरीष फक्त पाणी प्यायला. दुर्वास मुद्दामच अुशीरा आला. अंबरीषाने जलग्रहण केल्याचे कळताच महाकृत्यची निर्मिती करून त्याने त्याला अंबरीषाचा नाश करायला सांगितले. इतक्यात विष्णुचक्र येअून महाकृत्यचा वध झाला. ते चक्र तसेच आता दुर्वासाचा पाठलाग करू लागले. दुर्वास धावत जाअून शिव आणि विष्णु यांना शरण गेला. परन्तु ते त्याचे रक्षण करू शकेनात. शेवटी दुर्वासाने अंबरीषाकडे जाअून त्याची क्षमा मागितली अन् स्वतःचे प्राणरक्षण केले. दुर्वास हा अनुभव कधीच विसरू शकला नाही.

भीम गंगातटावर पोचला तेंव्हा तेथे कोणीच नव्हते. तिथल्या ब्राह्मणांना विचारल्यावर समजले की 'सर्वचे सर्व मुनि पळून गेले!' भीमाने आश्रमात परत येअून ही वार्ता दिली. धर्मराजाला भीती वाटू लागली की, कोण जाणे दुर्वास आपल्या शिष्यांसह अचानक केंव्हा अुपटेल?

कृष्ण धर्मराजाला म्हणाला, ''आता तो येणारच नाही.'' नंतर त्याने घडलेले सर्व सांगितले. अन् त्याचा निरोप घेअून कृष्ण तेथून निघून गेला. कृष्णाच्या कृपेमुळेच दुर्योधनादि कौरव पांडवांचे काहीच बिघडवू शकले नाहीत.

काही दिवस गेले. पांडव काम्यकवनात रहात होते. एके दिवशी त्यांनी शिकारीसाठी जंगलात जायचे ठरवले. परत येईपर्यन्त त्यांनी द्रौपदीला तृणबिन्दु नावाच्या ऋषीच्या आश्रमात ठेवले आणि आपले पुरोहित धौम्य



यांनाही तेथेच रहायला सांगितले. त्याच दिवशी सिंधुराज शाल्य राजाच्या कन्येशी विवाह करण्यासाठी सैन्य व काही राजांना बरोबर घेअून तृणबिन्दुच्या आश्रमाजवळून जात होता. आश्रम तसा निर्जनच होता. एका झाडाजवळ त्यांना द्रौपदी विद्युल्लतेसारखी चमकत असलेली दिसली.

सिंधुराज तिच्याकडे अपलक पहातच राहिला ! त्याच्या मनात तिच्याविषयी मोह अुत्पन्न झाला. कोटिकास्य नावाच्या राजकुमाराला बोलावून तो म्हणाला, ''अरे, पाहिलंस तू त्या स्त्रीला? तिला पाहून माझ्या मनात अदम्य इच्छा अुत्पन्न होत आहेत. मला शाल्वकन्या नकोय. तू त्या स्त्रीला ती कुणाची पुत्री, कुणाची पत्नी इ. विचारून ये. ती माझ्या बरोबर यायला तयार आहे का, असंही विचार.''

कोटिकास्य स्वतःही नीच प्रवृत्तीचा होताच. मान-अभिमान इ. त्याला ठाअूकच नव्हता! द्रौपदीजवळ जाअून तो विचारू लागला, ''सुंदरी, तू कोण आहेस? तुझा पति कोण आहे? कोणत्या कुळातली आहेस? तुझं नाव काय? या वनात एकटीच कशी? तू न विचारताच मी तुला. स्वतःबद्दलही सांगतो मी सुरथ राजाचा पुत्र कोटिकास्य. हे जे राजे दिसत आहेत ना, ते त्रिगर्तराज अन् कुलिन्दराज आहेत. तुझ्याकडे आतुरतेनं पहात असलेला तो सुबल राजाचा पुत्र आहे. बारा राजांच्या मध्यावर रथात बसलेला तो सिंधु सौवीर देशांचा राजा सिंधुराज आहे. त्यानेच तुझी माहिती विचारण्यासाठी मला पाठवलं आहे.''

द्रौपदी त्याला म्हणाली, ''तू कोण हे मला माहीत आहे. माझ्यासारख्या कुलीन स्त्रीने तुझ्याशी बोलणे योग्य नव्हे. पण तुझ्या प्रश्नांची अुत्तरं द्यायला दुसरे कोणीच इथे अुपस्थित नसल्यानं नाइलाजानं मला सांगावं





लागतंय.मी द्रुपद राजाची पुत्री असून माझं नाव कृष्णा आहे. पांडव माझे पति आहेत. ते आत्ता शिकारीला गेले आहेत. ते येईपर्यन्त आपण सर्वजण इथेच थांबा आणि त्यांचे आतिथ्य स्वीकारून मगच पुढे जा. त्यांना आनन्द वाटेल.''

कोटिकास्यने जाऊन ही हकिकत सिंधुराजाला सांगितली ''ती मानव स्त्री आहे, यावर माझा विश्वास बसत नाहीय. ज्या डोळ्यांनी तिला पाहिली त्या डोळ्यांनी अन्य कोणा स्त्रीला पहाण्याची कल्पनाच मी करू शकत नही.'' सिंधुराजा म्हणाला.

रथातून अुतरून आणखी सहाजणांना बरोबर घेऊन तो पर्णशाळेत आला. त्याने द्रौपदीला विचारले, ''तू आणि तुझे पती खुशाल आहात ना?''

द्रौपदीनेही त्याची खुशाली विचारून त्याला थंड पाणी व फळे दिली. त्याला बसायला सांगून ती म्हणाली, ''पांडव शिकार करून परत आले की, आपणा सर्वांना सामिष भोजन मिळेल.''

''आतिथ्याची गोष्ट सोड, रथातून माझ्या बरोबर चल. तुला आपली पत्नी बनवून सर्व सुखं प्राप्त करून देईन. राजसुखाला वंचित झालेल्या पांडवांबरोबर राहून इथे अरण्यात व्यर्थ कष्ट का सहन करत आहेस? सिंधु सौवीर देशांची राणी बनून वैभवाने, थाटामाटाने रहा.''

द्रौपदी यामुळे अतिशय चिडली. पती परत येईपर्यन्त त्याला आपल्याशी बोलण्यात गुंतवायचे तिने ठरवले. तरीही आपला क्रोध आवरेनासा होऊन ती म्हणाली, ''फारच मूर्ख दिसतोस तू! माझे पति इंद्राला तुल्य आहेत त्यांना क्रोधित करणं हानिकारक आहे, हे समजत नाही तुला?'' ती त्याला हितबोध करू लागली.

''पांचाली, पांडवांच्या गोष्टी सांगून मला भिववू पहात आहेस? मी हे सर्वकाही ऐकलं आहे. पण माझा इरादा तू बदलू शकणार नाहीस. जगात पंधरा श्रेष्ठ कुळं आहे. माझं कुळ त्यांपैकीच एक आहे. आपल्या बोलण्यात अडकवून माझा वेळ वाया घालवू नकोस. मुकाट्याने चल माझ्याबरोबर! पांडवांना घाबरून मी तुला सोडून देईन असं समजू नकोस.'' सिंधुराजा तिला धमकावत बोलला.

द्रौपदी रागाने लाल होऊन ओरडली, ''अरे पापी, अधमा! तुला काय वाटलं, पांडवपत्नी इतक्या सहजपणे तुझ्या हाती येईल? अर्जुनाचा रथ तुझ्या मागोमाग येईल अन् तो जाळून तुझं भस्म करील. मला घेऊन जाणं इन्द्रालाही अशक्य नाही! तू कुठला झाडपाला! मला तुझी आसक्ती वाटणं अगदीच अशक्य ! तू तसं समजत असशील, तर तो भ्रम आहे तुझा! पांडवच माझे सर्वस्व आहेत. तेच माझे जीवन-लक्ष्य आहेत.''



सिंधुराजाबरोबर आलेल्यांनी द्रौपदीला पकडायचा प्रयत्न केला. त्यांच्यापासून स्वतःला वाचवत ती ओरडू लागली. धौम्याने आपले ओरडणे ऐकावे अशी तिची इच्छा होती. सिंधुराजा आपल्या हातांनी तिला अुचलून तेथून पळू लागला. द्रौपदीचे ओरडणे ऐकून धौम्य सिंधुराजाचा पाठलाग करू लागला. तोही मदतीसाठी ओरडू लागला.

सिंधुराजाने द्रौपदीला रथात बसवले आणि तो निघाला. धौम्य त्याला ओरडून म्हणाला, ''सिंधुराजा, हे काय करत आहेस? तुला शक्य झालं, तर तिच्या पतींना हरवून तिला घेऊन जा. स्त्रीला असं जबरदस्तीनं घेऊन जाणं अुचित आहे काय?'' पण सिंधुराजाने त्याची पर्वा केली नाही. रथ वेगाने पळवत तो जाऊ लागला. धौम्यही त्याच्यामागे पळू लागला.

या अवधीत पांडवांनी काही प्राण्यांची शिकार केली व एका जागी एकत्र आले. नंतर ते आश्रमाकडे निघाले. तेथे पोचल्यावर द्रौपदी नसल्याचे त्यांना आढळले. रथसारथी इन्द्रसेनने पाहिले की धात्रेई नावाची एक स्त्री तेथे बिलाप करत आहे. तिने इन्द्रसेनला सिंधुराजाने द्रौपदीला जबरदस्तीने नेल्याचे अन् घटना घडून थोडाच वेळ झाल्याचेही सांगितले.

धात्रेयीला धीर देऊन धर्मराजाने आपल्या बंधूना, 'चला, रथातून आपण सिंधुराजाचा पाठलाग करू' असे म्हटले, पाचही जण रथात बसून वेगाने सिंधुराजा व त्याचे सहकारी गेल्या दिशेने निघाले. दूरवर त्यांना धूळ अुडताना दिसली. धौम्य पाठोपाठ धावत असलेलाही त्यांनी पाहिला. त्याला सावकाश यायला सांगून ते सिंधुराजाच्या सैन्यावर तुटून पडले. द्रौपदीसह रथावर स्वार झालेल्या सिंधुराजाला पाहून त्यांचे रागाने भान हरपले. 'थांब, थांब' म्हणत ते त्याच्या रथाजवळ पोचले. तेथे हजर असणारे अन्य राजे भयाने कापू लागले.

द्रौपदी सिंधुराजाला म्हणाली, ''पहा, माझे पती येत आहेत. तुझा अन् तुझ्या सेनेचा



नक्कीच विनाश होणार. तुझा मृत्यु तर अटळ आहे. पापकृत्य करून तू स्वतःच मृत्यूला आमंत्रण दिले आहेस. आता जर या आकस्मिक मृत्यूतून वाचू शकलास, तर तो तुझा पुनर्जन्मच म्हणायला हवा.''

पांडवांनी सिंधु-सैन्यावर बाणांचा वर्षाव केला. सैनिकांची वाताहत होऊन ते सैरावैरा धावू लागले. भीम गदा घेऊन सिंधुराजाला भिडू लागला, तेंव्हा कोटिकास्यने त्याला अडवले. त्याच्या साह्याला इतर राजेही आले. त्यांनी भीमावर आपल्या तलवारी चालवायला सुरुवात केली. इतरांनीही अनेक हत्यारांनी त्याला जखमी करायचा विफल प्रयत्न केला.

सिंधुराजाच्या रथाजवळ पोचण्यापर्वीच अर्जुनाने पंधराजणांना यमसदनी रवाना केले. धर्मराजाने तीन सौवीरांचे प्राण घेतले. नकुल रथावरून अुतरून सैनिकांना मारू लागला. सहदेव हत्तीवर चढला आणि बर्च्या फेकून सैनिकांना धडाधड लोळवू लागला. त्रिगर्तराजा धर्मराजाच्या हातून मारला गेला.

सिंधु-पक्षाचे बरेचजण मारले गेले. कोटिकास्य कसाबसा तेथून पळून गेला. आता आपला मृत्यु निश्चित असल्याचे सिंधुराजाने ओळखले. आणि द्रौपदीला रथातच सोडून स्वतः प्राण वाचवण्यासाठी तेथून पळून जाअू लागला. भीम धर्मराजाला म्हणाला, ''अग्रज, आपण द्रौपदी आणि धौम्य यांना रथात घेअून आश्रमाकडे जा. मी आणि अर्जुन या पापी सिंधुराजाचा चांगला समाचार घेतो.''

''भीमसेन, कितीही दुष्ट असला तरी सिंधुराज जयद्रथचा वध करू नकोस. आपली भगिनी दुःशला विधवा होईल. गांधारीमातेला दुःखात लोटू नको.'' धर्मराजाने भीमाला अशा प्रकारे सावध केले. परन्तु त्याला मारूनच टाकायचा द्रौपदीचा हट्ट होता.

एक कोस अंतरावर सिंधुराजाला भीम व अर्जुनाने पकडले. त्यांनी जयद्रथाच्या मस्तकाचे तीन पाट काढून केस भादरून टाकले. त्याला विद्रुप केले अन् माती माखल्या त्या सिंधुराजाला रथात घालून आश्रमात आणून त्यांनी त्याला धर्मराजा समोर अुभे केले.

''पुन्हा कधी असं नीच काम करायचा प्रयत्न करू नकोस'' असे धमकावून धर्मराजाने जयद्रथाला सोडून दिले.

**क्रमशः**



# ‘चान्दोबा’ च्या बातम्या

### वृषभवर्ष



चीन देशवासीयांनी पुराणात अुल्लिखित पशूंची नावे आपल्या वर्षांना दिली आहेत. प्रत्येक नव्या वर्षाला एकेका प्राण्याचे नाव देणे शक्य नसल्याने त्यांनी बारा वर्षांना बारा नावे दिली आहेत. बारा वर्षे संपली की पुन्हा त्याच नावांची पुनरावृत्ति होते. अशा प्रकारे या फेब्रु. ८ ला सुरू झालेल्या वर्षाचे नाव आहे - वृषभ! नवीन वर्षाच्या आरंभी बंधु-मित्र इ. ना भेटणे, नवीन वस्त्रे खरीदणे, मेजवान्या, मनोरंजक कार्यक्रम, जन-समूह ट्राफिक जॅम इ. सर्व यथावत् चालते. येत्या जुलै महिन्यात इंग्लंड हॉंगकॉंग चीनच्या हाती सोपवणार आहे. यासाठी चीनच्या संगीत, नाटक पात्रांनी मिरवणूक काढली. या मिरवणुकीच्या आघाडीवर बैलाच्या आकाराचा एक विस्तृत फुगा प्रदर्शित करण्यात आला.

### लांबचलांब चॉकलेट

स्वीडनच्या एका जपानी हॉटलने फेब्रुवारी १७ ला १८८ मी. च्या लांबीचे एक चॉकलेट तयार केले. ‘गिनीज बुक ऑफ वर्ल्ड रेकॉर्ड’ मधे त्याचा अुल्लेख होणार होता, पण इतक्यात स्वित्झरलंडमधे त्याहूनही लांब चॉकलेट बनवले गेले. त्याची लांबी होती २२१ मीटर्स (७२५ फूट) आणि रुंदी ३ सें. मी. ओळीने ठेवलेल्या टेबलांवर हे सजवून ठेवण्यात आले. गिनीज संस्थेच्या अधिकाऱ्यांनी स्वतः येअून ते पाहिले. यानन्तर हे चॉकलेट कापून ५०० चॉकलेट प्रेमींना ते वाटले गेले.



### पट्टे असणारी गाढवे

तुम्ही ‘टायगान्स’ च्या बाबतीत अैकले असेल. वाघ व सिंहापासून संकरित केलेली ही जात आहे. अशाच प्रकारे गाढव व झेब्रा यांचा संकर घडवून आणखी एक संकरित जात निर्माण करण्यात सफलता मिळालेली आहे. लंडनच्या लिओमिन्स्टर झू मधे पट्टे असणारी दोन गाढवे प्रेक्षकांना आकर्षित करत आहेत. सुसी पालार्डकडून यांना प्रशिक्षण दिले जात आहे. या गाढवांच्या केवळ पायांवरच पट्टे दिसत आहेत.



चांदोबा पुरवणी १०२



आपल्या देशाची सौन्दर्य स्थळे

# रॉकगार्डन्स

लंडनचे क्यू गार्डन्स अद्भुत अशा रोपांसाठी प्रसिद्ध आहे. मॅनहटनमधे असणारे न्यूयॉर्क सेन्ट्रल पार्क ७४० एकरांच्या क्षेत्रात पसरलेले आहे. यात तलावही आहेत. हे जगातील सर्वात मोठे अुद्यान होय. चंदीगढचे एक अुद्यान या दोहोंपेक्षा वेगळेच आहे. आपोआप बनलेल्या विविध आकारांच्या शिला व वाया जाणारे धागे, दोरे, काचा इत्यादींनी ते मढवलेले आहे. जवळ जवळ २०,००० बाहुला-बाहुल्यांच्या आकारांनी भरलेले एक विलक्षण अुद्यान आहे हे. सुंदर मार्ग, अन्दाजही करता येणार नाही अशी वळणे व विचित्र पुल यांनी भरलेले हे अुद्यान प्रेक्षकांना निराळ्याच सृष्टीत घेअून जाते. फुटक्या काचांनी बनवलेले अस्वल, घोडा, माकड, मोर आदि प्राणी व पक्षी त्यांचे लक्ष वेधून घेतात. नेकचंद नावाच्या एका कल्पक माणसाने या अुद्यानाची निर्मिती केली. सरकारने ‘पद्मश्री’ हा बहुमान त्यांना अर्पण केला. राष्ट्रपतींनी त्यांचा सत्कार केला. राजधानी दिल्लीतल्या चिल्ड्रेन्स म्युझियममधेही एक सुन्दरसे अुद्यान बनवण्यासाठी भारत सरकारने १९८५ मधे त्यांना विनती केली. देशविदेशाहून येणाऱ्या प्रवाशांसाठी चन्दीगढचे अुद्यान हे एक आकर्षक केन्द्र आहे.



आपल्या देशातील ऋषि-मुनि

# शुकदेव

व्यास महर्षींनी वेदांचे विभाजन केले. त्यांनी पंचमवेद नावाने विख्यात महाभारतही रचले. तपोनिधी शुकदेव हे त्यांचेच पुत्र.

काही दिवस शुकने आपल्या पित्याजवळ विद्याभ्यास केला. यानन्तर ते देवगुरु बृहस्पतीचे शिष्य बनले. विद्याभ्यास समाप्त झाल्यावर पुन्हा पित्याजवळ येअून शुक म्हणाले, ''माझा विद्याभ्यास पूर्ण झालाय. मी निरंतर ध्यानातच असतो. सर्वसंग-परित्याग करून, निर्विकार बनून मी आपला काळ व्यतीत करत असतो. तरीही मी यापासून संतुष्ट नाहीय.''

''तू विवाह करून गृहस्थाश्रम स्वीकार पुत्रा!'' वेद व्यासांनी मार्ग सुचवला.

''संसारात जन्म घेअू, विवाह करू, सांसारिक बन्धनात अडकू, अनेक कष्ट झेलू अन् शेवटी मृत्युला बळी पडू-अशा करोडो जीवांप्रमाणे जगायची माझी इच्छा नाहीय. ते जीवनही मला संतुष्ट करू शकणार नाही.'' शुक म्हणाले.

थोडा वेळ व्यासांनी काहीच अुत्तर दिले नाही. ते मौन राहिले. नंतर ते बोलू लागले, ''पुत्रा, तू एकदा मिथिलेला जा आणि जनक महाराजांचे दर्शन घेअून ये.''

पित्याच्या आज्ञेप्रमाणे शुकदेव पायीच मिथिलेकडे निघाले. ते विचार करू लागले हाक देताच समोर अुपस्थित होणाऱ्या सेवकांनी वेढलेल्या, सर्व सुखं आणि अधिकार अुपभोगून आनन्दाने जगणाऱ्या त्या जनक महाराजांकडे तात मला का बरं पाठवत आहेत? परन्तु प्रत्यक्षात ते जेंव्हा जनकमहाराजांना भेटले, त्यांच्याशी बोलले, तिथली सारी परिस्थिती अवलोकन केली, तेंव्हा त्यांना कळले, की जनक कोणी सामान्य व्यक्ती नव्हे! राजा बनून ते आपल्या जबाबदाऱ्या तर संभाळत आहेत, पण संन्याशाप्रमाणे आपले जीवन व्यतीत करत आहेत. अगदी खऱ्या अर्थाने कर्मयोगी आहेत ते! कमलपत्रावरील पाण्याच्या थेंबाप्रमाणे अगदी आलिप्त जीवन जगणारांपैकी एक आहेत ते. शुकदेवांनी जनक महाराजांच्या जीवनाचे गूढ सत्य जाणले.

सार्थक मानव-जीवन जगण्यासाठी जनकच आदर्शभूत आहेत हे ओळखून ते पित्याकडे परत आले.





## तुम्हाला माहीत आहे काय?

### सॉल्मन मासा

स्वच्छ पाण्यात खालील भेगांमधे सॉल्मन माशांची अुत्पत्ती होते. ते दोन वर्षेपर्यंत लहान कुंडात रहातात अन् नंतर प्रवाहात मिसळून समुद्रात पोचतात. काही वर्षांनंतर प्रजोत्पत्ती साठी पुन्हा आपण जन्मल्याजागी परत येअून तेथे अंडी घालतात.



## इन्द्रधनुष



### विलक्षण पक्ष्यांचे केन्द्र

सिंगापुरच्या 'झुरांग बर्ड पार्क' मधे जवळजवळ सहा हजार जातींचे पक्षी आहेत. याच्या निर्मितीसाठी ऐंशी लाख सिंगापुर डॉलर्स खर्च झाले. यात पाच जातींचे १६० पेंग्विन आहेत. सहा हजार जातींचे आठ हजार पक्षी आहेत जलपक्ष्यांसाठी या पार्कमधे काही तलाव बांधले आहेत, हिरवळ असणारे काही भाग आहेत, सुन्दर वृक्ष वाढवले आहेत. कबुतरे, हॉर्नबिल बगळे, पेलिकन्स इ. पक्ष्यांनी भरलेला 'ऑल स्टार बर्डस् शो' झुरांग पार्कचे वैशिष्ट्य होय.



# दुःखाचे कारण - अतिलोभ

अवतारची चार एकर जमीन होती. बरीच वर्षे योग्य वेळी पाअूस पडत राहिल्याने पीक चांगले येत होते. तरीही तो संतुष्ट नव्हता. एकदम खूप भाग्यवान बनायची इच्छा होती त्याची.

एकदा त्याच्या गावात एक ज्ञानयोगी आला होता. त्याने गावकऱ्यांना अुपदेश केला, हितबोध करवला. त्याला भेटून अवतारने विचारले की, 'माणसांच्यात गरीब - श्रीमन्त असा फरक का असतो ?''

''त्यांच्या त्यांच्या कर्मांप्रमाणे, शक्ती-सामर्थ्यांप्रमाणे, परिस्थिती मुळे काहीजण श्रीमन्त बनतात, तर काही गरीब.'' ज्ञानयोगी अुत्तरला.

भाग्यवान बनण्यासाठी अवतारने काही अुपाय सांगायची विनन्ती केली.

योग्याने त्याला व्यापार करायचे सुचवले; तेंव्हा अवतारने, ते आपल्याला जमणार नाहीं असे म्हटले. योग्याने त्याला एकादी कला आत्मसात करायला सुचवले, तेही त्याने नाकारले. आता योगी म्हणाला, ''मग तू एकाद्या मोठ्या माणसाच्या आश्रयाला जा.'' अवतारने, ''हे नाही माझ्याच्यानं होणार'' असे म्हटले.

''अरे, तुला खायला काही कमी नाहीय, आरामानं रहातोयस. एकदम भाग्यवान बनण्याची तुझी इच्छा या परिस्थितीत 'अतिलोभ' ठरेल. हे बरं नव्हे !'' ज्ञान-योग्याने अवतारला हितोपदेश केला.

''प्रत्येक माणूस 'मोठा' होअू इच्छितो. हा काही लोभ नव्हे ! फक्त भाग्य मदतीला येईल, तर सारं काही शक्य असतं.'' योग्याच्या सांगण्याकडे दुर्लक्ष करत, बेपर्वाई दाखवत अवतार म्हणाला.

''सामर्थ्य आणि स्वत:च्या मेहनती शिवाय जे भाग्य मिळतं ना, ते टिकाऊ नसतं. केवल भाग्याच्या बळावर मोठं बनायची इच्छाच अतिलोभ आहे. माझ्या बोलण्यावर विश्वास नसेल, तर तुला मी एक मन्त्र सांगतो. त्याचं पठन केलं तर चोरदेव प्रसन्न होईल आणि तुला हवं तेवढं धन देईल.'' ज्ञानयोग्याने सांगितले.

**नामदेव शिंपी**

अवतार अशीच काही अपेक्षा करत होता. वर ऐकून तो आनन्दाने वेडाच झाला. मन्त्र सांगण्यासाठी तो योग्याची याचना करू लागला.

''मन्त्रोपदेशापूर्वी तुला चोरदेवबद्दल माहिती असायला हवी.'' असे म्हणून ज्ञानयोगीने चोरदेवाविषयी असे सांगितले.

''चोरदेव धनवानांकडून त्यांच्या नकळत धन घेअून ते निर्धनांना देत रहातो. पण धनवानांचे हे धनही सरळ मार्गाने मिळवलेले नसल्याने ते राजाकडे तक्रार करू धजत नाहीत. चोरदेव ज्याला धन देतो, तोच फक्त ते पाहू शकतो. धन घेणारा ते धन एक महिन्यापर्यन्तच स्वत:जवळ ठेवू शकतो. तेवढ्या अवधीत त्याने ती रक्कम खर्च करायला हवी. कोणाही माणसाला चोरदेव फक्त एकदाच पैसे देतो. त्याची एकच इच्छा तो पूर्णही करतो. अतिलोभ करणाराचे चोरदेवकडून काही काम होणे कठीणच आहे.''

हे सगळे वर्णन ऐकूनही अवतारने ज्ञानयोग्याकडून मन्त्रोपदेश घेण्याचा हट्ट धरला. योग्याने त्याला मन्त्रोपदेश करून म्हटले, ''उद्या पहाटेच अूठ. स्नान करून मन्त्रोच्चार कर. चोरदेव प्रसन्न होईल पहा.''

अवतार घरी आला. दिवसभर तो



अशान्तच राहिला. रात्रभर त्याला झोपही आली नाही. अगदी पहाटेच अुठून त्याने स्नान केले आणि नंतर मन्त्रपठन केले.

ताबडतोब एक काळी व्यक्ती अवतार समोर अुभी ठाकली. साऱ्या शरीरावर त्याने तेल माखल्यासारखे दिसत होते. शरीर चिकट दिसत होते. डोळ्यांवर पट्टी बांधलेली होती. अुंच, बलिष्ठ पहिलवानासारख्या त्या दृढ माणसाने म्हटले, ''मी चोरदेव आहे. बोल, किती धन हवंय तुला ?''

अवतारचा आनन्द आता वर्णनातीत होता. भय अन् भक्तीने त्याने चोरदेवाला प्रणाम करून म्हटले, ''स्वामी, मला एक कोटी मोहोरा हव्यात.''

''देतो, नक्की देतो, सारं धन इथे जमिनावर ओतू ? नाहीतर कसं, एक खूप



मोठीशी पेटी तयार ठेवशील ?'' चोरदेवाने विचारले.

''स्वामी, खोलीत एक खूप मोठी पेटी रिकामी पडलेली आहे. त्यात तुम्ही मोहोरा ठेवू शकता.'' अवतार म्हणाला.

''ठीक आहे, उद्या भल्या पहाटेच पेटी उघडून बघ.'' असे म्हणून चोरदेव अदृश्य झाला.

अवतारला हे सारे स्वप्नच वाटत होते. बालसूर्याच्या किरणांचा स्पर्श होईपर्यंत तो अत्यन्त उत्सुकतेने घरभर फिरत राहिला. नन्तर जेव्हां त्याने पेटी उघडली, तेंव्हा त्यात अपार धन भरलेले होते. इतकी मोठी धनराशि पाहून तो जवळ जवळ वेडाच झाला. त्याच्या मनात आले की या धनात तर तो स्वतः आणि पुढल्या अनेक पिढ्या वैभवात राहू शकतील !

त्याचे आई-वडील अन् बायको मुलांनाही अवतार अचानक इतका खूश का दिसतोय हे कळेना ! त्याने धनाबाबत कोणाला काहीच सांगितले नाही. ते तो एकटाच फक्त पाहू शकत होता. त्याने विचार केला की, एक महिन्यानन्तर धन सर्वांना दिसेलच. मग तेंव्हाच याबाबत बोलणे ठीक होईल.

अवतार दररोज एकटाच खोलीत जाऊन ते धन पाहून येई. पेटीत इतके सारे धन पाहून त्याला अपार हर्ष होतो. असेच दोन आठवडे निघून गेले. नंतर एक दिवस पहातो, तो पेटीत एकही मोहोर नाही !

आपले हृदय बंद पडत असल्यासारखे अवतारला वाटले. धन तर कोणी पाहिलेही नव्हते! मग असे नाहीसे कसे झाले ? ज्ञानयोग्याने काही माया-बिया केली असावी! त्याने तर आपल्याला 'धन दोन आठवड्यांनी दिसणार नाही' असे सांगितलेही नव्हते. तो पुन्हा आला तर त्याच्याकडून याचे कारण विचारायला हवे.

ज्ञानयोग्याबाबत चौकशी केल्यावर अवतारला समजले की, तो एका आठवड्या पूर्वीच गाव सोडून गेला होता. कोणाकडून तरी तो मथुरेला गेल्याचे कळून अवतार ताबडतोब तिकडे जायला निघाला.

मथुरेची सीमा ओलांडून अवतार नगरात प्रवेश करणार इतक्यात समोर बलराम येऊन त्याला सांगू लागला की, ''अरे, काय योगायोग पहा ! मी आत्ता तुलाच भेटायला निघालो होतो, अन् देवासारखा तूच समोर आलास !''



अवतारने विचारले, ''माझ्याकडे काय काम होतं तुझं ?

''विसरलास? आपल्या मुलीचं लग्न तुझ्या मुलाशी करावं असं म्हणालो. तेंव्हा तू पन्नास हजार मोहरा हुंडा म्हणून मागितल्यास ! तेंव्हा माझ्याजवळ इतकी मोठी रक्कम नव्हती. आता म्हणालास तर मी एक लाखही देऊ शकतोय. तुला हे सांगून हे लग्न पक्कं करण्यासाठीच निघत होतो. माझ्या मुलीलायक दुसरा कोणी मिळणार नाही, असं नको समजूस ! पण तुझा मुलगाही लायक आहे, म्हणून तुझ्याकडे निघालो होतो.'' बलराम बोलला.

मनातला संशय प्रकट न होऊ देता अवतारने विचारले, ''इतकी मोठी रक्कम तुला अचानक कशी मिळाली ?''

''ही तर सारी ज्ञानयोग्याची कृपा !'' बलराम उत्तरला.

''बाकी सगळं आपण नंतर बोलू. मला ज्ञानयोग्याला भेटायचंय.'' अवतार घाईघाईने बोलला.

ज्ञानयोगी रहात असल्याजागी बलराम अवतारला घेऊन गेला. ज्ञानयोगी हेही गाव सोडून अन्यत्र कुठे जायच्या तयारीत होता. अवतारची हकिकत पूर्ण ऐकून घेऊन तो म्हणाला, ''मी तर तुला सांगितलं होतं, की अतिलोभाला बळी पडू नकोस. पण तू ऐकलं नाहीस अन् चोरदेवाचा तुला काहीच उपयोग झाला नाही.''

अवतार दुःखी होत म्हणाला, ''स्वामी, पण खरं काय घडलं, हे सांगाल ?''

''कोटी मोहोरा मिळाल्यामुळे तूही एक धनवान माणूस बनलास, अन् ही तर अन्यायानं मिळवलेली संपत्ती ! सहाजिकच कोणी मोठी रक्कम मागितली, तर चोरदेव तुझ्याच रकमेची चोरी करणार ! तू जर



दहा, पंधरा हजारांची अपेक्षा केली असतीस, तर तू चोरदेवाच्या नजरेत आला नसतास. कोणी मोठ्या रकमेची मागणी केली नसती, तर तुझी रक्कम तुझ्याजवळच राहिली असती. पण आजच्या काळात माणसांच्या इच्छा अमर्याद वाढल्या आहेत. कोटी मोहोरा कोण नाही मागणार ? तसा कोणी न कोणी चोरदेवाला भेटणारच. त्यामुळे कोटी मोहोरांच्या या पेट्या बदलत रहाणार'' ज्ञानयोगी हसत बोलला.

ही बोलणी ऐकताच बलरामही एकदम दचकला ! ''बापरे ! मी तर वीस कोटी मोहोरा मागितल्या होत्या !'' अन् तो घराकडे सुसाट पळत सुटला.

''अजून अदृश्य झाल्या नसल्या, तर आठवडाभरात मोहोरा नक्कीच अदृश्य होणार.'' असे म्हणत ज्ञानयोगी दुसऱ्या गावाकडे चालू लागला.

बलरामकडे काय घडले असावे, हे जाणण्याची अवतारला उत्सुकता वाटली. तो त्याच्या घरी गेला. रिकाम्या पेटीसमोर बलराम डोके धरून उभा होता !

बलरामच्या पाठीवर थोपटत अवतार म्हणाला ''काळजी नको करूस ! आपण दोघंही 'भाग्यवान' बनता-बनता तसेच राहून गेलो. अतिलोभ चांगला नसल्याचं ज्ञानयोगी प्रथमपासूनच सांगत होता.''

''माझी तीव्र इच्छा होती की, तू मागितलेला हुंडा तुला देऊन दोघं व्याही बनू. पण माझी इच्छा सफल झाली नाही. माझा अतिलोभच याला कारण आहे !'' असे म्हणत बलराम धाडकन जमिनीवर पडला !

त्याला पकडून नीट बसवत अवतार म्हणाला, ''आपण दोघंही अतिलोभाला बळी पडलो, अन् दोघांचं नुकसान झालं. पण माझ्या मुलाला जावई बनवायची तुझी इच्छा म्हणजे काही 'अतिलोभ' नव्हे. आता एक पैसाही हुंडा न घेता मी तुझ्या मुलीला आपली सून बनवायला तयार आहे. तुला आहे कबूल ?''

अवतारचे बोलणे ऐकून बलरामला तर असे वाटले की 'चोरदेवाने दिलेली संपत्ती नाहीशी झालेली नाही. दोघेही व्याही यानन्तर अतिलोभ सोडून देऊन असलेल्या परिस्थितीत सुखाने असे राहू लागले की, धन आपल्याकडे अजून सुरक्षितच आहे.'







# महाबळी

अरण्याजवळ एक बलिष्ट माणूस रहात असे. त्याचे नाव होते शरभ. 'जगात आपल्या पेक्षा बलाढ्य कोणी नाहीच' अशी त्याची स्वतः बाबत समजूत होती. याचे एक कारण होते - तो जंगलात गेला की सर्वसाधारण माणसापेक्षा दहापट जास्त लाकडे डोक्यावर वाहून आणत असे. नन्तर बायकोला तो गर्वाने म्हणे, ''बघ, कलियुगातला भीमच आहे मी.''

''भीम आहात ? भीम खरंच समोर आला, तर पळून नाही जाणार ? तुम्ही बलशाली नाहीत असं नाही म्हणणार मी, पण तुम्ही काही महाबळी नव्हेत !'' शरभची बायको दुर्गा यावर त्याला नेहमीच चिडवत असे.

तिच्या बोलण्यावर नाराज होत, तो म्हणे, ''नुसतं बोलून काय उपयोग ? दाखव ना माझ्या पेक्षा जास्त बलवान कोणी असेल तर !''

एकदा दुर्गा आपल्या डोक्यावर मोठी घागर घेऊन पाणी आणायला विहिरीवर गेली. विहिरीत सोडलेली घागर वर ओढून घ्यायला तिने सुरुवात केली, पण ती इतकी वजनदार झालेली होती की तिला ती ओढता येईना. प्रयत्न करून करून बिचारी घामाने निथळून गेली, शेवटी घागर रहाटाला बांधलेली तशीच सोडून ती घराकडे निघाली. त्याच वाटेने समोरून एक बाई कडेवर मूल घेऊन विहीरीकडे निघाली होती.

दोघी समोरासमोर पोचल्या तेव्हा त्या बाईने दुर्गाला विचारले, ''रिकाम्या हातानं कशी निघालीस ? विहीर आटून गेली की काय ?''

''नाही, पाण्यात सोडलेली घागर ओढून काढता येत नाहीशी झाली. विहीरीत एखादं भूतबीत बसलंय की काय कुणास ठाऊक !'' दुर्गा उत्तरली. ''अरे, एवढंच ? चल माझ्या

(चान्दोबात पन्नास वर्षांपूर्वी प्रकाशित झालेली गोष्ट)

बरोबर, हवं तेवढं पाणी काढून देते बघ.'' ती दुसरी बाई म्हणाली. दिसायला खरे तर तीही मोठी ताकदवाली दिसत नव्हती. तरीही दुर्गा तिच्यामागोमाग पुन्हा विहिरीकडे गेली.

''बघ आता तूच ! घागर तू ओढू शकशील ?'' असे म्हणत दुर्गाने दोरीला हात घातला.

इतक्यात त्या बाईच्या कडेवरून आलेल्या मुलाने दोरी आपल्या हाती घेतली आणि अगदी सहज घागर भराभरा वर ओढली ! आश्चर्याने तोंडावर हात धरून दुर्गा पहातच राहिली ! तिच्या तोंडून शब्दही निघेना ! पण मुलाच्या आईला मात्र ते काही नवल नव्हते.

मुलगा जराही न थकता भराभर घागरी मागून घागर पाणी ओढू लागला. दोघी बायकांनी आता स्नाने केली आणि आपापल्या घागरी उचलून त्या घराकडे निघाल्या. परत फिरताना दुर्गाने त्या बाईची चौकशी केली.

''हा समोरचा रस्ता थेट माझ्याच घराकडे जातो.'' असे म्हणत तिने वाटेत फुटलेल्या एका पाऊलवाटेकडे निर्देश केला आणि पुढे ''माझ्या नवऱ्याचं नाव आहे अपरभीम'' असे सांगून डोक्यावर घागर अन् कडेवर मूल संभाळत ती आपल्या वाटेला लागली. ''घरी पोचताच दुर्गाने सारा वृत्तान्त आपल्या नवऱ्याला सांगितला.

''काय ? या भागात स्वतःला अपरभीम म्हणवणारा कोणी वावरत असतो ? पहाच, मी त्याची स्थिती आता कशी करून टाकतो ते !'' शरभ गरजला, ''माझं ऐका, सोडून द्या त्याचा विचार ! उगीच भांडायला जाऊ नका त्याच्याशी. त्याचा मुलगा जर इतका बलवान आहे, तर तो स्वतः किती बलवान असेल !'' दुर्गा रडतच नवऱ्याला अटकाव करू लागली.

पण बायकोकडे लक्षही न देता तो म्हणाला,





''उद्या मला त्या घराची वाट दाखव. मग मी काय करायचं ते पाहून घेईन.'' चिडक्या आवाजात शरभ बोलला.

दुसऱ्या दिवशी धनुष्य-बाण, तलवार इ. बरोबर घेऊन शरभ आपल्या बायको बरोबर बाहेर पडला. पण अपरभीमला भेटण्यापूर्वी विहिरीची नीट पहाणी करण्यासाठी तो तिकडे वळला. बरोबर त्याच वेळी अपरभीमची बायकोही तिथे आली.

शरभने दोराला घागर बांधून ती खाली सोडली. ती पाण्याने भरत असताना तो स्वतःशी बडबडत म्हणत होता, ''हूं ! इतकी लहानशी घागर वर खेचायला कोणी महाबळी येण्याची काय गरज ?'' घागर भरली आणि शरभने ती वर खेचायला सुरुवात केली. पण त्याने पुरे बळ लावून, जोरजोरात श्वास ओढूनही त्याला ती वर ओढायला भारीच त्रास पडू लागला. मोठ्या कष्टाने त्याने ती जराशी वर ओढलीही; पण अचानक घागर खाली जाऊ लागून तो स्वतःच विहिरीत ओढला जाऊ लागला. ऐनवेळी त्या दुसऱ्या बाईच्या मुलाने धावत येऊन शरभला घट्ट धरले नसते, तर तो नक्कीच विहिरीत कोसळला असता !

नंतर त्या मुलाने शरभच्या हातातली दोरी घेऊन विनासायास ती घागर वर ओढून दिली.

''आता तरी खरं काय हे ओळखलंत ना ! चुपचाप घरी चला आपल्या.'' दुर्गा नवऱ्याला म्हणाली ''यात नक्कीच काही जादूबिदू असली पाहिजे.'' काहीही झालं तरी अपरभीमला मी भेटणारच.'' शरभ म्हणाला.

''तुमची ललाटरेषा बदलणं मला शक्य नाहीय. मी तुमच्याबरोबर मात्र येणार नाही हे नक्की.'' दुर्गा म्हणाली आणि पाणी भरून घेऊन घराकडे निघून गेली. अपरभीमची





बायको शरभला म्हणाली, "माझं म्हणणं ऐका. तुम्ही आपले घरी चालू लागा कसे! माझ्या नवऱ्यानं तुम्हाला पाहू नये अशी इच्छा आहे माझी." पण तिचे न ऐकता शरभ तिच्या मागोमाग जात राहिला.

"माझा नवरा शिकारीला गेला आहे. एक संबंध हत्ती खातो तो. तेंव्हा कुठेतरी लपून राहून दिसेल ते पहात रहा. समोर आलात तर मात्र तो तुम्हाला गिळून टाकेल यात शंका नाही." अपरभीमच्या बायकोने शरभला समजावले. सावधान रहायला सांगून तिने एका मोठ्या टोपल्याखाली शरभला लपवले.

संध्याकाळ होता होता एकाएकी झंझावातासारखा वारा येऊ लागला. अपरभीम घराच्या अंगणात पोचत होता. तो ओरडला, "हत्ती शिजवला?" त्याच्या आवाजानेच सगळ्या वस्तु भूकंप झाल्या-सारख्या गडगड आवाज करत हलल्या. शरभचे टोपलेही हलले. तो आतल्या आत थरथरू लागला. त्याला स्पष्टच कळून चुकले की, "आपल्यापेक्षा महाबळीही इथे अस्तित्वात आहे!"

"हं, शिजला तुमचा हत्ती! या अन् खाऊन घ्या" अपरभीमची बायको बोलली. "थांब जरा! कुठून तरी माणसाचा वास येतोय मला! माणूस खाऊनही फार दिवस गेलेत." असे म्हणत अपरभीम इकडे तिकडे शोधू लागला.

तो थोडा दूर झाल्याबरोबर त्याची बायको हळूच टोपल्याजवळ येऊन म्हणाली, "माझा नवरा आपलं खाणं खाऊन झाल्यावर छान घोरायला लागेल. मग मी जळती मशाल खिडकीत ठेवीन. तुला पळून जाण्यासाठी तीच खूण समज, पण पुन्हा कधी या घराकडे फिरकायचं धाडस करू नकोस."

"देवी, इथं येऊन मी फार मोठी चूक केलीय. पुन्हा कधीही नाही येणार. माझं डोकं ठिकाणावर आलंय आता." शरभने कबूल केले.

मध्यरात्री शरभला खिडकीत जळती मशाल दिसली. तो हळूच टोपली-बाहेर आला अन् वेगाने धावत सुटला.

थोडा दूर गेला नसेल, इतक्यात जोरदार झंझावात सुटला. त्याला ऐकू आले-"माणसाचा वास! माणसाचा वास! अपरभीमचा आवाज शरभने ओळखला; तो आणखी वेगाने धावू लागला.

पण शरभ जसा वेगाने धावू लागला, तसाच अपरभीमनेही वेग वाढवला. हवेचा वेगही वाढला होता. शरभच्या पावलातली शक्ती संपत आली होती. पण हवा त्याला पुढे पुढे ढकलत होती! अरण्यातून पळत असल्याने त्याला बराच वेळ कोणी माणूसही दिसला नाही.

इतक्यात शरभला समोर एक दृश्य दिसले. ते पाहून मात्र आता आपला जीव निघून चालल्यासारखे त्याला वाटले. अरण्यात एक माणूस आपण मारलेल्या प्राण्यांचा ढीग लावून त्यातला एकेक उचलून खात होता! हाडे तो एका बाजूला फेकत होता.

"कोण आहेस तू? तुझा पाठलाग कोण करत आहे?" त्या माणसाने शरभला विचारले.

"एक महाबळी माझा पाठलाग करत आहे" कापत कापत शरभने सांगितले.

"जंगलातला राक्षस तर इथे हजर आहे अन् कोणी दुसरा महाबळी तुझा पाठलाग करतो आहे? त्याला मारूनच टाकीन मी!" तो महाकाय माणूस हुंकारत बोलला.

इतक्यात अपरभीम तिथे पोचला. त्याच्या बरोबर जो जोरदार वारा आला, त्यामुळे शरभ उडून झाडाच्या फांद्यामधे अडकून बसला. नंतर खाली त्याला दिसले की, दोन्ही महाबळी आपसात घनघोर युद्ध करत आहेत.

दोन्ही महाबळींनी प्रथम समोरासमोर येऊन एकमेकांना पाहून घेतले. आणि नंतर ते भिडले. दोघे एकमेकांना लाथा बुक्क्यांनी मारत होते. लाथाबुक्के इतके जोरदार होते की पहाडांचाही चक्काचूर व्हावा!

सकाळपर्यन्त दोघे एकमेकांशी लढत होते. अचानक दोघे आकाशात उडाले आणि ढगांआड गेले. दोघांनी आपसात बोलून तसे केल्यासारखे वाटत होते. अजूनही शरभला त्यांचा गडगडाटी आवाज ऐकू येत होता.

दोघात कोण जिंकणार, हे तिथूनच पहायचा शरभ प्रयत्न करत होता. पण ते पुन्हा जमिनीवर उतरलेच नाहीत. शेवटी शरभच कसाबसा खाली उतरला आणि आपले घर शोधत चालू लागला.

यानन्तर शरभने ना कधी आपल्या बायकोजवळ आपल्या शक्तीची डींग मारली, ना लोकांशीही! जेंव्हा जेंव्हा विजा चमकून आवाज होई, तेंव्हा तेंव्हा लोक म्हणत-महाबळींचं युद्ध आजूनही चालूच आहे!



विशेष समाचार

# रशिया - बेलारसचे पुनर्मिलन

**मे** २० ला रशिया व बेलारस यांच्यात फेडरेशनच्या रूपात पुन्हा ऐक्य होत आहे. पाच वर्षांपूर्वी सोव्हिएट युनियनच्या पतनानन्तर पंधरा रिपब्लिक राज्ये निराळी झाली. त्यावेळी त्या राज्यांच्या जनतेला आपण स्वतन्त्र झाल्याचा मोठाच आनन्द झाला होता. पण तो आनन्द औट घटकेचाच ठरला.

१९९१ मधे सोव्हिएट युनियन छिन्नविच्छिन्न झाले. त्यामुळे रिपब्लिक राज्यांची शक्ती क्षीण झाली. रोजच्या जरुरीच्या वस्तुंच्या किंमती आकाशाला भिडल्या. शेवटी अशी स्थिती अुत्पन्न झाली की काही राज्यातून ब्रेडसाठी तासन् तास रांगा लावायची वेळ आली! बऱ्याच जणांना वाटले की, यापेक्षा कम्युनिस्टांच्या शासनात आपण बरे होतो ! चालू दुस्थिती पाहून वाटले की तेंव्हाच आपण सुखात होतो. एशियात पुन्हा ऐक्य होण्यातच आपले कल्याण आहे, असे त्यांना वाटू लागले.

रशिया, बेलारस (श्वेत रशिया) यांच्यात कसला मतभेद जवळ जवळ नाहीच. दोन्हींची मातृभाषाही रशियनच आहे. बेलारस आपल्या यंत्र-विद्या आणि तांत्रिक प्रगतीसाठी प्रसिद्ध आहे. यामुळेच पूर्वीच्या सोव्हिएट युनियनच्या योजना आयोगाने इलेक्ट्रॉनिक्स, मशीन निर्मिती, पेट्रो केमिकल्स, आहार आदींच्या संबंधित अुद्योगांची स्थापनाही तेथेच केली होती. या अुद्योगांसाठी आवश्यक कच्चा माल रशियातूनच पाठवला जात असे. याशिवाय बेलारस हे फार मुख्य स्थान असल्यामुळे सोव्हिएट युनियनने आपला माल निर्यात करायचे केन्द्र येथेच बनवले होते. येथूनच युरोपच्या अन्य देशात माल निर्यात होई.

पूर्वीची ही स्थिती पुन्हा प्राप्त व्हावी, म्हणून पुन्हा या दोन देशांनी एकत्र येणे हितकर ठरेल. दोन्ही देश व त्यांच्या प्रजेने ही गरज ओळखली असेल, तर आश्चर्य नाही. इथे आणखी एका विषयाचा अुल्लेखही आवश्यक आहे. सोव्हिएट युनियन मोडल्यानंतर रशियात निवडणुका झाल्या. त्यात बोरिस एलस्तिन अध्यक्ष म्हणून निवडून आले. बेलारसनेही त्यांना निवडून येण्यात काही मर्यादिपर्यन्त मदत केली होती.

१९९६ च्या आरंभाला विविध क्षेत्रात आपापसात सहकार्यासाठी एक ठराव झाला व त्यावर दोन्ही देशांनी सह्या केल्या. २ एप्रिलला फेडरेशनच्या प्रस्तावावरही अशाच सह्या झाल्या. रशियाचे अध्यक्ष एलस्तिन व बेलारसचे लुकषेंको हे २० मे रोजी त्यावर सह्या करणार आहेत. यानंतर दोन्ही देशांच्या सदनांना या ठरावाला मान्यता देवून तो पक्का करावा लागेल.

बेलारसच्या काही लोकांचे असे म्हणणे आहे की, अशा फेडरेशनमुळे रशियाचाच फायदा होणार आहे. त्यामुळे राजधानी मिनस्कमधे याविरुद्ध आन्दोलनेही होत आहेत. परन्तु अध्यक्ष लुकषेंको यांनी जनतेला कौल मागितला. त्यासाठी त्यांनी रेफरेंडम ठेवला आणि अधिक टक्क्यांनी लोकांची संमती मिळवली.

जे देश यापूर्वी सोव्हिएट युनियनमधून फुटून निघाले, तेही या फेडरेशनमधे सामिल होण्यासाठी पुढे येतील काय, असे आता आपल्याला पहायचे आहे.





# राधेश्यामचा हृदयविकार

रामनगर जमीनदाराच्या दरबारात राधेश्याम नावाचा एक पंडीत होता. दरबारच्या कविगणांच्या चुका शोधून काढणे हे त्याचे काम होते. जमीनदार राधेश्यामच्या पांडित्याने प्रभावित झालेला असल्यामुळे कोणत्याही कवीला प्रथम राधेश्यामची प्रशंसा मिळवणे आवश्यक असे.

राधेश्यामला आपल्या उच्च स्थानाबद्दल फार गर्व वाटे. त्याच्या बोलण्यावरुन असे वाटे की, त्याच्या बरोबरीचा कवि कोणी असूच शकत नाही. त्याच्या 'हो' ला 'हो' म्हणणाऱ्यांना अन् जमीनदाराच्या निकटच्या व्यक्तींनाच फक्त तो मान देई. बाकी सर्व त्याच्यापुढे कःपदार्थ असत.

जमीनदार स्वतः भला माणूस होता. कोणाबद्दल वेडेवाकडे बोलणारांना तो जवळ फिरकूही देत नसे. त्यामुळे राधेश्यामचे दुर्गुण त्याच्या कधीच ध्यानी आले नाहीत.

एक दिवस जमीनदार गाडीतून शेजारगावी जात होता. वाटेत गाडीचे चाक खराब झाले. गाडी थांबवून गाडीवान म्हणाला, ''मालक, इथे जवळच आंबराई आहे. आपण तिथे जरा आराम करावा. गाडी ठीक झाली, की मी स्वतः बोलवायला येईन.''

जमीनदाराने आमराईत प्रवेश केला, तेंव्हा त्याला असे दिसले की, एका झाडाखाली काही लोक बसले आहेत. जवळ जाऊन पाहिल्यावर एक माणूस मोठ्या मधुर आवाजात गात असल्याचे त्याला आढळले. तो पदामागून पदे गात होता आणि त्याचा अर्थही समजावून सांगत होता. जमीनदारही त्या गर्दीत मिसळला आणि तन्मयतेने ऐकू लागला.

थोड्या वेळाने तो गायक उपस्थित श्रोत्यांना म्हणाला, ''आज इतकंच पुरे, उद्या पुन्हा भेटू. आपण आता इथून निघून आपापल्या कामाला लागा.''

सर्वजण निघून गेल्यावर जमीनदाराने त्याच्याबाबतीत विचारपूस केली. त्याला कळले की, गायकाचे नाव गोविन्द असून तो स्वरचित काव्य रामनगरच्या जमीनदाराला ऐकवण्यासाठी गेला असता राधेश्यामने त्याला अडवले. सध्या तो आपले पोट भरण्यासाठी या बगीच्याच्या माळ्याचे काम करत असतो. तो रोज शेतात कामाला येणाऱ्या शेतकऱ्यांना आपले काव्य ऐकवून त्याचा अर्थही स्पष्ट करुन सांगत असतो.

''असं करण्यामुळं तुझा काय फायदा होतो?'' जमीनदाराने गोविन्दला विचारले.

''लोकांनी माझं काव्य ऐकावं, त्यातून आनन्द लुटावा यातच मला आनन्द मिळतो; मनाला तृप्त वाटतं!'' गोविन्द उत्तरला.

''पण श्रोत्यांच्या लायकीनुसार काव्याचं महत्व वाढत असतं. रामनगरच्या जमीनदारापर्यन्त आपलं काव्य पोचवण्याचा आटोकाट प्रयत्न तू केला नाहीस, ही तुझी चूकच आहे.'' जमीनदार बोलला.

''माझ्या दृष्टीनं तर जमीनदारापेक्षा हे श्रोतेच मोठे आहेत. कविता ऐकून आनन्द लुटण्यात अडथळा आणायला यांच्यात कोणी राधेश्याम सारखा माणूस तरी नाहीये. हे रोज माझ्याकडे येऊन मोठ्या आवडीनं माझं काव्य ऐकतात. यामुळेच मला आत्मतृप्ती मिळते.'' गोविन्दने सांगितले.

आता जमीनदाराने 'आपण कोण' हे सांगितले. नंतर तो म्हणाला, ''राधेश्याम हा महान् पंडित आहे. काहीतरी चूक झाली असावी. माझी इच्छा आहे की तू माझ्या दरबारात येऊन माझा सत्कार स्वीकारावास.''



आताच गोविन्दला समजले की, हा माणूस दुसरा कोणी नसून खुद्द रामनगरचा जमीनदारच आहे. त्याला आपल्या वर्तणुकीबद्दल पश्चात्ताप वाटला. तो म्हणाला, ''माझ्याकडून अजाणता चूक घडली असेल, तर मला माफ करा. पण राधेश्यामसारखा अडथळा वाटेत असताना दरबारात यायची माझी इच्छा नाही.''

आपली अंगठी काढून गोविन्दच्या हाती देत जमीनदार म्हणाला, ''ही दाखवलीस की, कसलाही अडथळा न येता तू सरळ माझ्यापर्यन्त येऊ शकशील. आज आहे पंचमी. दशमीच्या दिवशी मी तुझी वाट

निरंजन हवालदार



पाहीन.'' गोविन्दने त्याला विनयपूर्वक नमस्कार केला. इतक्यात गाडीवाला येऊन जमीनदाराला बोलावून घेऊन गेला.

दशमीच्या दिवशी गोविन्द जमीनदाराला भेटला आणि त्याने भरल्या दरबारात आपले काव्यपठन केले. जमीनदाराने खूश होऊन त्याला हजार अशर्फ्या देण्यासाठी मन्त्र्याला आज्ञा दिली. तेंव्हा हस्तक्षेप करत राधेश्याम म्हणाला, ''स्वामी, या दरबारात सन्मान मिळवण्यासाठी योग्यायोग्य ठरवायचा निर्णय मी घ्यायचा असतो. माझा असा निर्णय आहे की - हा कवि सन्मान मिळवायला योग्य नव्हे!''

''आपला निर्णय मी नेहमीच मानत आलो आहे. पण फक्त एकदाच यावेळी आपण माझा निर्णय मान्य केलात, तर बरं होईल. ही माझी केवळ विनन्ती आहे.'' जमीनदार हसत बोलला.

''स्वामी, योग्य व्यक्तींचा निर्णय मी नेहमीच कबूल करतो. पण या दरबारात कवीची योग्यता पारखू शकेल असा माझ्या शिवाय दुसरा योग्य माणूस नाहीय.'' राधेश्याम बोलला.

जमीनदाराचा चेहरा आता रागाने लाल झाला. पण मोठ्या कष्टाने स्वतःला सावरत तो म्हणाला, ''योग्यतेबाबत मला कदाचित कळत नसेलही, पण सन्मान मिळवायचा हक्कदार कोण, इतकं तरी मला नक्की समजतं.'' अन् दिवाणाला उद्देशून तो म्हणाला, ''दिवाणजी, मी सांगितल्याप्रमाणे कवीचा सत्कार करा.''

राधेश्याम हा अपमान सहन करू शकेना! तो म्हणाला, ''आपण आपल्या अधिकाराच्या अहंकारामुळे आपला विवेक विसरलात. अशामुळे आपलंच अहित होईल. पंडित म्हणून मी आपणाला सावध करत आहे. माझं ऐका अन् हा सन्मान थांबवा. तसं घडलं नाही, तर इथून पुढे कवींच्या चुका ओळखायची माझी जबाबदारी नाही.''

''दुसऱ्यांच्या अहंकाराबद्दल बोलण्याआधी स्वतःच्या अहंकाराबद्दल विचार करा पंडितजी! पंडिताला अहंकार शोभत नाही. आपणाला हा माझा सावधगिरीचा इशारा आहे.'' जमीनदार बोलला.

हा घोर अपमान सहन न होऊन राधेश्यामने घरी पोचल्यावर बायकोला सारी हकीकत सांगितली आणि जमीनदाराबाबत तिच्या समोर खूपच भलेबुरे बरळला. ती त्याला म्हणाली, ''असं आवेशात येऊन आपण कोण, आपलं स्थान काय-या गोष्टी विसरू नका. ते मालक आहेत. त्यांच्या निर्णयाचं पालन केलं नाही, तर अस्तित्वच मिटून जाईलं नं?''

त्याच वेळी गोविन्द तेथे येऊन म्हणाला, ''माझ्यामुळे जमीनदार आपणावर नाराज झाले, याचं मला दुःख वाटतंय. विश्वास ठेवा-माझी यात काहीच चूक नाहीय. सर्व अगदी अचानक घडलं. मला आपणाबद्दल आदर वाटतो. माझ्या कवितेत काय चुका आहेत, मी मानाचा अधिकारी का बनू शकत नाही, हे मला कळलं तर मी आपल्या चुका सुधारेन. ते जाणण्यासाठीच मी आत्ता आपणाकडे आलोय. जे सांगायचं, ते अगदी निःसंकोच सांगा.''

रागाने राधेश्याम म्हणाला, ''आता एकदा जमीनदाराकडून प्रशस्ती मिळाल्यावर तुला माझ्याकडे काय काम? माझी चेष्टा करण्यासाठीच तू इथे आलायस हे माहीत आहे मला! अगदी ताबडतोब चालू लाग इथून!''



''दुसऱ्या एका कवीशी वागायची ही काय पद्धत आहे? आपण अत्यन्त अहंकारी आहात. आपल्या या गर्वाची शिक्षा आपणाला नक्कीच मिळेल.'' असे म्हणून गोविन्द तेथून निघून गेला.

त्याच्या बोलण्याने आता राधेश्यामचे भानच सुटले! तो गोविन्दला शिव्या देऊ लागला. शिव्या बकता बकता त्याच्या छातीत कळ आली आणि तो धाडकन् जमिनीवर कोसळला त्याच्या बायकोने घाबरून जाऊन ताबडतोब वैद्याला बोलावून घेतले. तपासणी करून वैद्य म्हणाला, ''हा हृदय विकाराचा तीव्र झटका आहे. योगापुरचा वैद्य सनातन हाच यावर अुपाय करू शकतो. पण तो राजा अन् जमीनदारांना सोडून इतर कोणावरही अुपचार करत नाही.''

जमीनदाराला याबद्दल कळल्यावर त्याने ताबडतोब राधेश्यामला योगापुरला पाठवायची व्यवस्था केली; सनातनकडून अुपचार करवायची व्यवस्थाही केली. अनेक प्रकारांनी तपासणी करून सनातन म्हणाला, ''हा मानसिक रोग आहे. खरे कारण कळल्यावरच अुपचार होऊ शकेल. तोपर्यन्त हा बरा होण्याची काहीच शक्यता नाही.''

जे घडले, ते सर्व राधेश्यामने सनातनला



निवेदन केले. नन्तर तो म्हणाला, ''जमीनदार आणि गोविन्द यांच्या अहंकारामुळेच मी आजारी पडलो. त्यांनीच माझ्या मनावर आघात केला.''

''जमीनदारानं तर तुझ्या उपचारासाठी आवश्यक ती व्यवस्था करून दिली. गोविन्दनं तुझ्याकडे येऊन आपल्या चुका जाणून घ्यायचा प्रयत्न केला. एकजण दयाळु आहे, तर दुसरा विनयशील! त्यांच्यात खोट काढणं हा तुझाच अहंकार आहे. प्रथम तुला आपला हा दोष त्यागायला हवा. नाहीतर ही व्याधी कायमची चिकटणार तुला.'' वैद्य बोलला. त्याच्या या बोलण्यावर चिडून राधेश्याम म्हणाला, ''मी महापंडित आहे. अहंकार आणि आत्माभिमान यातला फरक चांगला कळतो मला. तुम्हाला ते कळत नाही, म्हणूनच असं बोलताय.''

हसत सनातन म्हणाला, ''मी केवळ वैद्य आहे, पंडित नव्हे; हे खरंच आहे. पण तुझ्या रोगाचं मूळ कारण जाणल्यावाचून चिकित्सा करणं, मलाही शक्य नाही. आपल्या शिष्याला रामनगरला पाठवून मी पूर्ण माहिती मिळवीन. तुझ्या रोगाचं कारण तिथे असेल, तर कळेलच मला.''

सनातनचा शिष्य रामनगरला गेला व त्याने सर्वत्र चौकशी केली. एका प्रमुख माणसाने त्याला म्हटले, ''राधेश्यामला हृदय विकार झाला असला तर नवल नाही. आपल्या मुलाचं बोलणं तो ऐकून घेत नाही. आपल्याला हवं तेच करतो. बापाचं अन् मुलाचं भांडण झाल्यावाचून एक दिवसही जात नाही. शेवटी इतकं झालं की बापानं मुलाला घरातून हाकलून दिलं; अन् त्यामुळेच त्याच्या छातीत कळ आली.''

दुसऱ्या एका माणसाने म्हटले, ''मला याचं मूळ कारण माहीत आहे. राधेश्यामच्या शेजारी सुग्रीव रहातो. या दोन घरांच्या मधे भागीदारीतली भिंत आहे. या विषयावरून दोघात नेहमी भांडणं होत असतात. रोगाचं कारण तेच आहे.''

''हा सुग्रीव कशा प्रकारचा आहे?'' शिष्याने विचारले.

''राधेश्याम सोडला तर त्याला दुसरा कोणी शत्रु नाही.'' त्या माणसाने सांगितले. शिष्य आणखी लोकांना भेटायला निघाला.

राधेश्यामची चार एकर जमीन होती. नोकरांकडून तो ती कसून घेत असे अन् दररोज त्यांच्याशी भांडत असे. एकाने त्याच्या आजाराचे हे कारण सांगितले; तर दुसरा एकजण म्हणाला की, राधेश्यामचा गवळी दुधात पाणी घालतो म्हणून तो चिडून आरडाओरडा करत असतो.

शिष्याने जवळजवळ वीस लोकांकडून माहिती गोळा केली. त्यातल्या प्रत्येकाने राधेश्यामच्या हृदयविकाराचे निरनिराळे कारण सांगितले. एका हृदयरोगाची इतकी कारणे? शिष्य आश्चर्यात पडला आणि परत येऊन त्याने सर्व काही गुरूला सांगितले. राधेश्यामने त्यांच्यातला सारा संवाद ऐकला. सनातन त्याला म्हणाला, ''ऐकलंस नं? रामनगरच्या बऱ्याच जणांना तुझ्या हृदयरोगा बद्दल अगोदरच माहिती आहे. त्यांना त्याची कारणंही माहीत आहेत. इतकी जी कारणं आहेत, त्यातलं तुला हृदयरोग होण्याचं मुख्य कारण तूच शोधायला हवं.''

राधेश्याम आता मान खाली घालून म्हणाला, ''मी स्वतःच खरं कारण सांगावं अशी तुमची इच्छा आहे ना? ज्या दिवशी मी रोगानं पछाडून तुमच्याकडे आलो, त्याच दिवशी तुम्ही खरं कारण ओळखलं. जितकी कारणं तुमच्या कानी आली, त्यातलं मूळ कारण माझ्याही ध्यानी आलंय. ते म्हणजे माझा अहंकार! मी त्याचा त्याग केला नाही, तर माझ्या मनाला शान्ती मिळणार नाही. ते कायमचं अशान्त राहील. हा हृदयरोग हटायला आधी मन शान्त व्हायला हवं. बरोबर आहे ना? पण हा अहंकार कसा पळवून लावावा हे कळत नाहीय मला. आपण सांगा त्यासाठी मला काय करायला हवं?''

सनातन हसत म्हणाला, ''तुझ्यात अहंकार भरला आहे, हे कबूल केलंस ते बरं झालं. सत्य समजलं हेच खूप झालं. यामुळे हळूहळू तुझा अहंकार कमी होत जाईल.'' थोडे दिवस वैद्याने राधेश्यामवर उपचार करून त्याला परत पाठवले.

यानंतर राधेश्यामला आपल्या मुलाचे बोलणे बरोबर वाटू लागले. आसपासचे लोक त्याला आप्त वाटू लागले. जमीनदार आता त्याला सर्वगुण संपन्न माणूस भासू लागला. सर्वांच्या चुका त्याला क्षम्य वाटू लागल्या. कवींच्या कवितांत काही चूक वाटलीच, तर तो स्वतः ती सुधारायला मदत करू लागला.



# आंधळा भिकारी

सत्यपुरच्या रामाच्या देवळाजवळ बसून एक आंधळा भिकारी भीक मागत असे. आपल्या समोर एक फडके पसरून ठेवून तो मन्दिरात येणाजाणाराला म्हणे, ''साहेब, आंधळ्याला भिक्षा द्या !''

एकदा सुगंधिपुरच्या एका युवकाने देवळात जाअून देवदर्शन केले अन् परत येताना त्याला हा भिकारी दिसला. 'जन्मान्धळा आहे' असे म्हणून तो भीक मागत होता. इतर भिकाऱ्यांपेक्षा त्याच्याच फडक्यावर जास्त पैसे होते. पण या तरुणाने पाहिले की, भिकारी अधून-मधून काही नाणी नीट पाहून एका डब्यात ठेवत आहे.

तरुणाने 'भिकारी खरा आंधळा नसल्याचे' ओळखले. इतक्यात भिकारी ओरडला, ''भिक्षा द्या बाबा!''

''भिक्षा देईन, पण मला तुझ्या आंधळेपणाबद्दल संशय येतो आहे.'' तरुण त्या भिकाऱ्याला म्हणाला.

भिकारी लगेच बोलला, ''साहेब, दूरवरचा तो हिरवा महाल दिसतोय न तुम्हाला? त्यापासून थोड्या अंतरावर बाभळीच्या झाडांजवळ जे नारळाचं झाड आहे, तेही दिसतंय न आपल्याला?''

''हो, दिसतंय तर!'' तरुण अुत्तरला.

''पाहिलंत, या आंधळ्यात अन् तुमच्यात किती फरक आहे? ते झाड मला मुळीच दिसत नाहीय!'' भिकारी म्हणाला.

**सौमित्र चव्हाण**







# सम्राट अशोक

८

मगधसम्राट बिन्दुसार आजारी असताना तक्षशिलामधे बंड सुरू झाले. ते मोडून टाकायच्या कामात ज्येष्ठ पुत्र सुशेम याने निरुत्साह दाखवला. कनिष्ठ पुत्र अशोक पित्याचा आशिर्वाद घेअून त्या कामासाठी ससैन्य तक्षशिलाकडे गेला आणि एकाच दिवसात त्याने बंडाचा बीमोड केला. द्रोह करणारांना त्याने जराही दया न दाखवता मृत्युदंड दिला. - पुढे

संध्याकाळची वेळ होती. महाराज बिन्दुसार यांचा ज्येष्ठ पुत्र सुशेम आपल्या भावांना बरोबर घेअून वनविहारासाठी निघाला. राजधानी पाटलीपुत्रच्या जवळून वहाणाऱ्या नदीच्या किनाऱ्यावरील अुपवनात ते पोचले. ते पोचण्यापूर्वीच सेवकांनी त्यांच्यासाठी खाद्यपदार्थ, पेये, फळे इ. ची व्यवस्था करून ठेवलेली होती. राजकुमारांनी अुपवनात प्रवेश केल्याबरोबर ठिकठिकाणी अंगरक्षक नेमून आत कोणी येणार नाही अशी व्यवस्था केली. आपल्या मनोरंजनात कोणी विघ्न आणू नये अशी त्यांची इच्छा होती. विशेषतः 'जनतेने आपल्याला विलासप्रेमी आणि सम्राट बिन्दुसारचा अयोग्य पुत्र' म्हणू नये अशी सुशेमची अपेक्षा होती. त्या सर्वांनी हरतऱ्हेचे रुचकर पदार्थ खाअून फळांचा रस प्यायला आणि ते अुपवनाच्या मध्यावर अंथरलेल्या जाजमावर जाअून बसले. थोड्याच वेळात



काही सुन्दर युवती त्यांच्या समोर आपले नृत्यप्रदर्शन करू लागल्या.

सुशेम नृत्य पहाण्यात मग्न झाला. त्याला असल्या मनोरंजनाची आवड असल्याचे त्याच्या हावभावांवरून स्पष्ट दिसत होते. थोड्या वेळाने काही आवाज त्याला ऐकू आला. वळून पाहिल्यावर एक अंगरक्षक वेगाने धावत आपणाकडेच येत असल्याचे त्याला दिसले. जवळ आल्यावर हात जोडत तो म्हणाला, ''प्रभू, आपला एक दलनायक आपल्या सैनिकांसह येथे प्रवेश करू इच्छित आहे. आज आपल्या आज्ञेशिवाय कोणीही आत येअू शकणार नाही, असे सांगूनही आत येण्यासाठी तो राजमुद्रा दाखवत आहे.''

''दलनायकाचं इथे काय काम?'' सहनशक्ती घालवून सुशेमने विचारले, ''तो कारण सांगू इच्छित नाहीय. कदाचित आपणालाच सांगेल.'' अंगरक्षक म्हणाला, ''ठीक आहे; ताबडतोब पाठव त्याला.'' सुशेम चिडून ओरडला.

अंगरक्षक परत गेला आणि थोड्याच वेळात दलनायकाला बरोबर घेअून आला. दलनायकाने सुशेमला नमस्कार केला. सुशेमने इशाऱ्याने अंगरक्षकाला तेथून जायला सांगितले. नंतर दलनायकाकडे नाराजीने पहात विचारले, ''आमच्या मनोरंजनात अडथळा का आणलास? इतकी हिम्मत झाली तुला?''

''अडथळा आणणारे आम्ही कोण प्रभु? आमचा तसा अुद्देशशी नाहीय.'' दलनायक नम्रतेने अुत्तरला.

सुशेमने आणखी ओरडून विचारले, ''मग



इथे कशाला आलास तू?''

''अुद्या संध्याकाळी इथे मोठ्या प्रमाणावर अभिनन्दन-समारंभ साजरा होणार आहे. आवश्यक व्यवस्था करायची मला सेनापतीची आज्ञा आहे. त्या आज्ञेचं पालन करण्यासाठी माझ्याबरोबर आलेले काही सैनिक अुपवना-बाहेर अुभे आहेत. आपली अनुमती असेल, तर आत बोलवतो त्यांना.'' दलनायकाने अुत्तरादाखल माहिती दिली. ''मोठ्या प्रमाणावर स्वागत-समारंभ? कुणाचं अभिनन्दन करायचं आहे?'' सुशेमने विचारले.

''युवराज अशोक यांचं.'' दलनायकाने सांगितले.

''कशाबद्दल अशोकचं अभिनन्दन?'' सुशेमने विचारले.



''प्रभु, युवराज अशोक यांनी तक्षशिला-मधलं बंड मोडून काढलं. एकाच दिवसात त्यांनी हे महान कार्य करून दाखवलं. विजयी होऊन ते येत असल्यानं त्यांच्या स्वागतासाठी ही सारी तयारी चालू आहे.'' दलनायकाने माहिती पुरवली. ती ऐकताच सुशेमचा चेहरा पांढरा पडला! अंगावर वीजच कोसळल्या-सारखे सर्व बंधूंना वाटले. कोणाच्या तोंडून शब्दच फुटेना! सर्वजण अवाक् झाले! एक नर्तकी म्हणाली, ''वा! काय उत्तम खबर!''

सुशेम जोराने ओरडला, ''बन्द कर बकवास!'' सुशेम अशोकचा द्वेष करतो, हे नर्तकींना अगोदरच माहीत होते. त्यामुळे त्यांनी सुशेमच्या ओरडण्याची मुळीच पर्वा केली नाही. सुशेमच्या या कमजोरीबद्दल त्या मनोमन हसत राहिल्या.

स्तब्ध झालेला सुशेम थोड्या वेळाने मौन भंग करत म्हणाला, ''माझ्यापासून आत्तापर्यन्त ही बातमी लपवून का ठेवण्यात आली? जाणूनबुजून असं केलं गेलं काय?''

''ही शुभवार्ता कळताच ती आपणालाही सांगितली जावी, अशी महाराजांची इच्छा होती. पण आपण कुठे आहात हे माहीत नव्हते. त्यामुळेच आपणापर्यन्त ही वार्ता पोचवली जाऊ शकली नाही.'' दलनायक बोलला.

क्रोधाने कापत सुशेम ओरडला, ''गप्प बस!''

''आपण कारण विचारलंत अन् मी सांगितलं. क्षमा असावी प्रभु!'' दलनायक म्हणाला.

''आम्हाला सगळं माहीत आहे. तू आपलं तोंड बन्द ठेव.'' असे म्हणत सुशेम चुकून विस्तवावर पाय पडलेल्या माकडासारखा अशान्त होऊन तिथल्या तिथे फिरू लागला. नन्तर मुठी बन्द करून तो आकाशाकडे पाहू लागला. इतक्या सहजपणे अशोक आपले लक्ष्य साधेल, असा विचारही मनात येणे त्याला अशक्य होते. त्याचा या मोहिमेत पराभव व्हावा अशी त्याची इच्छा होती. पण आता तर या विजयामुळे जनमानसात त्याचा आदर वाढेल अन् तो 'वीर-नायक' म्हणवला जाईल. खूप विचार करून तो मान खाली घालून दलनायकाजवळ गेला. काय करावे हे दलनायकाला समजेना.

अचानक आपली अंगठी काढून सुशेमने ती दलनायकाच्या बोटात घातली. नंतर हसून त्याची पाठ थोपटली. या अचानक कृतीमुळे दलनायक स्तंभित झाला. हळूच हसून त्याने सुशेमला नमस्कार केला.

''तू शुभसमाचार आणल्यामुळे तुला बक्षिस दिलं मी! अुद्या याहूनही मोठं बक्षिस देईन पहा!'' सुशेम बोलला. ''कृतज्ञ आहे मी महाप्रभु.'' हात जोडत दलनायक म्हणाला, ''तुला ते मोठं बक्षिस हवं असेल; तर तू एक काम करायला हवं.'' भावगर्भित आवाजात सुशेम बोलला.

''आज्ञा व्हावी.'' दलनायक म्हणाला.

''काय आहे ते नंतर सांगेन. प्रथम सांग, की मी कोण आहे?'' सुशेमने विचारले.

''असं का बोलता? आपण तर युवराज आहात.'' दलनायक म्हणाला.

''आज मी युवराज आहे, तर भविष्यात कोण बनेन?'' सुशेमने विचारले.

''आपण महाराज बनाल प्रभु!'' दलनायक अुत्तरला.

''शाबास! बरोबर बोललास बघ! भावी महाराजाला साथ दिलीस, तर तुझं भविष्यही अुजळून जाईल.'' सुशेम म्हणाला.

''आज्ञा द्या प्रभु, अवश्य पालन करीन.'' दलनायकाने आश्वासन दिले. ''अशोकच्या स्वागताची सारी व्यवस्था तुझ्यावर सोपवली आहे न! तेंव्हा ही व्यवस्था अुच्च प्रकारे व्हावी अन् अद्‌भुत रूपानं प्रकट व्हावी. हा समारम्भ इतक्या अुच्च कोटीचा व्हावा,कि त्या दासी पुत्राला आणखी कसल्या सन्मानाची जरूरच पडू नये. समारंभाची व्यवस्था काहीही अुणं न ठेवता व्हावी. समजलं ना माझं म्हणणं?'' सुशेमने विचारले.

हे बोलणे ऐकल्याबरोबर दलनायकाच्या भुवया आकुंचित झाल्या. मोठ्या प्रेमाने त्याचे हात पकडून सुशेम म्हणाला, ''भागूबाई-सारखा घाबरतोस काय? दलनायक आहेस ना? सेनापती बनायचं असेल, तर माझं





बोलणं लक्षपूर्वक ऐक. तू काय करायचंस हे नीट सविस्तर सांगेन मी. चल माझ्या बरोबर.'' असे म्हणून सुशेम त्याला झाडीमागे घेअून गेला.

दुसऱ्या दिवशी संध्याकाळी अशोकचे अभिनन्दन करण्यासाठी बरीचशी प्रमुख माणसे अुपवनात जमा झाली. त्यांच्यात मगधचा प्रधानमन्त्री, इतर मन्त्रिगण, सेनापती, दलनायक, अधिकारी, नगरप्रमुख, आणि राजपरिवारातले सुशेम व त्याचे भाअू असे सर्व अुपस्थित होते.

सूर्यास्त होत आला होता. तरीही अशोक अजून आला नव्हता. प्रधानमन्त्री सेनापतीला म्हणाला, ''आपले युवराज यायला इतका वेळ कसा लागला?''

''सूर्यास्तापूर्वीच तर त्यांनी यायला हवे होते. काही अनिवार्य कारण असेल.'' सेनापती म्हणाला.

इतक्यात एक दूत घोड्यावरून तेथे आला व नमस्कार करून प्रधानमन्त्र्याला म्हणाला, ''वाटेत इक्षुपुरला प्रजेनं त्यांना अडवून त्यांचा सत्कार केला. समारंभ संपवून निघेपर्यन्त एक तास गेला, त्यामुळेच अुशीर झाला. युवराज सेनेसह लवकरच पोचतील.''

जवळच अुभ्या आपल्या मित्राकडे अर्थपूर्ण नजरेने पहात सुशेम हसला, त्याच्या योजनेप्रमाणेच स्वागताचे नाव पुढे करून जाणून बुजून अशोकच्या यात्रेत अुशीर करण्यात आला होता. विघ्न अुभे केले गेले होते. ही गोष्ट फक्त सुशेम व त्याच्या विश्वासू लोकांनाच माहीत होती. त्याची योजना अशी होती की, अंधार पडल्यावरच अशोक अुपवनात येअू शकावा.

अुपवनात पोचण्याच्या मार्गावर एका बाजूला अुंच टेकाड होते. नदीला पूर आल्यावर पाण्यात भू-प्रदेश बुडू नये म्हणून संपूर्ण नदीकिनाऱ्यावर दगडांचा अुंचसा बांध बनवला होता. खूप पूर्वी हे काम झालेले होते. काही ठिकाणी दगड सुटून बांध काहीसा ढिला झालेला होता.

सूर्यास्त होअून सर्वत्र अंधार पसरू लागला. तेथील मोठमोठ्या खांबांना पेटत्या मशाली बांधण्यात आल्या. इतक्यात दुरून घोड्यांच्या टापांचा आवाज ऐकू येअू लागला. घोषणा ऐकू आल्या, ''वीराधिवीर युवराज अशोकचा विजय असो! युवराज अशोकचा विजय असो!'' घोषणांमुळे वातावरण दुमदुमले.



सुशेम व त्याचे साथीदार काहीसे अुद्विग्न होते. त्यांची चिंता वाढत होती. प्रधानमन्त्री महाराजांतर्फे हातात हार घेअून अुभे होते.

अशोकची सेना बांधावरून अुपवनात पोचण्याच्या मार्गावर पुढे सरकत होती. अुपस्थित जनतेत हर्षातिरेक पसरला होता. त्यांचा आनन्द वर्णनातीत होता.

पुढे येणाऱ्या सैन्यात अचानक खळबळ माजली. एक मोठा आवाज झाला आणि पाठोपाठ हाहाःकार माजला. वेदनेने येणारे कण्हणे चारी दिशांना प्रतिध्वनित होअू लागले. अंधार झाल्यामुळे कुठेच काही दिसत नव्हते. आवाज कानी आला तरी, प्रत्यक्ष काय घडले, याचा मुळीच अंदाज येईना. सैनिकांवर काही आपत्ती आली असावी असा अंदाज आला. ते मदतीसाठी ओरडत होते. 'वाचवा, वाचवा आम्हाला', 'काढा हो कोणीतरी मला या दगडाखालून!' असे आर्त आवाज अुमटत होते. या सर्व गदारोळात 'हा दासीपुत्र अडकून मेला असला पाहिजे, आपला बेत चांगल्या तऱ्हेने अंमलात आला' - या विचाराने सुशेम मात्र फार खूश होता. दलनायकाने कारस्थान पूर्णत्वाला नेल्याबद्दल मनोमन तो त्याचे आभार मानत होता. पण वरकरणी मात्र तो अशोकबद्दल चिन्ता दर्शवू लागला.

''काय झालं? माझा भ्राता अशोक खुशाल आहे ना?'' सुशेम ओरडत विचारू लागला. कोणीही त्याच्या प्रश्नाचे अुत्तर दिले नाही; देअू शकले नाही. काही शिपाई मशाली घेअून पुढे धावले. तोपर्यंत मोठमोठे पत्थर गडगडत येअून सैन्यावर कोसळून सैनिक त्याखाली ठेचले जाअू लागले. बाकीचे सैनिक हाहाःकार करत सैरावैरा धावू लागले.

प्रधानमन्त्री व सेनापती अशोकला शोधत ओरडू लागले, ''युवराज अशोक! कुठे आहात तुम्ही?''

थोड्या वेळाने कुठूनसा प्रकट होअून अशोक म्हणाला, ''मी खुशाल आहे. प्रथम सांगतो तसं करा. दगडांमुळे जखमी झालेल्या सैनिकांना काळजीपूर्वक अुचला. बांधावरून ज्या बदमाशांनी पत्थर ढकलले त्यांना पाठलाग करून पकडा! आमचा विनाश इच्छिणाऱ्या व्यक्तीचा अुद्देश स्पष्ट झाला आहे. या कारस्थानामागे कोण आहे, ते शोधायचं आहे आपल्याला.''



# दीवाणीत नोकरी

सूरज हा व्यवहारी व हुशार मानला जात असे. एकदा मुलीच्या लग्नासाठी त्याला पैशांची जरूर भासली. गावचा महाजन मिश्रीलाल याच्याकडे कर्ज मागितले, तर त्याने ते द्यायला नकार दिला.

या घटनेनंतर बऱ्याच दिवसांनी दिवाणीत नोकरासाठी एक जागा रिकामी झाली. नोकरी मिळणाराला दिवाणाला त्याच्या कामात मदत करणे जरूरीचे होते. बऱ्याच तरुणांची ही नोकरी मिळवण्यासाठी चढाओढ चालली होती. त्यांच्यातून प्रथम फक्त दोघांचीच निवड झाली. पण दोघेही प्रत्येक बाबतीत तुल्य होते.

'एका आठवड्यानंतर सूचना मिळेल' असे सांगून त्यांना रवाना केले गेले. ज्याची निवड होईल त्याला नोकरी दिली जाणार होती. त्या दोघांपैकी एक होता खुद्द मिश्रीलाल महाजनचा मुलगा.

ही बातमी कळल्यावर सूरज मिश्रीलालला भेटायला जाऊन म्हणाला, ''तुझा मुलगा दिवाणीत नोकरी मिळवण्याच्या खटपटीत आहे, असं समजलं. दिवाण माधव अन् मी पूर्वीचे वर्गबन्धु. जिगरी दोस्त आहोत आम्ही. सौभाग्यानं तो दिवाण बनला अन् मी आपला एक मामुली शेतकरी. मला तीन हजार रुपये दे. मी ते बक्षिस मागतो आहे, असं नको समजूस. यथाशक्ती प्रयत्न करून मी तुम्च्या मुलाला ही नोकरी मिळवून देईन. प्रयत्न सफल झाले नाहीत, तर मी तुझी रक्कम परत करीन.''

महाजन मिश्रीलालने मुकाट्याने सूरजला तीन हजार रुपये दिले. एका आठवड्यानन्तर मिश्रीलालच्या मुलाला नोकरी मिळाली. सूरजच्या बायकोला जेंव्हा हे समजले, तेंव्हा आपल्या पतीला दोषी ठरवत ती म्हणाली, ''दीवाण अन् तुम्ही चांगले मित्र आहात, हे मला आधी कधी म्हणला नाहीत ते ? माझ्यापासून का लपवलीत ही गोष्ट ?''

यावर सूरज हसला अन् म्हणाला, ''खरं म्हणजे मी आणि दिवाण दोस्त वगैरे सर्व खोटे ! मी दिवाणाला भेटलेही नाही अन् मिश्रीलालच्या मुलाला नोकरी द्यायला त्याला सांगितलंही नाही. त्याला योगानंच ही नोकरी मिळालीय. पण झालं ते छानच झालं. आपली गरज भागली. केव्हातरी महाजनाला ही गोष्ट सांगून रक्कम व्याजासह परत करून टाकीन !''

**- यशवंत थैसास**







# सुनयना

अंधारी रात्र, आणि भयानक वातावरण! राहून राहून पाऊस रिपरिपत होता. मधून मधून चमकणाऱ्या विजेच्या प्रकाशात अक्राळविक्राळ, भेसूर चेहरे नजरेस पडत होते. शरीर थरकापायला लावणाऱ्या कोल्हेकुईच्या आवाजाची त्यात भरच पडत होती. पण दृढ निश्चयी विक्रमराजा पुन्हा त्या झाडाकडे गेला. झाडावरून प्रेत उतरवून आपल्या खांद्यावर आडवे टाकले आणि नेहमीप्रमाणे मौन धारण करून स्मशानाकडे चालू लागला. तेंव्हा प्रेतातला वेताळ बोलू लागला, ''राजा, मी तुला समजावता समजावता थकलो बाबा ! इतके कष्ट करायची अशी काय गरज पडलीय तुला ? या भयानक स्मशानात पिशाच्चं अन् विषसर्प आहेत, हे विसरलास काय ? कोणत्याही क्षणी इथं तुझ्या प्राणावर बेतू शकतं. तू काही सामान्य माणूस नव्हेस ! क्षणभर दु:ख केलं अन् सोडून दिलं, असं तुझ्या

## वेताळ कथा



बाबत शक्य नाही नं ! तुझा हा हट्टीपणा आणि कष्टांशी दोन हात करायची प्रवृत्ती पाहून मला शंका येतेय की, तू कोणी शापग्रस्त व्यक्ती तर नव्हेस ? बहुधा हे खरं असावं. म्हणूनच तर विवश होऊन यान्त्रिकपणे या कामाला जुंपला आहेस ! माणूस जाणूनबुजून किंवा अजाणता पाप करतो. कधी कधी देवता आणि तपोनिधींशी दुर्व्यवहार करतो, अहंकाराने वाईट वागतो अन् त्यामुळे शापग्रस्त होतो. तू या श्रेणीतला आहेस की नाहीस, हे मला नाही माहीत ! पण भविष्यात जागरूक रहावंस म्हणून सुनयना नावाच्या एका राजकन्येची गोष्ट सांगतो तुला, ''आणि वेताळ कहाणी सांगू लागला.

विनयपुरीच्या राजाच्या विवाहाला सोळा वर्षं झाली, तरी त्याला अपत्यप्राप्ती झाली नाही. हे दांपत्य गेले नाही, असं पुण्यक्षेत्र किंवा ज्याची पूजा केली नाही, असं कुळलंच दैवत उरलं नाही.''

एकदा पावसाळ्यात मध्यरात्री जोरदार वीज कडकली आणि मुसळधार पाऊस पडू लागला. सर्वांना एक भयंकर आवाज ऐकू आला! नगराबाहेरचा डोंगराच मोडून पडल्यासारखे सर्वांना वाटले.

त्या आवाजाने दचकून राणी बिछान्यातून उठून उभी राहिली. थोड्या वेळाने पाऊस थांबला आणि वातावरण एकदम शांत झाले. राणी पुन्हा बिछान्यावर पडली आणि शांत झोपून गेली. तिला एक स्वप्न पडले. त्या स्वप्नात तिला सर्वांगसुन्दर दुर्गादेवीचे दर्शन झाले. देवी तिला म्हणाली, ''खूप काळापासून दगडमाती अन् झाडांनी झाकलेलं माझं मंदिर या पावसामुळे प्रकट झालंय. पडिक अवस्थेतल्या त्या मन्दिराचा जीर्णोद्धार करव. तुझं कल्याण होईल.'' आणि देवी अंतर्धान पावली.

सकाळीच राणीने राजाला आपले स्वप्न सांगितले. त्याच दिवशी राजाराणी व परिवारातले काहीजण मोठ्या मुश्किलीने तो डोंगर चढून गेले. तेथे खरोखरच पडीक अवस्थेतले मन्दिर पाहून सर्वजण आश्चर्यात बुडाले ! राजाज्ञेवरून सहाच महिन्यात अजाड मंदिराचा जीर्णोद्धार होऊन डोंगरावर जाण्याचा रस्ताही तयार झाला.

ज्या दिवशी दुर्गादेवीच्या पूजेची सुरुवात झाली, त्याच दिवशी लक्षात आले, की राणी गर्भवती आहे. राजदम्पतीच्या आनन्दाला पारावार उरला नाही. एका विशिष्ट प्रकारचे



चान्दीचे डोळे अर्पण करून स्वतः देवीला पोशाख चढवायचा नवस राणी बोलली. परन्तु आता गर्भवती असल्याने तिला डोंगर चढायला मनाई करण्यात आली अन् तिला तो प्रयत्न सोडून द्यावा लागला.

नऊ महिन्यांनन्तर राणीने एका सुन्दर कन्यारत्नाला जन्म दिला. अत्यन्त आकर्षक अशा मोठ्या मोठ्या डोळ्यामुळे ती जास्तच मनोहारी वाटत होती. तिला बघायला आपले दोन डोळे अपुरेच आहेत असे प्रत्येकाला वाटे.

डोळे पाहून तिचे ''सुनयना'' असे नामकरण करायचा सल्ला पंडितांनी दिला.

जन्माच्या दुसऱ्याच दिवशी वैद्याने जाहीर केले की, दिसायला इतके सुन्दर डोळे असले तरी, कन्या मात्र जन्मान्ध आहे ! राजदम्पतीवर या वार्तेने जणू वीजच कोसळली !



सुनयना आंधळी असली तरी अतिशय बुद्धिमान होती. अतिशय मधुर कण्ठ ही तिला लाभलेली देणगी होती. तरीही तिच्या अंधत्वामुळे राजाराणी नेहमीच चिन्ताग्रस्त असत.

काळ जात राहिला आणि सुनयना आता उपवर झाली. कितीही सुन्दर व बुद्धिमान असली, तरी जाणूनबुजून आंधळ्या मुलीशी विवाह करायला कोणता राजपुत्र पुढे येईल ? या विचाराने राजदम्पती अतिशय दुःखी राहू लागली.

''माझ्या विवाहासाठी तुम्ही चिन्तित होऊ नका. सगळा भार दुर्गादेवीवर टाका. ''असे म्हणून सुनयना त्यांना धैर्य देई.

ती स्वतः दररोज संध्याकाळी आपल्या प्रिय सखीला घेऊन डोंगर चढून दुर्गामातेच्या मन्दिरात जात असे पुजाऱ्याकडून प्रसाद घेतल्यावर ती रोज मन्दिरामागल्या खडकावर बसून थंड हवेचा आस्वाद घेई.

एके दिवशी नेहमीप्रमाणे प्रसाद घेतल्यावर ती मन्दिरामागे आली. तिच्या सखीने तिला खडकावर बसवत म्हटले, ''सखी, आपल्या मधुर आवाजात दोन-तीन गाणी म्हण ना !''

सुनयनाने देवीच्या स्तुतीपर गाणे म्हणायला सुरुवात केली आणि तिची सखी चुपचाप तेथून निघून गेली. मन्दिरात शिल्पकाम करणाऱ्या तरुणाशी लवकरच तिचा विवाह होणार होता. त्याला भेटायला ती गेली. शिवाला आवडणाऱ्या नन्दिवर्धन आणि चमेलीच्या फुलांच्या सुगन्धाने आसमन्त दरवळून गेला होता. त्या सुगंधी थंड हवेच्या लहरींमुळे सुनयना स्वतःला विसरून गात राहिली.



चन्द्रगिरीचा युवराज सुधाकर देशाटन करता करता डोंगराच्या मागील बाजूने चढून वर आला. तो एक अुत्तम चित्रकार असून पित्याच्या परवानगीने त्याने अनेक राज्यांतून पर्यटन केले व कित्येक सुंदर प्रदेश व व्यक्तींची चित्रे रेखाटली. तिथे बसून गात असलेल्या सुनयनाचे सौन्दर्य पाहून तो हतप्रभ झाला ! अपलक तो तिचे सौन्दर्य निरखत राहिला. अशी अद्‌भुत सुन्दरी आजवर त्याने पाहिलीच नव्हती. त्याने तिथल्या तिथेच गानमग्न असणाऱ्या सुनयनाचे चित्र रेखाटले. ते पुरे होता होता तिची सखीही परत येअून म्हणू लागली, ''अंधार पसरू लागलाय, चला युवराणी.''

आपल्याला कोणी पाहू नये म्हणून सुधाकर तेवढ्यात एका खडकामागे लपला होता. गाणारी युवती या राज्याची राजकन्या असल्याचे त्याने जाणले आणि निश्चय केला की, विवाह करीन तर हिच्याशीच !

यानन्तर सुधाकर आपल्या राज्यात परत गेला. त्या रात्री त्याचा पिता कान्तिवर्मा याने त्याच्या प्रवासातील विशेष वर्णने त्याच्याकडून ऐकल्यावर म्हटले, ''राजकुमार, एक शुभ-समाचार आहे. आपल्या सम्राटाची एकुलती एक कन्या कांचना तुझ्याशी विवाह करू इच्छित आहे. तुझं मत ऐकण्यासाठी त्यांनी आपला दूत पाठवला होता. आपण त्यांचे मांडलीक आहोत. त्यांच्याशी संबंध जुळणं आपलं सौभाग्य ठरेल. भाग्यच जणू आपला दारवाजा खटखटावत आहे.''

सम्राटाने एका वर्षापूर्वीच ऐकले की, सुधाकर एक अुत्तम चित्रकार आहे. त्याने मुद्दाम त्याला बोलावून आपल्या कुटुंबात राहवून घेतले होते आणि परिवारातल्या लोकांची चित्रेही काढवून घेतली होती. त्यावेळी युवराणी कांचनाशी त्याचा परिचय झालेला होता.

कांचना काहीशी अधिक लठ्ठ होती आणि तिचा एक पायही बधीर होता. तिची आठवण येअून सुधाकर पित्याला म्हणाला, ''त्या जाड्या, लंगड्या, मुलीशी विवाह ? अशक्य आहे ते ! ती स्वभावानं लहरीही आहे.''

मुलाच्या अुत्तराने नाराज झालेला राजा म्हणाला, ''तू काय स्वतःला मदन समजतोस? तूही तर कुबडा आणि तिरळा आहेस ?''

आपल्या रूपाबद्दलचा पित्याचा टोमणा ऐकून सुधाकर दुःखविव्हळ झाला. तो म्हणाला, ''विनयपुरची क्षमा करा बाबा ! राजकन्या आवडली आहे मला.'' त्याने



दाखवलेल्या चित्रातील सौन्दर्य पाहून कान्तिवर्माही अवाक् झाला. थोडा वेळ गप्प राहिल्यावर तो म्हणाला, ''माझ्या बोलण्याचं वाईट वाटून घेअू नकोस. सम्राटाचा प्रस्ताव अमान्य केला, तर कदाचित भविष्यात त्याचा परिणाम वाईट होईल. आपण मांडलीक आहोत. आपलं राज्यही हातून जायची शक्यता आहे.''

कान्तिवर्माला आपल्या पुत्राचा हट्टी स्वभाव चांगला माहीत होता. सुनयना व तिच्या पित्याबद्दल माहिती मिळवण्यासाठी त्याने आपले गुप्तचर विनयपुरला पाठवले. एका आठवड्याने परत येअून त्यांनी बातमी दिली की, सुनयना जन्मांध आहे !

हा अहवाल मिळताच राजाने आपल्या पुत्राच्या दालनात जाअून त्याला विचारले, ''पुत्रा, तू सुनयनाशी काहीही बोलला नाहीस. फक्त चित्र काढलंस, खरं ना ?'' सुधाकरने होकारार्थी मान हलवल्यावर राजा पुढे म्हणाला, ''राजकन्या अतीव सुन्दर आहे यात वाद नाही. पण ती बिचारी जन्मापासूनच आंधळी आहे, हे माहीत नाही तुला.'' सहानुभूती दाखवत कान्तिवर्माने माहिती दिली.

क्षणभर सुधाकर आश्चर्यातच पडला. पित्याच्या सांगण्यावर त्याचा विश्वास बसेना. तो चित्रातल्या सुनयनाच्या डोळ्यांकडे पहातच राहिला ! नंतर तो म्हणाला, ''मग तर फारच छान ! माझा विवाह सुनयनाशीच होईल.''

कान्तिवर्मा म्हणाला, ''ठीक आहे. लवकरच तुझा विवाह सुनयनाशी होईल.'' अन् पुत्राला आशिर्वाद देअून तो आपल्या भवनाकडे निघून गेला.



विक्रमराजाला इतकी गोष्ट सांगून वेताळ म्हणाला, ''राजा, सम्राटाच्या कन्येशी आपल्या पुत्राचा विवाह न घडला तर अनर्थ होईल, अशी कान्तिवर्माला भीती होती. सुनयना आंधळी आहे हे कळल्यानंतर त्याने पुत्राला मनाई करायला हवी होती. पण त्याने तर अुलट त्याला आशिर्वाद दिला. विचित्र नाही वाटत हे? मला तर आणखी एक प्रश्न पडलाय. सुनयना आंधळी आहे, असं कळल्यावर सुधाकरने 'मग तर फारच छान !' असे का म्हटले ? त्याचं हे बोलणं असंबद्ध वाटतंय. ज्या तरुणीशी आपण विवाह करू इच्छित आहोत, ती विकलांग आहे, याबद्दल त्याला तर चिन्ता वाटायला हवी. पण अुलट त्याला आनन्द वाटतोय. ठीक आहे, थोड्या वेळासाठी आपण हे सर्व विसरूया. सुनयनाचं

जन्मांध असणं, सम्राटाच्या एकुलत्या एका मुलीशी विवाह करायची सुसंधी सुधाकरने हातची घालवणं हे सर्व त्यांच्या दुर्भाग्याचं द्योतक वाटतंय. असं वाटतंय की दोघंही शापग्रस्त आहेत. माझ्या या शंकांचं उत्तर माहीत असूनही ते देण्याचं टाळलंस, तर तुझ्या मस्त- काची छकलं होऊन जातील.''

अडचणीचे उत्तर देत विक्रमराजा म्हणाला, ''सुधाकरचा सुनयनाशी विवाह करायचा प्रस्ताव कान्तिवर्मानि प्रथम ठोकरला, त्याला आपली असंमती दर्शवली. नंतर पुन्हा आशिर्वाद ही दिला. यात आश्चर्य वाटण्यासारखे निदान मला तरी काही वाटत नाही. स्पष्ट आहे की कान्तिवर्माच्या पुत्रानं सम्राटाच्या मुलीशी विवाह करायला नकार दिला अन् त्यामुळे कान्तिवर्माला भीती पडलीय की, भविष्यात आपल्याला राज्याला मुकावे लागेल, सम्राटाच्या क्रोधाला बळी पडावे लागेल. पण मांडलीक राजाचा पुत्र एका अंध युवतीशी लग्नाला तयार झालाय असे पाहून सम्राटाला सुधाकरच्या त्यागबुद्धीचं कौतुक वाटेल, असा कान्तिवर्माला विश्वास वाटत होता. आपल्या मुलीशी तो लग्नाला तयार नसल्या बद्दल त्याला तक्रार रहाणार नाही. सम्राटासारख्याच्या मुलीशीच विवाहाला नकार दिला ही गोष्ट त्याचा मोठेपणा व मनाची परिपक्वता दर्शवत आहे. आता राहिला सुधाकरचा विषय! त्याला जेव्हां त्याने 'हे तर छानच झालं' असं म्हणण्यामागे एक सबळ कारण आहे. तो स्वतः उत्तम चित्रकार असला तरी रूपवान नाहीय. कुबडा आणि तिरळा आहे. सुनयना आंधळी नसती, तर कदाचित तिने मनापासून त्याला स्वीकारले नसते, त्यांचा विवाह होऊ शकला नसता. आता प्रश्न असा की सुधाकर अन् सुनयना काय शापग्रस्त आहेत? माझ्या दृष्टीनं हा प्रश्न संयुक्तिक नव्हे. जगात कितीतरी माणसं सुखानं जगतात तशी कितीतरी दुःखानं भरलेलं जीवन घालवतात. त्यामुळे काही माणसांना धन्य, भाग्यवान आणि देवाकडून आशिर्वाद प्राप्त झालेले असं म्हणणं, अन् ज्यांना हे मिळत नाही-त्यांना भाग्यहीन आणि शापग्रस्त म्हणणं हे अनुचित आहे. आपल्या बुद्धिहीनतेचं लक्षण आहे.''

उत्तर देऊन झाल्यावर राजाचे मौन भंग झाल्याच्या निमित्ताने वेताळ प्रेतासह अदृश्य झाला.







# बहिऱ्या आणि आंधळा

**भू**षण भूस्वामी महादेवच्या घरी चोरी करताना पकडला गेला आणि त्याला दोन वर्षे कैदेची शिक्षा झाली. आजच तो मुक्त झाला. कोतवालाने त्याला बोलावून म्हटले, ''चोरी करणं हा अपराध असल्याचं तुला आजपर्यन्त कळलंच असेल. कळलं की नाही?'' भूषण विनयाने उत्तरला, ''चोरी करणं, कुणाला फसवणं हा अपराध असल्याचं कुणाला माहीत नसेल साहेब ?''

''ते माहीत असूनही तू चोरी का केलीस?'' कोतवालाने विचारले, ''थोरा- मोठ्यांचं म्हणणं आहे की आपला खानदानी धन्दा सोडू नये. माझ्या आज्या-पणज्यां पासून चालत आलेला धन्दा आहे हा. चोरी करणं चूक आहे, असं मी म्हणालो, तर मी जाणून बुजून आपल्या पूर्वजांचा अपमान करतोय असा अर्थ होतो ना!'' भूषणने स्पष्टीकरण दिले.

कोतवालाने यावर हसत म्हटले, ''मग आता बाहेर गेल्यावर काय करायचा इरादा आहे, सांग!'' ''मी जसं नेहमी करतो तसं-नेहमीप्रमाणे आपले कान साफ करीन!'' भूषणने सांगितले. ''माझी चेष्टा करायचं धाडस करतोयस? इतकी हिम्मत तुझी?'' रागानें लाल होत कोतवालाने विचारले.

हात जोडत भूषण म्हणाला, ''साहेब, आपली चेष्टा करायचं धाडस मी कसं बरं करीन? आपण कुठे, अन् मी कुठे!'' ''तुझ्या बोलण्यात नक्कीच काही रहस्य लपलेलं आहे. नीट स्पष्ट बोल बरं?'' कोतवाल म्हणाला. भूषण सांगू लागला, ''साहेब, मी भूस्वामी महादेवच्या घरी चोरी करायचं ठरवलं, त्याच्या दोन आठवडे आधी काही कामाच्या बहाण्याने त्याच्या घरी गेलो. त्याची लोखंडी ट्रंक घरात कुठे आहे, हे मी पाहून ठेवलं. नंतर भिंतीला कुठे भोक पाडायला हवं, हे

अपर्णा साने

ठरवलं भिंतीबाहेर खूण करून ठेवली. पण रात्री माझ्या हातून चूक झाली अंधारात ती खूण मला नीटशी दिसली नाही. जे भोक ट्रंकेजवळ बनवायचं होतं, ते मी बरोबर ट्रंकेच्या मागे केलं. त्यामुळे ट्रंकेवर कुदळीचा थोडासा आवाज झाला. दुसऱ्याच क्षणी महादेव आणि त्याच्या दोन लोकांनी मला तिथल्या तिथेच पकडलं.''

बोलणं ऐकल्यावर कोतवाल म्हणाला, ''तू म्हणाला होतास की बाहेर गेल्यावर मी नेहमी प्रमाणे कान साफ करीन. याचा अर्थ काय ? तू आपल्या या सवयीबद्दल तर बोलला नव्हतास?''

''साहेब, तेच तर सांगत होतो ना! महादेवनं मला पकडून चांगलं पिटलं अन् तो म्हणाला, ''तुझी इतकी हिम्मत ? तू काय समजलास की, तुझ्या कुदळीची खणखण ऐकू न येण्याइतका मी बहिरा आहे? हा आवाज ऐकून तर कुंभकर्णही जागा होईल. त्याचं बोलणं ऐकून मला वाटलं की, मीच तर बहिरा नाही ना झालो ? तुरुंगात कोंबल्यावर मी एका काडीला कापूस लावला अन् रोज कान साफ करत राहिलो. या दोन वर्षांत माझे कान अगदी ठीक झाले. एकादी मुंगी हलली, तरी आवाज ऐकू येतो मला ! त्यामुळेच बाहेर गेल्यावरही नेहमीप्रमाणे कान साफ करीन मी.''

त्याच्या बोलण्याने फार नाराज होऊन कोतवाल विचारू लागला, ''तुझ्या बोलण्याचा अर्थ असा की, तू नेहमीप्रमाणे चोरीच करायचं ठरवलं आहेस. होय ना ?''

भूषण गप्प अुभाच राहिला. तेंव्हा छडी त्याच्या खांद्यावर टेकवून कोतवाल बोलला, ''अरे मूर्खा ! तू एका गोष्टीकडे लक्ष दिलं नाहीस असं वाटतंय. तू भिंतीवरची खूण ओळखू शकला नाहीस याचं कारण आहे तुझ्या रातंधळेपणामुळे तुझी नजर कमजोर होत चाललीय.''

ताबडतोब कोतवालाचे पाय धरत भूषण म्हणाला, ''मालक, मी फक्त चाळीस वर्षांचा आहे, त्यावेळी बहिरेपणामुळं मला शिक्षा भोगावी लागली, आता आंधळेपणामुळे पुन्हा एकदा तुरुंगात यायची इच्छा नाही माझी. भूस्वामी महादेवकडेच मला एकादी नोकरी मिळवून द्या. कसलंही वाईट काम करणार नाही मी.''








समुद्र किनाऱ्यावर सहल - १९

# कोरोमोडेल किनाऱ्या-किनाऱ्याने आणखी पुढे

शब्दांकन - मीरा नायर ✦ चित्रकला : के एस गोपकुमार

चेन्नैहून अुत्तरेला पुढे सरकल्यावर आपण द. आशियाच्या सर्वात मोठ्या समुद्रतलावाच्या एका किनाऱ्यावर पोचतो. हे आहे बंगाल अुपसागराच्या पाण्याने बनलेले एक खारे सरोवर. हे तमिळनाडु व आन्ध्र प्रदेशाच्या सीमेवरील पुलिकाट शहराला लागून आहे. सरोवरात कित्येक बेटे असून ती शिंपल्यांनी भरलेली असतात. हे शिंपले जाळून चुना बनवला जातो. पुलिकाट मधे एक पक्षी-अभयारण्य आहे. येथे येणाऱ्या रोहित (फ्लेमिंगो) व अन्य देशांतर करणाऱ्या समुद्रपक्ष्यांच्या रक्षणासाठी १९७६ मधे याची स्थापना करण्यात आली.



पुलिकाट सरोवर

## पुलिकाट सरोवर

पुलिकाट ही डच लोकांनी सुरुवातीला भारतात स्थापलेल्या वसाहतीं पैकी एक होय. सरोवराचा बराच मोठा भाग आन्ध्र प्रदेशात गणला जातो. आन्ध्र हे भारतातील पाचव्या क्रमांकाचे मोठे राज्य होय. भाषावार प्रान्तरचनेप्रमाणे बनलेले हे पहिलेच राज्य होय. येथे चक्रीवादळे मोठ्या प्रमाणावर होत असतात. केवळ समुद्र-किनाराच नव्हे, तर बराच आत-पर्यन्तचा प्रदेश ही वादळे अुध्वस्त करतात. पुलिकाट



तटवर्ती प्रान्तातील शंकु-आकाराच्या छतांच्या झोपड्या

सरोवराच्या अुत्तरेला आन्ध्राच्या नेल्लूर जिल्ह्यात श्रीहरिकोटा हे द्वीप आहे. भारताचे अंतरिक्ष-संशोधन-केन्द्र 'इस्रो' हे येथेच आहे. भारताचे पहिले अंतरिक्ष संवेदन यान 'रोहिणी' हे ९ ऑक्टो. १९७१ रोजी येथूनच सोडण्यात आले. जास्त मोठ्या यानांसाठी येथे एक नवीन क्षेपण-वेदी बनवली जात आहे.

श्रीहरिकोटा बेट अंतरिक्ष-अड्डा बनवले गेल्यामुळे येथील जंगलातल्या येनाडी कबिल्याच्या मूळ रहिवाशांची हकालपट्टी करावी लागली. हे लोक मुख्यतः शिकारीवर गुजराण करतात. अजूनही काही येनाडी विस्तव पेटवण्यासाठी गारगोटीच्या दगडांचा वापर करतात.

आन्ध्र हा अभ्रक अुत्पादन करणाऱ्या मुख्य प्रदेशांपैकी एक होय. जास्त करून नेल्लूरमधेच हे अभ्रक खोदून काढले जाते. पण नेल्लूर हे धान्य-अुत्पादनासाठी जास्त प्रसिद्ध आहे आणि याहूनही विशेष म्हणजे ते तेलगू महाकवी तिक्कन या नावाशी जोडलेले आहे.



श्रीहरिकोटामध्ये रॉकेट - प्रक्षेपण



बाराव्या शतकात ते काकतीय राजा गणपती याच्या मांडलीक राजा मनुमसिद्धीच्या दरबारचे कवि होते. तेलगुचा आणखी एका महाकवि नन्नय याने महाभारताचा तेलगू पद्यानुवाद सुरू केला होता, परन्तु त्यांनी तो अर्धवटच सोडला होता. तिक्कन याने तो पुरा करून 'कविब्रह्मा' ही पदवी मिळवली. ज्या लहानशा मंदिरात बसून त्यांनी हे लेखन केले, त्याचा आज सीमेंटचे गोदाम म्हणून अुपयोग केला जात आहे.

तटवर्ती आन्ध्रमधे दोन बारामास पाणी असणाऱ्या नद्यांचे विशाल त्रिभुज प्रदेश आहेत-एक कृष्णा व दुसरी गोदावरी. दोन्हींचा अुगम शेजारच्या महाराष्ट्र प्रदेशात झाला आहे.

कृष्णेच्या त्रिभुज प्रदेशात एका धारेच्या किनारी कुचिपुडी हे गाव असून ते सुप्रसिद्ध कुचिपुडी नृत्याचे जन्मस्थान आहे. सतराव्या शतकाच्या अुत्तरार्धात सिद्धेन्द्रयोगी नामक तपस्व्याने 'परिजात-हरणम्' नावाचे तेलगू काव्य रचले. त्यात असे वर्णन आहे की श्रीकृष्णाने सत्यभामेच्या आग्रहावरून स्वर्गातील पारिजात वृक्षाचे अपहरण करून आणून तो तिच्या बगीच्यात अशा प्रकारे रोवला की त्याची फुले मात्र रुक्मिणीच्या बगीच्यात पडतील. नंतर सिद्धेन्द्रयोगीने या पद्यावर एक नृत्य तयार करून ते गावातील लहान मुलांना शिकवले.

नृत्य अत्यन्त लोकप्रिय होअून ते गोवळकोंड्याचा सुलतान हसन तानासाहेब यांच्या दरबारात प्रस्तुत केले गेले. सुलतान इतका प्रसन्न झाला की त्याने कुचिपुडी हे गाव सिद्धेन्द्रयोगी त्याच्या नृत्यपथकाला दान देअून टाकले, परन्तु अशी अटही घातली की हे गाव या नृत्यशैलीचे केन्द्र बनावे. सिद्धेंद्रयोगीने आपल्या शिष्यांकडून असे वचन घेतले की, त्यांच्या घराण्याचा प्रत्येक पुरुष जीवनात कमीत कमी एकदा तरी सत्यभामेची भूमिका



प्रसिद्ध कुचिपुडि-गुरु वेम्पाटी चिन्न सत्यम् कुचिपुडीच्या दोन मुद्रांमधे

करील. प्रत्येक बालकाला दीक्षा देताना त्याच्या कमरेला एक घंटा बांधली जाते. या नृत्यप्रकाराला 'कुचिपुडी-नृत्य' असे नाव मिळाले.

नेहमी घडते, त्याप्रमाणेच काळा-बरोबर कुचिपुडी-नृत्यातही परिवर्तन झाले व आज स्त्रियाही ते प्रस्तुत करतात.



राजा व राधा रेड्डी

कृष्णा नदी जेथे बंगालच्या अुप-सागराला मिळते, तेथे मच्छलीपट्टण किंवा मसुलीपट्टण हे दीर्घकाळ प्रसिद्ध असणारे बंदर आहे. 'द पेरिप्लस ऑफ द एरिथ्रियन सी' या अतिप्राचीन पुस्तकातही या बंदराचा अुल्लेख आहे. १६८० मधे येथे डच लोकांचा अड्डा होता परन्तु १७५० मधे फ्रेंचांनी ते ताब्यात घेतले व नअू वर्षानंतर ते इंग्रजांनी त्यांच्यांकडून हिरावून घेतले. अशा प्रकारे मच्छलीपट्टण हे इंग्रजांच्या ताब्यात जाणाऱ्या सुरुवातीच्या बंदरांपैकी एक होय. १८६४ मधे येथे एक भयानक वादळ होअून सर्वत्र हाहाकार झाला. तेव्हापासून मच्छलीपट्टणचे समुद्री महत्व कमी झाले. आता तेथे केवळ एक छोटेसे बन्दर असून कृष्णा जिल्ह्याचे मुख्यालय आहे.

स्वातन्त्र्य संग्रामात मच्छलीपट्टणने अुत्तम भूमिका बजावली. स्वातंत्र्य-सेनानी गद्दिचर्ला

हरिसर्वोत्तमराव यांनी देशभक्त तरुणांना औद्योगिक तन्त्रशिक्षण देण्यासाठी व स्वदेशी आन्दोलन वाढवण्यासाठी येथे आन्ध्र जातीय कलाशालेची स्थापना केली. तिरंगी झेंड्याची रचना करणारे पिंगली वेंकय्या हे येथीलच नागरिक होते. त्यांनी बनवलेला झेंडा पुढे स्वतन्त्र भारताच्या राष्ट्रध्वजाचा आधार बनला. ज्येष्ठ कांग्रेस नेता श्री. पट्टाभी सीतारामय्या हे ही मच्छलीपट्टणनेच नागरीक होते.



पिंगलि वेंकय्या रचित तिरंगी कॅाग्रेस झेंडा

कपड्यावर केल्या जाणाऱ्या प्रसिद्ध कलमकारी चित्रकलेचे केन्द्रही मच्छलीपट्टण येथेच असून या कलेची परंपरा सातव्या शतका इतकी जुनी असल्याचे सांगण्यात येते. यात आकर्षक पौराणिक दृश्ये कलमाच्या आधाराने कपड्यावर अंकित केली जात असत. यामुळे कलेचे नाव 'कलमकारी' असे पडले. आज लाकडी साच्यांच्या आधारे ही चित्रे छापली जातात.







# मनोहरचा नवस

मनोहर हा तरुण शिवपुरमधे रहात असे. नाव बुडून झालेल्या अपघातात त्याचे आईवडील त्याच्या लहानपणीच मरुन गेले. त्याच्या आजीने पालनपोषण करुन त्याला वाढवले. मनोहरला शिक्षणात मुळीच गोडी नसल्यामुळे त्याचे फारसे शिक्षणही झाले नव्हते. मेहनतीची कामे त्याला मुळीच आवडत नसत. आजी वाढेल ते जेवायचे आणि कोपऱ्यातल्या खाटेवर लोळत पडायचे हाच त्याचा उद्योग झाला होता. आजीला वाटे की, नातू थोडा मोठा झाल्यावर एकाद्या धनिकाकडे नोकरी करेल. आता तो अठरा वर्षांचा झाला, तरी आळशीपण त्याची पाठ सोडेना.

वय वाढू लागले तसतशी आजीची दृष्टी कमी होऊ लागली. पहिल्यासारखा ती चरखा चालवू शकेना. प्राप्ती कमी झाली. आता काय खायचे? कसे खायचे? आजीची ही वाईट परिस्थिती पाहून गावकरी मनोहरला खूप रागावले.

कष्ट न करता पैसे मिळवायचे कोणकोणते मार्ग आहेत, याचा मनोहर विचार करु लागला. शेवटी त्याला वाटले की, तसा 'चोरी' हाच एकमेव मार्ग आहे. मग त्याने चोरी करायची एक योजना आखली. परन्तु त्याला भीती वाटली की, आपण सापडलो तर 'आपली चामडीच लोळवली जाईल.' काय करावे याबद्दल खूप विचार केला त्याने. शेवटी त्याला आपली गावदेवी शांभवी हिची आठवण झाली.

एका रात्री लपतछपत तो देवळात गेला आसपास कोणी नाही, अशी खात्री करुन तो देवीच्या मूर्तीजवळ गेला. तिच्या नाकातली नथ काढताना त्याचे हात कापू लागले. त्याने देवीला भक्तीपूर्वक नमस्कार करुन म्हटले, ''दुसरा काहीच मार्ग न उरल्यानं आजीसाठी

निनाद डफळे



मी चोरी करत आहे दया कर माझ्यावर देवी! मला कोणी पकडू नये! ही नथ विकून जे पैसे मिळतील, त्याचा अर्धा भाग मी तुझ्या हुंडीत टाकीन.''

प्रार्थना केल्यावर मनोहरला धीर आला. नथ काढून त्याने आपल्या खिशात टाकली आणि तो देवळाबाहेर पडला.

नथ चोरीला गेल्याची बातमी दुसऱ्या दिवशी गावभर पसरली चोराला पकडण्या साठी ते सर्वत्र चौकश्या करू लागले.

धाडस करून मनोहरने चोरी तर केली, पण तेंव्हापासून तो फार अशान्त राहू लागला. गावची कोणी व्यक्ती त्याच्याकडे पाहू लागली किंवा कोणी दुरून त्याला ओरडून हाक मारली तरी त्याचे हृदय धडधडू लागे.

एक आठवडा असाच गेला. आपल्यावर कोणाचाच संशय नाहीय असे त्याच्या लक्षात आले. गावकरीही आता गप्प झाले होते, कसल्या चौकश्याही चालू नव्हत्या. आता तर आपल्याबाबत कोणाच्या मनात किन्तु नसल्याची त्याची खात्रीच झाली. नथ कशी विकावी याबद्दल तो आता विचार करू लागला.

तिसऱ्या दिवशी तो गावच्या शंभूच्या दुकानात गेला. इकडच्या- तिकडच्या गप्पा मारून तो दुकानदाराला म्हणाला, ''शंभू, मी आपला अुगीच विचारतोय हं! गैरसमज नको करून घेऊ. पण तू कधी चोरीचा माल खरेदी केला आहेस?''

हे ऐकल्याबरोबर समोरची हातोडी जोराने ऐरणीवर मारत शंभू म्हणाला, ''असलं नीच काम शेजारगावचा रमिया करत असतो. तो चोरीचं सोनंच काय, पण स्वस्तात मिळणाऱ्या लाकडी वस्तूही खरेदी करतो. नालायक कुठचा!'' खूप चिडला होता शंभू !

त्याच्या बोलण्यावर हसत मनोहर म्हणाला, ''मी आपली अुगीच चेष्टा केली. देवीची नथ ज्यानं चोरलीय, तो येअून ती तुझ्याकडे स्वस्तात विकू लागला, तर खरेदी नाही करणार तू ?''

आपले कान पकडून, ''अरे, खरीदणं तर दूरच, पण मी अगोदर त्याला पकडून या हातोडीनं असा पिटून काढीन, की ज्याचं नाव ते! नंतर त्याला पोलिसाच्या हवाली करीन. शंभू काय कोणी असा-तसा माणूस आहे होय? पुन्हा कधी माझ्याकडे येअून असलं काही बोललास, तर तुझीही चांगली खबर



घेईन मी! समजलं?'' हातोडी एका कोपऱ्यात भिरकावत तो म्हणाला.

त्याचे अवसान पाहून मनोहर घाबरला अन् 'तत पप' करत म्हणाला, ''अरे ही चेष्टा आहे असं अगोदरच म्हणालो ना मी? तुझा प्रामाणिकपणा कोणाला ठाअूक नाही का?'' आणि मनोहर तेथून अुठून हळूहळू निघून गेला.

दुसऱ्या दिवशी देवीची नथ विकण्यासाठी मनोहर रमियाकडे निघाला. वाटेत त्याला वीर नावाचा एक पोलीस भेटला. त्याने मनोहरला थांबायला सांगितले. मनोहरला वाटले की, आता नक्कीच आपली चोरी पकडली गेलीय! पण खिशातून चिरूट काढत वीरने त्याला काडेपेटी विचारली.

मनोहरच्या जिवात जीव आला. तो म्हणाला, ''मी धूम्रपान करत नसल्यामुळे काडेपेटी जवळ बाळगत नाही.'' वीरही ते ऐकून आपल्या वाटेने निघून गेला.

मनोहर रमियाच्या गावात पोचला. तो कुठे रहातो हे कुणाला तरी विचारावे असा विचार मनोहरच्या मनात आला. इतक्यात पोलीस शिपाई दोन माणसांना हातकड्या घालून घेअून जात असलेले त्याला दिसले.

रस्त्याने जाणाऱ्या एकाकडे मनोहरने त्या दोघांविषयी विचारले, तेंव्हा तो म्हणाला, ''तो दाट मिश्यावाला रमिया असून दुसऱ्याचं नाव मात्र मला माहीत नाही. चोरीचा माल खरीदल्याबद्दल रमियाला अन् विकण्याबद्दल त्या दुसऱ्या माणसाला पोलिसांनी कैद केलंय.''

हे ऐकताच मनोहरचे धाबे दणाणले!



खिशातली नथ त्याला फार जड भासू लागली. 'चोरी करणं' किती भयानक असते हे आता तो समजून चुकला!

तावडतोब तो आपल्या गावी परत आला. देवीच्या मूर्ती समोर लोळण घेत तो म्हणाला, ''चोरी करून मी मोठंच पाप केलंय माते! क्षमा कर मला!'' अन् नथ त्याने पुन्हा देवीच्या नाकात अडकवली.

आता मनोहरचे मन शान्त झाले. रात्री आरामात झोपला असताना अचानक त्याच्या मनात आले - आपण तर देवीला वचन दिले होते की आपली चोरी पकडली गेली नाही तर नथ विकून येणाऱ्या किंमतीची अर्धी रक्कम आपण हुंडीत टाकू! देवीची कृपा होती म्हणूनच आपण पकडले गेलो नाही. आपल्याला पश्चात्ताप होअून आपण नथ परत

केली खरी, पण नवस बोलल्याप्रमाणे नथीच्या किंमतीच्या अर्धी रक्कम हुंडीत टाकायला हवीच ना!

खूप विचार करून दुसऱ्या दिवशी मनोहरने स्वतःच ठरवले की, ''नथ विकू शकलो नाही ही आपलीच असमर्थता आहे; त्याच्याशी देवीचा काहीच संबंध नाही. नथ जरी मी देवीला परत केली असली, तरी बोलल्या नवसाप्रमाणे अर्धी रक्कम हुंडीत टाकणं हे आपलं कर्तव्य आहे.''

नवस फेडायचा, तर आपल्याला मेहनत करायला हवी. आता त्याने, निश्चय केला की, आपण मेहनत करून पैसे कमवू आणि नवस फेडूच. तो गावच्या एका मुख्य शेतकऱ्याला भेटून म्हणाला, ''काका, मला एखादी नोकरी द्या ना. माझ्याबद्दल आपल्या कानी कसली तक्रार नाही येणार!''

मनोहरच्या आळशीपणाबद्दल माहिती असणाऱ्या त्या बड्या शेतकऱ्याचा मनोहरच्या बोलण्यावर प्रथम विश्वासच बसेना! पण त्याने जेव्हा त्याचे पाय धरले, अजिजी केली, तेंव्हा त्याला पाझर फुटला. रहाट ओढून शेताला पाणी द्यायचे काम त्याने मनोहरला दिले. आपल्या नातवाच्या स्वभावात फरक पडलेला पाहून त्याच्या आजीला फार आनन्द झाला. शेतकरीही त्याची काम करायची पद्धत, कष्ट करायची तयारी पाहून खूश झाला.

ओळीने तीन महिने काम केल्यावर शेतकऱ्याने जे पैसे दिले, त्यातले निम्मे मनोहरने देवीच्या मन्दिरातल्या हुंडीत टाकले, आणि आपला नवस फेडला.

आणखी एक महिन्यानन्तर शेतकरी मनोहरला म्हणाला, ''आता मला कळलं की तू चांगला मेहनती तरुण आहेस, तू आळस झटकून टाकला आहेस. आता तुला रहाटाचं पाणी ओढायची गरज नाही. मी तुला माझा खास नोकर बनवत आहे. या महिन्यापासून तुझा पगारही दुप्पट करत आहे.''

मनोहर फारच खूश झाला. आळस गेला, चोर बनायची गरज उरली नाही. शेतकरी त्याच्या स्वभावाची खूप तारीफ करू लागला होता. त्याला वाटले की आपल्यावर ही देवीची कृपाच आहे. मनातल्या मनात त्याने देवीला कृतज्ञता दर्शवली आणि भक्तिपूर्वक तिला नमस्कार केला.







# सोनेरी क्षण

## १३ जगात हे कोठे आढळेल?



*१.... गुहांमधील शेपेक्षा अधिक भिंति चित्रांनी भरलेले लेणे?*

या लेण्यांमधे 'हॉल ऑफ बुल्स' (वृषभ मंडप) नावाचा फार प्रमुख असा अद्भुत भाग आहे.



*२. ... नऊ मजले असणारा हा स्तंभ रजपूत शासक राणा कुंभा याने १४४० मधे बांधला आहे.*

विजयस्तम्भ या नावाने विख्यात असणाऱ्या या स्तंभाची उंची ३६ मीटर आहे.



*३. ... आफ्रिकेत बर्फाने झाकलेला पर्वत?*

विषुववृत्तीय उष्ण भागात असूनही याचे शिखर बर्फाच्छादित असते.

*४. .... जिराफी स्त्रिया?*

पडाँग जातीच्या या स्त्रिया उंच मान हे सौन्दर्यलक्षण मानतात. या वयाच्या तिसऱ्या वर्षापासूनच गळ्यात तांब्याची कंकणे घालतात. वय वाढते तशी या कंकणांची संख्याही वाढत जाते. या कंकणांमुळे मान लांब होत जाते.



*५. .....हे पुस्तकालय एकूण ८६० कि. मि. लांबीच्या कपाटांनी भरलेले आहे. यात जवळजवळ दोन कोटी पुस्तके आहेत.*

पुस्तकालय तीन इमारती मिळून बनलेले आहे. या 'लायब्ररी ऑफ कॉंग्रेस' मधे ४० लाख नकाशे, ६० लाख छायाचित्रे अन् १३ लाख ऑडियो रेकॉर्ड्स आहेत



# चित्रकोडे

## अरण्य वीर



आफ्रिकेच्या जंगलातील एक आदिमानव झाडाच्या एका फांदीवरून दुसऱ्या झाडावर जात आहे आणि वाघाला हरवत आहे. तरीही या चित्रात एक चूक राहून गेलीय. लक्षपूर्वक पाहून चूक शोधून काढा बरं!

## चित्र कोडे

इथे नऊ देशांची नावे अन् त्यांचे नकाशे दिले आहेत. पण नावे आणि नकाशे बरोबर समोरासमोर नाहीत. जोड्या बरोबर लावू शकाल?






## गमतीचे प्रश्न

१. माझ्याजवळच्या दोन नाण्यांची एकूण किंमत ५५ पैसे आहे. पण दोनांतले एक पन्नास पैशांचे नव्हे. मग ती दोन नाणी कोणती?

२. पोपट विकणाऱ्याने म्हटले, ''हा पोपट तुमच्या प्रत्येक बोलण्याचा पुनरुच्चार करील.' त्यावर विश्वास ठेवून एका माणसाने एक पोपट खरीदला. आणि त्याने त्याला शिकवायचा खूप प्रयत्न केला. विकणाराने खोटे तर सांगितले नव्हते. मग असे का घडले? तुम्ही सांगू शकाल?



३. राजदाम्पत्याला तीन कन्या आहेत. प्रत्येकीला एक भाऊही आहे. मग या कुटुम्बातील लोकांची एकूण संख्या किती?

४. ग्रीनलॅण्डचा शोध लागण्यापूर्वी कोणते बेट सर्वात मोठे होते?

५. सिनेमा दाखवायला आपल्या एकेका मित्राला दोनदा घेऊन जाणे आणि दोघांना एकाच वेळी घेऊन जाणे - यात कमी खर्चाचे कोणते?



६. एका पेटीत पाच सफरचन्दे आहेत. पाच मुलींना ती सारखी वाटायची आहेत. पण एक सफरचंद पेटीतच राहील. हे कसे शक्य होईल?

७. खरे बोलणाऱ्यांची आणि खोटे बोलणाऱ्यांची बैठक चालू आहे. तेथे एक माणूस तुम्हाला म्हणतो की, ''आत्ताच एक मुलगी सांगत होती की, मी अगदी खोटी आहे.'' तो माणूस खोटा आहे, की खरा?

८. सैन्यात सर्वात मोठे 'बूट्स' कोणाला मिळतात?

### करून पहा

## फुलदाणी

**आवश्यक साहित्य**

रिकामी बाटली, अंड्याचे कवच, डिंक, रंग.

**बनवण्याची पद्धत**

अ) अंड्याचे कवच साबणाच्या पाण्याने स्वच्छ करा.

आ) त्याचे लहान-लहान तुकडे करा.

इ) एकेक तुकडा डिंकाने बाटलीवर चिकटवा.

ई) कवचाचे तुकडे चमकदार रंगांनी रंगवा. सुंदर फुलदाणी तयार.





अुंदराची वाट
पहात बसलेले
मांजर





भुकेने तडफडणारी
लहानशी
चिमणी

## सोनेरी क्षण - १२ ची अुत्तरे

**जगात कुठे?**

१. द. अमेरिकेच्या पलिकडील डालपगोस बेटात.
२. व्हॅटिकन सिटी.
३. पेरू व बोलिव्हियाच्या सरहद्दीवर टिटिकाका सरोवर आहे.
४. ऑस्ट्रेलियाच्या सिडने बंदरावरून जाअून हा पुल पार करता येतो.
५. राजस्थानचे देषनाक

**गोष्टीचे कोडे**

रॉबिन्सन कपडे अुतरवून पाण्यात शिरला होता. बिस्किटे ठेवायला खिसा कसा असणार?

**गंमतीचे प्रश्न**

१. हत्तीवर माहूतही बसलेला असताना.
२. तराजूचा काटा बिघडला असेल तेंव्हा.
३. आकडे इंग्रजीत काढून पान अुलट फिरवले म्हणजे.
४. सापाला पापण्या नसतात तो डोळे बन्द करूच शकणार नाही.
५. दोन हत्ती असतील तेंव्हा.
६. घड्याळ
७. बाटली
८. हे खरे नाही. सैनिकाला एकच हात अुरला आहे. तेंव्हा म्यानातून तलवार काढून तो आपला दुसरा हात कापू शकणार नाही.





# महाभारत

पांडवांनी सिन्धुराजाला पराजित करून परत पाठवले. नंतर ते काम्यकवनात रहात असताना मार्कंडेय तेथे आले. वनवासात आपल्याला कसा त्रास झाला, काय काय संकटे गुदरली इत्यादी वर्णन धर्मराजाने त्यांना सांगितले. त्याबरोबरच दुःखी आवाजात हेही सांगितले की, बिचाऱ्या द्रौपदीलाही फार कष्ट सहन करावे लागत आहेत. नंतर धर्मराजाने मार्कंडेयांना विचारले, ''महात्मन्, एकाद्या पतिव्रता स्त्रीने यापूर्वी कधी अशा संकटांना तोंड दिले होते काय?''

अुत्तरादाखल मार्कंडेयांनी त्या सर्वांना सावित्रीची गोष्ट सांगितली. ती अशी - मद्रदेशचा शासक होता अश्वपती. तो मोठा धर्मात्मा असून अपत्यहीन होता. कठोर नियमांचे पालन करून तो सावित्रीदेवीची अुपासना करत असे, होम-हवन करत असे. शेवटी एकदा कुंडातून देवी सावित्री प्रकट होअून त्याला विचारू लागली, ''राजा, तुला काय हवंय?'' दोन्ही हात जोडत त्याने निवेदन केले, ''हे देवी, मला वंश रक्षणासाठी पुत्र हवा.''

''तू असा वर मागणार, हे मला ठाअूक असल्याने मी अगोदरच ब्रह्मदेवांना याबद्दल विचारले होते. त्यांनी तुला एका कन्येचंच वरदान द्यायला मला अनुमति दिलीय. तेंव्हा इतकाच वर मान्य करून संतोष मान.'' इतके बोलून देवी अंतर्धान पावली.

तपस्या संपवून अश्वपती राजधानीत परत आला. आणि नेहमीप्रमाणे राज्यकारभार पाहू लागला. त्याची पत्नी मालती गर्भवती होअून तिने एका सुन्दरशा कन्येला जन्म दिला. तिचे नाव ठेवण्यात आले - सावित्री.

सावित्री खूप लाडाकोडात वाढली. दिवसेंदिवस तिचे सौन्दर्य जास्तजास्त निखरू लागले. पहाणारांना ती कोणी देवीच वाटे,

(सत्यवान - सावित्रीची कथा - २६)



खुद्द सावित्री-देवीनेच मानवरूप धारण केल्यासारखे वाटे. एक दिवस पिता अश्वपती तिला म्हणाला, ''पुत्री, आता तू उपवर झाली आहेस. कोणी राजकुमार अजून तुला मागणी घालायला का येत नाहीत, हे कळत नाहीय मला. तेव्हा आता माझी अशी इच्छा आहे, की तू स्वतःच एखाद्या वराची निवड कर. त्याच्याशी तुझा विवाह करून देऊन मी कर्तव्यमुक्त होईन.''

सावित्री वरसंशोधनात मग्न असताना महामुनी नारद एकदा अश्वपतीकडे येऊन त्रिलोकातल्या वार्ता सांगू लागले. त्याचवेळी वरसंशोधन यात्रा संपवून सावित्री परत आली. पित्याला व नारदाला प्रणाम करून ती त्यांच्या सम्मुख उभी राहिली. नारदाने अश्वपतीला विचारले, ''राजा, तुझी ही कन्या आत्ता कुठून परत आलीय? आपल्या तरुण कन्येचा विवाह तू अजून का करून दिला नाहीस?''

''मुनिवर, त्यासाठीच - योग्य वर निवडण्यासाठीच - मी हिला पाठवले होते. ती त्यात सफल झाली की नाही, हेच आता तिला विचारायचे आहे.'' असे म्हणून अश्वपतीने सावित्रीला विचारले, ''बाळे, तू ज्या कार्यासाठी गेली होतीस, ते सफल झाले की नाही?''

सावित्री पित्याला सांगू लागली, ''राजा द्युमत्सेन यांनी दीर्घकालपर्यन्त साल्वदेशचं राज्य संभाळलं. वृद्धावस्थेत त्यांना एक पुत्र झाला. आणि दुर्भाग्यवश ते स्वतः अंध झाले. या गोष्टीचा लाभ घेऊन पूर्वी त्यांच्या हातून पराजित झालेल्या राजांनी राज्य त्यांच्याकडून हिरावून घेतले. सध्या वृद्ध राजा आपली पत्नी व पुत्रासह अरण्यात राहून तपस्या करत असतात. बाल्यकालापासूनच त्यांचे पुत्र आश्रमात मुनिकुमारासारखे वाढले. त्यांच्या स्वभावात क्रूरबुद्धी अगदी नावापुरतीही नाहीय. सत्यवचनी आहेत ते. त्यांचे नाव आहे - सत्यवान. या सत्यवाननाच मी पति म्हणून पसन्त केलंय, तात!''

हे ऐकताच दीर्घ निश्वास सोडत नारद म्हणाले, ''हे तर फार अमंगल घडलं राजा! सावित्रीने अज्ञानामुळेच त्या तरुणाची निवड केलीय.''

घाबरून अश्वपतीने विचारले, ''मुनिवर, आपणाला माहीत नाही, असं या पृथ्वीतलावर काही नाहीच! तो सत्यवान कशा प्रकारचा तरुण आहे? रूप, गुण आणि शीलाने कसा आहे तो?''



नारद म्हणाला, ''राजा द्युमत्सेन प्रमाणेच त्याचा हा पुत्रही मोठा सत्यव्रती आहे. तो अश्वांची चित्रे फार सुरेख काढतो, म्हणून त्याला 'चित्राश्वी' असेही म्हणतात. अश्विनी कुमारांसारखा तो अतिशय सुन्दर आहे, सर्व-गुणसंपन्न आहे. पण तो अल्पायुषी आहे. आजपासून बरोबर एक वर्षानं त्याचं आयुष्य संपणार आहे, मृत्युलोकाचा पाहुणा बनणार आहे तो!''

नारदाच्या या सांगण्याने चिन्तित झालेला अश्वपती सावित्रीला उद्देशून म्हणाला, ''बाळे, या अल्पायुषी तरुणाला सोडून तू आणखी कुणाची तरी निवड कर.''

''मी काया, वाचा, मनाने एकदा कुणाला तरी आपला पती म्हणून निवडला आहे. आता तो अल्पायुषी असो, वा दीर्घायुषी; सज्जन असो वा दुर्जन; शिष्ट असो वा दुष्ट, तोच शाश्वत रूपाने माझा पती असेल. दुसऱ्या कोणाला निवडण्याचा प्रश्नच येत नाही! सत्यवान सोडून अन्य कोणाशी मी कदापि विवाह करणार नाही. आपण त्यांच्याशीच माझा विवाह करून द्यावा.'' सावित्री दृढपणे बोलली.

नारदानेही अश्वपतीला म्हटले, ''राजा, तुझ्या कन्येचा निश्चय दृढ आहे, अटळ आहे. तिचं मत बदलणं तुला शक्य होणार नाही. खरे पहाता, आज या पृथ्वीतलावर सत्य-वानच्या बरोबरीचा दुसरा कोणी राजकुमार नाहीच. सावित्रीचा विवाह त्याच्याशीच करून दे. तिचं सुकृत चांगलं असेल, तर कदाचित सत्यवानला दीर्घायुष्य लाभेलही. शुभमस्तु!'' आशिर्वाद देऊन नारद स्वर्गाकडे निघून गेले.



नारदाने सांगितल्याप्रमाणे अश्वपतीने आपली कन्या सावित्री हिचा विवाह सत्यवानशी करायचे ठरवले आणि तो सपरिवार द्युमत्सेनच्या आश्रमात गेला.

वृद्ध व अन्ध द्युमत्सेन वडाच्या झाडाखाली बसलेला होता. त्याच्याजवळ जाऊन अश्वपती म्हणाला, ''आपला पुत्र सत्यवान याच्याशी माझी कन्या सावित्री हिचा विवाह करून देण्यासाठी मी इथे आलो आहे. आपण तिचा स्नुषा म्हणून स्वीकार करावा.''

''राजा, आम्ही आपलं राज्य घालवून या अरण्यात जीवन व्यतीत करत आहोत. आपली कन्या सुकुमार आहे. इथले कष्ट ती सहन करू शकेल?'' द्युमत्सेनने संशय व्यक्त केला.

''सुख-दुःख मानवाअधीन नसतात हे सत्य माझी कन्या जाणते. सर्व विचार करूनच



आम्ही इथे आलो आहोत. आपला पुत्र आणि माझी कन्या यांची जोडी सर्वप्रकारे अनुरूपच ठरेल. तेंव्हा आपण या विवाहाला कृपा करून आपली संमती द्या.'' अश्वपती विनयपूर्वक बोलला.

द्युमत्सेन या आश्वासनाने संतष्ट झाला. त्याने आश्रमातल्या सर्व मुनींना निमन्त्रित केले आणि एका शुभमुहूर्तावर सर्वांच्या अुपस्थितीत सत्यवान-सावित्री यांचा विवाह पार पडला. अश्वपती आपल्या परिवारासह राजधानीकडे निघून गेला.

पिता निघून गेल्याबरोबर सावित्रीने आपली रेशमी वस्त्रे आणि आभूषणे अुतरवून ठेवली व पतीप्रमाणेच तीही वल्कले नेसू लागली आणि सासूसासऱ्यांच्या सेवेत मग्न झाली. साध्या जीवनाची तिची आवडही वाढू लागली.

परन्तु हे सर्व करत असताना ती मुकाट्याने पतीच्या आयुष्याचे दिवसही मोजत राहिली. पतीच्या आयुष्याचे अुर्वरित दिवस कमीकमी होत चालल्याची तिला पूर्ण जाणीव होती. नारदाच्या सांगीप्रमाणे जेंव्हा त्याच्या आयुष्याचे चारच दिवस अुरले तेंव्हा तिने त्रिरात्री अुपासाचे व्रत सुरू केले.

''मुली, तू तर तशीही नाजुक आहेस, अन् आता आणखी हे व्रत कशाला? तुला हे व्रत सोडून द्यायलाही मी सांगू शकत नाहीय.'' द्युमत्सेन सावित्रीला म्हणाला.

''दृढ निश्चय असला म्हणजे पुरे! तो असला की, कितीही कठीण कार्य निर्विघ्नपणे पूर्ण होअू शकतं. दृढनिश्चयानं सुरू केलेलं हे व्रत मी मोडू शकणार नाही मामंजी!'' सावित्री नम्रपणे बोलली.

तिला आपल्या अुपासाची मुळीच चिन्ता नव्हती. आपल्या पतीला लवकरच काळ हिरावून घेणार असल्याची चिन्ता मात्र तिचे मन पोखरत होती. तीन्ही रात्री पार पडल्या. नारदाच्या म्हणण्यानुसार आता शेवटचा दिवस होता.

त्या दिवशी सकाळीच सावित्रीने अग्नि प्रज्वलित केला. होम करून सासूसासऱ्याच्या पावलांना स्पर्श करून नमस्कार केला; त्यांच्याकडून 'अखंड सौभाग्यवती भव' असा आशिर्वाद घेतला आणि येणाऱ्या संकटाचा विचार करत मौन बसून राहिली.

''मुली, तुझं व्रत तर पूर्ण झालं. आता अुपास सोडल्याशिवाय गप्प बसून का राहिली आहेस?'' सासूसासऱ्यांनी तिला विचारले.

''या व्रताची सांगता सूर्यास्तानन्तरच



करायची असते.'' सावित्रीने त्यांना माहिती दिली.

नेहमीप्रमाणे फळे-फुले व समिधा आणायला जाण्यासाठी सत्यवानने आपली कुऱ्हाड खांद्यावर घेतली अन् तो अरण्यात जायला निघणार इतक्यात सावित्री त्याला म्हणाली, ''मीही आज तुमच्याबरोबर येते. आज तुम्हाला सोडून रहावंसं वाटत नाहीय मला.''

''वेडी! जंगल कसं असतं हे माहीत नाहीय तुला. तिथे वाटभर खडे, दगड, काटे-कुटे असतात. याशिवाय गेले तीन दिवस तू अुपास केला आहेस. चालण्याफिरण्याची शक्तीही नसेल तुझ्या पायात.'' सत्यवान म्हणाला.

''पण अुपासामुळे मला थोडाही अशक्तपणा जाणवत नाहीय. आजच तुमच्याबरोबर जंगलात जावंसं मला का वाटतंय हेही कळत नाहीय. पण माझी विनन्ती अमान्य करू नका नं!'' सावित्री जरा अजीजीने म्हणाली.

''बरं तर, चल. पण माझ्या आईबाबांनी परवानगी दिली तरच चल हं!''

सावित्रीने आपली इच्छा सासऱ्यासमोर व्यक्त करत म्हटले, ''मला इथे येअून एक वर्ष झालंय. एकदा भोवतालंच अरण्य बघायची इच्छा राहूनच गेलीय. आज मला त्यांच्याबरोबर जायची परवानगी द्या ना!''

आजपर्यन्त सावित्रीने त्यांच्याकडे काहीच मागितले नव्हते. त्यामुळे द्युमत्सेनला तिची ही मागणी नाकारता येणे शक्य झाले नाही.

सावित्री मनातून चिन्तित असली तरी सासू सासऱ्यांनी परवानगी दिल्याचा वरकरणी आनन्द दर्शवित ती सत्यवान बरोबर जंगलात



गेली. अरण्यातले सौन्दर्य व शोभा दाखवत सत्यवान बरोबर चालत असला, तरी सावित्रीला मनातून खात्री वाटत होती की, आत्ता आपला पती मृत्यूला सामोरा जाण्यासाठीच स्वतः पुढे चालत आहे.

फळाफुलांनी सत्यवानने टोपली भरली आणि आता तो लाकडे तोडू लागला. थोड्याच वेळात थकवा जाणवू लागून तो घामाने भिजून गेला. कुऱ्हाड खाली टाकून तो सावित्रीला म्हणाला, ''माझं मस्तक फुटून जाणारसं वाटत आहे. शरीर थरथरायला लागलं आहे. मला अुभंही रहावत नाहीय. थोडा वेळ झोपतो मी!''

सावित्रीने खाली बसून सत्यवानचे मस्तक आपल्या मांडीवर घेतले. आणि त्याला जरा वेळ झोपू दिले. थोड्या वेळातच त्याच्याजवळ

तिला एक आकार दिसला. ती व्यक्ती काळी असून डोळे लाल होते. तिने निळी वस्त्रे परिधान केलेली होती; हातात पाश असून रूप भयानक होते. ती व्यक्ती पहाताच सावित्रीने सत्यवानचे मस्तक अुचलून त्याला खाली जमिनीवर नीट ठेवले. स्वत: अुभी राहून तिने त्या व्यक्तीला विनयाने वाकून नमस्कार केला आणि विचारले, ''कोण आहात आपण? कशासाठी आला आहात इथे?''

''देवी मी यम आहे. तू पतिव्रता असल्यामुळेच मला प्रत्यक्ष पाहू शकलीस. सत्यवानचे आयुष्य संपल्यामुळे अन् तो धर्मात्मा असल्याने दूतांना न पाठवता मी स्वत:च त्याला घेअून जायला आलो आहे.'' असे म्हणत यमराजाने आपला पाश फेकला आणि त्याच्या साह्याने सत्यवानच्या शरीरातून अंगुष्ठमात्र प्राण बाहेर काढला. तो घेअून यम दक्षिणेकडे जाअू लागला.

पतीचे शरीर एका ठिकाणी सुरक्षित ठेवून सावित्रीही यमापाठोपाठ जाअू लागली. त्याने तिला परत जायला सांगितले, पण सावित्रीने स्पष्ट शब्दात सांगितले की, 'माझे पती जिथे जिथे जातील, तिथे तिथे मीही त्यांच्या बरोबर जाईन. तो माझा धर्मच आहे.''

संतुष्ट होअून यम सावित्रीला म्हणाला, ''वर देतो मी तुला. पतीचे प्राण वगळून दुसरं काहीही माग माझ्याकडे.''

''माझे सासरे वृद्ध अन् आंधळे आहेत. त्यांना शक्ती अन् दृष्टी प्रदान करा.'' यमाने ते मान्य केले. तरीही सावित्री त्याच्या मागेमागे जातच राहिली. तिला थांबवण्यासाठी यमाने आणखी एक वर देअू केला. सावित्रीने या वराद्वारे सासऱ्याला पुन्हा राज्य प्राप्ती मागितली. हा वरही यमाने कबूल केला. तरीही सावित्रीने यमाची पाठ सोडली



नाही. यमाने आता तिसरा वर देअू केला.

सावित्रीने यावेळी असा वर मागितला की, 'पिता अश्वपती याला शंभर पुत्र प्राप्त व्हावेत.' यमाने होकार दिला. पण यानन्तर ही सावित्री परत फिरायचे नाव घेत नाही असे दिसल्यावर आणखी एक वर देअून तरी ती थांबेल, या आशेने यमाने चौथा वरही देअू केला. सावित्रीने चतुरपणे यावेळी असा वर मागितला की, ''माझ्या आणि पतीच्या वंशाची वृद्धी होअून आपल्याला शंभर पुत्र व्हावेत.'' अनवधानाने यमाने तेही मान्य केले, आणि तिने आता तरी परत जावे, असे सुचवले. ''तर मग यासाठी माझ्या पतीचे प्राण परत करा.'' सावित्री पटकन् म्हणाली. दुसरा मार्गच न अुरल्याचे पाहून, वर परत घेणे अशक्य असल्यामुळे यमाला सावित्रीची मागणी पुरी करावी लागली. आता सावित्री परत येअून सत्यवानाचे मस्तक पुन्हा मांडीवर घेअून बसून राहिली. थोड्याच वेळात त्याने डोळे अुघडत तिला विचारले, ''मी खूप वेळ झोपलो, होय ना? स्वप्नात मला एक काळा माणूस खूप दूर घेअून गेल्याचे दिसले.'' ''काय घडलं ते आता नंतर सांगेन. संध्याकाळ टळून अंधार पसरू लागला आहे अुठून चालू शकत असाल, तर अगोदर आपण आश्रमात जाअू.'' सावित्री म्हणाली.

तिने आधार देअून सत्यवानाला अुभे केले आणि हळूहळू चालत चांदण्याच्या प्रकाशात दोघे आश्रमात पोचले.

द्युमत्सेनला अकस्मात दृष्टी प्राप्त झालेली होती. अंधार पसरल्यामुळे त्याला आता पुत्र व सून यांची काळजी वाटू लागली होती. तो पत्नीसह त्यांना हाका मारत जंगलाकडे चालू लागला. इतक्यात ते दोघे येअून पोचलेच. तोपर्यन्त चिन्तेने सर्वजण त्यांच्या कुटीत जमले होते. घडलेली सारी हकिकत सावित्रीने सर्वांना सांगितली.

यमाचे वर व्यर्थ ठरले नाहीत. द्युमत्सेनला पुन्हा राज्यप्राप्ती झाली. अश्वपतीला शंभर पुत्र झाले आणि सत्यवान- सावित्रीलाही पुत्रप्राप्ती झाली.

मार्कण्डेयाने पांडवांना ही गोष्ट सांगून म्हटले, ''द्रौपदीच्या पातिव्रत्यामुळे तुमचे कष्टही असेच दूर होतील.'' आश्वासन देअून मार्कण्डेय तेथून निघून गेले.



# "चान्दोबा" च्या वार्ता

**निराळे नवे वर्ष**

हिन्दुचा असा विश्वास आहे की 'विश्व' ही ब्रह्मदेवाची सृष्टी आहे. आपल्या पूर्वजांनी कालक्रमाचे चार भाग केले - कृत, त्रेता, द्वापर व कलियुग. असे मानले जाते कि कलियुगाच्या चौथ्या भागाची ५,०९७ वर्षे संपून गेली आणि ४,३२,००० वर्षानंतर याही युगाचा अन्त होईल. एक अंदाज असा लावला जातो की या विश्वाच्या निर्मितीनन्तर १,९५५,८८५,०९७ वर्षे निधून गेली आहेत. आपल्या देशातील बऱ्याच प्रान्तांमधे एप्रिल ८ ला नव्या वर्षाची सुरुवात होते. यानन्तर बरोबर सहा दिवसांनी नन्तर १४ एप्रिलला बंगाल, आसाम, तमिळनाडु व केरळमधे नववर्ष सुरु होते.

**एकान्त दिवस**

इण्डोनेशियाच्या बाली द्वीपात हिन्दुंची संख्या अधिक आहे. तेथे दरवर्षी ९ एप्रिलला एकान्त दिवस साजरा केला जातो. त्या दिवशी कोणीही घराबाहेर पडत नाही. दिवे मालवून टाकतात, प्रवास करत नाहीत. कसलाही मनोरंजन कार्यक्रम केला - पाहिला जात नाही. केवळ खास परवानगी घेतलेली वाहनेच रस्त्यांवरून धावतात, साधारणपणे पर्यटकांच्या येण्या-जाण्यात गुंतलेल्या या द्वीपात वीस तास अगदी शान्तता पसरलेली असते.

**सोन्याचे पोस्टाचे तिकीट**

इण्डोनेशियाचे अध्यक्ष सुहार्तो यांची धर्मपत्नी एक वर्षपूर्वी दिवंगत झाली. एप्रिल २८ ला, त्यांच्या मृत्यु-दिवशी त्यांच्या सन्मानार्थ इण्डोनेशियाच्या डाक-विभागाने प्रत्येक किंमतीची डाक तिकिटे काढली. एकूण ३०,००० तिकिटेच काढली गेली. ही तिकिटे सोन्याची आहेत. तिकिटाची किंमत १९२ डॉलर आहे. (जवळजवळ चार हजार रुपये!) पहिल्या दिवसाच्या लिफाफ्यावर अध्यक्ष सुहार्तो यांची सही आहे.

**जिगरी दोस्त**

छेडीलाल आयोध्येचा निवासी, तर महमद मार्टिन जवळच्याच फैजाबादचा. पन्नास वर्षे दोघे बरोबरच हिंडत-फिरत राहिले. एकदा मार्टिन अचानकच आजारी पडला. त्याच्या मित्राला-छेडीलालला ही बातमी कळल्याबरोबर, ताबडतोब तो फैजाबादला निघाला. पण तिथे पोचता-पोचताच मार्टिन मरून गेला. मित्राचे मृत शरीर पाहून छेडीलालला दुःख सहन झाले नाही व तो बेशुध्द पडला. थोड्याच वेळात त्याचाही मृत्यु ओढवला. १२ एप्रिलला दोन्ही मित्रांच्या अन्त्यक्रिया निरनिराळ्या स्थानी झाली. दोन्ही शहरवासीयांना असे वाटते की, जिगरी दोस्तांची ही घटना हिन्दु-मुस्लिम ऐक्याचे ज्वलन्त अुदाहरण होय.



चांदोबा पुरवणी १०३



आपल्या देशाची सौन्दर्यस्थळ

# पृथ्वीवरचा स्वर्ग - नीलगिरी



द. भारतातील पश्चिम घाटात नीलगिरी पर्वत विस्तारलेला आहे. या पर्वताच्या आसपासचा हिरवेपणा फारच सुखावह वाटतो. इथे जवळजवळ तीस प्रकारची जंगली फुले विकसत असतात 'नीलगिरी टाहर' म्हणवल्या जाणाऱ्या जंगली बकऱ्यांचे हे निवासस्थान होय. या जातीच्या बकऱ्या आता हजारभरच असतील. बारा वर्षातून एकदाच विकसित होणाऱ्या निळ्या रंगाच्या 'कुरिंजी' फुलांनी जेंव्हा हा पर्वतप्रान्त आच्छादित होतो, तेंव्हाची शोभा वर्णनातीत असते. सांबर आणि चित्तेही





या जंगलात रहातात. 'बाल्सम' जातीचे तऱ्हेतऱ्हेचे वृक्षही येथे आहेत. त्याच्या फांद्या नेहमी शेवाळाने झाकलेल्या असतात. यांवर विविध रंगांची, तऱ्हेतऱ्हेची फुले फुलतात. नीलगिरी पर्वताची शोभा दर्शकांना आनन्द व आश्चर्यात बुडवते. त्यामुळेच असे म्हटले जाते की, 'नीलगिरी हा जमिनीवर अुतरलेला स्वर्गच आहे.

# सूर्यवंशाचा मूळ पुरुष - ईक्ष्वाकु

भारतीय नागरिकत्वाची वृध्दी व त्याच्या संस्कृतीच्या सर्वतोमुखी विकासात सहाय्य देणाऱ्यांमधे इथले ऋषि-मुनि व राजे यांचे मोठे स्थान आहे. त्यांनी या क्षेत्रांमधे खूपच प्रयत्न केले. प्रत्येक भारतीयाला वसिष्ठ, विश्वामित्र आदि ऋषि ऐकून माहीत असतात. त्याप्रमाणे श्रीराम, जनक आदि राजेही ठाऊक असतात.

सिंहासन-परित्याग करुन विश्वामित्र ऋषि बनले. जनकाने राजा असूनही, मानसिक रुपाने ऋषिसारखे जीवन व्यतीत केले. साहसी, वीर, शासन-दक्ष, त्यागी व जाति-निर्माता इ. गुणांवरून आपले कित्येक राजे ओळखले जातात. आदर्श राजांमधील अग्रगण्य राजा म्हणजे श्रीराम. त्याचा आदर्शपूर्ण शासनकाल 'रामराज्य' नावाने सुविख्यात आहे. शेकडो वर्षांपासून प्रजेच्या मनात त्याच्याबद्धल श्रध्दा आहे.

श्रीराम ईक्ष्वाकु-वंशातला सर्वश्रेष्ठ राजा मानला जातो. तो सूर्यवंशीय होता. सूर्यवंशाचा मूळ पुरुष होता ईक्ष्वाकु. ईक्ष्वाकुचे पिता होते वैवस्वतमनु. मातेचे नाव होते श्रध्दादेवी. वैवस्वत या शब्दाचा अर्थ आहे - भगवान सूर्याचा पुत्र.

ईक्ष्वाकुच्या बाबत जास्त माहिती अुपलब्ध नाहीय. हरिश्चंद्र, सगर, भगिरथ आदि सुप्रसिध्द राजे सूर्यवंशातीलच. सूर्यवंशाचे मूळपुरुष ईक्ष्वाकु असल्याने त्यांचे नाव चिरस्थायी झाले आहे.





## तुम्हाला माहीत आहे काय?

# इन्का

रेड इंडियानांच्या वंशाचे इन्का पेरूमधे रहात असत. जास्त करून ते राजधानी 'कूजो' च्या परिसरातील प्रान्तात रहात. त्यात संपन्न असे राजेही असत आणि गुलामही असत. त्यांचे अनेक वर्गात विभाजन झाले होते. 'वीरकोच' नावाच्या देवाची ते पूजा करत त्यांच्यातले कलाकार कलात्मक वस्तु बनवण्यात मोठे हुशार असत. त्यांनी बनवलेल्या काही वस्तु आजही अस्तित्वात आहेत. मका, बटाटा व काही भाज्या ते पैदा करत. तोच त्यांचा मुख्य आहार असे. इल्मा नावाचे प्राणी ते पाळत असत. त्यांच्या दैनन्दिन जीवनात या प्राण्यांचेच मख्य स्थान असे.



## इन्द्रधनुष




# बर्फातील माणूस

'एस्किमो' चा अर्थ आहे-कच्चे मास खाणारा. ते सील प्राण्याचे मास खातात. त्याच्या कातड्याचा तंबू व कपडे बनवण्यासाठी अुपयोग होतो. 'कयाक' नावाची यांची नाव सुप्रसिध्द आहे. 'स्लेजलेज' नावाची यांची गाडी कुत्रे बर्फावरुन ओढून नेतात. त्यावर बसून एस्किमो सफर करतात. त्यांच्या छोट्या छोट्या बर्फाच्या घरांना 'इग्लू' असे म्हणतात. या लोकांची अशी समजुत आहे की निसर्गनिर्मित प्रत्येक वस्तूत आत्मा असतो. एस्किमो बर्फाळ प्रदेशात रहातात. त्यांचे परिवार पाहून, त्यांच्या-बरोबर राहून विचित्र अनुभूती होते.



# भाग्य-दुर्भाग्य

एक राजा होता. तो होता नास्तिक. भगवन्ताच्या अस्तित्वावर त्याचा जराही विश्वास नव्हता. स्वतःच्या शक्तीवरच फक्त त्याचा अपार विश्वास होता. इतर शक्तींचे अस्तित्वही तो मानत नसे. त्याच्या व्यक्तिशः काहीही समजुती असल्या तरी राज्यकारभार तो दक्षतेने संभाळत असल्याने त्याची प्रजा सुखी असे, आरामात आपले जीवन व्यतीत करत असे. वर्षातून एकदा राजा वेषांतर करून राज्यभर फेरफटका मारी. या काळात तो प्रजेचा स्वतःबद्दलचा अभिप्राय जाणून घेई अन् त्याबरोबरच प्रजेच्या सुखदुःखांचीही नोन्द करी.

सवयीनुसार राजा एकदा वेषांतरात एका शेताजवळून जात असताना त्याला तहान लागली. घोड्यावरून अुतरून तिथल्या विहिरीतून पाणी काढून त्याने आपली तहान भागवली. नन्तर तो आजूबाजूला पाहू लागला. तेंव्हा त्याला वडाखाली एक गरीब माणूस बसलेला दिसला. तो बराच चिन्तित वाटत होता. त्याच्या चेहऱ्यावर चिन्तेचा भाव स्पष्ट दिसत होता.

जवळ जाअून राजाने विचारले, ''काय झालं बाबा ? असा का बसला आहेस इथे ? कसली काळजी पडलीय तुला ?'' बोलता बोलता राजाही त्याच्याजवळ बसला.

गरीब दुःखी आवाजात म्हणाला, ''काय सांगू ! आठवतंय तेंव्हापासून मी दुःखच दुःख भोगत आलोय. सुख काय असतं हेही मला माहीत नाही.''

''आपली पोट भरण्यासाठी तुला एकादी नोकरी नाही मिळाली का ?'' राजाने विचारले. ''कुठे एकादी नोकरीच करायची काय गरज ? ताडाची ती तीन झाडं दिसत आहेत ना ? त्यांच्या मधली सगळी जमीन माझीच आहे. पण काय अुपयोग ? देवाची मर्जी नाहीय माझ्यावर.'' असे म्हणत, देवाचे स्मरण करून त्याने दोन्ही हात जोडले. राजा हे पाहून नाराज झाला. पण त्याला मूर्ख समजून तो म्हणाला, ''मेहनत केलीस, तर दोन वीत जमीनही सुख मिळवायला पुरेशी आहे.''

राजाच्या वक्तव्याचे वाईट वाटून गरीब म्हणाला, ''आळशीपणा म्हणजे काय, हे मला माहीतच नाही. गेली तीन वर्षं माझ्या वर काय गुदरलं, ते माझ्याच तोंडून ऐका. पहिल्या वर्षी धान्याचं पीक चांगलं आलं. वाटलं की देवाची कृपा आहे आपल्यावर ! सारं धान्य पोत्यात भरून मी घरी पाठवलं. तुम्हाला वाटत असेल की माझं घर चांगलं मोठं असेल. ते तर सुक्या गवतानं शाकारलेलं, मातीच्या भिंतींचं एक लहानसं घर आहे. चांगलं पीक आल्याच्या आनन्दात मी बायकोला म्हणालो, कि वडे बनव आपल्याकडे, अन् तसाच मी सावकाराकडे गेलो. परत येअून पाहिले तर माझं घर जळत होतं ! आगीच्या अुंचअुंच ज्वाळांमधे सगळं जळून चाललंय. असं घडलं होतं की, मी गेल्यावर बायकोनं चूल पेटवली अन् त्याच्या वर भांडं ठेवून कसल्या तरी कामासाठी बाहेर आली. इतक्यात आपसात भांडण करत माझ्या दोन मुलांपैकी एक जळतं लाकूड हातात घेअून, दुसऱ्याला 'जाळून टाकीन' अशी धमकी देअू लागला. ते पाहून माझी बायको ओरडली, ''अरे, तुमची अक्कल तर चरायला नाही गेली न ? नालायक कुठचे! आगीशी खेळताय ?'' अन् पुढे येअून धपका घालून लाकूड काढून घेणार, इतक्यात घाबरून त्यानं ते फेकलं ! छताच्या गवतानं लगेच पेट घेतला. माझी बायको अन् मुलं ओरडू लागली. लोकांनी येअून पाण्यानं ती आग विझवण्यापूर्वी सगळंच जळून गेलं. तेवढ्यात मी सावकाराकडून परत आलो. प्राणाशी खेळून आम्ही यथाशक्ती प्रयत्न केला अन् फक्त पाच पोती धान्य तेवढं वाचवू शकलो. थोडा बहुत पैसा अडका होता, तोही जळून गेला आता हे माझं दुर्भाग्यच नव्हे तर काय ?''



त्याचे बोलणे लक्षपूर्वक ऐकून राजा म्हणाला, ''या अपघाताचं मूळ कारण आहे- तुझी बायको. खोडकर मुलांना घरात सोडून आपण बाहेर जाणं अत्यंत धोक्याचं आहे. मुलांना शिस्तीत ठेवणं, हे माता-पित्याचं काम आहे. ठीक आहे, पुढे काय झालं, सांग !''

मनोहर जोशी



गरीबाला राजाबद्दल थोडी शंका आली. त्याच्या कडे संशयाने पाहून तो पुढे म्हणाला, ''दुसऱ्या वर्षीही पीक चांगलंच आलं. या वेळीही आम्ही खूप मेहनत केली. गावदेवीची पूजा करून, 'मागल्या वर्षीप्रमाणे या वर्षी काही अनर्थ न होवो', अशी माझ्या बायकोने तिची प्रार्थना केली. या वर्षी आम्ही जास्त काळजी घेतली; धान्याची पोती घरात न ठेवायचा निश्चय केला. सावकाराची परवानगी घेऊन गुदामात ठेवायचं ठरवलं. लहान मोठ्या शेतकऱ्यांनी धान्य लवकर भरडलं अन् पोत्यात भरून घेऊन गेले. धान्य जास्त असल्यानं भरडायला एक दिवस जास्त लागला. पहिल्या दिवशी पाच पोत्यांइतकं धान्य भरडल्यावर ते सावकाराच्या गुदामात ठेवलं. बाकीचं काम दुसऱ्या दिवसावर ढकललं. पण तीन दिवस पाऊस येत राहिला अन् त्यामुळे माझ्याबरोबर इतरही बऱ्याच शेतकऱ्यांचं खूप नुकसान झालं.''

''हं ! म्हणजे पहिल्योवेळी अग्निदेवानं तुझं नुकसान केलं, आणि दुसऱ्यावेळी वरुणदेवानं ! मी तर म्हणतो की, ही सगळी तुझी चूक ! साधारणतः धान्य भरडायच्या वेळी खूपदा असा थोडा-बहुत पाऊस येतोच. या अगोदरही तू मार खाल्ला होतास, पण काळजी घेतली नाहीस. आपलं काम लवकर करून घ्यायला हवं होतं, पण तू उशीर केलास, चार मजूर जास्त लावून आपलं काम करून घ्यायला हवं होतंस ना ?'' राजाने त्यालाच दोष दिला.

त्याचं हे बोलणं ऐकून गरीबानं हात जोडून नमस्कार करत म्हटले, ''महाराज, आपणच वेष पालटून फिरणारे आमचे महाराज तर नव्हेत ?''

चकित होऊन राजाने विचारले, ''तुला असा संशय का आला ? ''माझी हकिकत ऐकून वास्तविक कोणीही सहानुभूती दाखवेल. माझ्या दुर्भाग्यबद्दल त्याच्या डोळ्यात अश्रू उभे रहातील. पण तुम्ही दोन्ही वेळा माझ्या दुर्भाग्यावर नव्हे, तर माझ्याच चुकीवर जोर दिलात. त्यावरच बोट ठेवलंत !''

त्याची प्रशंसा करत राजा म्हणाला, ''तुझ्यात थोडबहुत तर्क करायचं ज्ञान आहे, याचा आनन्द वाटतोय मला. मी कोण आहे, ते नंतर कळेल. पण आता तिसऱ्या वेळी काय झालं ते सांग ?''

निर्लिप्तपणे तो गरीब माणूस थोडा वेळ राजाकडे पहात राहिला, आणि नंतर म्हणाला, ''तिसऱ्या वेळी माझ्या दुर्भाग्यानं



मला पार गिळूनच टाकलं. स्वामी, पहिल्या वर्षी घर पुन्हा बांधायला, अन् दुसऱ्या वर्षी गृहस्थी चालवायला मला सावकाराकडून कर्ज घ्यावं लागलं. तिसऱ्या-म्हणजे गेल्या वर्षीही पीक चांगलंच आलं. कापणीच्या वेळी यमधर्म सावकाराला घेऊन गेला अन् मागे राहिला त्याचा मुलगा ! तो तर साक्षात यमच ! दया, सहानुभूती, करुणा वगैरे सद्गुणांशी त्याचं वावडं ! धान्य भरडायच्या वेळी तो सरळ शेतावर आला, अन् तिथेच बसून राहिला. विचारू लागला, मूळ रक्कम देतोस की नाही? नाहीतर त्याच्या ऐवजी हे धान्यच दे. मी खूप याचना करून म्हटले-हप्त्या हप्त्यानं कर्ज चुकवीन तुमचं ! पण ऐकलं नाही त्यानं. खाण्यासाठी थोडं सोडून, बाकी सगळं धान्य घेऊन गेला तो ! अन् तरीही म्हणत राहिला की-अजूनही सगळं कर्ज फिटलेलं नाहीय तुझं! नंतरही तो गप्प राहिला नाहीच. माझं शेत त्यानं आपल्या ताब्यात घेतलं. त्याच्या कृपेनं त्याचा नोकर बनून शेतात खपत असतो मी हल्ली ! तो देईल, त्यात कुटुम्बाचं पोषण करतो. या वर्षीही कडक मेहनत केलीय मी! ते पीक पहा ! किती हिरवंगार दिसतंय ना शेत ? कापणीच्या वेळी तो सावकाराचा मुलगा येईल अन् गिधाडासारखं माझ्या कष्टांचं फळ स्वतःच्या तोंडात घेऊन उडून जाईल ! मी असहायपणे पहात राहीन ! ग्रामाधिकाऱ्या कडे मी त्याची तक्रार करू शकत नाही, कारण तो ह्याचा सासरा आहे. आपल्याच जावयाचं नुकसान तो का करील ? आपलं रडगाणं ऐकवायला त्या ईश्वराशिवाय कोण उरलंय आता ? आपणच सांगा, कोणी आहे



तयार ते ऐकायला ?''

त्याच्या बोलण्यावर पुन्हा नाराजच होत राजा म्हणाला, ''मुर्खा, तुझ्यावर अन्याय झाला, तेव्हा जे करायला हवं, ते करत नाहीयेस. सर्वेश्वर, दयानिधी, करूणाकर म्हणत वेड्यासारखा जोर जोरात ओरडत आहेस ! यामुळेच तुझं आयुष्य बरबाद झालं. ग्रामाधिकाऱ्यानं ऐकलं नाही, तर मंडलाधिकाऱ्यानंही ऐकलं नसतं का ? तोही निगरगट्ट असेल तर या देशाला राजा नाहीय का? त्यानं तुझं दुःख ऐकून न्याय दिला असता! आपलं दुःख कुणाला तरी सांगून हा अन्याय थांबवण्यासाठी तू प्रयत्न करायला हवे होतेस. हे भगवान, हे ईश्वर ! म्हणत ओरडत राहून काय उपयोग ?''

हे ऐकल्यावर पुन्हा गरीबाने हात जोडून



राजाला नमस्कार करत म्हटले, ''महाप्रभु, आपण साक्षात् महाराजच आहात, यात काही शंका नाही. आता राहिली माझी बाब! दुर्भाग्यानं मला आपल्या मुठीत धरलं. माझा दृढविश्वास आहे, की भाग्यवन्ताचं कोणी काही बिघडवू शकत नाही, आणि अभाग्याला कोणी सावरू शकत नाही. म्हणूनच मी कुठेही गेलो नाही, ह्या भगवन्ताच्या भरंवशावर जगतो आहे.''

प्रत्यक्ष राजाशी आपण बोलत आहोत, हे माहीत असूनही, आपल्याच पद्धतीने बोलत रहाणाऱ्या गरीबाचा राजाला रागच आला ! व्यंग्यभरल्या स्वरात तो त्याला म्हणाला, ''देवावर तुझा इतका विश्वास आहे, तर शेतात इतकी मेहनत करायची तरी काय गरज ? घरात कांबळं पांघरून झोपून राहिलास, तरी तो तुझ्या आवश्यकतांची सोय करीलच ! तुझं भाग्य उजळून जाईल, तू 'बडा असामी' बनशील; हो की नाही ?''

राजा रागावल्याचे गरीबाने ओळखले. तरीही न भिता तो म्हणाला, ''पेटता दिवा वाऱ्यावर ठेवून, भगवंतावर भरोसा ठेवून देवाला 'तो विझू देऊ नकोस' असं म्हणणाऱ्या वेदान्त्यांपैकी मी नव्हे.' महाराज, माझा तर असा विचार आहे की, दिवा न विझण्यासाठी त्यावर हाताचा आडोसा करायला हवा. यापुढे परमेश्वराची दया ! भाग्यानं साथ दिली, तर तो विझणार नाही. प्रकाश पसरतच राहील. हे सूत्र माझ्या व आपल्याही बाबत सारखंच लागू आहे.''

राजा आपला राग लपवू शकेना. क्रोधाने लाल होत तो म्हणाला, ''अरे अभाग्या ! मी त्या सावकाराच्या मुलाला शिक्षा करून तुझं शेत तुला परत देववलं, तरीही तू ती परमेश्वराचीच दया-भिक्षा मानणार असं वाटतंय.''

विनयपूर्वक गरीब म्हणाला, ''राजन् आपलं अनुमान बरोबर आहे. मी ती आपली अन् भगवंताची दोघांचीही कृपाच मानणार, या जगात चांगली माणसं ही 'परमेश्वराचे दूत' असतात. माझ्यासारख्या अभाग्याला आधार देण्यासाठी आपणासारख्यांना तोच या जगात पाठवत असतो. त्यामुळे मी नेहमी दोघांचाही कृतज्ञ राहणार या जगात चांगली माणसं ही 'परमेश्वराचे दूत' असतात. माझ्या सारख्या अभाग्याला आधार देण्यासाठी आपणासारख्यांना तोच या जगात पाठवत असतो. त्यामुळे मी नेहमी दोघांचाही कृतज्ञ



राहीन !''

तिथल्या तिथेच त्या माणसाचे तलवारीने दोन तुकडे करावे, असे राजाला वाटत होते, पण मोठ्या कष्टाने स्वतःला सावरत राजा म्हणाला, ''ठीक आहे. आता सांग, तू शेवटी काय सांग इच्छितोस ? हेच ना, की - भाग्यवन्ताचं कोणी काही बिघडवू शकत नाही ? कोणी काही करू शकत असेल, तर तो फक्त परमेश्वरच ? होय ना ?

नम्रतेने गरीब म्हणाला, ''होय प्रभु, माझा यावरच विश्वास आहे. राक्षस-द्वीपात घेऊन जाऊन, मला कोणी तिथे सोडून दिलं, तरी, शक्य आहे की भाग्य मला तारेल. अन् आपण मला स्वत: बरोबर बसवून राजधानीला नेलंत, तरी माझं दुर्भाग्य माझी पाठ सोडणार नाही !''

मोठ्या खुशीनं टाळी वाजवत राजा त्याला म्हणाला, ''अरे मूर्खा, मी खरोखरच आता तुला राक्षस-द्वीपावर पाठवणार आहे ! सहा महिने पुरतील इतके खाद्यपदार्थ मी तुझ्या बरोबर देईन. सहा महिने राक्षस-द्वीपावर रहा अन् त्या तथाकथित भगवन्ताची प्रार्थना करत रहा !'' इतके बोलून राजा उठून उभा राहिला.

राजाचे बोलले ऐकून गरीब माणूस तर अवाकच झाला ! त्या देशाच्या उत्तरेला उत्तुंग लाटांनी उसळणारा समुद्र होता. किनाऱ्याकडे येणाऱ्या-जाणाऱ्या नौकांमुळे तो नेहमी गजबजलेला असे. समुद्रव्यापार करणारे कित्येक व्यापारी त्या देशात होते. तेथे मधेच असणाऱ्या राक्षस द्वीपाबद्दल सर्वच व्यापारी काहीबाही बोलत असत.

समुद्राच्या मध्यावर नौकेतून जाणाऱ्या



प्रवाशांना, व्यापाऱ्यांना व नाविकांना ते द्वीप स्पष्ट दिसत असे. तिथली हिरवळ व उंच उंच वृक्ष त्यांना मुग्ध करत. व्यापाऱ्यांना त्या बेटाची माहिती नसताना, ते तिथे थांबत असत. पण थांबणारांपैकी क्वचितच कोणी परत येत असे. बाकीचे सारे त्या बेटावरच्या विचित्र राक्षसाचे खाद्य बनत. परत आलेले लोक म्हणत की, तो राक्षस ताडामाडासारखा आहे, सहा-सात फूट आडवा आहे. हात पसरून एकाच वेळी तो चार-पाच माणसांना हाताच्या विळख्यात पकडतो ! त्यामुळेच द्वीपाचे नाव 'राक्षस-द्वीप' पडले. गेल्या कित्येक वर्षात त्यावर कोणी पाऊलही ठेवले नव्हते.

राजा आपल्याला त्या बेटावर पाठवणार असल्याचे कळल्यावर गरीबाला भीतीने कापरे भरले, थरथर कापत तो राजाला म्हणाला

''महाराज, बोलण्याचा भरात काहीच्या बाहीच बोलून गेलो मी ? क्षमा करा मला ! माझ्यावर दया करा. गरीबाला इतकी कडक शिक्षा देणं अुचित आहे काय, विचार करा आपणच !''

त्याचे भय पाहून राजाला आनन्द झाला! हसतच तो म्हणाला, ''या शिक्षेतून वाचायची इच्छा आहे तुझी ? वाचू शकशील तू. तुझ्या हातचं आहे ते. तू आत्तापर्यंतच बोललेलं सगळं खोटं आहे, शंभर टक्के चूक आहे-असं कबूल करत असशील, तर तुझं शेत आत्ता तुला परत मिळवून देतो.

तुझं सगळं कर्ज चुकवलं जाईल. याशिवाय तुला खूपसं धन आणि सोनं दिलं जाईल. करतोस कबूल ?''

गरीबाने थोडा विचार केला. त्याला परमेश्वर आठवला. त्याच्यावर त्याचा आजपर्यन्त पूर्ण विश्वास होता. जन्मापासूनच वडीलधाऱ्यांनी सांगितेल्या श्रद्धेची आठवण झाली. त्याला वाटले की या साऱ्या श्रद्धा विसरून-ज्या भगवंताच्या भरोशावर आपण जगत आलो, त्याला विसरून, स्वार्थी पणाने राजाच्या 'हो' ला 'हो' म्हणणे म्हणजे कृतघ्नता, नीचपणा आहे.

दृढपणे तो म्हणाला, ''मालक, राक्षस द्वीपावरच मरायचं माझ्या ललाटी लिहिलं असेल, तर मला मृत्युपासून कोणीच वाचवू शकणार नाही. पाठवा मला तिथे ! देवाची इच्छा असेल, तसं होईल. आता माझ्या बायको-मुलांचा प्रश्न ! आपली दया अन् त्यांचं भाग्य !'' अन् त्याने हात जोडून नमस्कार केला.

त्याचे हे बोलणे ऐकून राजाच्या मनात त्याच्या बद्दल जी थोडी बहुत सहानुभूती होती, तीही नाहीशी झाली. आता तोही हट्टाला पेटला. त्या गरीबा कडूनच त्याने ग्रामाधिकाऱ्याला खबर कळवली आणि त्याच्या कुटुंबासह त्याला राजधानीला न्यायची व्यवस्था केली खरं काय, हे कोणालाच कळले नाही. त्यामुळे सर्वांना गरीब शेतकऱ्याचे भाग्य अुजळले - असे वाटले.

राजधानीत पोचल्याबरोबर राजाने गरीबाच्या कुटुम्बाच्या रहाण्याची व्यवस्था केली आणि रहस्यपूर्वक त्याला राक्षस-द्वीपावर पाठवायची व्यवस्थाही केली.

**अपूर्ण**





# धाडसी राजपुत्र

धवलपूर राजा आकस्मिक मरण पावल्यानंतर त्याचा भाअू वीरसिंह हा सिंहासनावर बसला. परंतू महाराजांचा बारा वर्षांचा एक मुलगा होता. त्याचे नाव होते सूर्यसिंह. राजा बनल्यानंतर वीरसिंहच्या मनात दुर्बुद्धी अुपजली. सूर्यसिंहचा वध केला, तर आपल्याला राजपद निरंतर प्राप्त होईल असा त्याने विचार केला.

मंत्र्याने त्याचा हा विचार ताडला आणि राजपुत्र सूर्यसिंहचा जीव वाचवायचे ठरवले. एक दिवस राजपुत्राला घेअून तो सरहद्दीवरील कृष्णगडाकडे निघाला. तिथली राणी ही मन्त्र्याची मावशीच होती.

संध्याकाळपर्यन्त दोघे अंजनपुर नावाच्या गावात पोचले. गावच्या एका धनवान शेतकऱ्याने या दोघांना आश्रय दिला. अन् त्यांचा चांगला पाहुणचार केला. पण आपल्या-बरोबरच्या राजपुत्राकडे सर्वजण आश्चर्याने पहात असल्याचे बघून मन्त्र्याला नवल वाटले. याचे कारण त्याच्या लक्षात येईना. शेतकऱ्याचा मुलगा अगदी हुबेहूब राजपुत्रा सारखाच दिसत असल्याचे पाहून मन्त्री चकित झाला व लोकांच्या आश्चर्याचे कारणही त्याच्या लक्षात आले. चेहरा, आकारमान, अुंची व शेवटी चालण्यातही दोघांच्यात अगदी साम्य होते; जणू काही जुळी मुलेच ! शेतकऱ्याच्या मुलाचे नाव होते बलराम मन्त्र्याच्या मनात आले की, या बलरामला आपल्याबरोबर ठेवले तर काही अुपयोगही होअू शकेल. तो शेतकऱ्याला म्हणाला, ''आपल्या पुत्राला तू राजपुत्राचा मित्र म्हणून आमच्याबरोबर पाठवलंस, तर त्याचं भविष्य अुजळेल, मी तुला भरपूर धनही देईन.'' शेतकऱ्याने मोठ्या आनन्दाने ते मान्य केले.

मन्त्री आता राजकुमार व बलराम या दोघांनाही घेअून निघाला व चार दिवस प्रवास

पंचवीस वर्षांपूर्वी 'चांदोबा' त प्रकाशित कहाणी



करून कृष्णगडला पोचला. तिथल्या महाराणीने पाहुण्याच्या रहाण्याची उत्तम व्यवस्था केली. दिवस जात राहिले. तसतशी राजपुत्र व बलराम यांची दाट मैत्री जमली.

बऱ्याच दिवसांनंतर वीरसिंहाला राजपुत्र कृष्णगडावर असल्याचे समजले व त्याने सैन्य घेऊन जाऊन कृष्णगडाला वेढा घातला.

आपल्यामुळे मावशी अडचणीत पडू नये अशी धवलगिरीच्या मन्त्र्याची इच्छा होती. यासाठी तो हाती पांढरे निशाण घेऊन वीरसिंहशी तह करण्यासाठी गडाबाहेर आला. 'राजपुत्र सूर्यसिंहला आपल्या हाती सोपवले तरच आपण कृष्णगडचे नुकसान न करता वेढा उठवू' अशी अट त्याने मन्त्र्याला घातली. मन्त्री आता पेचात पडला. वीरसिंहची मागणी पुरी केली, तर राजपुत्राला वाचवण्यासाठी केलेले सर्व प्रयत्न वाया जाणार होते, आता काय करावे असा प्रश्न मन्त्र्याला पडला. आता राजपुत्राला वाचवायचा एकच उपाय त्याच्याजवळ होता; तो म्हणजे बलरामला राजपुत्राच्या जागी वीरसिंहच्या हाती सुपूर्त करायचे.

बलरामला एकान्तात बोलावून मन्त्री म्हणाला, ''मुला, शत्रू राजाची इच्छा आहे की, मी राजपुत्राला त्याच्या स्वाधीन करावे. पण असं केलं, तर दाट शक्यता आहे की, तो सूर्यसिंहला मारून टाकील ! त्याऐवजी मी तुलाच 'राजपुत्र' म्हणून त्याच्या हवाली करू शकतो, पण कदाचित त्यामुळे तुझ्यावर प्राणसंकट येईल. काय करावं हे समजत नाहीय मला.''

मन्त्र्याचे बोलणे ऐकून बलराम म्हणाला, ''माझा, जीव गेला, तरी बेहत्तर ! पण राजकुमार जिवन्त राहिला, की जमले तर पुन्हा आपले राज्य हाती घेईल आणि राजवंशाचं रक्षण होईल. मला पाठवा शत्रुराजाकडे. पण एक मात्र करा, की राजपुत्राला हे कळू देऊ नका.''

बलरामच्या बोलण्याने मन्त्री प्रसन्न झाला. यानन्तर बलरामच्या अंगावर राजपुत्राचा वेष आणि आभूषणे चढवली गेली आणि काही सैनिक बरोबर देऊन त्याला कृष्णगडाबाहेर वीरसिंहच्या तळावर पाठवण्यात आले.

बलराम गेल्यानंतर थोड्या वेळाने सूर्यसिंह त्याला शोधू लागला. काही शिपाई त्याला किल्ल्याबाहेर घेऊन गेल्याचे राजपुत्राला समजले वीरसिंह आपला प्राण घ्यायला टपला असल्याचे त्याला माहीत होते. याला हेही माहीत होते की, बलरामला पहाणारा प्रत्येकजण त्याला राजकुमारच समजणार आहे. झटकन एका शिपायाची तलवार खेचून घेऊन तो खूप वेगाने किल्ल्याबाहेर पडला.

बलराम वीरसिंहच्या तळावर पोचल्याबरोबर तेथे उपस्थित असणारे सर्वजण त्याला राजपुत्र सूर्यसिंहच समजले आणि आपसात 'आपले छोटे महाराज आले' असे मोठ्या आनन्दाने ओरडू लागले. वीरसिंहने त्या सर्वांना बाहेर घालवले आणि बलरामला तो म्हणाला, ''खूप दिवसांनी हाती लागलास माझ्या. तू माझ्या आणि सिंहासनाच्या मधला अडथळा आहेस. आत्ताच तुला मारून तो दूर करते बघ. माझा मार्ग निष्कंटक होईल.'' अन् त्याने म्यानातून तलवार बाहेर खेचली.

बलराम निर्भयपणे उभा होता. तो म्हणाला, ''मला मारल्यानं, तुझे भले होणार नाही. आता तुझ्या हाती असलेलं सिंहासनही घालवून बसशील तू !'' वीरसिंहने बलरामवर झडप घातली, पण तो त्याच्या हाती आला नाही. तो मोठ्या चपळाईने इकडे तिकडे पळत होता ! इतक्यात तंबूच्या द्वाराशी आलेला. राजकुमार ओरडला, ''थांबा !'' त्याला पाहून वीरसिंह आश्चर्यचकीत झाला. त्याला समजेना की एकाच वेळी दोन राजकुमार आपल्या तंबूत कसे ? मनाच्या या गोंधळलेल्या अवस्थेत त्याच्या हातातली तलवार गळून पडली. दुसऱ्याच क्षणी राजपुत्र सूर्यसिंहने वीरसिंहवर झडप घातली आणि एकाच वारात त्याचे मस्तक धडावेगळे केले. वीरसिंहच्या मृत्यूची खबर पोचताच सैनिकांनी राजपुत्राला घेरले. परन्तु वीरसिंहने राजकुमारालाच मारण्याचा घाट घातला असल्याचे कळल्यावर ते त्याच्यावर फार खूश झाले. त्याने केले ते योग्यच केले हे त्यांना पटले.

यानन्तर मन्त्री राजपुत्र व बलराम यांना घेऊन राजधानीत पोचला. राजकुमाराना लवकरच राज्याभिषेक करण्यात आला. राजप्रतिनिधी बनून मन्त्र्याने अज्ञान वयाचा राजपुत्र सज्ञान होई पर्यन्त राज्यकारभार संभाळला व नंतर सर्व काही त्याच्या हाती सोपवले. बलराम अनेक जहागिरीचा मालक बनला आणि त्याने आजन्म आपले मित्रकर्तव्य बजावले.



विश्व समाचार

# ब्रिटनचे नवे प्रधानमन्त्री

स्कोटलंडमधला चौदा वर्षाचा एक मुलगा शाळेत शिकत होता. शाळेची कडक शिस्त पाळणे कठीण वाटून, घर सोडून वेस्ट इंडिजमधील बहमासला पळून जायचे त्याने ठरवले. पण तसे घडू शकले नाही. ही तीस वर्षापूर्वीची गोष्ट आहे. हा मुलगा मोठा होऊन आता ब्रिटनचा प्रधान मन्त्री बनून १०, डाअुनिंग स्ट्रीट येथे रहात आहे.

त्याचे नाव आहे टोनी ब्लेअर. १ मे रोजी ब्रिटन मधे ज्या सार्वत्रिक निवडणुका झाल्या, त्यात टोनी ब्लेअरच्या अध्यक्षतेखाली लेबर पक्षाने अभूतपूर्व विजय मिळवला. सत्तारूढ कॉन्झर वेटिव्ह पक्षाला हरवून राज्य शासन हाती घेतले. हाअुस-ऑफ कॉमन्सची एकूण सभासदसंख्या ६५९ आहे. या निवडणुकीत लेबर पार्टीने ४१९, सत्तारूढ कॉन्झरवेटिव्ह ने १६३ व लिबरल डेमॉक्रसी ने ४५ जागा जिंकल्या. बाकीच्या विजेत्यांमधे काही राष्ट्रीय दलाचे व काही स्वतन्त्र अुमेदवार आहेत.



ब्लेअरचे मातापिता कॉन्झर्वेटिव्ह पक्षाचे सदस्य होते. ब्लेअरचा जन्म १९५३ मधे झाला. शालेय शिक्षण पूर्ण झाल्यावर ते कायदेशिक्षणासाठी ऑक्सफर्ड विश्व विद्यालयात भरती झाले. सेंट जोन कोलेजने त्यांच्या विचार पद्धतीत बदल घडवला आणि त्यांचा दृष्टिकोन विस्तृत केला. अध्यापक व सहपाठी विद्यार्थ्यांच्या विचारांचा त्यांच्यावर प्रभाव पडला. लेबर पक्षात सामील होण्यात या विचारांचा भाग महत्वाचा आहे. मजूर संघासंबंधीच्या कायद्याच्या परीक्षेत ते अुत्तम श्रेणीत अुत्तीर्ण झाले. राजनीतीच्या क्षेत्रात प्रवेश करण्यापूर्वी काही काळ त्यांनी वकिली केली.

१९८३मधे लेबर पक्षाचे प्रतिनिधी बनून त्यांनी हाअुस ऑफ कॉमन्समधे प्रवेश केला. त्यावेळी ते संसदेत सर्वात कमी वयाचे सदस्य होते. १९९२ मधे जेव्हा मजूरपक्षाने 'छाहो कॅबिनेट' चे आयोजन केले, तेव्हा त्यांनी तेथे शान्ति व संरक्षण संभाळले. यानन्तर १९९४मधे त्यांची लेबर पार्टीचे अध्यक्ष म्हणून नेमणूक झाली. १९०६ त स्थापन झालेल्या या लेबर पार्टीचे ते विसावे अध्यक्ष होत. सार्वत्रिक निवडणुकांपूर्वी झालेल्या सर्वेक्षण अभिप्रायात ६१ टक्के लोकांनी त्यांना देशाचे प्रधानमन्त्री निवडले. यापूर्वीचे प्रधानमंत्री जॉन मेजर यांना फक्त २९ टक्के मते मिळाली होती.

टोनी ब्लेअर यांनी आपला इतका भव्य विजय होईल अशी कल्पनाही केली नव्हती. मजूर पक्ष निवडून येईल अशी लोकांना पूर्ण आशा होती; परन्तु कॉन्झर्वेटिव्ह पार्टीला इतका जोरदार मार बसेल अशी त्यांना कल्पना नव्हती.

विजय जेव्हा दृढ झाला, तेव्हा आपल्या घरासमोर जमलेल्या गर्दीला अुद्देशून ते म्हणाले, "आपल्या देशात नवोदय सुरू झाला आहे. काही प्रमुख क्षेत्रात आपल्याला विशेष श्रम करायला हवेत. मुख्यतः आपल्या बालकांचे शिक्षण व त्यांच्या कल्याणकारी योजनांचे आधुनिकीकरण करायला हवे. राष्ट्रीय आरोग्याच्या संरक्षणासाठी आवश्यक व बरोबर सोयी अुपलब्ध करायला हव्यात. अशा प्रकारच्या अत्यन्त आवश्यक योजनांवर लक्ष केन्द्रित करायला हवे."

४६ वर्षे वयाचे टोनी ब्लेअर हे या शतकातले सर्वात कमी वयाचे प्रधानमन्त्री आहेत हे त्याचे वैशिष्ट्य म्हणायला हवे. १८१२ मधे लॉर्ड लिव्हरपुल आपल्या वयाच्या ४२ वयात ब्रिटनचे प्रधानमन्त्री बनले होते.



# विनोदचा सल्ला

विनोद कुन्दनपुरला नवीनच आला. त्याचा शेजारी प्रदीप याच्याबद्दल लोक म्हणत की, तो विद्वान अन् बुद्धिमान आहे. विनोद प्रमाणेच त्याचे घरही मोठे आहे, त्याचीही दहा एकर जमीन आहे, सुन्दर सुशील पत्नी अन् एक मुलगा आणि मुलगीही आहे. दहा लाख नकद रक्कम बाळगून आहे आणि दोघेही अगदी एकाच वयाचे आहेत.

विनोद ज्या दिवशी गावात आला, त्याच दिवशी जाऊन प्रदीपला भेटला आणि म्हणाला, "तुझ्या बाबतीत चौकशी करूनच मी तुझ्या शेजारी रहायला आलोय. इथला रहिवासी होण्यासाठी मला वेळोवेळी तुझा सल्ला हवाय."

प्रदीप हसून म्हणाला, "मी तर कुणाला सल्ला-बिल्ला न देण्याची शपथ घेतलीय. गैरसमज नको करून घेऊस. सल्ला न दिला म्हणून काय झालं? आपण मित्र बनून राहूया."

विनोद हसत म्हणाला, "पण एकमेकांना सल्ला न दिला, तर मैत्री रंगत नाही. तू वाटलं तर सल्ला नको देऊस, पण मी तुला देत राहीन."

"मला नाही कुणी सल्ला दिलेला आवडत. म्हणूनच मी शपथ घेतली की दुसऱ्या कुणाला मीही काही सूचना वा सल्ला देणार नाही. तुझ्या सल्ल्यांचा मला काहीही उपयोग होणार नाही; अन् बुद्धिमान माणूस बिना उपयोगाचं काम करत नसतो." प्रदीपने विनोदला सावध केले.

"पण मी तुला सल्ला देत राहीन आणि शाबित करीन की तुझं मत चुकीचं आहे." विनोदनेही आवेशात येऊन त्याला आव्हान दिले.

प्रदीप नुसताच हसून गप्प राहिला.

यानन्तर एकदा दोघे भेटले, तेव्हा विनोदने प्रदीपला सुचवले, "तुझ्याजवळ लाख रुपये आहेत. कुणाला तरी कर्जाऊ देऊन व्याज घे अन् आपलं धन वाढव ना!"

"जी माणसं कर्ज घेतात, त्यांना स्वतःच्या अनेक अडचणी असतात. त्यामुळे ते वायद्याप्रमाणे मुद्दल परत करू शकत नाहीत. त्यांच्यावर दया दाखवून आपण गप्प राहिलो, तर उलट ते ती आपलीच कमजोरी समजून आपल्याला फसवतात. त्यामुळे व्याजानं रक्कम देण्याचा धन्दा करणाऱ्याच्या स्वभावात दया, करुणा अगदी नावालाही असू नये. आपला व्यवहार त्यांना कठोरपणेच संभाळायला हवा. माझ्याच्यानं ते जमणार नाही. प्रदीपने विनोदचा सल्ला धुडकावून लावला.

प्रवीण गुप्ते



थोडे दिवस चुप राहिल्यावर विनोदने प्रदीपला आणखी एक सल्ला दिला - "तुझ्या मुलानं उच्च शिक्षण घेतलंय. शहरात पाठव त्याला. तिथे त्याला चांगली नोकरी मिळू शकेल आपल्या मुलीसाठी एकादा घर-जावई शोध. तो शेतीवाडीचं काम चांगलं संभाळेल. म्हातारवयात सुनेचं राज्य अन् तिचे टोमणे यातून स्वतःला वाचवू शकशील. सून आपल्या सासऱ्याला नेहमी शत्रूच मानते. पण मुली आपल्या आईबापांची सेवा करतात."

विनोदचा हा सल्लाही प्रदीपला आवडला नाही. तो विनोदला म्हणाला, "पति-पत्नींमधे कसला भेद-भाव, नाराजी किंवा कसलं रहस्य असू नये. तसं न झालं, तर पत्नी आपल्या पतीला परका मानील. मुलगी सासरी रहाणं हाच चांगला रिवाज आहे. जावयाला आपल्या घरात बसवून कोणी कधी सुखी राहू शकणार नाही. आता राहिली सुनेची गोष्ट, ती परक्या घरून आपल्याकडे आलेली आहे, ही गोष्ट विसरून चालणार नाही. ती आता आपल्याबरोबरच रहायला आलेली आहे, हे नेहमी ध्यानात ठेवून तिला 'आपलीच' समजायला हवं. या गोष्टी नीट ध्यानात ठेवल्या तर घरात कसली खळबळ माजेल असं मला नाही वाटत."

काही दिवस गेल्यावर त्या भागात चोऱ्या दरवड्यांची संख्या वाढू लागली. ते जनतेला तऱ्हेतऱ्हेने सतावू लागले. अचानक ते एकाद्या गावात धाड घालून माल लुटून निघून जात. पोलिसांना कसला पत्ता लागण्यापूर्वी ते आपले काम करून निघून जात. यामुळे प्रत्येक गावातले तरुण संघटित झाले. थोडेसे सैनिक शिक्षण घेऊन, हत्यारे बाळगून ते गावच्या रक्षणासाठी पुढे आले. तरीही लुटारू अचानक



हल्ला करीतच. कधी गाववाल्यांचा जय होई, तर कधी त्यांचा!

नेहमीप्रमाणेच याही वेळी विनोदने प्रदीपला सल्ला दिला - "सारं धन तिजोरीतच ठेवलं तर चोर ते लुटून पळून जातील. जोपर्यंत त्यांच्या या हालचाली सुरू आहेत, तोवर आपलं धन, दागिने इत्यादी मागील दारी खड्डा करून पुरून सुरक्षित ठेवावं, हे बरं. मग दरोडेखोर आपलं काही नुकसान करू शकणार नाहीत."

हा सल्लाही नाकारत प्रदीप विनोदला म्हणाला, "सर्व काही पुरून ठेवलं, तर तिजोरी रिकामी दिसून चोरांना संशय येईल. ते आपल्याकडून खरं वदवून घेतील. तुझा हा सल्ला मला मुळीच पटत नाहीय."

विनोदने यावर विचारले, "मग काय करायला हवं आपल्याला?"

"मी जे करीन, ते तुला मुळीच सांगणार नाही. तू काय करणार, हेही मी तुला विचारणार नाही." प्रदीप अुत्तरला.

आणखी काही दिवस गेले. जमीनदार मोहनराय यांची आई आजारी पडली. ती मरणार असेच सर्वांना वाटले. पण ती ठणठणीत बरी झाली. लवकरच ती सत्तर वर्षांची होणार, म्हणून मोहनराय मोठ्या प्रमाणावर अुत्सव साजरा करणार होता. त्यासाठी त्याने आसपासच्या गाववाल्यांनाही आमंत्रण दिले. पाहुण्यांच्या स्वागतासाठी त्याने चांगल्या सोयी केल्या. पायी येणारांना गारवा देणारे मांडव बनवले; बैलगाड्यांतून येणाऱ्यासाठी आरामात रहाण्याची सोय केली. घोडागाड्यांतून येणाऱ्यांसाठी त्याहीपेक्षा चांगली व्यवस्था केली.

विनोदने जेंव्हा याबद्दल ऐकले, तेंव्हा तो प्रदीपला म्हणाला, "तू तर मोठा बुद्धिमान आहेस. जमीनदाराकडे नोकरी केलीस, त्याच्याशी मैत्री वाढवलीस तर तुझी बुद्धी जास्तच अुजळेल. एक घोडागाडी खरेदी कर अन् त्यातून अुत्सवाला जा, म्हणजे विशेष स्वागत होईल. परत आल्यावर घोडागाडीचा दळणवळणासाठी अुपयोग करून पैसा कमव."

प्रदीप हसून अुत्तरला, "जमीनदार तर पाहुण्यांच्या लायकीप्रमाणेच त्यांचं स्वागत करणार आहे. कुणाच्या अकलेशी त्याचं काही घेणं-देणं नाहीय. घोडागाडीतून जाअून मी माझं स्थान वाढवलं, तर त्यानुसार मला भेटवस्तूही द्याव्या लागतील. जमीनदारांची दोस्ती वाढवणं म्हणजे तलवारीच्या धारेवर चालण्यासारखं होईल. त्यांच्यापासून चार हात दूर असणंच बरं. मी अजिबात गेलोच नाही, तर कदाचित माझी बदनामी होईल, म्हणून मी आपला पायीच जाणार आहे. मला कोणी ओळखणारही नाही. नुसताच अुपस्थिती लावून परत येणार मी. आता राहिली घोडागाडीची गोष्ट. मी आपला साधा शेतकरी आहे. व्यापार करणं मला जमणार नाही." असे म्हणून विनोदचा हा अनाहूत सल्लाही प्रदीपने नाकारला.

"आपण पायी चाललो, तर हरकत नाही. पण आपल्या बायका कशा बरं चालत येतील? तुझी साठी बुद्धी नाठी झालीय." विनोद रागातून म्हणाला.

क्षणभर थांबून प्रदीप म्हणाला, "तुझं मला काही माहीत नाही पण याबाबतीत मी तुझं मत मुळीच विचारात घेणार नाहीय. अुत्सवात भाग घ्यायला तर मी एकटाच जाईन." प्रदीपही चिडलाच.

एक क्षण थांबून विनोद म्हणाला, "शेजारी आहोत एकमेकांचे! काही विषयात का होईना, पण आपल्याला एकमेकांच्या संगतीनं, मिळूनमिसळून रहायला हवं. या अुत्सवात बायको अन् मुलांनाही घेअून जावं असं वाटतंय मला. तुमच्याकडची माणसं न आली तर माझ्याकडचीही यायला तयार होणार नाहीत. तुम्ही याच आमच्या-बरोबर." अन् तो निघून गेला.

पण विनोद अन् प्रदीपच तेवढे जमीन-दाराच्या गावी अुत्सवाला गेले. तिथे खूप गर्दी झाल्यामुळे काही गैरसोयीही झाल्या. ज्या



स्त्रिया आल्या होत्या, त्यांना फारच त्रास झाला. गर्दीत धावपळ झाल्याने काहीजण जखमीही झाले. काहीजण आजारी झाले अन् त्यांना इस्पितळात भरती करावे लागले. त्यासाठी पाहुण्यांच्या बैलगाड्या अन् घोडागाड्यांचा वापर करावा लागला. पाहुणचाराला लागलेल्या खर्चापेक्षाही अधिक रकमेच्या भेटवस्तु जमीनदाराला मिळाल्या.

तिथे रहाणे गैरसोयीचे असल्याचे जाणवल्याबरोबर विनोद व प्रदीपने तेथून काढता पाय घेतला व ते मध्यरात्र होताहोता कुन्दनपुरला पोचले.

कुन्दनपुरात त्यावेळी गडबड अुडालेली होती. आवाज न करता दरोडेखोर गावात घुसल्याचे त्यांना कळले. दरोडेखोरांनी चुपचाप एका घरात घुसून तिजोरी अुघडली. त्यात

काहीही न मिळाल्यामुळे त्यांनी घरातल्या लोकांना मारपीट केली. नंतर ते विनोदच्या घरात घुसले. तिजोरीतून दहा हजार नकद व दोन तोळे सोन्याचे दागिने त्यांने अुचलले. पण ते जेव्हा पळून जाअू लागले, तेंव्हा गावच्या युवसेनेने त्यांना पकडले आणि विनोदच्या घरच्यांना त्यांनी त्यांच्या वस्तु परत मिळवून दिल्या. चोरांच्या हातून मार खाल्लेल्या कुटुंबाची शारीरिक स्थिती नाजुक होती. त्या सर्वांवर अुपचार चालू होते.

हे ऐकल्यावर प्रदीप विनोदला म्हणाला, ''तू मोठा भाग्यवान आहेस बघ.'' ''हे भाग्य नव्हे, माझी बुद्धिमानी आहे!'' विनोद गर्वाने म्हणाला, ''तुझी बुद्धिमानी काय वर्णावी! तुझी बुद्धी तर निरुपयोगी कामात खपत आहे, फुकट जात आहे. तू जोपर्यन्त मला सल्ले देणं सोडणार नाहीस, तोपर्यन्त मी तुझ्या बुद्धिमानीला दाद देणार नाही. तुझं भलं झालंय, ते केवळ भाग्यानंच!'' प्रदीप पुन्हा बोलला.

यावर हसत हसत विनोद म्हणाला, ''तुला सल्ला देत रहाण्यातच माझं कार्य साधलं जातंय. तुला वाटत असेल की मी तुला सूचना, सल्ले देण्याचा प्रयत्न करत असतो. पण वास्तविक एका निराळ्या पद्धतीने मी तुझ्याकडूनच सल्ले मिळवत राहिलो. सावकारी करायची इच्छा होती माझी पण तू मनाई केलीस; घर-जावई आणू पाहिलं, तेंव्हाही तूच मनाई केलीस. चोरांपासून धन कसं वाचवावं हे तूच शिकवलंस. जमीनदाराकडील अुत्सवाबाबत ही मी तुझ्याच सूचना पाळल्या. तू तर समजत राहिलास की मी तुला सल्ले देत होतो, पण हे नाही ओळखलंस की मीच दर वेळी तुझं मत विचारत होतो. यात माझी बुद्धिमानी नव्हती, तर काय होतं?''

प्रदीपचा चेहरा आता मात्र निस्तेज झाला! तो म्हणाला, ''तूच खरा बुद्धिमान आहेस हे कबूल करतो मी. मला नकळत माझ्याकडून सल्ला मिळवत त्याचं पालन करत राहिलास तू. इतकंच नव्हे, तर माझ्या सल्ल्यात काही तथ्य आहे, हे अुघड केलंस तू! यापुढे तू अुघडपणे सल्ला मागितलास तरी अवश्य देईन मी. कारण माझ्या सल्ल्यानं दुसऱ्यांचं भलं होतं, हे आता सिद्ध झालंय.''

तेंव्हापासून विनोद आणि प्रदीपने मरेपर्यन्त अुत्तम शेजाऱ्यांप्रमाणे जीवन व्यतीत केले.







# अनैतिक राज्य

भूपाल देशात अनीती मर्यादेबाहेर पोचली. राज्याचा सगळाच्या सगळा नोकरवर्ग लाचखाअू बनला. परिस्थिती अशी बनली की, लाच दिल्यावाचून कोणतेच काम होईनासे झाले. गुप्तचरांकडून राजाला ही हकिकत कळली अन् त्याने मन्त्र्याला बोलावून सल्ला-मसलत केली.

राजा म्हणाला, ''महामन्त्री, ही हकिकत कळून माझं मन व्याकूळ झालंय. आपण जे काही, जसं कसं करू इच्छाल, तसं करा अन् हा अनीतीचा राक्षस आपल्या राज्यातून पळवून लावा. यासाठी मी आपणाला पंधरा दिवसांची मुदत देत आहे.''

पंधरा दिवसांच्या मुदतीच्या अटीने मन्त्री घाबरून गेला. त्याने नगरातल्या सर्व नोकरांची बैठक बोलावली. आश्चर्य प्रकट करत सर्वजण म्हणाले, ''आपल्या देशात अनीती?'' लाचखोरीचा अन्त करायची सर्वांनीच ताबडतोब शपथ घेतली. ते खोटं बोलत आहेत, नाटक करत आहेत हे मन्त्र्याला समजलेच नाही. आपली प्रतिज्ञा विसरले नाहीत, तरी दुसऱ्या दिवसापासून ते नेहमीप्रमाणेच लाच खाअू लागले. वाघ एकदा माणसाच्या रक्ताला चटावला, की तो आपली सवय थोडीच सोडणार? लाचखाअूपणाही एक अशी सवय आहे, की ती सोडणं नोकरांना शक्य झाले नाही. ते लाच घेतच राहिले.

आपल्या विश्वासू घरगड्यांकडून मन्त्र्याने हे सर्व जाणले. राजवाड्यातून परत येअून या दिशेने काय करावे याबद्दल तो गंभीरपणे विचार करत बसला; लाचखोरीचा अन्त कसा करावा?

नवऱ्याची अुदासी पाहून मन्त्र्याच्या बायकोने कारण विचारले. त्याने राज्यात पसरलेली अनीती व राजाज्ञेची माहिती देत तिला सांगितले, ''राजाने दिलेली मुदत दोन

अश्विनी नारखेडे

दिवसात संपते आहे. अनीती होती तशीच चालू आहे. सर्वचे सर्व नोकर खोटारडे अन् बदमाश आहेत. त्यांची प्रतिज्ञा खोटी अन् नाटकी आहे.''

क्षणभर विचार करून मन्त्र्याची बायको हसून म्हणाली, ''हुं:, इतकी छोटी गोष्ट, अन् तुम्ही इतके त्रासून गेलात? ही कठिण समस्या दूर करायचा मार्ग असा आहे...'' म्हणत तिने नवऱ्याला काय करावे याबद्दल सूचना दिली. तिच्या बोलण्याचा त्याने खूप विचार केला अन् प्राप्त परिस्थितीत त्याशिवाय अन्य मार्ग नसल्याचे ओळखले.

ठरलेली मुदत संपल्याच्या दुसऱ्या दिवशी मन्त्र्याचे अभिनन्दन करत राजा म्हणाला, ''अरे वा! पंधरा दिवसात तुम्ही लाचखाऊ पणाचा राक्षस राज्यातून हद्दपार केलात! अनीती घालवून टाकलीत! उद्या भरसभेत आपणाला 'देशरत्न' पदवी देऊन मी आपला सत्कार करणार आहे.''

मन्त्री आनन्दाने घरी येऊन बायकोचे आभार मानत म्हणाला, ''तू सांगितल्या प्रमाणे राजाला बातम्या पुरवणाऱ्या गुप्तहेरांना भारी बक्षिस देऊन राजाला चुकीची माहिती देण्यात सफल झालो मी. त्यांचं बोलणं ऐकून राजा समजला की पहातापहाता सर्व नोकर सदाचारी बनलेत. त्याच्या दृष्टीनं तर हा चमत्कारच होता! गुप्तहेरांना मी दिलेली रक्कम माझ्या हाताखाली काम करणाऱ्या मुख्य नोकरांकडून मी वसूल केली. त्यानं ती त्याच्या हाताखालच्यांकडून वसूल केली असेल.''

''देशात अनीती इतक्या थराला का गेली, याचा तुम्ही विचार केलात?'' बायकोने त्याला विचारले.

'तूच सांग' असा भाव प्रकट करत मन्त्र्याने बायकोकडे पहाताच ती बोलू लागली, ''अनीतीची राक्षसीण बहुमुखी आहे. राजनीती म्हणजे काय, हे ज्या राजाला कळत नाही, ज्याच्यात शासन चालवण्याची क्षमता नाही, त्याचं सिंहासनावर बसणं - हेच मुळी अनीतीकारक आहे. त्यामुळेच राज्यात अनीती फैलावलीय, तिचा नंगा नाच चाललाय.''

काहीही असो; भूपाल देशच्या सर्व लोकांना अनीतीची सवय लागली. लाच घेणं अन् देणं ही त्यांना अतिसामान्य गोष्ट वाटू लागली.







# सम्राट अशोक

६

(मौर्य चक्रवर्ती बिन्दुसार आजारी असताना, तक्षशिलामधे बंड झाले. बिन्दुसारचा थोरला मुलगा सुशेम याने बंड मोडून काढण्यात जराही रुचि दाखवली नाही. सर्वात लहान अशोक याने मात्र ती जबाबदारी उचलली. थोडेसे सैन्य बरोबर घेऊन जाऊन एकाच दिवसात बंड मोडून काढले. बंडखोरांना मृत्युदंड देऊन तो राजधानीकडे परत निघाला. परत येण्यापूर्वीच त्याला ठार करायची योजना सुशेमने बनवली, पण त्यात तो अयशस्वी झाला.) -यानन्तर

**न**गरसीमेवर घडलेल्या अपघाताचे सविस्तर वर्णन प्रधानमन्त्री भल्लाटक याने राजा बिन्दुसारला सांगितले. याबद्दल आश्चर्य व खेद प्रकट करत बिन्दुसार म्हणाला, ''अपघाताचं वर्णन ऐकून मला धक्काच बसलाय. पण अशोक तर सुरक्षित आहे नं? तो मरतामरता वाचला नं? अशोकचं व्यूह-कौशल्य अन् त्याच्या विजयाचं वर्णन तुमच्या तोंडून ऐकायसाठी मोठ्या उत्सुकतेनं मी तुमची वाट पहात होतो. याबद्दल अशोकची प्रशंसा केल्यावाचून रहावत नाहीय मला! त्याला भेटायला मी फार आतुर होतो; पण ही वाईट बातमी मात्र कानी आली. या अपघातामागे कुणाचा हात आहे; कोणत्या उद्देशाने तो घडवण्यात आला, याची माहिती काढायला हवी.''

प्रधानमन्त्री यावर काहीच बोलला नाही. राजा पुढे बोलू लागला. ''मला असं वाटतंय



की तक्षशिलातील काही बंडखोर इथे राजधानीत हजर असावेत. अशोकनं सहजपणे बंड मोडून टाकल्यामुळे हे लोक नाराज असतील, त्याचा द्वेष करत असतील. अशोकला खलास करायच्या कारस्थानात त्यांचाच हात असला पाहिजे. महामन्त्री, तुमचं काय मत?''

''बांधावरून खडक ढकलणाऱ्यांपैकी काहीजण पकडले गेले आहेत. आपले नगरपालक त्यांची चौकशी करत आहेत. ते कोणत्याही क्षणी इथे येतील.'' मन्त्री अुत्तरला.

''याचा अर्थ असा की, आपण इतर काही लोकांवरही शंका घेत आहात?'' राजाने अुत्सुकतेने त्याच्याकडे पहात विचारले.

''होय महाराज, आपला अंदाज बरोबर आहे.'' प्रधानमन्त्री म्हणाला. त्याचा अन्दाज ऐकून राजा अवाक झाला. अपघाताच्या मुळाशी कोणकोण आहेत, हे जाणायला तो अुत्सुक होता. आपल्या राज्यात असे दुष्ट कोणी असू शकतील, ते राजपरिवाराविरुद्ध काही कारस्थान करत असतील असा त्याने स्वप्नातही विचार केला नव्हता.

त्या विशाल राजमहालात एक भयंकर शांतता पसरली होती. थोड्याच वेळात नगरपालक तेथे आला अन् त्याने राजाला व मन्त्र्याला नमस्कार केला. त्याचा चेहरा अुदास दिसत होता.

राजाने विचारले, ''आपली चौकशी पुरी झाली?''

नगरपालक हळूच अुत्तरला, ''होय महाराज.''

''नाही प्रभु, बांधाचे दगड अुद्दामच ढिले करून तेथे लाकडी फळ्या लावलेल्या होत्या. खालून त्या जराश्या हलवल्याबरोबर वरचे दगड गडगडत सैन्यावर येअून पडले. अशा प्रकारे लाकडी फळ्या लावण्यासाठी खूप कष्ट घ्यावे लागतात. कमीत कमी शंभर माणसे तरी या कामावर लावली असली पाहिजेत. यावरून असं सिद्ध होतं की, या कारस्थानामागे एक सुनिश्चित योजना आहे. शत्रूने मोठ्या हुशारीने योजना बनवली की, लोकांना वाटावं - हा योगायोगानं घडलेला अपघात आहे.'' नगरपालकाने आपले म्हणणे राजासमोर मांडले.

''माझा तर विश्वासच बसत नाहीय. दलनायक आणि आपले काही सैनिक सकाळपासून अुद्यानाजवळच तर होते! त्यांच्यापासून लपून इतक्या मोठ्या संख्येनं लोकांनी हे काम कसं पार पाडलं असेल?'' राजाने विचारले.

''आपल्या दलनायकांपैकीच एकाने त्यांना मदत केली; सर्व प्रकारचं सहाय्य दिलं. त्याच्याच नजरेखाली हे काम केलं गेलं.'' नगरपालक संयत आवाजात बोलला.

''इतकी हिम्मत? आजपर्यन्त मौर्य सेनेच्या कोणत्याही दलनायकानं इतका मोठा राजद्रोह करायचं साहस केलं नाही.'' राजाने आश्चर्य प्रकट केले.

''मौर्य सिंहासनावर बसणाऱ्या भावी युवराजानेच एकाद्या दलनायकाला लालूच दाखवून, प्रलोभन देअून असं काही करायचं ठरवलं, अन् एकादा दलनायक राजद्रोह करू धजला, तर त्यात आश्चर्य ते कसलं महाराज?'' नगरपालक विनयपूर्वक बोलला.

''काय म्हणत आहात तुम्ही?'' राजाच्या आश्चर्याला पारावार नव्हता.

''क्षमा असावी महाराज! माझ्या न्याय्य शोधात मला ज्या खऱ्या गोष्टी समजल्या त्या आपणाला सांगणं हे माझं प्रथमकर्तव्य आहे. त्यामुळे मी जे सांगतो आहे, ते सारं सत्य आहे; केवळ सत्यच ! दुसरं काही बोलायचं साहस नाही माझ्यात!'' नगरपालक ठामपणे बोलला.

थोडा वेळ तिथे अत्यन्त शान्तता पसरली. स्वत:ला सावरत राजा म्हणाला, ''तुम्हावर माझा पूर्ण विश्वास आहे हे सत्य तुम्ही माझ्यापासून लपवलं नाहीत; ते निर्भीडपणे समोर



प्रकट केलंत यासाठी अन् तुमच्या राजभक्तीसाठी मी मन:पूर्वक तुमचं अभिनन्दन करतो.'' राजा बोलला.

''हे सर्व सांगताना माझ्यावर काय बेतलं याचा कोणी अंदाजच करू शकणार नाही. माझं हृदय दु:खानं दबून जात होतं, वेदनेनं तडफडत होतं! तरीही आपलं कर्तव्य निभावण्यासाठी मनावर दगड ठेवून मी इथे आलोय. क्षमा असावी महाराज!'' नगरपालक दबक्या आवाजात बोलला.

इतका वेळ प्रधानमन्त्री मौन राहून दोघांमधील हा संवाद ऐकत अुभा होता. तो नगरपालकाला म्हणाला, ''आपलं हृदय याहूनही कठोर बनवायची वेळ आलेली आहे. आपल्या महाराजांसाठी, आपल्या राज्या-साठी, अन् राजपरिवाराच्या गौरवासाठी,

अपघाताचं हे रहस्य अगदी गुप्तच ठेवायला हवं. या कारस्थानाबद्दल कोणालाही काहीही कळू देता कामा नये. पकडले गेलेले कारस्थानी, ताब्यात घेतलेला दलनायक किंवा यासंबंधित कोणीही माणूस काहीच बोलणार नाही. असं वातावरण निर्माण व्हावं की, जणू काही असा कुठला अपघात घडलाच नाही.'' नंतर तो राजाला म्हणाला, ''माझी अपेक्षा आहे, की महाराजही माझ्या या बोलण्याशी सहमत आहेत!''

राजा बिन्दुसार दु:खभरल्या क्षीण आवाजात म्हणाला, ''महामंत्र्यांची बुद्धिमानी अन् विवेक याबद्दल आदर वाटतोय मला!''

स्वत:शीच बडबल्याप्रमाणे नगरपालक महामन्त्र्याला म्हणाला, ''ते सर्व मिळून शंभरापेक्षा अधिक असतील.'' त्याच्या बोलण्याचा मतलब असा होता की, 'इतक्या सर्वांना चुप तरी कसं ठेवता येईल?'

''असले म्हणून काय झालं? त्यांचं तोंड कायमचं बन्द करा. फाशी द्या त्यांना ! हे काम अुद्या सूर्योदयापूर्वीच व्हावं. सकाळी लोकांना सांगता येईल की, 'अशोकच्या हत्येच्या कारस्थानामागे तक्षशिलाच्या बंडखोरांचाच हात होता. ते सर्व पकडले गेले अन् फाशी दिले गेले', अशी घोषणा करून टाकावी.'' प्रधानमन्त्र्याने गंभीर आवाजात नगरपालकाला सांगितले.

''आपला निर्णय बरोबरच आहे. परंतु'' नगरपालक पुढे काही बोलणार, इतक्यात प्रधानमन्त्र्याने विचारले, ''आपल्या राज्याच्या रक्षणासाठी असंख्य माणसंही मारायला तुम्ही मागेपुढे पहाल? युद्धक्षेत्रात आपण हजारो शत्रुसैनिक मारत नाही? देशरक्षणसाठीच ना? हे दुष्ट तर शत्रूपेक्षाही धोकादायक आहेत. मग तुमचा हा संकोच





कशासाठी?''

''आता कुठल्याही परिस्थितीत माघार घेणार नाही मी.'' दृढ स्वरात नगरपालक म्हणाला, ''अशोक अन् सुशेम यांच्यात वैर आहे, हे तर सर्वांना माहीत आहे; ते एकमेकांना मुळीच आवडत नाहीत, पक्के शत्रु आहेत ते. पण याबाबत लोकांना जास्त स्पष्ट समजलं तर देश छिन्नभिन्न होण्याचा धोका आहे. आता ज्यांना आपण कैद केलं आहे, त्यांना सोडून दिलं, तर ते या अफवा आणखी वाढवूनच पसरवतील; होय ना?'' प्रधानमन्त्र्याने विचारले.

नगरपालक गंभीरपणे म्हणाला, ''आपण सत्यच बोललात!''

आता राजानेही आज्ञा दिली, ''आज मध्यरात्रीच हे काम बेधडक अुरकून टाका.''

नगरपालक राजा व मन्त्र्याला प्रणाम करून तेथून निघून गेला. राजभवनातून बाहेर पडण्यापूर्वीच सुशेम नगरपालकाला गाठून म्हणाला, ''असं ऐकलं की कैद झालेला दलनायक या कारस्थानात माझं नावही गोवतो आहे! खरं आहे हे?'' नगरपालक अुत्तरला, ''होय, तो असंच बोलला.''

''खोटं, साफ खोटं! त्याला मृत्युदंडच मिळायला हवा.'' सुशेम ओरडला.

त्याच्या या बोलण्याने नगरपालकही थोडा वेळ थबकून राहिला. असा कपटी माणूस पुढे आपल्या देशचा राजा बनणार, याचे त्याला फार दु:ख वाटले.

सुशेमने पुन्हा विचारले, ''दलनायकाचं हे खोटं बोलणं महाराजांच्या कानी गेलं?''

''दलनायकाचा प्रत्येक शब्द महाराजांना सांगणं, हे राजकर्मचारी म्हणून माझं कर्तव्य आहे, माझा धर्म आहे युवराज!'' नगरपालक बोलला.

''महाराजांनी खरं मानलं ते?'' सुशेमने





विचारले. "मी याबाबत काहीही सांगू शकत नाही." नगरपालकाने म्हटले.

"अच्छा, आता सांगा, की हे ऐकल्याबरोबर महाराज काय म्हणाले?" जोर देत सुशेमने विचारले.

"हे सांगणं कठीण आहे. पण होय, एक गोष्ट माहीत आहे मला. महाराजांनी असा निर्णय घेतलाय की, दलनायकासहित ज्या दुष्टांनी या कारस्थानात भाग घेतला, त्या सर्वांना मृत्युदण्ड देण्यात यावा."

"फार छान! महाराजांनी हा अद्वितीय निर्णय घेतलाय. पाहिलंत, माझे पिता किती विवेकी आहेत!" असे म्हणून तो आनन्दाने टाळ्या वाजवू लागला.

नगरपालकाला आता मात्र हे असह्य वाटू लागले. पण स्वतःवर ताबा ठेवत तो म्हणाला, "आपण बरोबर बोललात युवराज!"

त्याच वेळी मगध-सेनापती राज-दर्शनासाठी जाता जाता तेथे पोचला. सुशेमला त्याने प्रणाम केला. नगरपालक सेनापतीला नमस्कार करत म्हणाला, "मी आपणाला भेटण्यासाठीच येत होतो.

'इथेच थांबा, आत्ता येतो मी." असे म्हणून सेनापती पुढे जाऊ लागला. "असं ऐकलंय की महाराजांनी आपणाला अन् मला बरोबरच येऊन त्यांना भेटायला सांगितलंय." असे म्हणून नगरपालकही सेनापतीच्या मागोमाग वेगाने जाऊ लागला.

त्यांना पहाताच महाराज म्हणाले, "आपण बरोबरच माझ्याकडे आलात, हे बरं झालं. तुमच्याशी काही जरूरीचं बोलायचं आहे; बसा."

प्रधानमन्त्री, सेनापती व सुशेम आसनांवर बसले. काही क्षणातच सुशेमकडे पहात राजा बिन्दुसार म्हणाला, "मी जे ऐकलं, त्यावर विश्वास बसत नाहीय पुत्रा!"

"आपण काय ऐकलंत, हे मला काहीच माहीत नाही." सुशेम निर्लज्जपणे बोलला.

"तुझ्या या बोलण्यावरही विश्वास नाही माझा. मी काय अैकलंय हे तुला चांगलं माहीत आहे, मी आपल्या तोंडून काही बोलणार नाही; पण काळच काय ते सांगेल. काय करायला हवं, हे तोच सांगेल. आपण आता चालू विषयांवर बोलणं बरं. प्रधानमन्त्री आणि सेनापती यांचं मत आहे की आपल्याच सीमेवर असणाऱ्या मुख्य अवंतीची राजधानी अुज्जयिनी येथे एका युवराजाला राजप्रतिनिधी म्हणून



पाठवणं अुचित होईल. तू आणि अशोक यांच्याशिवाय यासाठी कोणी योग्य नाहीय. आणखीही एक मुख्य गोष्ट आहे, नीट ऐक. आमची इच्छा आहे की, जोपर्यन्त तुम्ही दोघं आपसातलं शत्रुत्व विसरणार नाही, भावाभावांसारखे वागणार नाही, तोपर्यंत तुम्ही एकमेकांपासून दूर रहाणंच बरं, राजपरिवाराला ते श्रेयस्कर होईल.''

सुशेम गप्प राहिला.

राजाले विचारले, ''तू जाशील अुज्जयिनीला?''

सुशेम अुत्तरला, ''नाही, मी इथेच रहाणार.''

''ज्येष्ठ पुत्र आहेस म्हणून प्रथम तुला निवडीचा अधिकार दिला. अशोकनंच तिकडे जावं. तो माझी आज्ञा नक्कीच पाळेल. तू जाअू शकतोस आता.'' राजाने म्हटल्यावर सुशेम तेथून निघून गेला. त्याला राग आला होता की, राजाच्या दृष्टीने तो युवराज नसून केवळ ज्येष्ठ पुत्रच फक्त होता! वेगाने तो बाहेर निघून गेला.

''महाराज, मला कृपा करून फक्त एकदाच युवराज सुशेमला भेटायची संधी दिली जावी. या स्थितीत तेच मला वाचवू शकतील. मी कसलंही पाप केलेलं नाहीय. त्यांनी सांगितलं, तेच फक्त मी केलं.'' कैदी दलनायक गयावया करू लागला, पाय पकडू लागला. दलनायकाबरोबरच बाकीच्या शंभर कैद्यांनाही वध-स्थानी नेण्यात आले.

त्यांचे काकुळतीचे बोलणे ऐकून-ऐकून नगरपालक त्रासून गेला. तो त्यांना म्हणाला, ''त्या युवराजांनीच तुम्हाला मृत्युदंड सुनावला आहे. तुम्ही आपले अखेरचे क्षण मोजत असताना तुम्हाला खोटं सांगायची गरज नाही.''

''काय म्हणालात? युवराज सुशेमनं मला मृत्युदंड दिला?'' असे विचारत दलनायक विलाप करू लागला.

''त्यांचं असं म्हणणं आहे की तूच त्यांना कारस्थानात ओढलंस.'' नगरपालक म्हणाला, ''देवा! हा काय अन्याय? सुशेमचा सर्वनाश होईल! माझ्यावर ओढवलला प्रसंग त्याच्यावरही ओढवेल.'' अन् तो रडत असतानाच बध्यस्थानी त्याच्या गळ्यावर तलवारींचा वार झाला!

क्रमशः





# मोठेपणा

दृढ निश्चयी विक्रमराजा पुन्हा झाडाकडे गेला. फान्दीवर लटकणारे प्रेत खाली काढले आणि ते खांद्यावर टाकून तो स्मशानाची वाट चालू लागला. त्याबरोबर प्रेतातला वेताळ बोलू लागला, ''राजा, ही ऐन मध्यरात्रीची वेळ आहे अन् शिवाय ही जागा म्हणजे स्मशान आहे; इथे भुताप्रेतांचा सतत निवास असतो. तू प्रत्येक वेळी आपलं ध्येय साधायचा अटोकाट प्रयत्न करत आहेस, पण प्रत्येक प्रयत्न वाया जात आहे. तरीही या पराजयाने नाअुमेद न होता, अुलट तू दुप्पट अुत्साहानं पुन्हा ध्येयसिद्धीसाठी तयार होतो आहेस. तुझा हा अथक प्रयत्न खरोखर स्तुत्य आहे. पण माणसाची ज्ञान-अज्ञान, सत्य-असत्य पारखण्याची शक्ती लुप्त होते, साध्य-असाध्याच्या शोधात असफल होते, तेंव्हा त्याचे प्रयत्न हट्टात परिवर्तित होण्याची शक्यता असते. श्रम व सहनशक्ती जडतेत

## वेताळ कथा



परिवर्तित होण्याचा धोका संभवतो. अुदाहरणादाखल मी तुला गोपाळची गोष्ट सांगतो; ऐक लक्षपूर्वक.'' अन् वेताळ गोष्ट सांगू लागला. -

गोपाळ फार चांगला माणूस आहे, असे सर्वजण म्हणत. मधुरवाडीतल्या प्रत्येकाचे त्याच्यावर प्रेम होते. पण गोपाळची तीव्र इच्छा होती की, आपण सर्वांपेक्षा आणखी 'चांगला' म्हणवला जावे आणि खूप धन कमवावे. याबद्दल अधिक माहिती मिळवण्यासाठी तो प्रथम आपल्याच गावच्या प्रसिद्ध रामशर्मा नावाच्या पंडिताकडे गेला.

रामशर्माने आठवडाभर गोपाळच्या ज्ञानाची परीक्षा घेतली, त्याला निरनिराळे धडे शिकवून ते पाठ करायला लावले आणि नन्तर तो गोपाळला म्हणाला, ''हे बघ मुला, तुझ्यात पंडित बनायची लक्षणं दिसत नाहीत; पण तुझा आवाज मात्र मोठा मधुर आहे. त्रिपुरा नगरीत रागी नावाचा प्रसिद्ध संगीत विद्वान आहे. त्यांच्याकडे जा तू. ते तुला संगीत शिकवतील.''

गोपाळ त्रिपुरानगरीला जाऊन रागीला भेटला. एक आठवडा संगीत शिकवल्यावर रागी त्याला म्हणाला, ''शिष्या, तुझा आवाज तर सुस्वर आहे, पण मला आश्चर्य वाटतंय की तुझ्या तोंडून फक्त गोड शब्दच बाहेर पडत आहेत, सुस्वर गाणी म्हणता येत नाहीत तुला! संगीत शिकण्याची योग्यता तुझ्यात नाही. पण तुझी ही सुंदर लांबसडक बोटं चित्रकलेत सफल होतील. विजयपुरमधे सुरेख नावाचा एक मोठा चित्रकार आहे. त्याच्याकडे जाऊन तू चित्रकलेत पारंगत व्हायचा प्रयत्न कर.''

एक आठवडाभर गोपाळला चित्रकला शिकवायचा प्रयत्न केल्यावर सुरेख त्याला म्हणाला, ''मित्रा, चित्रकलेत कल्पनाशक्ती असायची गरज असते. तो जे दृश्य पाहील, ते त्याच्या बारकाव्यांसह आठवणीत ठेवायला हवं. तरच चित्रकार चांगल्यांत चांगलं चित्र रेखाटू शकेल. तुझी कल्पना शक्ती काही खास नाहीये. काही दिवस कल्पनाशक्ती वाढवणं अन् तिला नीट रूप देण्यासाठी भरपूर प्रयत्न करायला हवेत. त्यासाठी पांडित्याची गरज आहे. मधुरवाडीत रामशर्मा नावाचा एक महापंडित आहे. काही दिवस तू त्याच्या सेवेत रहा.''

आपण मधुरवाडीचेच रहिवासी असून रामशर्मानं 'तू पंडीत बनू शकणार नाहीस'





असे म्हटल्याचे सांगायला गोपाळला संकोच वाटला. सुरेखजवळ आपली कृतज्ञता व्यक्त करून गोपाळने विजयपुरला 'रामराम' केला. 'या जन्मी आपण 'मोठा' माणूस बनूच शकणार नाही' असे वाटून तो खूपच निराश झाला.

आपल्या गावच्या सरहद्दीवर पोचल्यावर 'मला वाचवा, मला वाचवा' असे कोणी ओरडत असल्याचे त्याला ऐकू आले. आवाजाच्या रोखाने गेल्यावर रस्त्याकडेच्या एका खड्ड्यातून आवाज येत असल्याचे त्याच्या लक्षात आले. त्याने वाकून पाहिले; खड्डा खोल असून आत एक माणूस होता. गोपाळने आपला हात पुढे केला, पण तो त्या माणसापर्यन्त पोचू शकला नाही.

''मी तुला मदत करतो, घाबरू नकोस. आसपास झाडाची एकादी फांदी किंवा दोरी मिळते का, हे पहातो.'' गोपाळ त्याला धीर देत म्हणाला.

''तुझं इतकं आश्वासनही पुरेसं आहे मला'' असे म्हणत, तो माणूस स्वतःच बाहेर आला; आणि तो खड्डा आपोआप मातीने भरून गेला.

''तुझ्यात काही शक्ती असाव्यात असं दिसतंय. मग आपल्या रक्षणासाठी अुगीच ओरडत का होतास?'' गोपाळने त्याला आश्चर्याने विचारले.

तो माणूस हसत म्हणाला, ''मी एक संन्यासी असून माझ्यात काही अद्भुत शक्ती आहेत. प्रत्येक दिवशी एकाद्या चांगल्या माणसाची एक इच्छा मी पुरी करत असतो. त्यासाठी मुद्दामच एक खड्डा निर्माण करून त्यातून ओरडत रहातो मी. जो कोणी चांगला भाग्यवान असेल, तो आपसूकच येतो माझ्याकडे. आज तूच तो 'भाग्यवान' सापडलास. बोल, काय पाहिजे तुला?''

खोल श्वास घेत गोपाळ म्हणाला, ''मोठा अन् धनवान माणूस बनायची माझी इच्छा आहे. त्यासाठी हरतऱ्हेचे प्रयत्न केले मी.''

नंतर संन्याशाला त्याने आपली हकिकत सांगितली.

गोपाळच्या डोक्यावर हात ठेवून संन्यासी म्हणाला, ''या क्षणापासून कोणाही पंडिताला हरवण्याची शक्ती तुला प्राप्त होईल. संगीत अन् चित्रकलेतही तुझ्याशी कोणी बरोबरी करू शकणार नाही. हा माझा आशिर्वाद आहे तुला.'' गोपाळने त्याला साष्टांग नमस्कार केला आणि अुठून अुभा राहिला. तेंव्हा



संन्यासी त्याला म्हणाला, ''तू आपल्या मोठेपणाच्या आधारानंच धन कमावू शकशील. ही गोष्ट नीट लक्षात ठेव.''

यानन्तर गोपाळ प्रथम रामशर्माला भेटला. तो त्याला म्हणाला, ''महाराज, आपण म्हणाला होता की मी पंडित बनू शकणार नाही. आपणाला माहीतच असेल की, खूप पूर्वी विष्णुशर्मा नामक पंडिताने पंचतन्त्र कथांच्या आधारे मूर्ख अन् नालायक राजकुमारांना विवेकशील बनवलं. दृढनिश्चय असणारा पक्का शिष्य शिकू शकणार नाही, अशी कोणतीच विद्या नाहीय. मला वाटतं की, कसली कमतरता माझ्यात नसून आपणातच आहे. मी काही प्रश्न विचारतो, त्यांची अुत्तरं द्या बरं!'' असे म्हणून त्याने रामशर्माला काही प्रश्न विचारले.

रामशर्माला एकाही प्रश्नाचे अुत्तर देता येईना. तेंव्हा रागाने तो म्हणाला, ''तू तरी या प्रश्नांची अुत्तरं देअून दाखव बरं?'' गोपाळने ताबडतोब सगळी अुत्तरे पटापट सांगितली. तेंव्हा चकीत होअून शर्मा म्हणाला, ''तुझं पांडित्य असामान्य आहे! इतकं ज्ञान प्राप्त करणं, मला तर जन्मभर शक्य होणार नाही.'' गोपाळ तेथून निघून त्रिपुरानगरला गेला आणि रागीला भेटला. त्याने रागीला एक गीत गायला सांगितले. अन् म्हटले, ''मी तुमच्या गाण्यातल्या चुका काढून दाखवतो.''

रागीने खूपच सुंदर रागदारी गाअून दाखवली. पण गोपाळ ताबडतोब म्हणाला, ''अशिक्षितांना हे गाणं कदाचित आवडेल; पण तुमच्यासारख्या विद्वानानं या पद्धतीनं गाअू नये.'' अन् त्याने तेच गाणे सुधारून गाअून दाखवले.

मुग्ध होअून हात जोडत रागी म्हणाला, ''तू महान आहेस. मी जन्मभर साधना केली तरी असं गाअू शकणार नाही. तुझ्या बाबत मी पूर्वी बोललेलं विसरून जा अन् मला क्षमा कर.''

यानन्तर गोपाळ विजयपुरच्या सुरेखकडे गेला अन् त्याने सुरेखची चित्रे सुधारून दाखवली. तेंव्हा आपल्याच चित्रातली अद्भुत छटा पाहून चकित झालेला सुरेख म्हणाला, ''पुत्रा, तुझ्यात दैवी अंश आहे. या लोकात कोणीही तुझ्यासारखी चित्रे काढू शकणार नाही.''

आता गोपाळला पटले की आपण खूपच 'मोठा माणूस' झालो आहोत. या मोठेपणाचा



अुपयोग करून त्याने धन कमवयण्याचे ठरवले. विजयपुरमधे विमलानन्द नावाचा एक धनवान असून तो पंडितांचा फार आदर करत असे. त्याच्याकडे जाअून गोपाळने आपले पांडित्य-प्रदर्शन केले.

गोपाळबद्दलची सर्व माहिती मिळवून विमलानन्द म्हणाला, ''आर्य गोपाळ, आपणासारख्या पंडिताच्या दर्शनाने माझा जन्म सार्थक झाला. मी आपणाला भेट म्हणून एक अशी वस्तु देतो की, आजपर्यन्त तशी वस्तु कोणालाच मी दिली नाही.'' अन् त्याला एक ताडपत्र देत तो पुढे बोलला, ''खुद्द वेदव्यासांनी लिहायला सांगितलेल्या विघ्नेश्वराने स्वत:च्या अक्षरात लिहिलेल्या महाभारताच्या ताडपत्रांपैकी हे एक पान आहे केवळ पूर्वजन्मीच्या सुकृतामुळेच माझ्या पूर्वजाला हे प्राप्त झालंय अन् पिढ्यान् पिढ्या आम्ही ते जतन करत आलोय.''



पण ते ताडपत्र मिळून गोपाळ मात्र निराश झाला. तो विमलानन्दला म्हणूही शकेना की, आपल्याला या ताडपत्राऐवजी धन हवंय. तो तेथून निघाला तेंव्हा विमलानन्द म्हणाला, ''आर्य, शेजारच्या गावात माझे ज्येष्ठ बन्धु भ्रमरानन्द रहातात. संगीत हा त्यांचा प्राण आहे. आपण त्याही विद्येत पारंगत आहात. तेंव्हा आपण जसं आपल्या पांडित्यानं मला संतुष्ट केलंत, तसंच त्यांनाही आपल्या संगीतानं संतुष्ट करावं अशी माझी विनंती आहे.''

गोपाळने भ्रमरानन्दला भेटून आपली संगीतकला दाखवली. अतिशय आनन्दित होत तो म्हणाला, ''आपणासारखा महोन्नत संगीतज्ञ या पृथ्वीतलावर दुसरा कोणी असेल असं वाटत नाही मला! भेटीदाखल काहीही दिलं, तरी ते आपल्या प्रतिभेपुढे तुच्छच ठरेल. आतापर्यन्त कुणाला दिली नाही अशी भेटवस्तु मी तुम्हाला देत आहे.'' अन् काशाची छोटीशी डबी त्याने गोपाळच्या हाती दिली.

पिढ्यान्‌पिढ्या भ्रमरानन्दचे पूर्वज ही डबी फार महत्वाची वस्तु मानत आले होते. डबीचे झाकण अुघडून कानापाशी धरली की त्यातून नादब्रह्म त्यागराजच्या आवाजातील संगीत ऐकू येत असे. मनात एखादा राग ऐकायची अिच्छा आणली की, त्यातून तोच राग ऐकू येई.

आपल्याला ती डबी नको असून धन पाहिजे, असे गोपाळ बोलू शकला नाही. आपल्या दुर्भाग्याबद्दल स्वत:ला दोष देत



त्यांचा निरोप घेऊन गोपाळ तेथून बाहेर पडला. तेंव्हा भ्रमरानन्द गोपाळला म्हणाला, ''महाशय, माझे ज्येष्ठ बन्धु चित्रानंद शेजारच्या गावात रहातात. आपण आपल्या चित्रकलेद्वारा त्यांना मुग्ध कराल असं वाटतंय मला. कलेत प्राण फुंकायची क्षमता आहे त्यांची.''

चित्रानन्दही गोपाळच्या कलेवर फार संतुष्ट झाला. त्यानं अजिण्ठ्याच्या चित्रकाराने काढलेले एक चित्र त्याला भेट दिले. इतक्या वर्षानन्तरही त्यातील रंग जराही फिके पडले नव्हते चित्र तर वर्णनातीत अद्भुत होते. असंतुष्ट गोपाळ चित्रानन्द कडेही धन मागू शकला नाही. तो तेथून निघाला तेंव्हा चित्रानन्द त्याला म्हणाला, ''महाशय, अपार धन देऊन आपला सत्कार करायची शक्ती केवळ आपल्या राजातच आहे. आपण राजाला जाऊन भेटावं, अशी माझी इच्छा आहे. आपणासारखे कलाकार धनाच्या मोहात फसत नाहीत, हे माहीत आहे मला. पण राजाकडून सत्कार होणं हा कलाकाराचं गौरवचिन्ह आहे.''

त्याच्या बोलण्यावरून गोपाळला धन कमवायचा अुपाय समजला. तो ताबडतोब राजधानीला जाऊन एका धर्मशाळेत राहू लागला. तिथे त्याला रामशर्मा, रागी आणि सुरेखही दिसले.

तेथे गोपाळला समजले की, त्या देशच्या राजाने देशातील कलाकारांच्यात एक स्पर्धा आयोजित केली आहे. अुत्तम कलाकारांचा तो मोठ्या प्रमाणावर सत्कार करणार आहे. ते तिथे या स्पर्धेत भाग घेण्यासाठी आले होते. पण गोपाळला पाहून ते नाअुमेद झाले. ते म्हणाले, ''जगात आम्ही कुणाशीही स्पर्धा करू शकू; पण तुम्ही त्यात भाग घेतलात, तर त्याचं फळ काय मिळणार, हे तर आम्हाला आधीपासूनच कळलंय. आता आम्ही परत फिरावं, हेच बरं.''

ते तिघे आपल्या प्रयत्नांनी आपापल्या कलेत निष्णात बनले; पण गोपाळ केवळ आपल्या भाग्यानेच प्रवीण बनला होता. गोपाळने याबाबत खूप विचार केला अन् एक निश्चय करून तो तिघांना म्हणाला, ''तुम्ही तिघं मला गुरू सारखे आहात. तुमच्यामुळेच मी या अुन्नत स्थानी पोचलोय. मी स्पर्धा फक्त पाहीन; भाग नाही घेणार त्यात. पण हाँ, तुम्ही लोक पराजित झालात, तर मात्र जिंकणारांना मी भिडेन.''



त्याच्या बोलण्यामुळे रामशर्मा, रागी आणि सुरेख फार संतुष्ट झाले. गोपाळला स्पर्धेत अुतरायची गरज पडलीच नाही, कारण तिघेही आपापल्या विद्येत विजेते ठरले. तिघांनी बाकी सर्वांना हरवले आणि प्रत्येकाला एक-एक लाख अशर्फ्या बक्षिस मिळाल्या.

तेथून निघण्यापूर्वी तिघांनीही गोपाळला थोडेथोडे धन देऊ केले. परन्तु ''ज्याच्या भाग्यात जे लिहिलेलं असतं, तेच त्याला मिळतं. दान म्हणून तुम्हाकडून काही घ्यावंसं वाटत नाही मला.'' असे म्हणून गोपाळने ते नाकारले.

''हे धन तुम्ही दान म्हणून नका घेऊ. त्याच्या बदल्यात मदत म्हणून आम्हाला काहीतरी द्या'' तिघेही म्हणाले.

असे म्हणण्यात त्यांची अशी इच्छा होती की, गोपाळकडून आपल्याला आपापल्या विद्येतलं आपणाला माहीत नसलेलं ज्ञान घेऊन स्वतःच्या ज्ञानात भर घालावी.

परन्तु गोपाळ त्याचा अर्थ काही निराळाच समजला आणि म्हणाला, ''माझ्याजवळ जे आहे, ते म्हणजे वेदव्यासांचं ताडपत्र, त्यागराजांची काशाची डबी अन् अजिंठ्याचं चित्र! याशिवाय माझ्याजवळ दुसरं आहेच काय?''

गोपाळने त्या अपूर्व वस्तूंची नावे सांगताच तिघेही आश्चर्यात बुडाले; आणि म्हणू लागले, ''या तर अमूल्य वस्तु आहेत! अपार धन देऊनही त्या खरीदता येणं अशक्य! आम्ही तिघं या तीन लाख अशर्फ्या देऊन टाकतो तुम्हाला. वस्तु द्या आम्हाला!'' ते याचना करू लागले.



आता गोपाळ विचारात पडला. तो म्हणाला, ''आपण तलावाकिनारीच्या वडाखाली बसूया जरा वेळ. तिथेच मी आपला निर्णय सांगेन तुम्हाला, ''चौघेही वडाकडे निघाले. गोपाळ मनोमन विचार करू लागला कि, काय करावे आता? झाडाखाली बसल्याबरोबर तो म्हणाला, ''संन्याशाच्या बोलण्याचा गूढार्थ आता माझ्या ध्यानात येत आहे. तो कोण होता वगैरे विचारू नका मला. तुम्ही खरेखुरे कलाकार आहात. या अपूर्व वस्तु तुमच्या जवळ सुरक्षित रहाणं हेच बरं!'' त्याने ताडपत्र, डबी अन् चित्र त्यांच्या सुपुर्त केले आणि तीन लाख अशर्फ्या घेऊन तो आपल्या गावाकडे निघून गेला.

इतकी गोष्ट सांगून वेताळ विक्रमला म्हणाला, ''राजा, गोपाळची खूप धन

कमवावं आणि 'मोठा' माणूस म्हणवून घ्यावं अशी तीव्र इच्छा होती. त्यासाठी तो अनेकांच्या आश्रयाला गेला आणि शेवटी संन्याशाच्या आशिर्वादाच्या बळावर त्यानं मोठमोठ्या पंडितांनाही हरवायची शक्ती मिळवली. परन्तु त्यानं तिचा अुपयोग योग्य प्रकारे, योग्य वेळी केला नाही असं दिसतंय. राजाने कलाकारांमधे ठेवलेल्या स्पर्धेत तो सर्व पंडितांना सहजपणे हरवू शकला असता. पण ती संधी त्यानं हातची घालवली. या सुसंधीचा फायदा घेतला असता, तर त्याला अगणित बक्षिसं मिळाली असती. धनवान बनून तो आपलं स्वप्न पुरं करू शकला असता. शेवटी तर त्यानं मिळालेली बक्षिसंही पंडितांना देअून टाकली आणि त्यांच्याकडून तीन लाख अशर्फ्या घेअून संतुष्ट झाला. या सर्वाच्या मुळाशी आहे त्याचा विवेक अन् तार्किक दृष्टीचा लोप! माझ्या या शंकांचं अुत्तर माहीत असूनही दिलं नाहीस तर, तुझ्या मस्तकाच्या चिंध्या अुडतील.''

विक्रम म्हणाला, ''संन्याशानं गोपाळला आशिर्वाद देअून म्हटले की, मोठमोठ्या पंडितांनाही हरवण्याची शक्ती अन् सामर्थ्य मी तुला देत आहे! पण त्याबरोबरच याला इशाराही दिला की, धन कमवण्याविषयी काही नियमांचं तुला पालन करावं लागेल. त्यानं सांगितलं की तू आपल्या पांडित्याच्या बळावर नव्हे, तर व्यक्तिगत मोठेपणा, भलेपणा, चांगुलपणा आणि सद्व्यवहाराच्या जोरावरच धन कमवू शकशील. मनात असतं तर तो राजानं घेतलेल्या स्पर्धेत भाग घेअून रामशर्मा, रागी व सुरेखला हरवू शकला असता. पण तसं न करून त्यानं आपला मोठेपणा शाबित केला. आपणाजवळ असलेल्या वस्तु खऱ्या कलाकाराजवळच बऱ्या रहातील. त्यांच्या दृष्टीनं त्या वस्तु धनापेक्षाही महान् आहेत. गोपाळचं कृत्रिम पांडित्य पंडितांना हरवू शकतं, पण ते त्याला कलाकार नाही बनवू शकत, त्याला कलादृष्टी नाही देअू शकत. तेंव्हा न्याय्य हेच की त्या वस्तु खऱ्या कलाकारांजवळच असाव्या. शेवटी त्याचा विवेक जागा झाला अन् धन घेअून संतुष्ट होअून तो निघून गेला.''

वेताळ राजाचे मौन भंग करण्यात यशस्वी झाला आणि शवासहित पुन्हा गायब होअून पुन्हा झाडावर जाअून बसला.










# आन्ध्रच्या किनाऱ्या किनाऱ्याने

शब्दांकन : मीर नायर ✱ चित्रकला : के एम गोपकुमार

मच्छलीपट्टणच्या अुत्तरेला गोदावरीने बनवलेला त्रिभुजप्रदेश आहे. गोदावरी ही दक्षिणेतील सर्वात जास्त लांबीची नदी असून तिला 'दक्षिण गंगा' असे म्हटले जाते. पूर्वीची फ्रेंचांची वसाहत 'यानम' ही या त्रिभुजप्रदेशाच्या ईशान्य टोकावर आहे.

यानम ही केवळ २४ वर्गमैल क्षेत्रफळाची वसाहत असून पूर्वी ही फ्रेंचांची वसाहत होती. आता हा पांडीचेरीच्या संघराज्याचा भाग आहे.

जरा आणखी अुत्तरेला सर्पपुरम गाव आहे - सापांची नगरी. येथील भावनारायण स्वामींचे मन्दिर प्रसिद्ध आहे. त्याबद्दल अशी कथा आहे.

सर्पराज अनंत शेषनागाची माता एकदा इतकी रागावली की तिने समस्त सर्पजातीला एक भयानक शाप दिला. त्याच्या परिणामाने सर्व साप एका यज्ञात जळून मेले. त्यावेळी अनंत मात्र यात्रेसाठी दूर गेलेला होता. होता. परत आल्यावर ही घटना ऐकून त्याला फार दुःख झाले. त्याने सर्व साप पुन्हा जिवन्त व्हावेत म्हणून भगवान विष्णूंची स्तुति करत अुग्र तप केले. त्याच्या तपाने प्रसन्न होअून, त्याने मनात कल्पना केलेल्या रूपातच विष्णुभगवान त्याच्यासमोर प्रकट झाले. नंतर ज्या रूपात विष्णु दिसले त्याच रूपातली एक मूर्ती शेषनागाने बनवून घेतली व एक मंदिर बांधले. त्या मूर्तीला 'भाव नारायण स्वामी' असे नामाभिधान प्राप्त झाले, कारण ती कल्पनेत पाहिलेल्या रूपासारखी होती.

काकी नाडाचे मच्छीमार बन्दर



अुत्तरेला आणखी थोडे पुढे गेल्यावर आपण काकीनाडाला पोचतो. इंग्रज त्याला बराच काळपर्यन्त कोकोनाडा म्हणत असत. हे एक लहानसे बन्दर असून, येथून कापूस, भुईमूग, साखर व तंबाखू निर्यात केली जाते. १९२३ मधे येथे खिलाफत आन्दोलनाचे नेता मौलाना महम्मद अली यांच्या अध्यक्षते खाली कॉंग्रेसचे महत्वाचे अधिवेशन घेण्यात आले होते.

तटवर्ती शहर 'द्राक्षाराम' हे काकीनाडापासून १८ कि.मी. अुत्तरेला आहे. स्थानीय विश्वासानुसार याचे मूळ नाव दक्षाराम - (दक्ष+आराम) म्हणजेच 'दक्षाचा बगीचा' असे होते. दक्ष प्रजापतीने येथे एक यज्ञ केला होता.



द्राक्षाराम मन्दिर

पुराणांप्रमाणे - दक्ष प्रजापतीची कन्या दाक्षायणी वा सती हिने पित्याच्या इच्छेविरुद्ध शिवाशी विवाह केला. एकदा दक्षाने खूप मोठा यज्ञ केला आणि मुद्दामच आपल्या मुलीला व जावयाला आमन्त्रण दिले नाही. दाक्षायणीची यज्ञाला जायची इच्छा होती आणि हट्टाने ती अेकटीच यज्ञाला गेली. पित्याने तिची अुपेक्षा केली, इतकेच नव्हे, तर शिवाबद्दल अपमानकारक शब्दही अुच्चारले. दाक्षायणी पतीचा हा अपमान सहन करू शकली नाही. आणि तिने यज्ञकुंडात अुडी घेतली व जळून मरून गेली. ही वार्ता कळल्यावर शिव अतिशय क्रुद्ध झाले. त्यांच्या क्रोधाच्या अुष्णतेमुळे त्यांच्या शरीरातून घाम वाहू लागला. त्या घामातून शिवाचा गण वीरभद्र याचा जन्म झाला. त्याने आपल्या स्वामींच्या अपमानाचा बदला घेण्यासाठी दक्षाचा वध केला.

असे मानले जाते की द्राक्षाराम मन्दिरापासून प्रेरणा घेअून तेलगु कवि श्रीनाथ याला आपले काव्य 'भीमखंडम' लिहिण्याची प्रेरणा मिळाली. तेलगुमधे मौलिक रचनेची सुरुवात या श्रीनाथपासूनच झाली असे मानले जाते.

एक मोठी मनोरंजक हकिकत अशी की, या मंदिराच्या प्रांगणातच एक मुसलमान संत सैयद शहा भाजी औलियाचे थडगे आणि एक मशीदही आहे.



राजमुन्द्रीचा रेल्वेरस्त्याचा पुल

राजमुन्द्री किंवा राजमहेन्द्रवरम् हे काकीनाडाच्या पश्चिमेला त्रिभुजप्रदेशाच्या सुरुवातीलाच गोदावरी किनाऱ्यावर वसलेले शहर आहे. इथले गालीचे आणि चंदनाच्या बनवलेल्या वस्तु प्रसिद्ध आहेत. येथे गोदावरीवर असलेला ५६ स्पॅनवाला पुल भारतातला नंबर दोनचा लांब पुल आहे. राजमुन्द्रीचा संबंध महाकवि नन्नय यांच्याशीही आहे. नन्नयने तेलगुतले पहिले महाकाव्य 'आन्ध्र महाभारतमु' लिहिले.

तटाला समांतर बनवलेल्या सडकेने जाअून आता आपण विशाखपट्टणला पोचतो. हे पश्चिम युरोपमधील रॉटरडॅम आणि पूर्व आशियातील टोकियो यांच्या मधले सर्वात मोठे व सर्वात खोल असे बन्दर आहे. येथे समुद्रतटावर वीरतेचे दैवत वैशाखदेवाचे मन्दिर आहे. विशाखापट्टण हे नावही या देवावरूनच पडले आहे असे स्थानिक लोक मानतात.

विशाखपट्टणचे जहाज-निर्मितीचे यार्ड



विशाखपट्टण प्रथम एक छोटेसे मच्छीमार गाव होते. इंग्रजांनी बंदराच्या रूपात त्याचा विकास केला. आज हे एक मोठे गजबजलेले औद्योगिक शहर आहे. देशातला सर्वात मोठा जहाज-निर्मिती चा कारखाना 'हिन्दुस्तान शिपयार्ड लिमिटेड' हा येथेच असून त्याची स्थापना १९५२ मधे झाली.

शहरातले सर्वात प्रसिद्ध स्थळ आहे - डॉल्फिन्स नोज. हा ३५८ मी.अुंच आणि समुद्रात पाचरीसारखा घुसलेला एक खडक आहे. याचा आकार डॉल्फिनच्या तोंडासारखा आहे त्या विशाल खडकावरच येथील दीपस्तंभ बनलेला आहे. याचा प्रकाश समुद्रात ६५ कि.मी. पर्यन्त दूर दिसू शकतो. हा भारतातला सर्वात अधिक शक्तीचा दीपस्तंभ आहे.

विशाखपट्टणचे जुळे मानले जाणारे वॉल्टेअर शहर केवळ ३ कि.मी. अंतरावर आहे. अुत्तम हवापाण्यामुळे हे स्वास्थ्यवर्धक स्थान मानले जाते. आन्ध्र विश्वविद्यालय इथेच आहे. विशाखपट्टण सोनेरी रेतीच्या सुन्दर वाळूतटांबद्दल प्रसिद्ध आहे. त्यात मुख्य आहेत रामकृष्ण मिशन बीच, ऋषिकोंडा बीच आणि लॉसन्स बे.

सिंहाचलमूची टेकडी विशाखपट्टणपासून १६ कि.मी. दूर असून एक प्रसिद्ध तीर्थस्थान आहे. त्याच्या शिखरावर विष्णूच्या चौथ्या अवताराचे - सिंह भगवानाचे देअूळ आहे. ते ११ व्या शतकात बनवले गेले



डॉल्फिन्स नोज

होते.

पुराणात अशी कथा आहे की, दैत्यांचा राजा हिरण्यकशिपु हा आपला पुत्र प्रह्लाद विष्णुभक्त असल्यामुळे त्याच्यावर नाराज होता. त्याने त्याची विष्णुभक्ती सोडवायचा खूप प्रयत्न केला, परंतु सफल होऊ शकला नाही चिडून त्याने प्रह्लादला समुद्रात फेकून दिले; आणि वर सिंहाचलची टेकडी ठेवली. उद्देश असा की प्रह्लाद दबून मरून जावा. यामुळे विष्णु रागावले आणि नरसिंहाच्या (अर्धा माणूस व अर्धा सिंह) रूपात सिंहाचलाच्या एका टोकावर उभे राहिले. त्या वजनाने टेकडीची एक बाजू खाली दबली व दुसरी वर आली-व तेथून प्रह्लाद बाहेर आला. त्यानन्तर हिरण्यकशिपूचा पाठलाग करून नरसिंहाने त्याचा संहार केला. पण त्यानन्तरही त्याचा क्रोध शान्त न झाल्याने शिवाने शरभ पक्ष्याचे रूप घेऊन त्याचा राग शान्त केला.

देवाला पूर्ण शान्त करण्यासाठी सिंहाचलमच्या नरसिंह-मूर्तीवर चंदनाचा जाड लेप चढवला जातो. लेपाचा थर वर्षातून एकदाच ऍप्रिल - मे मधे चन्दनयात्रेच्या उत्सवात काढला जातो. त्यावेळी साऱ्या देशातील भक्त देवदर्शनासाठी सिंहाचलमला जातात.



लॉसन्स बे







# स्वप्न खरे झाले

किरीटचे आईबाप त्याच्या लहानपणीच मरून गेले. आजोबांनी खूप मेहनत करून त्याचे पालन पोषण केले. अठरा वर्षांचा झाला तरी आजोबांच्या लाडांमुळे त्याला जबाबदारी ची जाणीव नव्हती अन् घरची परिस्थितीही कळत नव्हती. आजोबा अचानक आजारी पडले. ते सारा दिवस खाटेवर पडून असत. त्यांच्या औषधपाण्यालाही पैसे नाहीत, हे ध्यानात आले, तेंव्हा कोठे किरीटला घरची परिस्थिती समजली.

पैशांची तीव्र गरज वाटली, तेंव्हा घर विकण्यावाचून किरीटला दुसरा मार्ग दिसेना. त्याच्या आजोबांनी हरकत घेतली अन् ते म्हणाले, "आता मी वाचणार नाही नक्की! जास्त दिवस उरले नाहीत माझे. रहातं घर विकून बसलास, तर अनेक संकटं येतील तुझ्यावर!"

"पण आजोबा, तुमच्यावाचून मी जगू तरी कसा शकेन? धन कमावण्याचे मार्ग सापडतील, पण मेल्या माणसाला जिवन्त करता येईल का? तुम्हाला माझ्यासाठी तरी जिवन्त रहायलाच हवं." किरीट रडत म्हणाला.

घर विकून पैसे मिळाल्यावर किरीटने शहरातून डॉक्टर बोलावला. तरीही महिन्याभरात आजोबा वारले. उपचार केल्यानन्तर उरल्या सुरल्या पैशातून त्याने आपल्या आजोबांचे क्रियाकर्म यथासांग केले.

एक आठवडा लोटला, अन् किरीट समोर गंभीर अडचण उपस्थित झाली. उपजीविका कशी चालवावी हे समजेना त्याला. एके दिवशी गावाबाहेर एका दगडावर बसून तो विचार करू लागला. खिशातून पैसे काढून तो मोजू लागला कि, आता आपल्याजवळची शिल्लक किती आहे. चांदीची बरोबर साठ नाणी होती त्याच्याजवळ. आपल्या भविष्याबद्दल तो

धीरेंद्र काळे



चिन्तेत होता. इतक्यात एक अरण्यवासी त्याच्याजवळ येऊन त्याच्या डोळ्याला डोळा भिडवून म्हणू लागला, ''चेहऱ्यावर तर राजतेज दिसतंय तुझ्या! पण तुझा वेष पाहून वाटतंय की तू गरीब आहेस. पण काळजी नको करूस. तुझं भविष्य उज्वल आहे.'' अन् किरीटकडून एक नाणं घेऊन तो निघून गेला.

किरीट दिवसभर त्या अरण्यवासी माणसाचाच विचार करत राहिला. पहाटे पहाटे त्याला स्वप्नात असे दिसले की, आपल्या डोक्यावर रत्नखचित मुकुट झळकतो आहे. काहीतरी बडबडत तो जागा झाला. त्यावेळी कोंबड्याचे आरवणे ऐकू येत होते. 'पहाटेची स्वप्नं खरी होतात' असे त्याचे आजोबा म्हणत असत. त्याला ते बोलणे आठवले. पण याच गावात राहून तो राजा कसा बनणार? त्याने गाव सोडायचे ठरवले.

लवकरच आपलं गाव सोडून तो राजधानीकडे निघाला. तीन दिवस, तीन रात्री चालून चौथ्या दिवशी दुपारी तो राजधानीत पोचला. आता त्याच्याजवळ चांदीची फक्त तीनच नाणी उरली होती. खूप भूक लागलेली असल्यामुळे तो जवळच्याच एका खानावळीत गेला.

त्यावेळी ओळीने बसलेल्या दहा प्रवाश्यांना एक म्हातारी आजी पानांवर जेवायला वाढत होती. तिने किरीटकडून एक नाणे घेतले अन् एका कोपऱ्यात त्याच्यासाठी एका केळीच्या पानावर जेवण वाढले. तिथे जेवणाऱ्यांपैकी दोघेजण खूपदा तिथे येत असत. त्यातला एकजण म्हातारीला विचारू लागला, ''आजीबाई, तुमच्या चेहऱ्यावर या काळजीच्या रेषा का म्हणून? मागल्या वेळी आलो, तेंव्हा म्हणाला होतात की - तुमचा राजा विषारी गळवामुळे आजारी आहे. ते अजून बरे नाही झाले का?''

खोल श्वास ओढत आजीबाई म्हणाली, ''शेजारच्या राज्याच्या राजवैद्याच्या कृपेनं आमचे महाराज वाचले. आता त्यांच्या समोर कन्येच्या लग्नाची चिन्ता उभी आहे. युवराणी नेहमी एकाच प्रकारचं स्वप्न पहात असते, असं ऐकलंय. स्वप्नात तिला दिसतं, की ती रोज ज्या मंदिरात जाते, तिथे जात असताना एक विषारी साप तिला डसणार, इतक्यात एक तरुण तिथे येऊन तिला वाचवतो. तिनं कितीतरी मागण्या नाकारल्या आहेत. तिचा हट्ट आहे की प्रत्यक्षात तिला तो तरुण वाचवेल, तेंव्हा ती त्याच्याशीच विवाह



करील. पण आश्चर्याची गोष्ट अशी की, मंदिराच्या वाटेवर आजपर्यन्त तिला एकादा अगदी साधेसे गांडूळसुद्धा कधी आडळलं नाहीय.''

म्हातारीचे सगळे बोलणे किरीट ऐकत होता. त्याला आपण 'गड जिंकला' असेच वाटले. त्याच्या आनन्दाला सीमा उरली नाही. भराभरा जेवण उरकून तो एकाद्या गारुड्याच्या शोधाला निघाला. त्याला दामू नावाचा गारुडी सापडल्यावर 'आपल्याला एकादा दात काढलेला, काळ्या रंगाचा, बिनविषारी साप' हवा असल्याचे सांगितले.

''साप देईन मी; पण त्यासाठी मला दोन नाणी हवीत'' असे दामू म्हणाला. खिशात असलेली शेवटची दोन नाणी किरीटने त्याच्या हातावर ठेवली अन् टोपलीत बन्द असलेला साप घेऊन तो मंदिरवाल्या डोंगरावर चढला. एका झाडोऱ्यामागे लपून तो येणाऱ्या-जाणाऱ्यांना निरखू लागला.

थोड्या वेळात दोन तरुणी मंदिराची वाट चालत असलेल्या त्याला दिसल्या. पण त्यात युवराणी नव्हती. सूर्यास्त होऊन हळूहळू अंधार दाटू लागला, अन् त्याला दिसले की, चमकदार वस्त्रे आणि अलंकार ल्यालेली युवराणी झाडी जवळ येत आहे! किरीटने ताबडतोब साप तिच्या अंगावर फेकला. तो युवराणीच्या खांद्यावर पडताच ती जोराने किंचाळली. दुसऱ्याच क्षणी झाडीतून वेगाने बाहेर येऊन किरीटने साप पकडून दूरवर फेकला.

थोड्याच वेळात युवराणी सावरली अन् किरीटला पाहून म्हणाली, ''अहाहा! माझं स्वप्न खरं निघालं. तुम्हीच माझे पती



आहात.''

''हे आपण काय म्हणत आहात युवराणी!'' जणू काही काहीच माहीत नसल्याचा आव आणत किरीटने विचारले.

युवराणीने त्याला आपण रोज पहात असलेल्या स्वप्नाबद्दल सांगितले. नन्तर आपला निर्णय सांगत ती म्हणाली, ''मला सर्पदंशापासून वाचवणाराशीच विवाह करायची शपथ घेतली आहे मी! आपण लग्नाला नकार दिलात तर जन्मभर मला अविवाहितच रहावं लागेल.'' बोलता बोलता ती रडू लागली.

किरीटने आनन्दविभोर होत तिचा हात पकडला. नन्तर देवीच्या मन्दिरात जाऊन पुजाऱ्याने दिलेले हार एकमेकांच्या गळ्यात घातले व ते पतिपत्नी बनले. किरीटचा हात

पकडून युवराणी डोंगर उतरू लागली. ही घटना किरीटला स्वप्नासारखीच वाटत होती. वर-वधु दोघेही खाणावळीची मालकीण म्हातार्‍या आजीकडे आले. आता कुठे किरीट जागा झाला.

"हे काय? इथे का घेऊन आलीस मला?" किरीटने आश्चर्याने विचारले.

युवराणी हसत म्हणाली, "खूप जुनी गोष्ट आहे. गंगामातेच्या पुष्कर उत्सवात मी हरवले. चार वर्षांचीच होते मी तेंव्हा. जमिनीवर बसून भोकाड पसरून रडत होते मी. सर्वजण नुसते पहात होते पण माझी विचारपूस कोणीच केली नाही. या आजीनं माझं रडण्याचं कारण जाणलं आणि आपल्याबरोबर मला घेऊन गेली. तेंव्हापासून तीच माझं पालनपोषण करत आली आहे. खूप प्रेमानं वाढवलं तिनं मला."

"म्हणजे तू युवराणी नव्हेस?" गोंधळून त्याने विचारले, "माझं नावच युवराणी आहे नं! शंका कसली?" युवराणीने आश्चर्याने विचारले.

"तू जर या आजीबाईची पाळलेली मुलगी असशील, तर ही चमकदार वस्त्रं कशी तुझ्या अंगावर? असे कपडे तर राजकन्याच वापरतात!" किरीटने विचारले.

त्याच्या प्रश्नावर खळखळून हसत युवराणी म्हणाली, "मी या देशाच्या राजकुमारीची मुख्य सेविका आहे. फार प्रेम आहे त्यांचं माझ्यावर. त्याचू मला कधी कधी आपली वस्त्रं देतात."

स्वयंपाकात मग्न असलेल्या आजीबाईनी हा सारा संवाद ऐकला अन् ती फार खूश झाली. बाहेर येऊन ती म्हणाली, "अग युवराणी, आता माझ्या शरीरात शक्ती नाही राहिली. ही खाणावळ आता मी जावईबुवांच्या हाती देईन."

युवराणी आजीला म्हणाली, "ही युवराणी आलेल्या लग्नाच्या मागण्या धुडकावत आली नं? तुला वाटलं की माझं लग्न होईल की नाही; काळजी पडली होती ना? आता खूश?"

तिचा गालगुच्चा घेत आजी म्हणाली, "आता युवराणी नव्हेस तु; 'राणी' बनलीस 'राणी'!"

स्वतन्त्रपणे जगायचा आधार आता किरीटला गवसला. तोही खूश होत म्हणाला, "या लग्नामुळं माझं स्वप्नही साकार झालं. 'राणी' चा नवरा 'राजा' च असतो ना?"





# सोनेरी क्षण - १४



चांदोबा.

**१. छोट्या छोट्या जलचरांच्या अवशेषांपासून बनलेले लांबच लांब खडक?**



समुद्रात रहाणाऱ्या या प्राण्यांची पांढरी हाडे एकावर एक साचत रहातात आणि लाखो वर्षांत क्रमशः कठीण होत जातात आणि खडकात परिवर्तित होतात. जमीन हलल्यामुळे ते खडक बाहेर ढकलले जातात.

## जगात हे कोठे आढळेल?

**२. स्तूपाच्या आकाराचे धान्य-कोठार?**

आपल्या देशातल्या या धान्य कोठाराचा दरवाजा फक्त आत ढकलूनच उघडला जाऊ शकतो. कोठार अगदी खचाखच



भरले तर ते उघडता येणारच नाही. सतराव्या शतकात इथे भयानक दुष्काळ पडला असताना ईस्ट इंडिया कंपनीने हे कोठार बांधले.



**३. जगातील सर्वांत अधिक उंचीची मूर्ती?**

दोन्ही हात फैलावलेले आणि एका हातात खड्ग असलेली ही मूर्ती एका स्त्रीची असून तिची उंची ८२ मीटर्स आहे.



**४. लाव्हा रसाने निर्मित, शंकू आकाराच्या टेकड्या?**

मिलियन वर्षांपूर्वी विस्फोट झालेल्या ज्वालामुखीच्या लाव्हा रसामुळे निर्माण झालेल्या या टेकड्या अनेक मजली इमारतींच्या शहरांसारख्या दिसतात. यातील नरम टेकड्या खोदून माणसांना रहाण्यासारखी गुहांची घरे बनवण्यात आली आहेत. त्यात लाव्हाचे दगड खोदून बनवलेली खुर्च्या, टेबले आणि व्यासपीठांनी युक्त चर्चेस आणि मठही आहेत.

**५. सर्वांत मोठे प्राणिसंग्रहालय?**

या संग्रहालयात जवळजवळ ४०० प्रकारचे पक्षी, १५० प्रकारचे सस्तन प्राणी, ५० प्रकारचे मासे, ४० प्रकारचे बेडूक आणि ३४ प्रकारचे साप आहेत. १९, ४५५ वर्ग कि.मी. चे क्षेत्र याने व्यापले असून त्यात आणखी जवळ-जवळ ७००० हत्ती, १,५०० सिंह, ९०० चित्ते आणि निराळ्या एका जातीचे २५० चित्ते आहेत.



## चित्रकोडे



१. या चित्रात एका सुन्दर मुलीचा एका बाजूचा अर्धा चेहरा दाखवला आहे. पण यातच आणखीही एक चेहरा लपलेला आहे. शोधा बरं तो?



२. सायकलस्वार खूप वेगाने सायकल चालवत आहे. पण चित्रकाराने चित्रात एक चूक केली आहे. कोणती?

## कथा - कोडे

***या गोष्टीत एक चूक आहे. कोणती?***

### सम्राटाचे औदार्य

चन्द्रगुप्त मौर्यचा नातू सम्राट अशोक एका फळबागेतून फिरत असताना त्याला एक दगड लागला. त्याच्या अंगरक्षकांनी दगड फेकणाऱ्या - एका घाबरल्या डोळ्यांच्या - स्त्रीला पकडून आणले. ''म... माफ करा महाराज'' ती रडत म्हणाली,



''म...म...मी आपल्या मुलांसाठी त्या झाडाचे पेरू पाडायच्या प्रयत्नात होते. मुलं सकाळपासून भुकेली आहेत. पण दगड चुकून आपणाला लागला महाराज!'' मोठ्या दीनतेने ती बोलली.

''हिला ताबडतोब चान्दीच्या शंभर अशर्फ्या देऊन सोडून दिले जावे.'' अशोकने मन्त्र्याला आज्ञा दिली.

''महाप्रभु, हिनं आपणावर दगड फेकला. हिला त्यासाठी शिक्षा मिळायलाच हवी. पण आपण तर पुरस्कार देत आहात?'' मन्त्री आणखी काही बोलणार होता.

पण त्याला मधेच थांबवत अशोक म्हणाला, ''तिनं मारलेला दगड झाडाला बरोबर लागला असता, तर त्यानं गरीब बाईला पेरू दिला असता. राजानं तर एका झाडापेक्षा अधिक अुदार असावं. बरोबर ना?'' अशोक हसत म्हणाला.

**अुत्तर :**

सम्राट अशोकच्या काळात आपल्या देशात पेरूची झाडेच नव्हती. युरोपियन लोकांनी नंतर ती आपल्या देशात आणली.



## गंमतीचे प्रश्न

१. बारा मुलांना एकेका ओळीत चार प्रमाणे चार ओळीत कसे अुभे करता येईल?





२. डावा पाय आणि डावा खांदा भिंतीला चिकटवून अुभे राहिले असता तुम्हाला अुजवा पाय अुचलता येईल काय?

३. काही कल्पित प्राण्यांची नावे चुकीच्या जागी लिहिली गेली आहेत. ती बरोबर जागी लिहू शकाल?




४. दोन लाल आणि तीन काळ्या-मिळून पाच टोप्या आहेत. मोहन, राम आणि विजयने एक-एक टोपी डोक्याला घातली. बाकीच्या दोन दृष्टी आड आहेत. राम अशा जागी बसला आहे, की त्याला विजय आणि मोहन दिसत आहेत. पण विजयला मात्र फक्त मोहनच दिसतो आहे; मोहनला कोणीच दिसत नाहीय. त्यांना सर्वांना एकमेकांचे बोलणे मात्र ऐकू येत आहे. रामला त्याच्या टोपीचा रंग विचारला असता तो 'माहीत नाही' असे म्हणतो. विजयलाही आपल्या टोपीचा रंग माहीत नाहीय. पण त्याला जेंव्हा रामचे अुत्तर ऐकू येते, तेंव्हा आपल्या डोक्यावर काळ्या रंगाची टोपी आहे, हे तो ताबडतोब ओळखतो. तो हे कसे काय ओळखू शकला?



## आपण चित्र काढू या

चार सोप्या क्रमांनी आपण इंग्रजी 'P' अक्षरातून झकास घुबड काढू शकू. पहा कसे ते.




### सोनेरी क्षण - १३ ची अुत्तरे

**जगात कुठे?**

१. दक्षिण फ्रान्सच्या लास्कावस मधे
२. राजस्तानातील चित्तोडगड
३. आफ्रिका (माअुंट किलिमांजारो) अुत्तर टांझानिया
४. मियान्मार (ब्रह्मदेश)
५. अमेरिकेतील वॉशिंग्टन डी.सी.

**चित्रकोडे**

आफ्रिकेच्या जंगलांमधे वाघच नसतात.

**चित्र - कोडे**

१. सौदी अरेबिया २. चीन ३. इजिप्त ४. जर्मनी ५. बोलिव्हिया ६. झिंबाब्वे
७. स्पेन ८. मियान्मार ९. मादागास्कर

**गंमतीचे प्रश्न**

१. पन्नास पैसे आणि पाच पैसे. एक नाणे पन्नास पैशांचे नाही. पण दुसरे आहे.
२. पोपट बहिरा आहे.
३. कुटुंबात एकूण सहा माणसे आहेत.
४. ग्रीनलॅण्डच. ते सापडले नसले, तरी अस्तित्वात होतेच.
५. दोन मित्रांना एकाच वेळी नेले तर तीन तिकिटे काढावी लागतील. निरनिराळे नेले तर एकूण चार तिकिटांचा खर्च होईल.
६. शेवटच्या मुलीला पेटीसह सफरचन्द द्यायचे.
७. खोटे. त्याने असा संवाद ऐकलाच नाही. खोटे बोलणारी आपण 'खोटी' आहोत असे कधीच म्हणणार नाही. अन् खरे बोलणारा स्वतःला कधीच 'खोटा' म्हणणार नाही.
८. ज्याचे पाय मोठे असतील त्यालाच.





# महाभारत

**पां**डवांचे वनवासाचे बारावे वर्ष पूर्ण होत आले होते. इन्द्राने पांडवांच्या कल्याणार्थ ब्राह्मणवेषात कर्णाकडे जायचे ठरवले. त्याला कर्णाकडून त्याची सहज कवच-कुंडले मिळवायची होती. पण ही बातमी कर्णाला त्याचा पिता सूर्य-भगवान याने स्वप्नात सांगितली. तो म्हणाला, ''पुत्र कर्ण, ब्राह्मण जे मागतात, ते द्यायची तुझी सवय आहे. इन्द्र ब्राह्मणरूपात तुझ्याकडे येअून तुझ्या कवचकुंडलांचं दान मागणार आहे. वाटल्यास दुसरं काही त्याला दे, पण आपली कवच कुंडलं मात्र देअू नकोस. ती जोपर्यन्त आहेत, तोपर्यन्त तुला युद्धात कोणीही हरवू शकणार नाही. ती तू दिलीस, तर तुझा मृत्यु निश्चित आहे. त्यात इन्द्राची स्वार्थ-बुद्धी आहे. अर्जुनाशी युद्ध करायची क्षमता केवळ तुझ्यातच आहे. त्याच्या रक्षणासाठीच तो तुझ्याकडे हे दान मागणार आहे. तू कवचकुंडलं दिलीस, की अर्जुनाहातूनच मरशील.''

''भगवान, आपण स्वतः येअून अुपदेश केलात, इतकंच मला खूप झालं. पण आपलं व्रत पाळण्यासाठी ब्राह्मणाची इच्छा डावलणं मला शक्य होणार नाही. या दानशूरपणामुळे मला या लोकात कीर्ती मिळालेली आहे. या स्थितीत प्रत्यक्ष देवेन्द्र माझ्याकडे येअून दान मागणार असतील, तर मी नकार कसा देईन? कवचकुंडलं मला द्यावीच लागतील. त्यामुळे माझी कीर्ती आणखीच वाढेल. अन् पांडवांची मात्र अपकीर्ती होईल. कीर्तीच नाहीशी झाली, तर नंतर जगण्यात तरी काय लाभ?''

''वेडा कुठचा! शरीरच अुरलं नाही, की कीर्तीशी काय देणंघेणं? ती तर प्रेताचा अलंकार झाला! तुझं अन् अर्जुनाचं युद्ध तर नक्की होणारच. जोपर्यंत कवचकुंडलं आहेत, तोवर तो तुझं काहीच नुकसान करू शकणार नाही, भले इन्द्रही त्याच्याबरोबर असो! तेव्हा



कुठल्याच परिस्तितीत ती देऊ नकोस.'' सूर्याने पुन्हा समजावले.

''देवा, क्षमा करा मला! ब्राह्मणानं येऊन दान मागितलं, तर प्राणही देणं, हे माझं कर्तव्य आहे. कवचकुंडलांशिवायच मी अर्जुनाला पराजित करू शकतो, परशुराम अन् द्रोणाचार्य यांनी दिलेली अस्त्रं माझ्या जवळ आहेत.'' कर्ण विश्वासपूर्वक म्हणाला.

''हा तुझा हट्टच असेल, तर एक काम कर. इन्द्राजवळ एक अमोघ शक्ती आहे. बलशाली शत्रूलाही तू या शक्तीनं मारू शकशील. ती शत्रूला मारून परत आपल्याकडे येईल. इन्द्र कवचकुंडलं मागेल, तेंव्हा तू ती शक्ती मागून घे. ती मिळाली, की तू अर्जुनालाही मारू शकशील.'' सूर्य म्हणाला.

इतक्यात कर्ण जागा झाला. सकाळ झालेली होती. तो इंद्राच्या आगमनाची वाट पाहू लागला. दररोज तो मध्यान्ह समयी सूर्याची अुपासना संपवून ब्राह्मणांना दाने देत असे. आज त्यावेळीच इन्द्राने ब्राह्मणवेषात येअून 'भिक्षांदेही' म्हटले.

कर्णाने सवयीनुसार त्याची पूजा करून विचारले, ''ब्राह्मणवर, काय देअू मी तुम्हाला? सुंदर स्त्रिया हव्यात? सुपीक जमीन हवी? अुत्तम सशक्त गायी पाहिजेत? बोला काय हवं?''

''पुत्रा, मला यांपैकी काहीच नको. तुझी सहज कवचकुंडलं कापून दे.'' इन्द्राने दान मागितले.

''ब्राह्मणवर, ही तर माझी प्राणरक्षक आहेत. त्यांच्या शिवाय दुसरं काही मागा ना?'' कर्ण विनयपूर्वक म्हणाला.

''नाही, नाही! मला कवचकुंडलंच हवीत.'' इन्द्र आग्रहाने म्हणाला. कर्ण हसला अन् म्हणाला, ''मला ठाअूक आहे, तुम्ही तर देवेन्द्र आहात. तुम्हासारख्या देवांनीच तर माझ्यासारख्या सामान्य माणसांना दान द्यायचं. पण अुलट स्वतःच दान मागायला आलात? बरं दिसत नाही तुम्हाला! कवचकुंडलं दिली, तर शत्रूकडून नक्कीच पराजित होईन मी. अपकीर्ती होईल माझी ती! त्या बदल्यात तुम्ही मला आपली अद्‌भुत शक्ती प्रदान करा.'' कर्णाने मागणी केली.

इन्द्र म्हणाला, ''आपली शक्ती अवश्य देईन मी तुला. पण तू त्याद्वारे फक्त एकाच माणसाची हत्या करू शकशील. त्याचा एकदा प्रयोग केलास की ती त्या माणसाचा संहार करून परत माझ्याकडेच येईल. कबूल आहे?''

''माझा केवळ एकच शत्रु आहे. त्याला मारणं हे माझं एकमात्र ध्येय आहे.'' कर्ण म्हणाला. ''मला माहीत आहे, तुला या शक्तीनं अर्जुनाला मारायचं आहे. पण जोपर्यंत कृष्ण त्याच्या बाजूला आहे, तोपर्यन्त त्याला मारणं तुला शक्य होणार नाही. एक गोष्ट लक्षात ठेव. तुझे प्राण संकटात असतील, तुझी शस्त्रास्त्रं निष्फळ होतील, तेव्हांच फक्त ही शक्ती अुपयोगात आण. सामान्य माणसांवर तिचा प्रयोग करशील तर ती तुझाच प्राण घेईल.'' इन्द्राने त्याला सावध-गिरीचा इशारा दिला.

कवचकुंडले कापल्यावर आपलं शरीर विकृत दिसू नये अशी इच्छा अर्जुनाने व्यक्त केली. इन्द्राने ती मान्य केली. कर्णाने इन्द्राकडून शक्ती ग्रहण केली आणि आपली कवचकुंडले कापून दिली.

कर्णाने कवचकुंडले दान दिल्याचे समजल्यावर पांडवांना फार आनन्द झाला. कर्ण महाबली असल्याचे ते जाणून होते. जन्मजात कवचकुंडले त्याच्याजवळ असेपर्यन्त तो अजिंक्यच होता. मनोमन त्यांनी इन्द्राचे आभार मानले. कौरवांना मात्र हे कळल्यावर दुःख वाटले. इन्द्राच्या या कुत्सित कार्यावर ते टीका करू लागले, कि देव असूनही असलं दुष्कर्म तो करू धजला.

पांडव द्वैतवनात असताना एक ब्राह्मण धावत येअून त्यांना म्हणू लागला, ''मी आपलं यज्ञोपवीत एका फान्दीला अडकवलं



होतं. इतक्यात एक सांबर येअून तिला आपलं शरीर घासू लागलं. माझं यज्ञोपवीत त्याच्या शिंगात अडकलं अन् त्यासह ते पळून गेलं. त्यावाचून मी अग्निकार्य करू शकणार नाही. कृपा करून मला ते परत मिळवून द्या.''

पांडव तावडतोब सांबरामागे लागून त्याच्यावर बाणांचा वर्षाव करू लागले. पण एकाही बाणाचा त्याला स्पर्श होईना. पहाता पहाता सांबर घनदाट अरण्यात नाहीसे झाले.

पांडव थकले; त्यांना तहान लागली थकव्यामुळे ते एका झाडाखाली बसले. तेंव्हा नकुल म्हणाला, ''आपण संकटं झेलत आहोत. असं वाटतंय की यांचा कधी अन्तच होणार नाही. काय कारण असावं कळत



नाहीय!''

धर्मराज म्हणाला, ''पूर्वजन्मी आपण काही पापं केली असतील, तर त्याचं फळ आहे हे. आपल्याला त्रास सहन करावाच लागेल.''

''द्रौपदीला ज्या दिवशी सभेत बोलावलं गेलं, त्याच दिवशी त्या दुष्टांना मारायला हवं होतं. मी तसं केलं नाही, त्यामुळेच हाल होत आहेत आपले.'' भीम बोलला.

''व्यूह खेळताना कर्ण तोंडाला येईल ते बडबडत होता. मी ते मुकाट्यानं सहन केलं. षंढासारखे आपण वनात निघून आलो; त्यामुळेच कष्ट करत आहोत आपण.'' अर्जुन बोलला.

''त्या कुटिल शकुनीला तेंव्हाच मारून टाकलं असतं, तर आपल्याला आताचा त्रास झाला नसता.'' सहदेव बोलला.

धर्मराज नकुलला अुद्देशून म्हणाला, ''आपल्या सर्वांना तहान लागली आहे. जरा या झाडावरून कुठे पाणी आहे का ते बघ अन् भात्यात भरून आण.

नकुलने झाडावरून पाहिले, की जवळच एक सरोवर आहे. आपली तहान भागवून, बरोबर पाणी आणण्यासाठी तो तिकडे निघाला. तेथे जाअून पाण्याची ओंजळ त्याने तोंडाजवळ नेली, इतक्यात त्याला आकाशवाणी ऐकून आली, ''थांब, मी प्रश्न विचारीन, त्यांची अुत्तरं दे, अन् मग पाणी पी. हे सरोवर माझं आहे.''

नकुलने या बोलण्याची पर्वा केली नाही, अन् तो हातातले पाणी प्यायला. ताबडतोब तो मरून खाली कोसळला. नकुलला जाअून बराच वेळ झाला, तरी तो परत न आल्याने धर्मराजने सहदेवला पाठवले. सहदेव सरोवराजवळ आला तेंव्हा नकुल मरून पडलेला त्याला दिसला. अन् त्याला अपार दुःख झाले. त्यालाही फार तहान लागली असल्याने तो पाणी पिणार, इतक्यात पूर्वी-प्रमाणेच त्याला त्या अशरीर आवाजाने सूचना दिली. त्यानेही नकुल प्रमाणेच बेपर्वाई दाखवून पाणी प्यायले अन् तो मरून पडला.

आपल्या भावांचा शोध घ्यायला यावेळी धर्मराजने अर्जुनाला पाठवले. त्याला सरोवराजवळ आपल्या भावांची मृतशरीरे दिसली. कोणाच्या हातून त्यांचा मृत्यु ओढवला, हे पहाण्यासाठी त्याने चोहोकडे पाहिले, पण त्याला आसपास एक चिटपाखरू





ही आढळले नाही. तोही तहान भागवण्यासाठी पाणी पिणार, इतक्यात त्यालाही अदृश्य आवाज ऐकू आला.

''सामर्थ्य असेल, तर समोर ये. लपून राहून काय बोलतोस?'' असे म्हणून अर्जुनाने आवाजाच्या दिशेने बाण सोडले. थकून शेवटी त्यानेही पाणी प्यायले अन् तो ही बेशुद्ध होऊन खाली पडून मरून गेला. यानन्तर भीमही तेथे आला अन् आवाजाची पर्वा न करता पाणी पिऊन इतर भावांप्रमाणे मरून पडला.

शेवटी धर्मराज स्वत:च बंधूंच्या शोधार्थ तेथे आला. सरोवराजवळ चारही भावांची प्रेते पाहून त्यानेही शोक केला. तेंव्हा त्याला त्या अशरीर वाणीने सांगितले -

''मी एक बगळा असून या सरोवरातील मासे खाऊन जगतो. माझ्या प्रश्नांना उत्तरं न देता दुर्लक्ष करून पाणी पिणाऱ्या तुझ्या भावांना मीच मारून टाकलंय. निदान तू तरी माझ्या प्रश्नांची उत्तरं दे आणि हवं तितकं पाणी पी. तू सुद्धा आपल्या बंधूंप्रमाणे मूर्खासारखं वागलास, तर तुझीही तीच स्थिती होईल.''

धर्मराज म्हणाला, ''माझे बंधु एकाद्या साध्याशा पक्ष्याच्या हातून मरण्यातले नाहीत. तू बगळा नव्हेस. बोल, कोण आहेस तू, अन् तुला काय हवंय?''

''बरोबर, मी बगळा नसून एक यक्ष आहे.'' असे म्हणत यक्ष प्रकट झाला. तो धर्मराजाला म्हणाला, ''तुला पाणी हवं असेल, तर माझ्या प्रश्नांची उत्तरं दे.''

''विचारा; माझ्याकडून जमेल तशी उत्तरं देईन मी.'' धर्मराज म्हणाला. यक्षाने नंतर अनेक प्रश्न विचारले आणि धर्मराजाने दिलेल्या उत्तरांनी तो संतुष्ट झाला.

यक्ष म्हणाला, ''तुझ्या उत्तरांनी प्रसन्न झालो मी. तुझ्या चार भावांपैकी एकाला जिवन्त करतो. बोल कोणाला करू?''

''यक्षराज, नकुललाच प्राणदान द्या.'' धर्मराज बोलला.

''भीम महाबलवान आहे; अर्जुन पराक्रमी आहे. तू या दोघांना सोडून सावत्र आईच्या पुत्रासाठी प्राणदान का मागितलंस?

''कुन्ती आणि माद्री या माझ्या पित्याच्या दोन पत्नी. कुन्तीपुत्रांपैकी एक मी जिवन्त आहेच. माद्रीपुत्रांपैकीही एक जिवन्त असावा, म्हणून मी ते उचित मानले, आपला धर्म मानला.'' धर्मराज



म्हणाला.

''फारच छान ! धर्म द्रोह न करता, तू उत्तम धर्म पाळलास. तुझे सगळेच भाऊ जिवन्त होतील.'' यक्ष बोलला.

ताबडतोब भीम, अर्जुन, नकुल, सहदेव सारेच उठून बसले, जणू आत्ताच झोपेतून उठत आहेत! आता त्यांना भूक-तहानही नव्हती.

''आपण कोणी सर्वसाधारण यक्ष नव्हेत. बोला आपण कोणते देव आहात?'' धर्मराजाने विचारले. यक्ष उत्तरला, ''मी धर्मदेवता यम - तुझा पिता! तुझी परीक्षा घ्यायला आलो होतो मी. ''देवा, ब्राह्मणाचं यज्ञोपवीत एक सांबर घेऊन गेला. त्याविना तो अग्निकार्य करू शकणार नाही. त्याच्या दैनिक कार्यात कसलं विघ्न न यावं, असा आशिर्वाद द्या.'' धर्मराजाने मागणी केली.

''मीच त्या प्राण्याला, तुम्हा सर्वांना इथे आणण्यासाठी पाठवलं होतं. हे घे ते यज्ञोपवीत आणि एक वर माग.'' धर्मदेव म्हणाला.

''वनवासाचं बारावं वर्ष समाप्त होत आहे. अज्ञातवासात आम्हाला कोणी ओळखू नये, असा वर द्या.'' धर्मराजाने वर मागितला. धर्म-देवतेने तो देऊन आशिर्वाद दिला.

पांडवांनी ब्राह्मणाला त्याचे यज्ञोपवीत परत केले. आपल्या कार्यात कसली बाधा न राहिल्याने ब्राह्मणाने कृतज्ञता व्यक्त करून त्यांचा 'विजय होईल' असा आशिर्वाद दिला.

पांडवांचा वनवासकाळ समाप्त झाला. आतापर्यन्त बरोबर असणाऱ्या ब्राह्मणांचा निरोप घेत ते म्हणाले, ''उत्तम ब्राह्मणांनो, नियमाप्रमाणे आणखी एक वर्ष आम्हाला अज्ञातवासात रहायचे आहे. निरोप द्या आम्हाला.'' ''तुमचा अज्ञातवास निर्विघ्न-पणे पार पडेल' असा आशिर्वाद त्यांना मिळाला.

धौम्य धर्मराजाला म्हणाला, ''लवकरच तुमची कष्टदशा संपेल.''

आता पांडव, द्रौपदी व धौम्य यांच्यासह आश्रमातून निघाले. थोडे दूर गेल्यावर ते एका प्रशान्त व एकान्त जागी थांबले. आणि अज्ञातवासाच्या कार्यक्रमाविषयी गुप्त-चर्चा करू लागले.



# 'चान्दोबाच्या' बातम्या

### स्वागताची तयारी

३१ डिसेंबर, २,००० रोजी विसावे शतक समाप्त होईल. या शताब्दीच्या पहिल्या हजार दिवसांचा काअुंट डाअुन ६ एप्रिल रोजी परिसच्या एफेल टॉवरमधे सुरु झाला. एकविसाव्या शताब्दीचे स्वागत करण्यासाठी जगभरच्या मोठ्या शहरातून जोरदार तयारी सुरु झाली आहे. जाने. १, २,००० रोजी हा अुत्सव सुरु होईल या शताब्दीचे स्वागत करण्याचा प्रथम सुअवसर न्यूझीलंडच्या ऑकलंड शहराला प्राप्त झाला.

### सर्वात अुंच मिनार

तायवानची राजधानी टायपी या नगरात लोखंडाने बनवलेला एक मिनार बांधून पूर्ण होत आहे. हे बांधकाम पूर्ण झाल्यावर 'जगातला सर्वात अुंच मिनार' म्हणून 'गिनीज बुक ऑफ वर्ल्ड रेकॉर्ड' मधे याच मिनाराचा अुल्लेख होणार आहे. याची अुंची आहे ५६० मीटर्स. कॅनडातील टोरंटोमधील सर्वात्त अुंच टॉवर सी.एन.टॉवर पेक्षा हा दहा मीटर अधिक अुंच असेल. ७३,०००,००० अमेरिकन डॉलर्स खर्च करून याची निर्मिती होत आहे. या टायपी टॉवरच्या बांधकामापूर्वी सर्वात अुंच मानला गेलेला टोकियो टॉवर (३३३ मी.) आणि एफेल टॉवर (३२० मी.) हे याच्यापुढे खुजे वाटू लागतील.

### अखंड पारायण

या वर्षी १६ एप्रिल रोजी रामनवमी अुत्सव सुरु झाला. यापूर्वी पाच दिवस अगोदर काही भक्तांनी शरयू नदीच्या किनारी 'महायज्ञ' सुरु केला. रामायणात सांगितले आहे की श्रीराम शरयू पार करून वनवासाला गेले. आता हा जो 'महायज्ञ' झाला, तो येणाऱ्या रामनवमीपर्यन्त, म्हणजे २० एप्रिल १९९८ पर्यन्त चालू रहाणार होता. या निमित्ताने सीतारामांच्या नामांचे पारायण निर्विघ्न व्हावे यासाठी २९,००० पंडितांची नियुक्ती झाली होती.

### फ्रेंच अनुवाद

शीखांचा प्रवित्र ग्रन्थ 'ग्रन्थसाहेब' याचे प्रथमच फ्रेंचमधे भाषांतर झालेले आहे. सोळा पृष्ठांच्या अनुबंधासह हा १६७६ पृष्ठांचा ग्रन्थ आहे. डॉ. बर्नाडिल सिंग यांनी हा अनुवाद केला आहे. ते कॅनडामधे सरकारी नोकरीत होते. आणि नुकतेच निवृत्त झाले आहेत. भाषांतर करायला त्यांना बारा वर्षे लागली. परदेशात जाअून राहिलेल्यांपैकी अधिकांश शीख कॅनडामधेच आहेत. तिथल्या सरकारी भाषा इंग्रजी व फ्रेंच आहेत. कॅनडा व फ्रान्स शिवाय जगातील चाळीस देशात फ्रेंच बोलली जाते. आपल्या देशातील पांडिचेरी, कारैकल, माहे, यानम आदि भागात फ्रेंच बोलणारे लोक आहेत.

### बालके का रडतात?

बालकांचे रडणे म्हणजे लोकांशी संवाद साधणे होय. ही भाषा मातांना चांगली कळते. दुधाची गरज असो, आईच्या स्पर्शाची असो वा आरामात झोपायची गरज असो-मुले ती रडूनच प्रकट करतात. साधेच आहे ना! तरीही अमेरिकेतील स्पीच रेकग्निशन अ‍ॅण्ड लॅंग्वेज अंडरस्टॅंडिंग सर्व्हिसेस लॅबोरेटरी आणि कॅनडातील युनिव्हर्सिटी ऑफ ब्रिटिश कोलंबियातील शास्त्रज्ञ बालकांच्या रडण्यावर अधिक संशोधन करत आहेत. बालकांच्या निरनिराळ्या प्रकारच्या रडण्यांच्या टेप्स बनवून त्यांचे विश्लेषण करत आहेत. या रडण्यांच्या आधारे त्यांच्या गरजा ओळखता येतील असे त्यांचे म्हणणे आहे.

चांदोबा पुरवणी १०४



आपल्या देशाची सौन्दर्यस्थळे

# कोणार्क सूर्यमन्दिर



ओरिसातील सुप्रसिद्ध कोणार्कचे सूर्यमन्दिर तेराव्या शतकात निर्माण झाले. हे सूर्यदेवाचे मंदिर आहे. जवळ जवळ २०० फूट अुंचीचे हे देवालय भारतातील अुंच देवालयांपैकी एक होय. प्रवेशद्वारापासून क्रमाने चढत जाणाऱ्या ज्या पायऱ्या आहेत, त्यांच्या दोन्ही बाजूंना घोड्यांची शिल्पे आहेत. संपूर्ण देवालय रथाच्या आकारात बनले आहे. आपल्या पुराणानुसार, सूर्य सात घोड्यांच्या रथात बसून आकाशमार्गाने संचार करतो.





गंगा वंशाचा नरसिंहदेवराज याने हे मंदिर बांधवले आहे. असे मानले जाते की १,२०० शिल्पकारांनी १६ वर्षे काम करून हे मन्दिर पूर्ण केले. त्यासाठी चाळीस करोड रुपये खर्च झाले.

कोणार्क मन्दिराचे शिल्प आजही दर्शकांना मन्त्रमुग्ध करते. त्यातील ओडिसी नृत्यातील हाव-भाव व मुद्रा दाखवणारी अद्‌भुत शिल्पे रसज्ञ दर्शकांना आकर्षित करतील अशीच आहेत. शिल्पे अगदी सजीव वाटतात.

# जनश्रुति आणि रैक्व

जनश्रुति हा धर्मपरायण राजा होता. तो दररोज नोकर व गुप्तहेरांकडून आपल्या प्रजेच्या सुखदुःखाची माहिती मिळवी. आणि त्यावर अुपाय करी, त्यांच्या आवश्यकता पूर्ण करी. जनता पूर्णतः सुखी आहे. कसलीही गंभीर समस्या नाही अशी माहिती आपल्या सेवकांकडून मिळाल्याशिवाय तो रात्री झोपी जात नसे. एक आदर्श राजा होता तो.

एका पौर्णिमेच्या रात्री राजवाड्याच्या गच्चीत फिरत असता त्याला दिसले की काही राजहंस आपसात बोलत आकाशातून अुडत आहेत. पक्ष्यांची भाषा समजत असल्याने राजा त्यांचे बोलणे लक्षपूर्वक ऐकू लागला.

एक राजहंस म्हणाला, ''या राजवाड्यावर काही विशेष असं तेज दिसत आहे.''

''होय. दिसतंय मला ते. राजा जनश्रुतींचं तेज आहे ते. तो सत्यव्रती, कर्तव्यनिष्ठ आणि धर्मशासक आहे. त्यामुळेच त्याच्याभोवती कायम एक तेजोवलय असतं. पण त्याला स्वतःला मात्र ते दिसत नाही.'' दुसरा एक हंस बोलला.

''मला मान्य आहे, की जनश्रुति धर्मपरायण आहे, निस्संदेह खरे आहे ते. परन्तु यापूर्वी एका रात्री रैक्व राजाच्या महालावरून अुडताना मला याहीपेक्षा जास्त तेजस्वी प्रकाश दिसला होता.'' तिसरा हंस बोलला.

यानन्तर हंस ढगांमागे अदृश्य झाले. त्यांचे बोलणे ऐकून राजा फार प्रसन्न झाला. आपल्यापेक्षाही जास्त धर्मपरायण असणारा एक राजा या धरातलावर अस्तित्वात आहे, हे जाणून त्याला फार आनन्द वाटला. त्या रात्री तो खूप समाधानात, शान्त झोपला. दुसऱ्या दिवशी सकाळी मन्त्री व दूतांना बोलावून रैक्व राजाबद्दल माहिती मिळवली. तो स्वतःच रैक्वला भेटायला गेला, त्याच्याशी बोलणी केली. युवक रैक्वच्या धर्मपरायणतेने तो प्रसन्न झाला. कन्येचा विवाह त्याने रैक्वशी करून दिला अन् आणि आपले राज्यही त्याच्या हाती सोपवले.

जनश्रुति हा अत्यन्त विनयी असून अधिकार-गर्वाचा स्पर्शही त्याला कधी झाला नाही. आपल्यापेक्षा अुन्नत व्यक्ती दिसल्यावर त्याला त्याबद्दल हेवा वाटला नाही. अुलट त्याच्याबद्दल प्रेम व श्रद्धेची भावना अुपजली. तो अुत्तमकोटीचा महापुरुष व आदर्श राजा होता.





## तुम्हाला माहीत आहे का?

### अद्‌भुत करमणूक - कार्यक्रम

ऑपेरा हा एक संगीत-नाटकाचा प्रकार होय. या संगीत नाटकांत गायकच अभिनयही करतात. वाद्यकारांचा समूहही बरोबर असतो. अद्‌भुत प्रकारचे पडदे त्यांच्याजवळ असतात. अभिनेते रंगीबेरंगी व चमकदार कपडे वापरतात. हा संगीत नाटकाचा प्रकार सोळाव्या शतकात सुरू झाला. याची कथा ग्रीक व रोमन पुराणांतून निवडलेली असे. बराच काळपर्यंत हा ऑपेरा फक्त श्रीमंत वर्गापर्यंतच मर्यादित असे. पण अठराव्या शतकाच्या मध्यावर युरोपमधील सर्व शहरात संगीत-नाटक प्रदर्शनांसाठी थिएटर्स अस्तित्वात आली. गेय नाटकांबरोबरच या मंचावर परंपरागत संगीत जलसेही होत असत.





## इंद्रधनुष्य

### कमलपुष्पाकार मन्दिर





कमळ आकाराचेही एक मन्दिर आहे. तुम्हाला आश्चर्य वाटतंय? आपली राजधानी दिल्लीत हे एक आकर्षणाचे केन्द्र आहे. आठ हजार मजुरांनी सहा वर्षे खपून हे मन्दिर अुभारले आहे. एकशे वीस लाख डॉलर्स इतका खर्च या बांधकामासाठी केला गेला. हे कमळाकार मन्दिर 'बहाई मन्दिर' नावानेही ओळखले जाते. मंदिराच्या बाह्यभागात तीन जोडींच्या पाकळ्या आहेत. त्याच्या आत नअू पाकळ्या आहेत. चमकत्या पांढऱ्या रंगामुळे त्याची शोभा फार सुन्दर वाटते. याच्या निर्मितीसाठी खास पांढरे सीमेंट कोरियातून मागवण्यात आले होते.



# भाग्य-दुर्भाग्य

*(भाग दुसरा)*

**रा**जाच्या निर्णयानुसार एके दिवशी चार शिपाई आणि नावाडी आवश्यक ते सामान व गरीब माणसाला घेअून राक्षस-द्वीपाकडे निघाले.

आपण गरीबाला सतावत आहोत, याबद्दल राजाला मुळीसुद्धा वाईट वाटत नव्हते. अुलट त्याच्या अपराधाची त्याला आपण योग्य तीच शिक्षा देत आहोत याचा आनन्द वाटत होता. तो आपले स्वतःचे महत्व, आपली शक्ती कबूल न करता, प्रत्येक गोष्ट भगवंताच्या भरंवशावर सोडत होता; माणसाला देवाच्या हातचं बाहुलं समजत होता; दावा करत होता की माणसाच्या ललाटी जे लिहिलेलं असतं, तसंच घडत असतं; बिघडवणारा व सावरणारा एक तोच आहे असे मानत होता, याबद्दल राजा त्याच्यावर नाराज होता. गरीबाच्या विचारांशी राजा बिलकुल सहमत नव्हता. अुलट माणसाच्याच शक्तीवर त्याचा पूर्ण विश्वास होता. सर्व शक्ती माणसाने स्वतःच प्राप्त केल्या आहेत, आपल्या बुद्धीच्या बळावर तो जगत आहे आणि जगण्या साठी आपल्याला आवश्यक त्या सोयी प्राप्त करून घेत आहे - असे तो मानत असे. यासाठी भगवान नामक अदृश्य शक्तीची माणसाला काय गरज? राजाचा या अदृश्य शक्तीवर मुळीच विश्वास नव्हता.

त्यामुळे निघण्यापूर्वी राजा गरीबाला निर्दयपणे म्हणाला, "बरोबर सहा महिन्यांनी याच दिवशी, हीच नाव अन् हेच सैनिक तुला परत आणण्यासाठी पाठवीन. तोपर्यन्त जिवन्त असलास, तर किनाऱ्यावर येअून वाट पहा. ते फक्त तीन तास तुझी वाट पहातील."

होकार दर्शवण्यासाठी गरीबाने फक्त मान हलवली अन् परमेश्वराचे स्मरण करत तो नौकेत बसला. त्यावेळची त्याची मनःस्थिती फारच विचित्र होती. आपले भले होत आहे की बुरे, हे त्याला कळत नव्हते. द्वीपावर राक्षसाच्या हातून मरणे तर निश्चित होतेच. पण त्याचा देवावर अपार विश्वास असल्याने आपला सर्व भार त्याच्यावर सोपवून तो निश्चिन्त झाला.

नाविकाने नाव वेगाने चालवली अन् ठरीव वेळाने राक्षस-द्वीपावर नाव पोचली. सैनिकांनी गरीबाला पटकन खाली अुतरायला सांगितले. त्याने जमिनीवर पाय ठेवताच शिपायांनी भराभर त्याचे सामान जमिनीवर फेकले अन् ताबडतोब नाव परत फिरली. पहाता-पहाता ती दृष्टिआड झाली अन् मागे राहिला चारी बाजूंना अनन्त समुद्र अन् जमिनीवर तो एकटा जीव-गरीब !

अकस्मात आलेल्या या भयंकर एकान्तामुळे गरीब घाबरून गेला. त्याला दुःख सहन होईना. अुभ्या जागीच खाली बसून तो हमसून हमसून रडू लागला. म्हणू लागला, "कसलं खडतर जीवन दिलंस तू मला देवा! हे एकटेपण अन् दुःख यांच्यापेक्षा मरण लाख बरं! लवकर माझा अन्त कर! त्या राक्षसाची गर्जना ऐकून माझं हृदय बन्द पडण्यापूर्वीच मारून टाक मला. सुखाचं असलं मरण तरी माझ्या नशिबी लिही!"

भय आणि चिंतेमुळे त्याची भूक नाहीशी झाली. 'मरायचंच आहे, तर जेअून खाअून तरी काय करू' या विचाराने त्याने खाद्य पदार्थांकडे पाहिलेही नाही. तो रडतच राहिला आणि बेहोश होअून तिथेच पडून



राहिला.

तो जागा झाला तेंव्हा सूर्यकिरण त्याच्या शरीरावर पडले होते. त्या कोवळ्या अुजेडात स्वतःला जिवन्त पाहून तो अतिशय खूश झाला. माणसाचा वास राक्षसांना खूप लवकर कळतो, असे त्याने ऐकले होते. पण इतका वेळ जाअूनही कोणी राक्षस आपल्याजवळ फटकला नाही, याचे त्याला आश्चर्य वाटले.

तरीही गरीब तिथून हलला नाही. आज इथेच राहून, मग काय होते ते पहावे, असा त्याने विचार केला. जेंव्हा जेंव्हा भूक लागली, तेंव्हा तेंव्हा टोपलीतून फळे काढली, मिठाया घेतल्या अन् भूक भागवली. रात्रीही तो तिथेच झोपला.

तिसऱ्या दिवशी सकाळीही स्वतःला जिवन्त पाहून गरीबाच्या मनात अुत्साह

मनोहर जोशी



संचरला; आता धीरही वाटला. तो बेडर होअून हळूहळू बेटाच्या आतल्या भागात पायी चालत राहिला, पण राक्षसाचा कुठे पत्ता लागला नाही. अंधार दाटता दाटता तो एका फळझाडांच्या प्रदेशात थांबला आणि भीत भीत तिथेच झोपला.

चौथ्या दिवशी सकाळीच अुठून तो पुन्हा पायी चालू लागला. मध्यान्ह समयी तो बेटाच्या मध्यावर पोचला. तिथे दिसलेल्या दृश्याने त्याचे मन भीतीने थरकापले!

विशाल अशा सपाट जागी हाडांचा एक लांबलचक सापळा पडलेला होता. त्याच्या आकारप्रकाराची वैशिष्ट्ये त्याने निरखून पाहिली आणि ठरवले की तो राक्षसद्वीपाच्या विचित्र राक्षसाचाच अस्थिपंजर असला पाहिजे. त्याच्या डोळ्यातून आनन्दाश्रू झरू लागले. हात जोडून त्याने परमेश्वराला वन्दन केले.

गरीबाने ठरवले की राक्षस मरून गेल्यामुळे आता बेटावर कसला धोका अुरला नाहीय. त्याचे धैर्य वाढले. झाडांची फळे तोडून तो खात राहिला.

पाचव्या दिवशी दुपारी त्याला आणखी एक विचित्र दृश्य दिसले. एका विशाल वृक्षाखाली अगणित हिरे, वैडूर्य, अनमोल रत्ने, मोती, सोन्याचे दागिने इ. चे ढीग पडलेले होते.

इतका मोठा खजिना पाहून गरीबाला मोठेच आश्चर्य वाटले. त्याला वाटले की, इथे अुतरणाऱ्या व्यापाऱ्यांना, नावाड्यांना मारून लुटलेले हे राक्षसाचे धन असावे. राक्षसाहातून मरणाऱ्या माणसांची त्याला दया आली. तिथेच बसून तो बराच वेळ विचार करत राहिला. नंतर समुद्रतटावर जाअून खाद्यपदार्थांच्या दोन थैल्या मोकळ्या करून घेअून आला. त्या थैल्यांमधे जमेल तितके सोने व रत्ने त्याने भरली. हे काम करत असताना काटे बोचल्यामुळे त्याचे दोन्ही हात जखमी झाले. पण त्याची पर्वा न करता त्याने आपले काम पूर्ण केले. त्याने परत फिरायचा विचार केला, तेंव्हा थोड्या अंतरावर पडलेल्या एका चामड्याच्या थैलीने त्याचे लक्ष वेधले.

ताबडतोब हातातल्या थैल्या खाली ठेवून चामड्याची थैली त्याने अुचलली. अुघडून पाहिली तेंव्हा त्याला डोळे दिपवणारा एक झगमगीत छोटासा मणी त्यात आढळला. तो हातात घेअून फिरवून त्याने नीट निरखून पाहिला. बस, त्या मण्याच्या केवळ स्पर्शानेच





त्याचे जख्मी हात ताबडतोब बरे झाले, थोडीशी खूणही कुठे राहिली नव्हती! त्याचे कातडे पूर्ववत झाले! त्या वैचित्र्यामुळे हरखून त्याने तो मणी इतर किरकोळ जखमांवरही ठेवून पाहिला. त्या खुणाही ताबडतोब नाहीशा झाल्या!

आता गरीबाच्या आनन्दाला पारावार अुरला नाही. देवाजवळ आपली कृतज्ञता व्यक्त करून त्याने मणी पुन्हा थैलीत नीट ठेवला. आता तो सर्व थैल्यांसह समुद्रतटावर पोचला.

या घटनेनन्तर चार दिवसांनी तटापासून दूरवर एक मोठे व्यापारी जहाज हळुहळू धीम्या वेगाने डावीकडे जाताना त्याला दिसले. तो किनाऱ्यावर धावत, ओरडत आपला दुपट्टा हलवत त्यांची दृष्टी आकर्षित करायचा प्रयत्न करत राहिला. थोड्या वेळाने नावाड्यांनी जहाज़ थांबवले आणि गरीबाला त्याच्या मालासह वर चढवून घेतले. जहाज पुढे चालू लागले.

जहाजातल्या लोकांनी त्याला घेरून आतुरतेने विचारायला सुरुवात केली, ''साहेब, कोण आहात आपण? त्या राक्षसद्वीपावर पाअूल ठेवायचं साहस कोणी करत नाही. आपण एकटेच तिथे गेलात, आणि तेही इतकं सामान घेअून? हे कसं शक्य झालं?'' ते प्रश्नावर प्रश्न विचारत सुटले.

गरीबाने खोल श्वास घेतला. विचारल्या प्रश्नांना काय अन् कशी अुत्तरे द्यायची, हे त्याने पहिल्यापासून ठरवून ठेवले होते. तो अुत्तरला, ''भल्या माणसांनो, माझं नाव शिवदास आहे. मी कुंभीनस देशचा व्यापारी



आहे. खूप दिवसांची समुद्री व्यापार करून लाखो कमवायची माझी इच्छा होती. पण माझे दोस्त मला अडवत राहिले. ते म्हणत, ''समुद्री व्यापार जोखमीचा असतो. कधी-कधी तर लाभ सोड, पण भांडवलही घालवावं लागतं.'' तरीही मी निराश नाही झालो. माझी आशा अपुरी नाही राहिली. एक दिवस माझ्या एका धनवान बालमित्राला म्हणालो, ''कोणी काहीही म्हणो, समुद्री व्यापार करायची माझी फार इच्छा आहे. ती पुरी करूनच राहीन. आवश्यक भांडवल नाहीय माझ्याजवळ. कर्ज घेतलं, तर कुणास ठाअूक, परत करू शकेन की नाही - या भयाने पाय मागं घेत आलो. कोणी मला जास्तीत जास्त धन देअून मदत केली, तर आठवडाभर राक्षस द्वीपावर रहायची अटही कबूल करीन.''



तो मित्र असल्या साहसी गोष्टींवर मरत असतो - हे मला माहीत होतं, म्हणून मी त्याला आपली इच्छा सांगितली. त्यानं ताबडतोब मला हवं तेवढं धन द्यायचं कबूल केलं. त्यानं आपला वायदा पुराही केला. खाद्यपदार्थ आणि इतर सामग्री देऊन मला या बेटावर उतरवलं. आमच्या वायद्यानुसार तिथून बाहेर यायची जबाबदारी माझ्यावरच होती. या बेटावर येऊन दहा दिवस झाले. सगळे दिवस उतरलो तिथेच हातावर हात ठेऊन बसून राहिलो. एकादी नौका येईल म्हणून वाट पाहिली. त्या परमेश्वराची प्रार्थना करत राहिलो. तुम्ही आल्यानं आज माझं भाग्य उजळलं.''

गरीबाची आत्मकथा ऐकून लोकांनी आश्चर्य प्रकट करत म्हटले, ''दहा दिवस राक्षसद्वीपावर राहूनही वाचलात? विश्वास नाही बसत माझा, बेटावर खरंच राक्षस आहे का?''

''मला काय माहीत? मी तर किनाऱ्यापासून दहा फूटही आत शिरलो नाही. आतूनही मला कसली हालचाल कळली नाही.'' शिवदास म्हणवणारा गरीब बोलला.

जहाजावर जितकी माणसं होती, ती सर्वजण 'बेटावर राक्षस जिवन्त आहे की मेला' - याची चर्चा करू लागली. त्याचं मरण आपसूक ओढवलं की कोणी त्याला मारले?

गरीबाने मोठ्या चातुर्याने विषय बदलला आणि तोच जहाज व त्यावरील लोकांची विचारपूस करू लागला.

ते जहाज गरीबाच्या देश कुंभीनसच्या जवळच्याच मातंग देशाचे एक व्यापारी जहाज होते. वाटेत ते चार-पाच बेटांवर थांबत सिंहल देशी जाणार होते. जहाजातल्या सर्व व्यापाऱ्यांच्यात मणिकुंडल हा सर्वात मोठा व्यापारी होता. गरीबाचं मन त्याच्याकडे आकृष्ट झाले. त्या क्षणापासून तो मणिकुंडलच्या आसपासच राहू लागला. आणि त्याच्याकडून व्यापाराची रहस्ये शिकू लागला.

असे दिवस जात राहिले अन् जहाज नारिकेल नावाच्या लहानशा द्वीपावर थांबले. ''शिवदास, इथे नारळ, खोबरं अन् काथ्याच्या बनवलेल्या वस्तु स्वस्त मिळतात. आपण ज्या ज्या बेटांवर जाणार आहोत, त्यात सिंहल देशातही या वस्तुंना मोठी मागणी असते.'' कुंडलने त्याला शिकवले.

गरीब ताबडतोब त्याच्याबरोबर बेटावर गेला आणि दोघांनीही मिळून खूप वस्तु खरीदून जहाजावर सुरक्षित ठेवल्या.

यानन्तर व्यापारी कामांसाठी ते बेटात फिरत असताना मणिकुंडलच्या पायाला दगडाची ठोकर बसली अन् तो जमिनीवर पडला. जखमेच्या वेदनेमुळे त्याला झोप येईना. अंथरुणावर पडून कूस बदलत असताना त्याला दिसले की, एक माणूस आपल्याजवळ बसलेला आहे. दिव्याची वात मोठी करत त्याने विचारले, ''अरे शिवदास! अर्ध्या रात्री इथे कसा तू?''

गरीब धीम्या आवाजात म्हणाला, ''तुमची वेदना पाहून मला राहवेना. मिनिटभर थांबा.'' त्याने माणिकुंडलची पट्टी सोडली, आपल्या कपड्यात लपवलेला मणी बाहेर काढला अन् तो जखमेवर ठेवला. दुसऱ्याच क्षणी मणिकुंडलचे दुखणे थांबले! आश्चर्याने त्याने विचारले, ''शिवदास, काय प्रकार आहे हा? तू खराच व्यापारी आहेस का?''

गरीब थोडा वेळ संकोच करत राहिला, गप्प बसला. नंतर म्हणाला, ''असल्या प्रश्नाला तोंड द्यावं लागेल, म्हणूनच इतके दिवस मी याचा उपयोग केला नाही. पण तुमचं दुःख मला पहावेना. म्हणून आत्ता हे काम केलं मी.'' मणिकुंडलचे हात धरत तो म्हणाला, ''महाराज, आपण वयानं, अनुभवानं माझ्यापेक्षा मोठे आहात, चांगले आहात! माझ्या गत जीवनाबद्दल काही विचारू नका. माझ्या चालू स्थितीला कारण असणाऱ्या व्यक्तीला सर्व सांगितल्यावर मगच बाकी सर्वांना सांगायची माझी इच्छा आहे. एक विषय मात्र सांगतो मी तुम्हाला. नेहमीच मी परमेश्वरावर विश्वास ठेवला, पुढेही ठेवीन. माझा अटळ विश्वास आहे की, भगवान माणसाच्या कपाळी जे लिहितो, तेच घडतं, पुढेही घडेल. माझा हा विश्वासच माझ्या चालू स्थितीला कारण आहे, माझ्या व्यापारीजीवनाचे आपणच माझे पहिले गुरू आहात. माझ्यावर विश्वास ठेवा. अन् आशिर्वाद द्या.'' अन् मणिकुंडलला त्याने हात जोडून नमस्कार केला.

आश्चर्याने त्याचे सर्व बोलणे ऐकून मणिकुंडलने त्याच्या डोक्यावर हात ठेवून त्याला आशिर्वाद दिला.

**(पुढील अंकी समाप्त)**





# जितकं धन, तितकाच अुपचार

एका गावात सोमशेखर नावाचा धनिक माणूस होता. आसपास त्याच्याइतका पैसेवाला कोणीच नव्हता. तरीही तो कधी कोणाला मदत करायला पुढे होत नसे. एक नंबरचा कंजूष होता तो. अुष्ट्या हातानं तो कावळाही हाकलत नसे!

असा हा कंजूष प्राणी एकदा डोळ्यांच्या आजारानं त्रस्त झाला. डोळ्यांची आग होत राहून, सारखं पाणी गळू लागलं. त्यामुळे त्याचं डोकंही दुखू लागलं, पाय कापू लागले, डोळ्यांना नीट दिसेनासंही झालं!

जवळच्या गावी एक वैद्य रहात असे. खूप हुशार, प्रसिद्ध वैद्य होता तो. त्याची औषधं रामबाण ठरत. रोगी नक्की बरा होई त्या औषधांनी. दुसरा कोणी वैद्य त्याच्यापुढे टिकू शकत नसे. सर्वत्र त्याची तारीफ होत असे.

या वैद्यात एक विशेष गुण होता. रोग्याची परीक्षा तो स्वतः करी, त्याच्या सगळ्या परिस्थितीची माहिती करून घेई अन् नंतरच औषध देई. पैसेही चांगलेच वसूल करी तो. गरीबांनाही तो औषधं देई, पण त्यांची ऐपत पाहून त्यांच्याकडून पैसे घेई. धनिकांकडून अपेक्षाकृत जरा जास्तच वसुली करी.

कंजूष सोमशेखर या वैद्यावर नाराज असे. एकदा आजारी असताना त्यानं या वैद्याकडून अुपचार करवला. त्यानं याच्याकडून पुरेपूर वसुली केली. अन्य अुपाय नसल्यानं मुकाट्यानं त्यानं वैद्याला तेवढी रक्कम दिली होती.

आता सोमशेखरला डोळ्यांवर अुपचार करायचा, तर या वैद्याकडे जाणं भाग होतं, कारण आसपास कुठे दुसरा वैद्य नव्हताच. आता याच्याकडून इलाज करवायचा, तर मोठी रक्कम द्यावी लागणार!

सोमशेखरनं एक अुपाय शोधला. गरीब बनून वैद्याकडे जायचं ठरवलं त्यानं! मग त्यानं फाटके कपडे अंगावर घातले; एक मळकासा जुना पंचा डोक्याला बांधला, पानात दोन आणे बांधले अन् लंगडत लंगडत वैद्याकडे गेला. आपल्या वेषभूषेला अनुरूप भाषा वापरत त्यानं आपल्या व्याधीची माहिती देअून दीनतेनं इलाज करायची वैद्याला विनंती केली.

"मी तुझ्यावर अुपचार करीन; नक्की बरा होशील तू. माझ्या अुपचारानं तुझा आजार पार नाहीसा होईल. घाबरू नकोस. पण मी सांगितल्याप्रमाणेच तंतोतंत करावं लागेल. चार मुळे आणून त्याचे गोल-गोल काप कर. त्यावर मीठ शिंपडलंस की पाणी सुटेल. त्या पाण्यात हिंग मिसळून ते पी. नंतर अुरलेले मुळ्याचे तुकडे अुन्हात वाळवून रात्री ते खात जा. कमीत कमी चाळीस दिवस हा इलाज केलास, तर तुझा आजार छूमंतर होईल बघ!" वैद्यानं सांगितलं.

सोमशेखरनं घरी जाअून चाळीस दिवस वैद्यानं सांगितल्याप्रमाणे केलं. पण हा अुपचार फारच टाकाअू, तुच्छ वाटू लागला. मुळ्याचं मीठ घातलेलं पाणी हिंग घालून प्यायचं अन् वाळलेले मुळ्याचे तुकडे खायचे, हे सारं रोज स्वादिष्ट भोजन चापणाराला कसं आवडणार? तरीही त्यानं मोठ्या निकरानं नियम पाळून चाळीस दिवस वैद्यानं सांगितलेलं पथ्य पाळलं.

सोमशेखरच्या अुपचाराची मुदत संपल्या-बरोबर त्यानं रुचकर पदार्थ अन् मिष्टान्नं भरपूर खायला सुरुवात केली. बरेच दिवस नीरस खाणं खाल्ल्यामुळे त्यानं हे सर्व जास्तच खाल्लं. त्याची पचनशक्ती कमी झाली; त्याला खूप तहान लागू लागली, पोट अतिशय दुखू लागले. आता पुन्हा वैद्याचे पाय धरायची पाळी आली.

पुन्हा पूर्वीचा वेष धारण करून, पुरचुंडीत



पंचवीस वर्षांपूर्वी 'चान्दोबा' त प्रकाशित कहाणी



दोन आणे बांधून तो वैद्याकडे गेला. जुना आजार जाऊन आता नवा सुरू झाल्याचं त्यानं सांगितलं.

वैद्यानं सोमशेखरची नाडीपरीक्षा करून म्हटलं, ''पचवू शकला नाहीस इतकं खाल्लंस तरी काय तू? जे खाल्लस, ते कळलं म्हणजेच औषध देईन मी.

''लाडू खाल्ले'' सोमशेखर बोलला.

तुझ्या या स्थितीवरून स्पष्ट कळतंय, की तू खूपसे लाडू खाल्लेस.'' कुठे खाल्लेस इतके?'' वैद्याने जोर देत विचारलं.

विषय बदलायच्या उद्देशानं सोमशेखर पोट धरत म्हणाला, ''वैद्यजी, पोटदुखी सहन होत नाहीय मला! अगोदर औषध द्या. ते घेतलं की, हे सारं कसं घडलं ते सांगेन.''

''तुला ज्यानं लाडू खायला घातले, तो नक्की चांगला श्रीमन्त असणार. तो माणूस कोण, हे जोवर तू सांगत नाहीस, तोवर औषध द्यायचा प्रश्नच नाही. उपचार करायची माझी हीच पद्धत आहे. ज्यानं खायला घालून घालून तुला आजारी पाडलं, तो काय आजाऱ्याच्या इलाजासाठी पैसे नाही देऊ शकणार?'' वैद्य नाराजीनं म्हणाला.

''सोमशेखरच त्यांचं नाव आहे. मी काम करत होतो त्यांच्याकडे. बरेच दिवस गेले, म्हणून काल त्यांना भेटायला गेलो. त्यांनी लाडू दिले अन् मी 'नको' म्हणू शकलो नाही. ते लाडू देत राहिले आणि मी खात राहिलो.'' सोमशेखरने सांगितले.

''मग आत्ताच त्यांच्याकडे जा आणि पन्नास रुपये घेऊन ये. या औषधाची किंमत पन्नास रुपये आहे. तू परत येईपर्यन्त औषध तयार ठेवतो मी.'' वैद्य म्हणाला.

''वैद्यजी हे तर चुकीचं आहे नं? त्यांचे लाडू चांगले पोटभर खाल्ले अन् त्यामुळे आजारी पडलो, तर त्यांची काय चूक? आजाराच्या इलाजासाठी त्यांच्याचकडे पैसे कसे मागू? माझ्याच्यानं नाही बाबा होणार ते!'' सोमशेखर म्हणाला.

तुझ्याकडून जमणार नसेल, तर मी स्वतःच मागून वसूल करीन. असे म्हणत वैद्याने सोमशेखरच्या तोंडात चूर्ण टाकलं अन् पाणी पाजलं. तो त्याला म्हणाला की, 'तुझं अजीर्ण लवकरच बरं होईल. आता तू जाऊ शकतोस.'

तोंडात चूर्ण घातल्याबरोबर सोमशेखरच्या तोंडाची आग होऊ लागली, जीभ थरथरू लागली अन् घेऱ्या येऊ लागल्या. कान



निष्क्रिय झाले. आपण बहिरे झालो, असं त्याला वाटू लागलं. ताबडतोब त्याला घरी जायचं असल्यामुळे तो भरभर घराकडे चालू लागला. चालवेनासे झाल्यामुळे तो एका झाडाखाली बसला आणि तोंड उघडून पाहिलं. इतक्या अवधीत वैद्य सोमशेखरच्या घरी पोचला. तिथे त्याला तो बाहेर गेला असून केंव्हाही परत येण्याची शक्यता असल्याचं कळलं. म्हणून तो सोमशेखरची वाट पहात तिथेच बसून राहिला.

थोड्या वेळानं सोमशेखर धडपडत, धापापत, मोठ्या मुश्किलीनं घरी पोचला. त्यानं तिथे बसलेल्या वैद्याला अचानक पाहिलं अन् घाबरत, ''आपण? इथं?'' असं म्हणत खुर्चीवर बसला.

वैद्यानं त्याला ओळखलं त्याच्या लक्षात आलं, की धनवान सोमशेखरच गरीब रोगी बनून आपल्याकडे औषधासाठी आला होता. सोमशेखरचं वागणं त्याला फार खटकलं. थोड्याशा पैशांसाठी माणूस पायरी सोडून इतका खाली येईल असं त्याला वाटलं नव्हतं. लाचार, गरीब माणूस पैसे देऊ शकला नाही, तर त्यामागं सबळ कारण असतं, त्यांचं दारिद्र्य अन् विवशता असते. वैद्याने आता निश्चय केला की, या कंजूष धनिकाकडून भरपूर पैसे काढूनच दाखवीन, त्याला चांगला धडा शिकवून राहीन. कंजूषपणा एका मर्यादेपर्यंत ठीक असेल, पण कंजूषपणाचं नाटक करणं, हा अपराध आहे. या अपराधाबद्दल अपराध्याला शिक्षा मिळायलाच हवी.

वैद्य नाराजीनं म्हणाला, ''मला पहिल्या-पासूनच तुझ्या खोटेपणाचा संशय होता कारण हा आजार मेहनत करणाऱ्या गरीबांना होतच नाही! तू डोळ्यांची तक्रार घेऊन आलास तेंव्हा तुला गरीब समजून देशी औषधच दिलं होतं. तुझ्यासारख्या लोकांवर देशी औषधाचा परिणाम होतच नाही; त्यांना रुचकर लेह, सुगंधी लेपन आणि तेल हवं. तुमच्या अजीर्णाचं औषधही निराळं असतं. पैशांची चिंता करू नकोस. दिव्य औषधं भरलेली आहेत. गोड्या रोगांसाठी रुचकर औषधांची गरज असते.''

वैद्यानं सोमशेखरकडून खूप पैसे वसूल केले, महागडी औषधं दिली अन् त्याच्यावर इलाज केला.



विशेष समाचार

## फ्रान्समधे नवे सरकार

ब्रिटनचे सरकार बदलल्याबद्दल आपण मागील अंकात वाचले. बदलाची ही हवा इंग्लिश खाडीतून पुढे येत आहे, असे वाटत आहे. जूनच्या पहिल्या तारखेला फ्रान्समधेही सार्वत्रिक निवडणुका झाल्या. त्यामुळे त्यांचेही सरकार बदलले. इंग्लंड मधे कॉन्झर्वेटिव्ह पार्टी हरल्यामुळे अठरा वर्षांनी लेबर पार्टीच्या हाती राज्यशासन आले. फ्रान्समधेही कॉन्सर्वेटिव्ह पक्षाचा अपूर्व असा पराभव होऊन तेरा वर्षांनी वामपक्षी दल सत्तारूढ झाले. सोशलिस्ट पक्षाचे नेता लयोनेल-जास्पिन नवे प्रधानमन्त्री बनले. ठरलेल्या वेळेच्या एक वर्ष अगोदरच फ्रान्समधे या निवडणुका झाल्या. कॉन्झर्वेटिव्ह पक्षाचे जाकेस चिराक हे देशाचे अध्यक्ष व एलेन जूस हे प्रधानमन्त्री होते. अध्यक्ष व प्रधानमन्त्री या दोघांची पूर्ण खात्री होती की या निवडणुकीत आपला बहुमताने जय होईल अन् त्यामुळे ठरलेल्या वेळेपेक्षा एक वर्ष अगोदरच त्यांनी निवडणुक लढवण्याचे ठरवले.

परन्तु त्यांचा अन्दाज चुकीचा ठरून सर्वच अुलटसुलट झाले! संसदेची एकूण संख्या आहे ५७७. कॉन्झर्वेटिव्ह पक्षाला त्यातील २५६ जागा मिळाल्या.

मागील संसदेत कम्युनिस्टांची संख्या फक्त २४ होती. त्यांनी आता ३८ जागा जिंकल्या. ही संख्या सरकार बनवायला अपुरी असल्यामुळे सोशलिस्ट ग्रुपने त्यांची मदत मागितली. जास्पिनने कम्युनिस्टांना मन्त्रिमंडळात सामील होण्यासाठी दिलेले निमन्त्रण त्यांनी स्वीकारले. चौदा सदस्यांच्या मन्त्रिमंडळात दोन कम्युनिस्टही आहेत.

फ्रान्सच्या संविधानानुसार सरकार चालवण्याचे सर्व अधिकार अध्यक्षाचेच असतात. चालू अध्यक्ष कॉन्झर्वेटिव्ह दलाचे असून मन्त्रिमंडळ मात्र त्यांच्या प्रतिद्वंद्व्यांनी बनवले आहे. प्रधानमन्त्री जास्पिन यांनी अशी आशा व्यक्त केली आहे की, ''देशाचे कल्याण प्रमुख मानून परस्पर आदर-भावना मनात बाळगूनच अध्यक्ष चिराक यांच्याबरोबर मिळून मिसळून काम करू.''

५७ वर्षांचे जास्पिन प्रथम विश्व विद्यालयात अध्यापक होते. काही काळ त्यांनी देशाच्या शिक्षणमन्त्र्याचे कामही संभाळले. त्यांनी कॉन्झर्वेटिव्ह पार्टीच्या नीति-घोषणा-पत्राला 'केवळ शुष्क वाक्यांचे गाठोडे' असे म्हणून त्यावर टीकेची झोड अुठवली. ते म्हणाले, ''फ्रान्सच्या प्रजेला खोट्या आश्वासनांची गरज नसून केवळ खऱ्याची माहिती हवी.'' ते असे मानतात की फ्रान्समधे खरे तर सध्या बेकारीची समस्या तीव्र आहे. तेंव्हा आपले पहिले ध्येय म्हणजे बेकारी हटवण्यासाठी निरनिराळ्या नोकऱ्यांचा मार्ग शोधायला हवा. ते झपाट्याने काही सुधारणाही अंमलात आणू इच्छित आहेत. ''प्रजेला खूप काही हवे आहे. पण ते सर्व एकदम, बरोबरच व्हायला हवे - असे ती म्हणत नाहीय. भविष्यात प्रगती व्हावी, यासाठी ती न्याय्य मागण्या करत आहे.'' असे प्रधानमन्त्री जास्पिन म्हणाले.





# आजार अुपयोगी पडला

**च**न्दनवनमधे शतव्रती नावाचा एक अुत्तम व प्रख्यात वैद्य रहात असे. लोक त्याला अुच्च कोटीचा धन्वन्तरी मानत असत.

त्याच्या एकुलत्या एका मुलाचे नाव होते दशव्रती. मातापित्यांनी त्याला फार कोडाकौतुकाने वाढवले. तो तल्लख बुद्धीचा निपजला, तरी एक नंबरचा हट्टी होता. मातापित्यांना वाटे की वाढत्या वयाबरोबर त्याचा हा दुर्गुण नाहीसा होत जाईल. परन्तु अुलटच घडले - वयाबरोबर दुर्गुणही वाढत गेला. रोपटेच वाकत नसेल, तर वृक्ष कसा वाकणार?

तसा तर दशव्रती वाईट सवयींच्या आहारी गेला नव्हता; परन्तु तो केवळ आपल्या मनाला वाटेल, तसाच वागत असे. वैद्यकशास्त्र शिकण्यासाठी पित्याने खूप आग्रह केला, पण त्याने नकार दिला. काव्य, पुराण आदि काव्ये वाचण्यात त्याला गोडी वाटे. तो स्वतःही कविता लिहीत असे. दुसऱ्यांची चेष्टा करणे, आपली चूक कबूल न करणे, मोठ्या माणसांचा अपमान करणे इ. वाईट सवयी त्याला जडलेल्या होत्या.

आपली ही वर्तणूक सोडून देण्याबद्दल पित्याने अनेकदा सांगूनही दशव्रतीवर त्याचा ढिम्मसुद्धा परिणाम झाला नाही. एके दिवशी शतव्रती त्याला म्हणाला, "ज्याची बुद्धी चांगली, त्याची तब्येतही चांगली रहाते. तू सुधारला नाहीस, तर तुला अुगीचच काही रोग वगैरे जडायची शक्यता आहे."

दशव्रतीने तरीही नेहमीप्रमाणे दुर्लक्षच केले. पण पित्याने सावधगिरीची सूचना दिल्यापासून एक महिन्याच्या आतच त्याला एका विचित्र रोगाने पछाडले. एक दिवस भल्या सकाळीच झोपेतून अुठला, तेंव्हा त्याच्या अंगावर सर्वत्र लाल-पांढरे डाग अुठलेले होते! फारच विचित्र दिसत होता तो. आपल्या मुलाची अवस्था पाहून शतव्रती फार घाबरला व त्याने त्याला औषध दिले. या औषधाच्या प्रभावाने दशव्रतीच्या हातापायांवरचे डाग नाहीसे झाले, पण पाठीवरचे अन् पोटावरचे डाग मात्र होते तसेच राहिले. हे डाग झाकण्यासाठी तो अंगात कायम सदरा घालून राही.

"दुसऱ्यांशी आदराने वाग, त्यांना मान दे; प्रत्येक गोष्टीत नाराजी दाखवायचं सोड, आपले दोष अन् आपली जीभ यांवर ताबा ठेव - मगच तुझा हा आजार बरा होईल." शतव्रतीने मुलाला समजावून सांगितले.

दशव्रतीचा या बोलण्यावर विश्वास बसला नाही. त्याला संशय येअू लागला की, पिता मुद्दामच आपल्या आजारावर औषधोपचार करत नाहीय. इतकेच नव्हे, तर त्याला असेही वाटत होते की त्यांनी मुद्दामच आपल्या खाण्यात काही औषध मिसळून आपल्यावर ही आपत्ती आणलीय. त्याने मातेजवळ तसे बोलून दाखवले व तिने पित्याला तसे सांगितले.

"परक्या लोकांवरही औषधोपचार करून मी त्यांचे आजार दूर करतो. कोणी आजारी पडावं अशा अुद्देशानं शत्रूलाही कधी तसं औषध मी दिलं नाही." आपल्या मुलाच्या स्वभावाबद्दल चिन्ता वाटून शतव्रतीने आपले दुःख प्रकट केले.

परन्तु दशव्रतीचा संशय दूर झाला नाही. पित्याबद्दल त्याला संशय वाटतच राहिला. काही दिवसांनी शतव्रतीकडे एक रोगी आला. त्यालाही दशव्रतीसारखाच आजार जडला होता. शतव्रतीने त्याला औषध देअून म्हटले,



"आपल्यापेक्षा मोठ्यांबद्दल नेहमी आदर बाळग; लहानांबद्दल दयाभाव ठेव; राग, चिडकेपणा आपल्या ताब्यात ठेव; म्हणजे लवकरच हा आजार बरा होईल."

आठवडाभरात तो रोगी अगदी ठणठणीत बरा झाला.

हे समजल्यावर दशव्रती पित्याजवळ जाअून रागाने म्हणाला, "हा रोगी एका आठवड्यात बरा झाला. तुम्ही जाणूनबुजूनच मला बरोबर औषध दिलं नाहीत. त्याला जे औषध दिलंत, तेच मलाही द्या. तसं न केलंत, तर 'मी तुम्हाला आवडतच नाही' असं समजेन. शतव्रती हसून म्हणाला, "अरे, पण मी तुम्हा दोघांना एकच औषध दिलं, मी समजावलं, तरी समजून घ्यायला तयार नाहीस तू. आता केवळ एकच अुपाय



अुरलाय. वैद्यकशास्त्राचा स्वतः अभ्यास केलास, तर तू स्वतःच सत्य जाणू शकशील.''

''मला वैद्यकशास्त्राची जराही आवड नाहीय. मला इतकंच सांगा की, कोणतं पुस्तक वाचलं की माझा आजार नाहीसा होईल? तेवढंच फक्त वाचून इलाज समजून घेईन मी.'' दशव्रती आवेशाने बोलला.

''वैद्यकशास्त्रात मानवी-शरीराच्या तत्वांबद्दल वर्णन दिलेलं असतं. रोग का होतात, त्यांची कारणं दिलेली असतात. आपण जे अन्न-पदार्थ खातो, आजार दूर करण्यासाठी आपण ज्या वनस्पतींचा, मुळ्यांचा अुपयोग करतो त्यांबद्दलचं वर्णन या शास्त्रात असतं. त्या सर्वांचं नीट अध्ययन अन् मनन करून वैद्य औषध तयार करतो. अमक्या रोगाला अमकंच औषध हवं - असं वैद्यकशास्त्र सांगत नाही. हा निर्णय तर फक्त वैद्यच करू शकतो. शास्त्र वाचल्यावरच माणूस वैद्य बनण्याचा अधिकारी होतो.'' शतव्रती बोलला.

पित्याचे हे बोलणे ऐकल्यावर 'आपण वैद्य बनून दाखवूच' असे दशव्रतीने ठरवले. पित्याने आपल्याला मुद्दाम चुकीचे औषध दिले - असे त्याला शाबित करून दाखवायचे होते. शास्त्र शिकून आपण रोगावर बरोबर औषध शोधून काढायचे त्याने ठरवले. त्यादिवसापासून तो अगदी मनापासून अभ्यासाला लागला. शतव्रती त्याला म्हणाला, ''स्वतःच अभ्यास करायचा म्हटलंस, तर शिकायला अुशीर लागेल; तुझं ज्ञान सीमित राहील, विषयाच्या खोलात तू जाअू शकणार नाहीस. कोणतीही विद्या गुरूजवळच शिकायला हवी. 'पित्यापेक्षा अुत्तम गुरू कोणी असू शकत नाही' हे सत्य जाणून घे.''

वैद्यकशास्त्र लवकर शिकण्यासाठी दशव्रतीने हे मान्य केले. तो स्वतः चांगला बुद्धिमान होताच, अन् त्यावर धन्वन्तरी पित्याकडून मिळालेले शिक्षण! एका वर्षातच वैद्यकशास्त्राची मुख्य वैशिष्ट्ये त्याने शिकून घेतली.

आता कुठे पित्याने सांगितलेल्या काही गोष्टींतील सत्य त्याच्या पचनी पडले. संतोष व शान्ति-दोन्हीही माणसाला शारीरिक स्वास्थ्यासाठी आवश्यक आहेत. घृणा, ईर्ष्या, द्वेष, असंतोष, क्रोध या सर्वांमुळे मनुष्याच्या स्वास्थ्याची हानी होते. ही सारी सत्ये जाणल्यानन्तरही त्याच्या मनात 'पित्याने आपल्याला योग्य औषध न दिल्याचा' संशय अजून कायम होताच.

दशव्रतीला आपल्या रोगाचे औषध माहीत झाले. ते बनवण्यासाठी दोन मुळ्यांची आवश्यकता होती. 'आपल्या संग्रहात त्या नाहीत' असे शतव्रतीकडून कळल्यावर तो त्यासाठी स्वतः जंगलाकडे निघाला.

जंगलात दशव्रती खूप फिरला अन् शेवटी त्याला त्या वनस्पती सापडल्या. तो त्या जमवत असतानाच कुठूनसा एक बाण येअून जवळच जमिनीत घुसला. बाणाच्या वेगामुळे त्याचा अुजवा हात जरासा सोलवटला.

क्रोधाने दशव्रती ओरडला, ''कोणा दुष्टाचं काम हे? फार गर्व झालाय का? माझ्यावर बाण सोडायची काय गरज?'' अन् असे बोलत तो मागे वळला.

त्याला असे दिसले की, आपल्या देशाचा राजाच तेथे अुभा आहे! तो शिकारीसाठी तेथे आलेला होता. जनावरावर सोडलेल्या बाणाचा नेम चुकला होता. त्याला पाहून राजा हसत म्हणाला, ''मी मुद्दाम तुझ्यावर बाण सोडला नाही. अन् तूही मुद्दाम निन्दा पर शब्द अुच्चारले नाहीस. माझ्या बाणामुळे तुला त्रास झाल्याचं कबूल करतो मी! तूही कबूल कर, की नकळत तू या देशाच्या राजाला शिवी दिलीस.'' दशव्रती म्हणाला, ''बाण चालवून आपण चूक केल्याचं तू कबूल केलंस. पण बाण मला लागल्यामुळेच मी तुला शिवी दिली. मी काही चूक केलीय, असं मला वाटत नाही.''

''मी राजा आहे देशाचा! आपल्या देशाच्या राजाला मान द्यायला शीक अगोदर! मग कोणाकोणाची कायकाय चूक झाली, याची मोजदाद करता येईल.'' राजा बोलला.

जास्तच अस्वस्थ होत आता दशव्रती



म्हणाला, "सामान्य माणसाकडून चूक घडली, तर परिणाम त्याला स्वत:लाच भोगावा लागतो. पण राजाकडून चूक घडल्यास संपूर्ण राज्यावर परिणाम होतो. चूक करणारा राजा आदरपात्र नव्हेच. मी आपली चूक मानायला तयार नाही."

त्याचे बोलणे ऐकून राजाच्या रागाचा पारा चढला. त्याने टाळी वाजवली, व दहा सैनिक तेथे धावून आले. त्यांना तो म्हणाला, "स्वत:ची चूक कबूल करणाऱ्याचीही निंदा करणारा अपराधी आहे हा! आपल्या राजाचाही आदर न करणारा वाचाळ आहे हा. याला आसुडाचे शंभर फटके मारा."

झाले, दोन सैनिकांनी दशव्रतीचे दोन्ही हात पिरगाळून धरून ठेवले अन् मारण्यासाठी आसूड वर अुचलला.

आता परिस्थितीचे गांभीर्य ओळखून कापत कापत दशव्रती बोलला, "महाप्रभु, मी प्रसिद्ध वैद्य शतव्रती यांचा मुलगा आहे. आजाराने अस्वस्थ आहे. काही पाळं-मुळं गोळा करण्यासाठी इथे आलो आहे. अस्वास्थ्यामुळे राग अन् चिडचिड मर्यादेबाहेर गेले; स्वत:वर ताबा ठेवू शकलो नाही. तोंडाला येईल, ते बडबडलो. क्षमा असावी मला."

"हं, आसूड पाहिल्यावर बदल झाला काय तुझ्यात?"

आसूड मारण्यासाठी सैनिकाने दशव्रतीचा सदरा काढून घेतला. त्याच्या शरीरावरील डाग पहाताच. "यानं आजाराबद्दल म्हटले, ते खरंच आहे. सोडून द्या त्याला." राजाने आज्ञा दिली.

जीव वाचल्याच्या आनन्दात वनस्पती घेअून दशव्रती घरी परतला. घडलेली घटना पित्याला सांगून तो म्हणाला, "तुम्ही मला समजावायचे खूप प्रयत्न केलेत; जिभेवर ताबा ठेवण्याबद्दलही तुम्ही सुचवलं. पण मीच बेपर्वाई दाखवली. तुम्ही सांगितलं होतं की, 'हा सुद्धा एक रोगच आहे, त्यापासून दूर रहा.' माझ्या शरिरावर हे डाग नसते, तर आज मी मेलोच असतो."

"या आजारानं तुझं भलंच झालं. क्रोध, वाचाळपणा, बकवास, इत्यादी भयानक रोगच आहेत, हे तुझ्या आता लक्षात आलंय. आता यापुढे या आजाराशी तुझा संबंध रहाणार नाही." शतव्रतीने मुलावर अुपचार केले, अन् दहाच दिवसात त्याला आजारातून मुक्त केले.





# आनन्दीआनन्द

अुर्मिला ही सुशीला व श्याम यांची एकुलती एक मुलगी. त्यांनी यामुळे तिला खूप लाडाने वाढवले होते. अुर्मिलाही आपल्या आईला सोडून कधीही, कुठेही राहिली नव्हती. मोठी झाल्यावर तिच्या आईवडलांनी तिच्यासाठी कंबर कसून स्थळांचा शोध घ्यायला सुरुवात केली. सुशीलाच्या आईची घरजावई शोधायची इच्छा होती. श्यामलाही तसेच वाटे. तशी तर खूप स्थळे आली. पण घरजावई बनून सासुरवाडीला रहायची कोणाचीच इच्छा नव्हती.

शेवटी सुशीला-श्याम यांना आपला आग्रह सोडून द्यावा लागला. मनात नसले, तरी लग्नानन्तर मुलीला सासरी पाठवायचा निर्णय त्यांना घ्यावा लागला. जवळच्या गावच्या रामबाबू नावाच्या युवकाने अुर्मिलाला पाहिले व त्याला ती पसन्त पडली. दोन्ही पक्षांच्या वडील माणसांनी आपसात बोलून लग्न ठरवले. विवाह मोठ्या थाटामाटाने पार पडला व अुर्मिला सासरी नान्दायला गेली.

माहेरी फार लाड झाल्यामुळे अुर्मिलेला सासरी रहाणे जड जाअू लागले. तिने पंधरा दिवसातच सासूला 'आपण माहेरी निघून जाणार असल्याचे' स्पष्टपणे सांगून टाकले. याशिवाय तिने नवऱ्यालाही 'आपल्याबरोबर आपल्या माहेरीच येअून रहायला' सुचवले. पण रामबाबूने घरजावई बनायला नकार दिला.

अुर्मिला एकटीच माहेरी परतली. सुशीला-श्याम मुलीला पाहून खूश झाले. ती सासरी गेल्यापासून ते फार चिंतेत होते. माहेरी आल्यावर आठवडाभरात अुर्मिलेला नवऱ्याची आठवण येअू लागली. तिला त्याच्यावाचून रहावेना. आईने कितीही समजावले, तरी काहीही करून आपल्याला नवऱ्याकडे जायचे असल्याचा तिने हट्ट धरला. मुलीच्या वागणुकीचे सुशीलेला फार आश्चर्य वाटले.

रमणी खोपकर

एके दिवशी सकाळी अुर्मिला सासरी जाण्यासाठी बाहेर पडली. इकडे रामबाबूला ही एकटेपण सतावत होते. त्यालाही अुर्मिलेवाचून रहावेनासे झाले, तिची आठवण सतावू लागली. त्याचे आईबाप त्याला वारंवार सांगू लागले की, ''तू सासुरवाडीला गेलास तर जग आपल्याला हसेल. आपल्या अन् परक्या माणसातही तुझी काही किंमत अुरणार नाही. लोक तुझी टर अुडवतील!'' तरीही त्यांचा हितबोध तो कानाआड करू लागला. त्याला सावधगिरीचा इशारा देत वडील म्हणाले, ''अरे, आपली प्रतिष्ठा यामुळे मातीला मिळेल. गावातल्या मोठ्या शेतकऱ्याचा मुलगा आहेस तू. आपलं घरदार, आपलं अुच्चस्थान विसरून, घरजावई बनून निघून जाणार तू?''

''गेलो तर काय होईल? काय आकाश खाली जमिनीवर कोसळेल?'' नाराजीने असे बोलून रामबाबू बाहेर पडला. रामबाबू अन् अुर्मिला दोघेही वाटेतच एकमेकांना भेटले, अन् आश्चर्यात पडले. काही क्षण दोघांच्याही तोंडून शब्द फुटेना.

अुर्मिलेने प्रथम स्वतःला सावरले अन् म्हटले. ''मी तुमच्या घरी येअून राहू शकणार नाही, अन् आमच्या घरी येणं तुम्हालाही पसंत नाही. आता काय करावं असं वाटतं तुम्हाला?''

थोडा वेळ विचार करून रामबाबू म्हणाला, ''अडचणीचा अुपाय तर अगदी सोपाच आहे! तुझ्या घरीही रहायची गरज नाही आपल्याला, अन् माझ्याही घरी नको. चल, आपण जाअून आपला निराळा संसार मांडू. कधीकधी तुझ्या घरी अन् कधीकधी माझ्या घरी जात जाअू अन् आपल्या माणसांना भेटत जाअू आपण! कसलीही तक्रार न होता आनन्दानं राहू या!''

अुर्मिलेने खुशीने डोके हलवून संमती दिली. घडलेले सर्व जाणून रामबाबूचे वडीलही खुशीने आपल्या बायकोला म्हणाले, ''पाहिलंस? मुलानं माझंच ऐकलं. घरजावई बनून सासरी नाही गेला तो! काहीही असो, शेवटी मुलगा कुणाचा आहे?''

''पाहिलंत? सासरी नाही गेली अुर्मिला! जावयालाच बरोबर मार्गावर आणलं तिनं. शेवटी मुलगी कोणाची आहे?'' सुशीलाही इकडे आनन्दाने नवऱ्याला म्हणाली.





# सम्राट अशोक

७

(तक्षशिलामध्ये झालेल्या बंडाचा बीमोड करून विजेता अशोक स्वदेशी परत येत असताना त्याला मारून टाकायचे कारस्थान सुशेमने रचले. परन्तु ते सफल झाले नाही. ज्येष्ठ पुत्राच्या कुटिल कारस्थानामुळे राजा बिन्दुसारच्या मनाला मोठाच धक्का बसला. त्याने निर्णय घेतला की, दोन्ही राजकुमारांपैकी एकाला राजप्रतिनिधी म्हणून अुज्जयिनीला पाठवावे. सुशेम राजधानी पाटलीपुत्र सोडून जायला तयार नव्हता म्हणून अशोकलाच तेथे पाठवायचे ठरले. अशोक आपल्या आज्ञेचे अुल्लंघन करणार नाही, अशी त्याची खात्री होती.) - यानन्तर

अशोकने येअून पित्याला विनयपूर्वक प्रणाम केला. राजाने संकेतानेच त्याला आसनावर बसायला सुचवले, स्वतः शय्येवर अुठून बसून तो अशोकला म्हणाला, ''पुत्र अशोक, तू विजयी होअून परतलास याबद्दल मला अतिशय संतोष वाटला. आपला जीव संकटात घालून तू बंडखोरांचा नायनाट केलास. तुला मारण्याच्या कारस्थानातूनही तू अगदी थोडक्यात वाचलास. आपली शासन-पद्धती सध्या काहीशी विस्कळित असल्याचं तुला माहीतच आहे. ती सुधारणे-सावरणे अन् सुचारू रूपात ठेवणे हे अत्यन्त आवश्यक आहे. विजय व सुधारणा तुम्हा दोघा राजकुमारासाठी दोन डोळ्यांइतक्या महत्वाच्या आहेत. पैकी एकात तू आपलं सामर्थ्य सिद्ध करून दाखवलंस अन् शाबित केलंस की तू खऱ्या अर्थानं महान योद्धा आहेस. आता दुसऱ्या विषयातही मी तुझ्या

एके दिवशी सकाळी अुर्मिला सासरी जाण्यासाठी बाहेर पडली. इकडे रामबाबूला ही एकटेपण सतावत होते. त्यालाही अुर्मिलेवाचून रहावेनासे झाले, तिची आठवण सतावू लागली. त्याचे आईबाप त्याला वारंवार सांगू लागले की, "तू सासुरवाडीला गेलास तर जग आपल्याला हसेल. आपल्या अन् परक्या माणसातही तुझी काही किंमत अुरणार नाही. लोक तुझी टर अुडवतील!" तरीही त्यांचा हितबोध तो कानाआड करू लागला. त्याला सावधगिरीचा इशारा देत वडील म्हणाले, "अरे, आपली प्रतिष्ठा यामुळे मातीला मिळेल. गावातल्या मोठ्या शेतकऱ्याचा मुलगा आहेस तू. आपलं घरदार, आपलं अुच्चस्थान विसरून, घरजावई बनून निघून जाणार तू?"

"गेलो तर काय होईल? काय आकाश खाली जमिनीवर कोसळेल?" नाराजीने असे बोलून रामबाबू बाहेर पडला. रामबाबू अन् अुर्मिला दोघेही वाटेतच एकमेकांना भेटले, अन् आश्चर्यात पडले. काही क्षण दोघांच्याही तोंडून शब्द फुटेना.

अुर्मिलेने प्रथम स्वत:ला सावरले अन् म्हटले, "मी तुमच्या घरी येअून राहू शकणार नाही, अन् आमच्या घरी येणं तुम्हालाही पसंत नाही. आता काय करावं असं वाटतं तुम्हाला?"

थोडा वेळ विचार करून रामबाबू म्हणाला, "अडचणीचा अुपाय तर अगदी सोपाच आहे! तुझ्या घरीही रहायची गरज नाही आपल्याला, अन् माझ्याही घरी नको. चल, आपण जाअून आपला निराळा संसार मांडू. कधीकधी तुझ्या घरी अन् कधीकधी माझ्या घरी जात जाअू अन् आपल्या माणसांना भेटत जाअू आपण! कसलीही तक्रार न होता आनन्दानं राहू या!"

अुर्मिलेने खुशीने डोके हलवून संमती दिली. घडलेले सर्व जाणून रामबाबूचे वडीलही खुशीने आपल्या बायकोला म्हणाले, "पाहिलंस? मुलानं माझंच ऐकलं. घरजावई बनून सासरी नाही गेला तो! काहीही असो, शेवटी मुलगा कुणाचा आहे?"

"पाहिलंत? सासरी नाही गेली अुर्मिला! जावयालाच बरोबर मार्गावर आणलं तिनं. शेवटी मुलगी कोणाची आहे?" सुशीलाही इकडे आनन्दाने नवऱ्याला म्हणाली.





कारस्थानाचा विषय आईपासून मुद्दामच टाळला. तिला कळले, तर ती अधिकच घाबरून जाईल असे त्याला वाटले. पिता आणि मंत्री यांनी कारस्थानाबद्दल सुशेम-विरुद्ध काही कारवाई न केल्याबद्दलही त्याच्या मनात दु:ख नव्हते. त्याला माहीत होते की, ते रहस्य अुघड झाले, तर तो राजवंशाचा अपमान ठरेल. त्याच्यावर चिखलफेक होईल. विद्रोही शक्ती याचा लाभ घेअून देश विच्छिन्न करायचा प्रयत्न करतील. असे तर, कधीच-कोणत्याही परिस्थितीत घडणे गैर आहे. देश-कल्याण सर्वोपरी आहे.

सुशेमने जायला नकार दिल्यामुळे, राजा आपल्याला अुज्जयिनीला पाठवत आहे, याबद्दल त्याला वाईट वाटत नव्हते. 'पित्याची आज्ञा पाळणं हे आपलं प्रथम कर्तव्य आहे.' अशी त्याची भावना होती.

एके दिवशी सूर्योदयाच्या शुभसमयी शंभर सैनिकांसह अशोकने अुज्जयिनीकडे प्रयाण केले.

मध्याह्न होताहोता तो सुंदरशा विदिशेच्या घाटातल्या एका गावात पोचला. गाव लहान-लहान डोंगरांनी वेढलेले होते. तेथे त्याला बरीचशी मन्दिरे व एक बौद्धविहारही आढळला. त्या गावात शाक्य वंशात जन्मलेली गौतम बुद्धाच्या वंशातली काही संपन्न कुटुम्बे रहात असत.

विदिशा दरीतल्या शाक्य नायकाने अशोकचे स्वागत केले आणि स्वत:च्या घरी पाहुणचाराची व्यवस्था केली. परन्तु अशोकने गावाबाहेरच रहायचा निर्णय घेतला. त्याच्या आज्ञेनुसार एका समतल टेकडीवर विश्रांतीसाठी पडाव तयार करण्यात आला. रात्री भोजनानन्तर अशोक आरामात झोपी गेला.

अुष:काली तो जागा झाला व पडावाबाहेर आला. चारी बाजूंना धुके दाटलेले होते. त्या प्रशान्त, मनोहर वातावरणात काही अंतर पायी फिरत जावे अशी इच्छा मनात येअून त्याने अंगरक्षकांनाही बरोबर यायला मनाई केली व नैसर्गिक सौन्दर्याचा आस्वाद घेत तो हळूहळू चालत राहिला. पहाटेच जागे झालेल्या पक्ष्यांचे मधुर संगीत कानांना आल्हाद देत होते. डोंगरदऱ्यांमधे संपूर्ण शान्तता नान्दत होती. पूर्वेला आता सूर्योदय होत होता. सूर्याचे सुवर्णकिरण निळसर धुके चिरत आकाशाला अजब शोभा आणत होते.



त्या थंड हवेत उभा राहून अशोक ते दृश्य नजरेने पिऊ लागला. तो आता एक पाऊल पुढे टाकणार, इतक्यात आवाज आला, ''थांबा, तिथंच थांबा!''

हा मधुर कंठस्वर कोणाचा, हे पहाण्यासाठी अशोकने वळून पाहिले. त्याला थोड्याच अंतरावर एक सुंदर तरुणी उभी असलेली दिसली. पांढुरक्या धुक्याच्या पडद्या मागून जणू आकाशातूनच उतरलेल्या देवी-सारखी भासली अशोकला ती.

''आपणाला थांबवलं. क्षमा असावी! आपल्या बरोबर समोर एका पावलावरच एक अगाध खाई आहे.'' ती युवती बोलली.

इतक्यात धुके काहीसे पातळ झाले. प्रकाश पसरला, आणि अशोकने डावीकडे वळून पाहिले. त्याला समोरच एक अत्यंत खोल अशी दरी दिसली! आपण अगदी तिच्या किनाऱ्यावरच उभा असलेले अशोकला आढळले. एक पाऊलही पुढे टाकले असते, तर मृत्यु अटळ होता!

अशोक वळून त्या तरुणीच्या जवळ गेला. तिने मान खाली घालून म्हटले, ''मधेच अडथळा आणला मी, क्षमा असावी युवराज!''

''तुला क्षमा करू मी? तू नसतीस तर माझं प्राणपाखरू केंव्हाच उडून गेलं असतं.'' अशोक बोलला.

''मी नाही आपलं रक्षण केलं; शाक्य-मुनि बुद्ध यांच्या दयेनंच केलं ते.'' ती तरुणी म्हणाली.

''कोण आहेस तू? यावेळी इथे कशी आलीस?'' अशोकने विचारले.



''या प्रदेशाचं नाव, तेच माझंही नाव आहे. विदिशा म्हणतात मला. इथले शाक्यनायकच माझे पिता आहेत. इथल्या एका गुहेत रहाणाऱ्या वृद्ध बौद्ध भिक्षूची सेवाशुश्रूषा करून परत जात आहे मी.'' तरुणीने सांगितले.

विदिशाच्या बोलण्याची पद्धत व तिचे सौन्दर्य यांनी अशोकला आकृष्ट केले. तिचे प्रशांत वदन मोठे मनोहारी होते.

''युवराणी विदिशा, आपली कृतज्ञता कशी व्यक्त करावी, हे समजत नाहीय मला.'' अशोक म्हणाला.

''मी युवराणी नव्हे युवराज!'' विदिशा बोलली.

''तू तर युवराणीपेक्षाही श्रेष्ठ आहेस. माझं रक्षण करणारी देवीच आहेस तू.'' अशोक



म्हणाला.

''युवराज, एका विषयाकडे आपलं लक्ष वेधणं हे कर्तव्य आहे माझं. मी आपलं रक्षण नाही केलं. शाक्यमुनि बुद्धदेवांच्या भक्तांची शुश्रुषा अुरकून परत येत होते न मी? म्हणजे याचा अर्थ असा की त्या बुद्धाच्या परम करुणेनंच आपलं रक्षण केलं.'' इतके बोलून विदिशा तेथून निघून गेली.

अशोकचे लक्ष पुन्हा निसर्गावर केन्द्रित झाले. 'किती विशाल विश्व हे! किती गोडवा आहे त्यात! किती करुणा!' ज्या राजभवनात त्याने इतकी वर्षे घालवली, तिथे ईर्ष्या, द्वेष, सूड, आकांक्षा, प्रतिस्पर्धा इत्यादीशिवाय होतेच काय? तो थोडा वेळ विचार करत राहिला अन् मग पायी आपल्या पडावात पोचला. त्या दिवशी तेथेच राहून, आराम करून, दुसऱ्या दिवशी अुज्जयिनीकडे निघायचे त्याने ठरवले. अंगरक्षकांना याबद्दल सांगून तो म्हणाला, ''अुद्याच निघूया आपण माझा अेकांतभंग होणार नाही, अशी काळजी घ्या तोपर्यन्त. या गावच्या प्रजेला आपल्यामुळे कसलाही त्रास न होईल अशी खबरदारी घ्या. सारा दिवस तुम्ही आपापल्या मनाप्रमाणे घालवा.''

यानन्तर अशोकने क्षिप्रा नदीत स्नान करून, डोंगर व घाटमुलुखात फिरत आपला वेळ व्यतीत केला.

अंगरक्षक संबंध दिवस अशोकपासून दूरच राहिले. गावच्या सरहद्दीवर त्यांना तीन नर्तकी भेटल्या. त्यांच्याबरोबर त्यांचा वादकगणही होता. त्या सुंदर नर्तकींनी नवरसांचा आस्वाद देत त्यांचे खूप मनोरंजन केले. नाचगाणे संपल्यावर सैनिकांनी त्या नर्तकींना आपल्याबरोबर जेवणाचे आमन्त्रण दिले. फारच खूश होत त्या म्हणाल्या, ''यापेक्षा अधिक आम्हाला काय हवं? नक्की येअू आम्ही. आपण परवानगी दिली, तर स्वयंपाकातही मदत करू आम्ही.''

सैनिकांनी होकार भरला.

त्या दिवशी संध्याकाळी शाक्य नायक अशोकला भेटायला गेला व त्याने आपणाकडे रात्रीच्या भोजनाचे आमन्त्रण दिले. क्षणभर अशोक विचारात पडला. प्रधानमन्त्री व सेनाध्यक्षांची सूचना त्याच्या मनात चमकली. त्यांनी आग्रहाने 'कोणत्याही परिस्थितीत अपरिचितांकडे काही न खाण्याबद्दल' बजावले होते. पण शाक्यनायक आत्ताच ओळखीचा झाला असला तरी, तो विश्वसनीय आहे, असे अशोकला वाटले. याशिवाय त्याच्या आमन्त्रणाचा स्वीकार केल्यास, त्याची कन्या विदिशा हिलाही पहायला मिळेल अशीही आशा वाटून त्याने ते आमन्त्रण स्वीकारले.

त्या रात्री अशोकला सर्वश्रेष्ठ आणि अति रुचकर असे भोजन देण्यात आले. सारे पदार्थ विदिशा व तिच्या आईने स्वतः बनवले होते. दिव्यांच्या अुजेडात विदिशाचे प्रशान्त मुखमंडल पाहून अशोकच्या मनात अुत्साह संचारला.

भोजन संपतासंपता आकाश ढगांनी भरून आले. शाक्य नायक व त्याचे मित्र स्वतः हाती मशाली घेअून अशोकच्या पडावापर्यंत त्याला पोचवायला गेले.

तेथे पोचल्यावर थोड्याच वेळात फुलांच्या वर्षावासारखे पावसाचे थेंब सरसरू लागले. शय्येवर पडून अशोक निद्रेची आराधना करू लागला. अर्ध्या रात्री अशोक गाढ झोपेत असताना त्याला किंचाळल्याचा मोठा आवाज ऐकू आला अन् तो दचकून अुठून बसला. आपल्या तंबूत त्याला दोन काळ्या आकृती दिसल्या. एकाने हातातली चमकती तलवार अुगारली.



झाले! चेंडूप्रमाणे अुसळून बिछान्याखालची तलवार अुचलून अशोक त्या व्यक्तीवर तुटून पडणार, इतक्यात ते दोघे तेथून पळाले.

अशोकने अंगरक्षकांना हाका मारल्या, अन् त्यांची वाट न पहाता तो एकटाच त्यांचा पाठलाग करू लागला. पण आपल्या आधीच कोणी व्यक्ती त्यांचा पाठलाग करत असल्याचे त्याला दिसले. एका व्यक्तीला पकडून खाली पाडून आता अशोक दुसऱ्याला पकडणार, इतक्यात त्या व्यक्तीने त्याला पकडले. दोन्ही कैदी व्यक्ती स्त्रियाच होत्या !

इतक्यात अंगरक्षक धावत तेथे पोचले. आकाशातले ढग दूर सरून आता चांदणे पडले होते. त्या दोन्ही स्त्रियांकडे पाहून सैनिक चकीत झाले. दिवसभर आपल्या नाच गाण्याने त्यांचे मनोरंजन करणाऱ्या स्त्रियाच होत्या त्या! मग मध्यरात्री ओरडून अशोकला कोणी अुठवले? त्याने पुढे होअून दुसऱ्या गुन्हेगाराला पकडणाऱ्या व्यक्तीकडे लक्षपूर्वक पाहिले. ती दुसरी कोणी नसून विदिशाच होती! अशोकच्या चेहऱ्यावरचे आश्चर्य ओळखून ती म्हणाली, ''दिवसभर आपले सैनिक नर्तकींच्या नाचगाण्यात मग्न होते. या

नर्तकींना पहाताच मला संशय आला. त्या केवळ नर्तकी नाही वाटल्या मला. त्यांची हुशारी अन् पावलापावलावरची जागरूकता यामुळे संशयात भरच पडली. बुद्ध भिक्षूंची सेवा अुरकून परत येत असताना मला दिसलं की, या दोघी आपल्या काही अनुचरांबरोबर आपल्या पडावाकडे जात आहेत. मी त्यांना तेंव्हाच अडवलं असतं, तर त्यांनी कदाचित मलाच मारलं असतं. माझं भाग्य म्हणूनच मला तेंव्हा माझा भाअू यश तिथे दिसला. त्याला मी आपल्या पडावाच्या पहाडाखाली सावध रहायला सांगितलं अन् स्वत: लपतछपत त्यांच्या मागे जात राहिले. त्या दोघींपैकी एकीने तंबूबाहेर येअून तलवार काढली. आता विलंब योग्य नव्हे, असं वाटून मी जोराने ओरडले.'

"हं म्हणजे दुसऱ्या वेळीही विदिशानंच मला वाचवलं." अशोक म्हणाला.

"माझी विनंती आहे की, आपण असं म्हणू नये. बुद्धाच्या दयेनंच आपणाला वाचवलंय." अशोकने मूकपणे आपले मस्तक हलवले. पुन्हा एकदा आपल्याला मारायला आलेल्या स्त्रियांकडे त्याने पाहिले. अन् तो आपल्या तंबूकडे चालू लागला. अंगरक्षक त्या स्त्रियांबरोबर आलेल्या पुरुषांच्या शोधाला लागले. कोणीच दिसले नाही. पण डोंगराखाली दबा धरून बसलेल्या यशला झाडामागे लपलेला एक माणूस दिसला. यशला पहाताच पाहून तो नदीत अुडी मारण्या साठी पळू लागताच त्याचा पाठलाग करून यशने त्याला पकडले.

पकडलेला माणूस व त्या दोन स्त्रिया यांचे हात मागे वळवून पकडून अंगरक्षक त्यांना घेअून अशोकसमोर आले. एवढ्यात शाक्यनायक व गावचे काही प्रमुखही तेथे आले. चौकशीत असे समजले की नर्तकींनी खाद्यपदार्थात काही मादक पदार्थ मिसळल्या मुळे नेहमी सावध असणारे अशोकचे अनुचर, त्याने ओरडूनही जागे झाले नाहीत. सर्व काही ऐकल्यावर विदिशाचा पिता म्हणाला, "यांचं रहस्य अुघड झालं आहे. हा अपराध कोणी घडवला हेच आता आपल्याला शोधायचं आहे."

यश म्हणाला, "होय, हे जाणणं फार महत्त्वाचं आहे."

क्रमशः





## वेताळ कथा

# राकोलकची शस्त्र चिकित्सा

**अ**तूट निश्चय असणारा विक्रमराजा पुन्हा त्या झाडाकडे गेला; प्रेत झाडावरून अुतरवून खांद्यावर टाकले अन् नेहमीप्रमाणे मौन धारण करून तो स्मशानाची वाट चालू लागला. त्याबरोबर प्रेतातला वेताळ बोलू लागला, "राजा, लोक या भयानक स्मशानात दिवसा यायला सुद्धा भितात अन् तू तर या मध्यरात्री निर्भयपणे इथे वावरत आहेस. ऐक माझं. आपल्या राजवाड्यात जा अन् आरामात झोप. का अुगीच अव्यापारेषु व्यापारात पडून आपल्या जिवाशी खेळत आहेत? कसला स्वार्थ तुला यासाठी प्रेरणा देत असेल, असं मला तरी वाटत नाही; कारण तुझा ज्यावर अधिकार नाही, जिचा तुला अुपभोग घेता येत नाही अशा कोणत्या संपत्तीचा तुला अभाव आहे? कळू दे तर खरं? सर्व प्रकारची सुखं पुढे हात जोडून अुभी आहेत. कुणाला मदत करण्यासाठी तू असे बेसुमार कष्ट अुपसत



आहेस? जो तुझ्या मदतीची अपेक्षा करत आहे, तुझ्या द्वारां आपला स्वार्थ साधायचं कारस्थान करत आहे, तुला फसवत आहे, तो आहे तरी कोण शेवटी? तो कोणी एकादा पंडीत किंवा मेधावी माणूस असेल, तर तुला सावध रहायला हवं; कारण अशिक्षित स्वार्थी माणसापेक्षा स्वार्थी पंडीत आणि मेधावी माणूस जास्त धोकादायक असतो. जन्मापासून मंद बुद्धी असणारा एक माणूस, एका पिशाच्याच्या भलेपणाचा फायदा घेऊन, त्याच्याच साह्यानं मेधावी बनला. ज्या पिशाच्यामुळे तो मेधावी बनला, त्याच्याशीच त्यानं द्रोह केला. हे तथाकथित मेधावी मोठे कारस्थानी असतात. त्यांची बुद्धी वक्र असते. आपल्या स्वार्थासाठी ते काहीही करतात त्यांच्यावर विश्वास ठेवणं म्हणजे आपल्याच हातानं पायावर कुऱ्हाड मारून घेण्यासारखं आहे. असल्या एका द्रोही माणसाची गोष्ट ऐक. तुझा थकवाही दूर होईल.'' असे म्हणून वेताळने गोष्ट सांगितली -

विशाल देशात एक तरूण होता. लहानपणीच त्याचे आईबाप त्याला सोडून गेले. मामाने त्याला वाढवले. जन्मतःच तो मंदबुद्धी असल्याने त्याचे शिक्षण होऊ शकले नाही. किती शिकवले, तरी त्याच्या डोक्यात शिरत नसल्याने लोक त्याला 'मन्द' म्हणत त्याचा मामा चांगला पैसेवाला होता. त्याची मुलगी कुरूप व विकृत असल्याने त्याने मरणापूर्वी तिचा विवाह मंदशी करून दिला.

राजाच्या दरबारात काही काम मिळावे, अशी मंदची फार इच्छा होती. तितके लायक बनावे म्हणून तो शिकत राहिला. त्याच्या बुद्धिहीनतेबद्दल मित्र त्याची चेष्टा करत. परन्तु सर्वांना तो आवडत असे; कारण तो अतिशय धीट होता, भय हा शब्दच त्याला माहीत नव्हता. मित्राने सांगितलेले कोणतेही धाडसपूर्ण काम करायला तो केंव्हाही तयार असे.

एकदा त्याच्या मित्रांनी एक पैज लावली. गावापासून थोड्या अंतरावर एक उजाड किल्ला होता. तिथेच गावचे स्मशानही होते. लोकांचे म्हणणे होते की, तेथे प्रेतात्म्यांचे वास्तव्य आहे. जो कोणी त्या किल्ल्यात जाई, तो पुन्हा कधी परत येत नसे; त्यामुळे तेथे जायचे धाडस कुणाच्यातही नव्हते. पैजेनुसार मंदने मध्यरात्री तेथे जाऊन खुणेदाखल तेथील एकादी वस्तु आणायची होती. - हीच पैज होती.

जराही न घाबरता मन्द रात्री किल्ल्यात गेला. दाट अंधारात, भयानक आवाजांच्या कोलाहलात तो किल्लाभर फिरत राहिला. पायाला काही लागले अन् ती वस्तु तो हातात घेऊन पाहू लागला. ती कोणाचीतरी डोक्याची कवटी होती. खूण म्हणून तीच घेऊन, त्याने बाहेर येऊन मित्रांना दाखवली.

मित्र भयाने थरथर कापू लागले, अन् त्याला ती कोणत्याही नदीत फेकून येण्याबद्दल सांगू लागले. पण त्याने कोणाचीही पर्वा न करता ती माळ्यावर लपवून ठेवली. रात्री तो गाढ झोपेत असताना अचानक कसल्याशा आवाजाने जागा झाला. जिथे त्याने ती कवटी ठेवली होती, तिथे आता भयानक आकाराचा एक विचित्र प्राणी दिसत होता. त्याचे शरीर तांब्याच्या रंगाचे होते. डोके, दाढी व बुबुळे चंदेरी असून जळत्या बाभळीच्या लाकडासारखे जळत होते. मंद त्या विकृत आकाराकडे पहातच राहिला.



''तुझ्या धैर्य अन् साहसाचं फार कौतुक वाटलं मला. घरात आपल्या पाहुण्यासारखं स्थान दिलंस तू मला. जेंव्हा स्मरण करशील तेंव्हा तेंव्हा दिसेन मी तुला. आपसात गप्पा मारत जाऊ आपण. तुला भीती वाटली, तर जिथून आणलंस तिथेच फेकून दे मला. मग पुन्हा कधीही दिसणर नाही मी.'' तो आकारवाला म्हणाला.

''भीती, अन् मला? कधीच नाही! कोणत्याही परिस्थितीत नाही.'' मंदने हसत विचारले, ''तू आपली ओळख नाही करून दिलीस?''

''माझं नाव राकोलक आहे. आपल्या काळी कित्येक विद्या शिकल्या मी. पण माझा आवडीचा विषय होता शस्त्र-चिकित्सा.'' त्या आकारवाल्याने आपला परिचय दिला.

मन्द पुढे काही बोलणार इतक्यात बाहेर कोंबडा आरवला. सकाळ होत असल्याचा तो संकेत जाणून राकोलक अदृश्य झाला.

दुसऱ्या दिवशी मध्यरात्री स्मरण केल्याबरोबर राकोलक प्रकट झाला. दोघेही दुर्गादेवीच्या ओसाड पडलेल्या मन्दिरात जाऊन खूप वेळ गप्पा मारत बसले. तेंव्हापासून खूपदा अर्ध्या रात्री मन्द राकोलकला भेटे आणि सकाळ होण्यापूर्वी परत येई.

असे काही दिवस गेले. नवरा अर्ध्या रात्री हळूच बाहेर पडतो हे लक्षात आल्यावर त्याच्या पत्नीला चुप रहावेना. एके दिवशी



कारण विचारल्यावर मन्दने तिला खरी गोष्ट सांगून टाकली.

''हं! कधी पिशाच्याशी कोणाची मैत्री होऊ शकते काय? केव्हातरी नसत्या संकटात सापडाल, अशी भीती वाटतेय मला. काहीतरी करून आपली सुटका करून घ्या राकोलकपासून'' बायको काकुळतीने म्हणाली.

''मला कसला त्रास द्यायचा विचार असता तर त्यानं यापूर्वीच तसं केलं असतं. गोष्ट आता इतकी पुढे गेलीय की सुटका करून घ्यायचा प्रयत्न करणंही धोक्याचं ठरू शकेल. माझा प्रयत्न ओळखून तो माझा सर्वनाश करील.'' मन्द म्हणाला.

मन्द किती असमंजस अन् मूर्ख आहे, हे थोड्याच दिवसात राकोलकच्या ध्यानात आले.

एके दिवशी दोघे बुद्धिबळे खेळत असताना मन्द सुरुवातीलाच हरला. राकोलक नाराज होऊन अदृश्य झाला. आपल्या बुद्धिहीनतेबद्दल स्वतःचीच निन्दा करत मन्द घरी परतला अन् झोपून गेला. झोपेतच अत्यंत वेदना होऊ लागून तो जागा झाला. समोर राकोलक उभा असून त्याच्या हातात तीक्ष्ण तलवार असल्याचे त्याला दिसले. अर्धवट प्रकाशात त्या तलवारीचे रक्ताचे थेंबही मन्दला दिसले. ते पाहून भयाने मन्द बेशुद्ध झाला.

थोड्या वेळाने मन्दने डोळे उघडले तेंव्हा राकोलक तेथेच हसत उभा असलेला त्याला दिसला. तो मन्दला म्हणाला, ''घाबरू नकोस, तुला कसलाही धोका नाहीय. तुला अक्कल नव्हती, पण मला ती असायची गरज वाटली. मला माझ्याबरोबरीचा बुद्धिमान दोस्त हवा; म्हणून मी तुला मेधावी बनवलंय. आतापासून तुझी-माझी मैत्री जास्त गाढ होईल. तुझ्याबरोबर वेळ घालवायला मला मजा वाटेल.''

फारच थोड्या वेळात मन्दने सर्व विद्या शिकून घेतल्या. त्याच्या असामान्य बुद्धीचे सर्वांना आश्चर्य वाटू लागले. राजाच्या दरबारात त्याला उच्च स्थान मिळाले. आपल्या नवऱ्यात झालेल्या बदलाचे कारण ते पिशाच्चच असल्याचे मन्दच्या बायकोने बरोबर ओळखले.

एका रात्री मन्द काहीसा चिन्ताग्रस्त दिसल्याने राकोलकने त्याला कारण विचारले.

''मी लहान असतानाच माझं लग्न झालं. माझी बायको कुरूप आहे. तरीही मला आवडते ती. तिचे शरीरसौष्ठव खूप चांगलं आणि आकर्षक आहे. त्याला अनुरूप असं तिचं रूप असतं, तर काय छान झालं असतं!'' मन्दने आपल्या चिंतेचे कारण सांगितले.

''मी तुझ्या बायकोला सुन्दर बनवू शकतो, पण काही दिवस तुला थांबावं लागेल. तुझ्या बायकोच्या वयाची, शरीराचा रंग गौर असणारी, उंच असणारी, सुंदर चेहऱ्याची बाई पहायला हवी.'' राकोलक म्हणाला.

राकोलक काय म्हणतोय हे मन्दच्या लक्षात आले नाही. पण त्याने नुसतेच डोके हलवले.

एका महिन्यानन्तर राकोलकने मन्दला झोपेतून उठवले व म्हटले, ''जरा एकदा आपल्या बायकोकडे पाहून ये.''

मन्द जवळच्याच खोलीत जाऊन बायकोकडे पाहू लागला. त्याचा आपल्या डोळ्यांवर विश्वासच बसेना. त्याची बायको एकाद्या अप्सरेहूनही सुंदर दिसत होती!

दुसऱ्या दिवशी आपला चेहरा आरशात पहाताच मन्दची बायको घाबरून जोरात ओरडली. मन्दने तिला सांगितले की राकोलकमुळेच तिला नवीन रूप प्राप्त झालेय. त्याच्यामुळे आपण सुंदर झालो, याचा वास्तविक तिला आनन्द वाटायला हवा होता; परन्तु तिला त्या दोघांच्या मैत्रीमुळे भीती वाटू लागली. तिला वाटत होते की, एका पिशाच्याची आज असलेली मैत्री, एकाद्या दिवशी नवऱ्याला एकाद्या संकटात टाकेल. एकाद्या अनर्थकारक मार्गाला नेईल.

नुकतीच मन्दला एक गोष्ट कळली की,



आपल्या बायकोच्या खांद्यावरचे डोके परदेशातल्या एका स्त्रीचे आहे. तिचा खून करून कोणीतरी तिचे डोके धडावेगळे केले होते. तिचा नवरा खुनी माणसाला शोधत मन्दच्या गावात येण्याचीही शक्यता होती. त्या रात्री मन्दने राकोलकला खरी गोष्ट सांगायचा आग्रह धरला.

''देवांप्रमाणे कोणाला वर देण्याची शक्ती माझ्यात नाहीय. मला माहीत आहेत त्या फक्त काही गुप्त विद्या अन् शस्त्र- चिकित्सा. तुला मी बुद्धिमान कसं केलं, माहीत आहे? तुझी बुद्धी काढून घेऊन दुसऱ्या एका बुद्धिमानाची बुद्धी ठेवली. त्याचप्रमाणे तुझ्या बायकोचं डोकं कापून त्या जागी दुसऱ्या एका सुन्दर स्त्रीचं डोकं लावून टाकलं.'' राकोलकने खरी गोष्ट सांगून टाकली.



''याचाच अर्थ असा की, तूच त्या रूपवतीचा खून केलास.'' रागावून मन्द ओरडला.

राकोलकचे डोळेही क्रोधाने लाल झाले. तोही ओरडून बोलला, ''पूर्वजन्मी पापं केल्यामुळेच मी पिशाच्च बनलो. तरीही आता पुन्हा पाप कसं करीन मी? मला कारण माहीत नाही, पण कोणीतरी त्या स्त्रीचं मस्तक धडावेगळं केलेलंच होतं. मी फक्त त्याचा अुपयोग केला.''

''झालं ते झालं! आता त्या सुंदरीचा नवरा खुनी माणसाला शोधत कोणत्याही क्षणी इथे यायची शक्यता आहे. माझी बायको त्याला दिसली, तर तो राजाकडे 'मीच खुनी असल्याची' तक्रार करील. मग माझं काय होईल?'' असे म्हणून मन्द आपले डोके धरुन बसला आणि भयाने कापू लागला.

त्याच्या भित्रेपणाला खो खो हसत राकोलक म्हणाला, ''भिअू नकोस, मी तुझी मैत्री सोडू शकणार नाही. तुझ्या रक्षणासाठी पुन्हा मी आपल्या शस्त्र-चिकित्सेचा अुपयोग करीन. ज्या दिवशी तो तुझ्याविरुद्ध तक्रार करील, त्याच दिवशी त्याचं मस्तक तुझ्या मस्तकाच्या जागेवर येअून तुझं त्याच्या जागी जाईल. मी दोन्ही मस्तकांची अदलाबदल करीन. तुला कैद करायला येणारे सैनिक त्यालाच घेअून जातील; कारण तो तुझ्या रूपात असेल नं! राजा त्यालाच शिक्षा करील. तुला काहीच त्रास होणार नाही; कारण तू त्याच्या रूपात असशील. कशी आहे या राकोलकची युक्ती?'' मंद यावर गप्पच राहिला.

दुसऱ्या दिवशी सकाळीच मन्दने राकोलकची कवटी एका पिशवीत घातली; नगराबाहेर दूर एक खड्डा करून कवटी त्यात गाडून टाकली. त्याच रात्री आपल्या बायकोला बरोबर घेअून तो दूर प्रान्तात निघून गेला.

इतकी गोष्ट सांगून वेताळ विक्रमराजाला म्हणाला, ''राजा, मन्दच्या या वागणुकीचा अर्थ काय? राकोलकनं दोनदा त्याला मदत केली. त्यामुळे मंदचं भलंच झालं. तिसऱ्या वेळीही त्यानं राकोलकचा सल्ला मानला असता, तर दूर प्रान्तात निघून जायची त्याला गरजच काय होती? त्याची बायको तर प्रथमपासूनच त्याला राकोलकची मैत्री सोडून द्यायला सांगत होती, पण तेंव्हा त्यानं तिचं ऐकलं नाही. मग शेवटी तिच्या सांगण्यावाचूनच मन्दने राकोलकपासून सुटका का करून घेतली?

पिशाच्याशी आता आपलं काहीही देणं-घेणं नाही, त्याची आता काही गरज नाही - असं त्याला वाटलं का? ज्या राकोलकनं त्याला मदत केली, ज्यानं त्याला अशिक्षितापासून सुशिक्षित बनवलं, त्याच्याशीच अशी कृतघ्नतेची वागणूक योग्य आहे काय? नीच पणाच्या वागणुकीचं तो जिवन्त अुदाहरण नव्हे का? माझ्या शंकांचं अुत्तर माहीत असूनही तू सांगायचं टाळलंस, गप्प राहिलास, तर तुझ्या मस्तकाचे तुकडे तुकडे होतील.''

विक्रमराजा अुत्तर देअू लागला, ''मन्द कृतघ्न होता असं म्हणता येणार नाही. त्याच्या वागणुकीमागे एक सबळ कारण आहे. वास्तवतः त्याला राकोलकची काहीच गरज नव्हती. राकोलकलाच मंदची गरज होती. त्याच्या मैत्रीत स्वार्थ होता. मैत्रीचा हात त्यानं निस्वार्थ बुद्धीनं पुढे केला नव्हता. एका बुद्धिमान माणसाशी मैत्री करावीशी वाटल्यामुळे त्यानं मंदनं न सांगताच त्याला बुद्धी दिली. आपल्या बुद्धीच्या जागी दुसऱ्या कुणाची बुद्धी असल्याचं मन्दला माहीत नव्हतं. त्याला वाटलं होतं की राकोलकनं आपल्याला बुद्धिमानीचा वर दिला आहे. त्यामुळे आपल्या बायकोला सुन्दर बनवण्याचा वरही त्यानं मागितला. पण राकोलकनं जेंव्हा खरं ओकलं, तेंव्हा कुठे खरी गोष्ट त्याला समजली. रूपवती बाईच्या नवऱ्यापासून जेंव्हा राकोलकनं त्याची सुटका करायचं ठरवलं अन् त्यासाठी शस्त्र-चिकित्सेचा प्रयोग करू म्हटलं, तेंव्हा त्याची चेतना जागी झाली. त्यानं स्वतःला सावरलं आणि कवटी खड्ड्यात गाडून आपली सुटका केली. रूपातही बदल झाला असता तर भविष्यात आपल्यावर काय आपत्ती येईल त्याची तो कल्पना करू शकत होता. देहाचा मुख्य भाग म्हणजे चेहरा! चेहऱ्यावरूनच माणूस ओळखला जातो. 'आपण मन्द बनूनच रहावं, दुसऱ्या कोणत्या नावानं ओळखला जाअू नये' अशी त्याची इच्छा होती. दुसऱ्या कोणाचं रूप धारण केल्यास पुढे आपलं जीवन कसं होईल याची कल्पना नसल्यानं 'मन्द बनूनच रहायची' त्याची इच्छा होती. म्हणूनच कवटी गाडून टाकून त्यानं आपलं अस्तित्व वाचवलं. यात मला तरी कृतघ्नता दिसत नाही.''

बरोबर अुत्तर देअूनही राजाचे मौन भंग झाल्यामुळे वेताळ प्रेतासह गायब झाला आणि झाडावर जाअून बसला.



# खरी गोष्ट

रेवा गावात रामचन्द्र नावाचा एक माणूस होता. अुपदेशपूर्ण व्याख्याने देण्यात तो मोठा पटाईत होता. चांगला प्रसिद्ध वक्ता होता तो. त्याच्या व्याख्यानांना चांगली गर्दी जमे. पण तो थोडासा विसराळू होता. त्यामुळे कधी-कधी त्याची चेष्टा केली जाई.

एकदा काही भक्तांनी रामचन्द्रच्या भाषणाचा कार्यक्रम ठेवला. अंगणात नारळाच्या झावळ्यांखाली मंच तयार करण्यात आला.

रामचन्द्र अुठून गळा साफ करत बोलू लागला, ''आज गोकुळाष्टमी. श्रीकृष्णाचा जन्मदिवस. कृष्णचा अर्थ आहे काळा. काळेपणा हा अंधाराचं प्रतीक आहे. अज्ञान नावाचा अंधार दूर करणारा परमात्मा म्हणने श्रीकृष्ण. त्या परमात्म्याचा जन्म कुठे झाला? तुरुंगात. आता खोलात शिरलं तर आपल्याला कळेल की, प्रत्येक मानवाचं शरीर हे तुरुंगासारखंच असतं. या देहाच्या आत असतो आत्मा. हा आत्मा म्हणजेच परमात्मा, श्रीकृष्ण. हा सण, ही कृष्णाष्टमी मानवाला आत्मबोधाचं ज्ञान देते.'' रामचन्द्रला वाटले की भाषण ऐकून लोक आता टाळ्या वाजवतील.

पण त्यांच्यातले काहीजण अुठून त्याच्याकडे सहानुभूतीने पाहू लागले, तर काहीजण आपले हसू दाबायचा प्रयत्न करू लागले.

हे पाहून रामचन्द्रने आश्चर्यात बुडून मंचावर बसलेल्या पंडित शिवशर्माला विचारले, ''पंडितजी, माझ्या भाषणात काही चूक झाली का? काही असंबद्ध गोष्ट माझ्या तोंडून बाहेर पडल्या का?''

''महाशय, आपण अुत्तम वक्ता आहात. आपल्या भाषणात चुका असायचा प्रश्नच अुद्भवत नाही. पण होय, एक असंबद्ध गोष्ट आपल्या तोंडून बाहेर पडली, ती अगदी स्पष्ट आहे. खरी गोष्ट अशी की, आज कृष्णाष्टमी नव्हे, तर रामनवमी आहे!'' शिवशर्मा म्हणाला.

**रामकृष्ण देशपाण्डे**








# विशाखपट्टणम् ते गोपालपुर

**शब्दांकन : मीरा नायर ★ चित्रकला : गोपकुमार**

विशाखपट्टणहून अुत्तरेकडे आपला प्रवास किनाऱ्याकडेच्या ज्या सडकेवरून होत रहातो, ती भारतातील सर्वात अधिक लाम्बीच्या किनारी सडकांपैकी एक होय. या सडकेवरून २४ कि.मी. पार केल्यावर आपण गोस्तनी नदीच्या मुखाजवळील भीमुनिपट्टम् येथे पोचतो. मोठे सुन्दर स्थान आहे हे. १७ व्या शतकात येथे डचांची वसाहत होती. याची ओळख पटवणारे अवशेष मोडके किल्ले, थोड्या तोफा आणि एका जुन्या दफनभूमीच्या रूपात आजही अस्तित्वात आहेत. येथील वालुकामय किनारा पूर्व भारताच्या सुन्दर किनाऱ्यांपैकी एक असल्यामुळे हिरवळीने भरलेला भीमुनिपट्टणम्‌चा किनारा लोकप्रिय पर्यटनस्थल बनला आहे.

**सूर्यनारायण मन्दिर**



श्रीकाकुलम् जिल्हा हा समुद्रतटावरील आन्ध्रचा सर्वात अुत्तरेकडचा जिल्हा. याच जिल्ह्याच्या अरसवल्ली नावाच्या ठिकाणी आंध्रमधील एकुलते एक सूर्यमन्दिर आहे. हे मन्दिर १७७८ मधे येलमंचिली पुल्लाजी पंतुलुने बांधले होते. मन्दिराची रचना अशी आहे की, वर्षातून दोन ठरीव दिवशी सूर्याचे किरण बरोबर देवमूर्तींच्या चरणांना स्पर्श करतात.





**कूर्म (कासव)**

आपला यापुढचा पडाव म्हणजे श्रीकाकुलम. या नावाचा अर्थ आहे - दिव्य कासव. या तटवर्ती शहराचे हे नाव येथील विष्णुभगवानाच्या मंदिरामुळे पडले. विष्णूची कूर्म म्हणजे कासव रूपात पूजा करण्यात येणारे हे आपल्या देशातील एकमेव देवस्थान होय. कूर्म हा श्रीविष्णूंचा दुसरा अवतार होय.

असे मानले जाते की मृत व्यक्तीच्या अस्थी या मंदिराचा तलाव श्वेत पुष्करिणींमधे विसर्जित केल्या, तर त्यांची कासवे बनतात. श्रीकाकुलमच्या अुत्तर टोकावर, परन्तु तटाच्या पलीकडे माचकुंड नदीचे पात्र आन्ध्र व ओरिसा या प्रांतांच्यामधे काही अंतरपर्यन्त सीमारेषेचे काम करते. माचकुंड जलविद्युत निर्मिती केन्द्राने ऑगस्ट १९५५ मधे वीजनिर्मिती सुरु केली. दोन्ही राज्यातील ही पहिली भागीदारी व सफल औद्योगिक अुपक्रम होता.

जुन्या काळी अधिकांश ओरिसा व आंध्रच्या अुत्तर तटाचा बराच हिस्सा मिळून कालिंग देश म्हणवला जाई. कलिंग समुद्री व्यापारासाठी प्रसिद्ध होता आणि त्याची जहाजे श्रीलंका,



मियान्मार (ब्रह्मदेश), इंडोनेशिया व पूर्व आशियातील देशात जात असत. भारतातुन श्रीलंकेत जाअून वस्ती करणारे पहिले आर्य लोक कलिंगहूनच गेले होते. पलौरा (महाभारतात याचा अुल्लेख आहे), अल्बा व चित्रपुरा ही इथली मुख्य बंदरे होत.

भारताच्या प्राचीन इतिहासात कलिंगचे महत्व अशासाठी आहे की, सम्राट अशोकने फार मोठे युद्ध करून हा भाग जिंकला अन् यानन्तर त्याला युद्धाची शिसारी बसली. त्याने आचार्य अुपगुप्तकडून बौद्ध धर्माची दीक्षा घेतली आणि आपले अुर्वरित आयुष्य देश-विदेशात धर्मप्रसार करण्यासाठी वेचले.



चौथ्यापासून तेराव्या शतकापर्यन्त केसरी व गंग राजांच्या शासनाखाली ओरिसा हे मोठे बलशाली राज्य होते. त्यांचे समुद्री बांध खूप मजबूत होते. ओरिसाची समुद्री शक्ती इंग्रजांच्या शासनकाळात पूर्णः नष्ट झाली. ओरिसातील जनता आपल्या पूर्वजांच्या पराक्रमाच्या स्मृत्यर्थ दरवर्षी कार्तिक पौर्णिमेला 'बोइटा बंदन' (जहाजाचे वंदन) हा अुत्सव साजरा करते. त्या रात्री लोक समुद्राची पूजा करतात आणि शेकडो वर्षांपूर्वी त्यांचे पूर्वज करत, त्याप्रमाणे पूजेनंतर बांबूच्या लहान लहान नावांमधे पेटते दिवे ठेवून ते नद्या व समुद्राच्या पाण्यात वहात सोडतात.

इंग्लिश चॅनल पोहून जाणारे पहिले भारतीय जलतरणपटु मिहिर सेन यांनी कलिंगपासून जावापर्यन्तचा समुद्री मार्ग शोधून काढण्यासाठी एकदा शिडाच्या बोटीची योजना केली होती. यासाठी ४० फूट लांबीची, दोन

डोलकाठ्यांवाली लाकडाची नाव उपयोगात आणली होती जुन्या जमान्यात कलिंगहून अशाच नावा रवाना होत असत.

गोपालपुर हे दक्षिण ओरिसातील एक शान्त व मनमोहक तटवर्ती शहर आहे. इंग्रजांनी याचे नाव गोपालपुर - ऑनसी असे ठेवले होते. येथील रहिवासी आजही आपली जुनी परंपरा राखून आहेत. स्त्रिया सूर्योदयापूर्वी उठून घरासमोरील रस्त्याचा भाग झाडून, त्यावर सडा टाकून दारासमोर तांदुळाच्या पिठाने सुंदर रांगोळ्या काढतात. सकाळीच लोक समुद्रकिनारी जमा होतात. पूर्व क्षितिजावर सूर्यभगवानाचे दर्शन होताच सर्वजण मस्तक झुकवून त्याला वन्दन करतात व नंतर समुद्रात डुबकी मारतात.

येथील समुद्रकिनाऱ्यावर जागजागी पांढरा रंग दिलेले बांबू गाडलेले असतात. त्यामुळे तट कोठे आहे याचा कोळ्यांना दिवसा अंदाज घेता येतो. रात्रीच्या वेळी हे काम किनाऱ्यावरील दीपस्तंभ करतो.

येथील कोळी त्रिकोनी टोप्या घालतात. त्यामुळे आन्ध्र व बंगाली कोळ्यांपेक्षा ते निराळे ओळखू येतात.

पाण्यातून नाव बाहेर खेचणारे कोळी







# भाग्य-दुर्भाग्य

*तिसरा भाग*

**ग**रीबाने आपल्या विशेष मण्याच्या साह्याने मणिकुंडलच्या जखमेची वेदना थांबवली. या घटनेनन्तर ते दोघे घनिष्ट मित्र बनले. मणिकुंडलने त्याला कित्येक व्यापारी सूत्रे व त्यासंबंधीची रहस्ये स्पष्ट करून सांगितली. आपण यापूर्वी कोणकोणते, व्यापार केले व समुद्रयात्रा सुरू केल्यानन्तर कोणकोणत्या परिस्थितीतून गेलो हे ही त्याने सांगितले. त्याची वर्णनशैली, इतकी स्पष्ट व प्रभावी होती, की सर्व गोष्टी आपल्या नजरेसमोर स्पष्ट घडत आहेत, असे गरीबाला वाटले. त्याचे शिष्यत्व पत्करल्यामुळे गरीबाचे भाषाज्ञान व व्यापारज्ञान यात तीव्र प्रगती झाली. व्यापारी मामल्यात आता तो स्वतःच निर्णय घेऊ लागला.

राक्षसद्वीपावर पाय ठेवल्यानन्तर अशा प्रकारे आता साडेचार महिने निघून गेले. या काळात त्याला बेटावर प्राप्त झालेल्या धनाच्या दुप्पट कमाई झाली. अनेक मूल्यवान वस्तु त्याने व्यापारात मिळवल्या. मणिकुंडलला अनेक वस्तु मोठ्या श्रध्देने भेट देऊन त्याने त्याचा निरोप घेतला. राजाने त्याला सहा महिन्यांची मुदत दिली होती. ती पुरी होण्यास आता फक्त पंधरा दिवसच उरले.

गरीब आता चांगला धनवान व्यापारी बनून स्वदेशी परतला. सर्वात आधी त्याने राजधानीत एक भव्य भवन खरेदी केले. त्यात आवश्यक त्या दुरुस्त्या व सुधारणा केल्या आकर्षक रंग दिला. दासदासींची नेमणुक केली. इतके सारे पूर्ण होताहोता उरलेले पंधरा दिवसही पूर्ण झाले.

मुदतीच्या शेवटच्या दिवशी गरीबाने मोठ्या व्यापाऱ्याचा वेष धारण केला व तो राजासाठी बहूमूल्य भेटवस्तु घेऊन सजवलेल्या

मनोहर जोशी

बग्गीत बसून त्याला भेटायला निघाला.

जाता जाता वाटेत तो कल्पनालोकात विचरत राहिला तो जेंव्हा राजमहालात पोचला, तेंव्हा त्याला राजा मागील दोन महिने फारच आजारी असल्याचे समजले. त्याच्या पाठीवर गळू झाले होते व चांगल्यात चांगले वैद्यही ते बरे करण्यात सफल झाले नव्हते. या गळवामुळे राजाला असहनीय वेदना होत असून त्याच्या डोळ्यातून अविरत अश्रुधारा गळत असल्याचे समजले.

ही माहिती कळून गरीबाला फार वाईट वाटले. स्वत:च स्वत:ला त्याने गेल्या पंधरा दिवसात राजाची माहिती न काढल्याबद्दल दोष दिला. तावडतोब घरी परत येऊन आपला-अपूर्व मणी घेऊन तो पुन्हा राजाकडे गेला.

श्रीमन्त व्यापाऱ्याच्या वेषात गरीब आता चांगला प्रतिष्ठित दिसत असल्याने राज-दर्शन घेण्यात त्याला कसलीही अडचण आली नाही. त्याने जेंव्हा राजाच्या कक्षात प्रवेश केला, तेंव्हा राजा अत्यन्त अशक्त झाला असल्याचे त्याला आढळले. त्याचा चेहरा कान्तिहीन होऊन तो बिछान्यावर एका बाजूला तोंड फिरवून झोपलेला होता. सहा महिन्यांपूर्वी जो राजा मोठ्या आत्मविश्वासाने त्याच्याशी बोलला होता, त्यालाच आता या स्थितीत पाहून गरीबाचे मन दु:खाने भरून गेले व डोळ्यातून अश्रू झरू लागून स्वत:वर ताबा ठेवणे त्याला अशक्य झाले. मनातल्या मनात तो परमेश्वराला म्हणाला, ''हे देवा, तुझी लीला कशी विचित्र आहे! केंव्हा काय घडतं, हे तुझं तुलाच ठाऊक!''

काही क्षण या स्थितीत गेल्यावर गरीबाने स्वत:ला सावरले. तो हळूच राजाच्या जवळ गेला. झाकलेले नसल्याने गळू स्पष्ट दिसत होते. आपला अद्‌भुत मणी त्याने गळवावर ठेवला.

बास, दुसऱ्याच क्षणी गळू अदृश्य झाले!



त्वचा पुन्हा कान्तिमय दिसू लागली. सुषुप्तावस्थेतही वेदना अनुभवत असलेल्या राजाला अकस्मात सुख वाटू लागले. पीडामुक्त राजाने डोळे अुघडून पाहिले.

तिथेच असलेल्या राणीने हे दृश्य पाहिले, तेंव्हा तिच्या डोळ्यातून आनन्दाश्रू वाहू लागले. अनायासच तिने हात जोडून गरीबाला प्रणाम केला.

क्षणभराने राजा बिछान्यावर अुठून बसला. आपला जणू पुनर्जन्मच झाल्यासारखे त्याला वाटत होते. आनन्दभरल्या स्वरात त्याने विचारले, ''कोणी मला हा पुनर्जन्म दिला? तो महान व्यक्ती कोण आहे?''

महाराणीने गरीबाकडे इशारा केला. राजा आश्चर्य प्रकट करत असतानाच गरीबाने त्याला प्रणाम केला. तावडतोब शय्येवरून अुतरून राजाने त्याचे हात आपल्या हातात घेत म्हटले, ''महानुभाव, आपलं सर्वस्व मी आपणाला अर्पण केलं तरी मी आपला ऋणीच राहीन. माझ्यासाठी तर आपण अपर धन्वन्तरीच आहात. आपला परिचय देऊन मला धन्य करा ना!''

हसतच गरीब म्हणाला, ''महाराज, आपला एकमेकांशी जुनाच परिचय आहे. नव्याने परिचय करायची काय गरज? सहा महिन्यांपूर्वीच परमेश्वराने एकमेकांशी आपला परिचय घडवला होता.''

आवाज ऐकताच राजाने गरीबाला ओळखले व गद्‌गद् स्वरात म्हटले, ''तर तूच तो गरीब माणूस, ज्याला मी राक्षसद्वीपावर सोडले होते!'' राजाला पुन्हा शय्येपर बसवत गरीब म्हणाला, ''माझ्या या नव्या स्थितीला आपणच कारण आहात महाराज! आपण मला इतका मान देऊ नये. त्या दिवशी जसं पुकारलं, तसंच पुकारावं मला. मी स्वत:बाबत मागाहून सर्व काही सांगेन.



आपण अजून खूपच कमजोर आहात. भोजन करून संध्याकाळपर्यन्त भरपूर विश्रान्ती घ्यावी.''

मन्त्रमुग्ध झाल्याप्रमाणे गरीबाने सांगितल्यानुसार राजाने भोजन केले व तो अगदी आरामात संध्याकाळपर्यन्त झोपला. संध्याकाळी स्नान करून तो ताजातवाना झाला. आता आपण अगदी स्वस्थ, चिन्तामुक्त, पीडारहित झाल्यासारखे त्याला वाटत होते. स्वतः अुद्यानात बसून त्याने गरीबाला बोलावून घ्यायची आज्ञा दिली.

थोड्याच वेळात गरीब तेथे पोचला व राजाजवळ बसून राक्षसद्वीपावर पोचल्यापासून कायकाय घडले, ते सर्व त्याने सविस्तर सांगितले.

सर्व हकिकत सांगितल्यावर गरीब राजाला म्हणाला, ''मनुष्य सर्वशक्तिमान आहे, हे मानतो मी! पण देवत्व हे मानवतेहून काहीसं अुंचच आहे. पंचमहाभूतांपासून निर्मित मानवाहून, तो सृष्टिकर्ता थोडा का होईना अुंच आहे, हे मान्य करायलाच हवं. विधि मानवाला क्षणोक्षणी निर्देश देत असतो. कोणतं दुर्भाग्य, केंव्हा सौभाग्यात परिवर्तित होतं; किंवा कोणतं भाग्य दुर्भाग्यात, हे अगदी मोठ्यात मोठ्या व्यक्तीच्याही आकलना पलिकडे आहे! धर्माचरण करावं, धर्मपथावर चालावं - इतकंच मानवाला आवश्यक आहे. तो धर्मपथावर मानवाला अुन्नतीकडे घेअून जातो व तो परमेश्वराचा लाडका बनतो. आपलंच अुदाहरण पहा! मला राक्षसद्वीपावर पाठवून ज्या दुर्भाग्याची शिकार बनवायचं आपण ठरवलंत, तेच आपलं भाग्य ठरलं. आपण हे सत्य नाकारू शकाल?''

राजा गंभीरतेने गरीबाचे बोलणे ऐकत होता. हात जोडत आता तो म्हणाला, ''हा नमस्कार प्रथम त्या जगन्नाथाला आणि नंतर तो त्याच्या दूताला - तुला ! 'जगात जितके चांगले लोक आहेत, ते सारे त्याचे दूतच आहेत' असं तूच म्हणाला होतास, आठवतंय?'' असे म्हणून राजा मनःपूर्वक हसला.

त्या रमणीय अुद्यानात चांदण्याचे धवल तेज आता अगदी कोपऱ्याकोपऱ्यातही देवाच्या स्वच्छ, पवित्र स्मिताप्रमाणे मनोहारी रूपात चमकून अुठले!

**(समाप्त)**





## सोनेरी क्षण - १९



**१. टिकालची भव्य मन्दिरे?**
चाके व ओझे वहाणाऱ्या जनावरांच्या साह्याशिवाय पिरॅमिड आकाराची दगडी मन्दिरे बांधली गेली आहेत. अुच्च कोटीचे शिल्पकार मायालुयांनी ती बांधली.




## जगात हे कोठे आढळेल?

ते केवळ शिल्पकारच नव्हे, तर अुत्तम खगोलशास्त्रज्ञ व गणितशास्त्रज्ञही होते. ई.स. २५० ते ९०० च्या दरम्यान त्यांची संस्कृती भरभराटीस आली.



**२. सप्टेंबर व ऑक्टोबर महिन्यात एका खेड्यातील पक्ष्यांची वर्तणुक विचित्रच होते ?**
काही धुक्याच्या रात्री सर्व प्रकारचे पक्षी जमिनीवर थोडा जरी प्रकाश दिसला तरी जिवाची पर्वा न करता जमिनीकडे झेप घेतात व मरतात. काही पक्षी जमिनीवर अुतरतात पण बेहोश पडून रहातात. अशा पक्षांना खेडुत पकडून घेअून जातात.
शास्त्रज्ञांनी याचे कारण शोधताना निरनिराळी स्पष्टीकरणे दिली असली तरी पक्ष्यांच्या या आत्मघाती प्रवृत्तीचे अगदी खरे व नेमके कारण ते शोधू शकले नाहीत.

**३. दोन खंडामधे विस्तारलेले नगर?**
प्राचीन व मध्ययुगात बैझांटियम व कॉन्स्टॅटिनोपल या नावांनी ओळखले जाणारे हे शहर युरोप व आशिया या दोन्ही खंडामधे पसरलेले आहे. आता ते युरोपच्या एका मुस्लिम देशाची राजधानी आहे.



## चित्रकोडे

हे सागरी जीव ओळखा




### गोष्टीचे कोडे

शेठ गोकुळदास यांच्या बंगल्यात १,४०,००० रुपये किंमतीच्या वस्तूंची चोरी झाली. गेल्या तीन महिन्यात आसपास झालेल्या चोऱ्यांमधे ही पाचवी चोरी होती. चोराने मागील बाजूच्या खिडकीच्या काचा फोडून आत प्रवेश केला होता. यावेळीही तोच प्रकार घडला. इन्स्पेक्टर देसाई खिडकीजवळच बागेत पडलेल्या काचांकडे लक्षपूर्वक पहात असताना बंगल्याचा राखणदार येऊन त्यांच्याजवळ ऊभा राहिला.

''मला आवाज ऐकू आला नाही. मध्यरात्रीनंतर जेव्हा एक्स्प्रेस आगगाडी इथून जाते, त्यावेळी चोराने काच फोडली असणार. गाडीच्या आवाजात दुसरा कसला आवाज ऐकूच येत नाही नं! इथे आसपास झालेल्या सर्व चोऱ्या याच वेळी झाल्या, असं म्हणतात.'' तो रखवाल बोलला.



''पण या घरात घुसणाऱ्याला तशी भीती नाही. घरात असणारे जागेच होते. आता नीट सांग, चोरीचा माल कुठं लपवलायस तू?'' इन्स्पेक्टरने गंभीरपणे विचारले.

रखवालदाराने थरथर कापत आपला गुन्हा कबूल केला. राखणदारच चोर आहे हे इन्स्पेक्टरने कसे ओळखले?



## गंमतीचे प्रश्न

१. साखरेचे घनाकार सहा तुकडे (शुगर क्यूब्स) चहाच्या तीन कपात अशा प्रकारे घाला की प्रत्येक कपात तुकडे विषम संख्येने येतील सहाही तुकड्यांचा उपयोग व्हायलाच हवा अन् कुठला तुकडा मोडायचाही नाही. अडचण कशी सोडवाल?




२. तुमच्या अंकलची बहीण जर तुमची आत्या नसेल, तर तिला काय म्हणावे?

३. केळ्याचे तेल कशापासून निघू शकेल?
- केळे?
- साखर?
- की कोळसा?



४. रिकाम्या पिंजऱ्यात किती माकडे भरता येतील?

५. पक्षी दक्षिणेकडेच का ऊडतात?



६. माझ्याजवळ एक असं घड्याळ आहे, की ते दिवसातून फक्त दोनदाच बरोबर वेळ दाखवते. हे कसले घड्याळ आहे?

**करून पहा**

## अंड्याच्या कवचापासून पेपरवेट बनवा.

अंड्याचे रिकामे कवच स्वच्छ धुवा. प्लॅस्टर ऑफ पॅरिसचा लगदा बनवून तो कवचात भरा. वरून सपाट करा. प्लॅस्टर वाळून कडक झाले की कवच ऊलटे ठेवा. यानंतर आवडीच्या रंगांनी रंगवा.

आता तुमच्यासाठी पेपरवेट तयार!



## चित्र काढून पाहूया :

शहामृग



## सोनेरी क्षण १४ ची अुत्तरे

### जगात कुठे?

१. इंग्लंडमधील केंट डोव्हरमधे
२. बिहारमधील पटना शहरात
३. स्टॅलिनग्राडच्या मामयेव पर्वतावर
४. पूर्व टर्कीतील कपडोसिया
५. द. आफ्रिकेतील क्रुगर नॅशनल पार्क

### चित्रकोडे

१. दुसरा म्हातारीचा चेहरा. मुलीचा गाल नाकाप्रमाणे व मुलीच्या गळ्याभोवती वेढलेली रिबन म्हातारीच्या तोंडासारखी दिसते.

२. चाकाचे आरे वेगवेगळे स्पष्ट दिसत आहेत. वेगाने चालणाऱ्या सायकलींचे तसे दिसणार नाहीत.

### गोष्टीचे कोडे

सम्राट अशोकच्या काळात भारतात पेरूची झाडेच नव्हती. युरोपियन लोकांनी ती इकडे आणली.

### गंमतीचे प्रश्न

१.



२. शक्य नाही

३.
अ. बासिलिस्क
आ. ड्रॅगन
इ. फीनिक्स
ई. युनिकॉर्न

४. मोहनने लाल टोपी घातली. विनयची टोपीही लाल आहे. त्यामुळे रामूने अंदाज केला असावा की त्याने काळी टोपी घातलेली आहे.



# महाभारत

बंधूंनो, आपला अज्ञातवासाचा काळ सुरू होत आहे. या अवधीत आपल्याला फार सावधगिरीनं रहायला हवं. आपण कोण आहोत हे कळू देता कामा नये. सांगा, अज्ञातवासानं हे वर्ष आपण कोणत्या देशात काढूया बरं?'' धर्मराजने आपल्या बंधूंना विचारले

''पांचाल, चेदी, मत्स्य, शूरसेन, पटच्चर, विशार्ण, नवराष्ट्र, मल्ल, साल्व, युगंधर, कुन्ती, सुराष्ट्र, अवंती आदि देश खूप संपन्न आहेत. तिथली प्रजा सुखी आहे, पीकपाणी चांगलं येत आहे; अन् या देशांची सामाजिक व्यवस्थाही दृढ आहे. यांपैकी कोणत्याही देशात आपण अज्ञातवासाचा काळ घालवू शकू. आपल्याला धर्मदेवाचा आशिर्वाद आणि अनुग्रह आहे. तेंव्हा माझी खात्री आहे की आपल्या अज्ञातवासात कसलंही विघ्न येणार नाही.'' अर्जुनाने आपला विचार व्यक्त केला.

''मत्स्य देशचा शासक विराट धर्मशील, बलवान आणि आपला शुभ-चिन्तक आहे. आपण एक वर्ष तिथे राहिलो तर अुत्तम होईल. आता बोला, तुम्ही कोणकोणती वृत्ती स्वीकारायला तयार आहात?'' धर्मराजने बाकी पांडवांना विचारले.

अर्जुनने दुःखी आवाजात विचारले, ''दादा, आमची गोष्ट सोडा. आपण आजवर कुणाच्या अधीन राहून काम केलं नाही. कधी कुणाच्यात सेवेत राहिला नाहीत. मग आपण विराटराजाकडे नोकरी कशी करू शकाल? या विचारानंच माझं मन दुःखानं भरून जात आहे.''

धर्मराज म्हणाला, ''मी ब्राह्मणवेष धारण करीन. माझं नाव असेल कंक. या वेषात अन् या नावानेच मी विराटच्या राजसभेत प्रवेश करीन. द्यूत खेळून राजा, मंत्री आणि



सामंतांना खूश ठेवीन. मला कोणी 'तू यापूर्वी काय करत होतास?' असं विचारलं तर मी सांगेन की मी धर्मराजच्या निकटवर्ती मित्रांपैकी असून त्यांच्याबरोबरच रहात असे.'' नन्तर भीमाला अुद्देशून त्याने विचारले, ''भीमसेन, तू बोल, विराटकडे काय काम करायचा विचार आहे तुझा?''

''स्वयंपाककलेत प्रवीण आहे मी. माझं नाव वल्लव असेल. विराट राजाला अशी पक्वान्न खायला घालीन, की आजतागायत तसली चाखली नसतील त्यानं. लाकडाच्या मोठ-मोठ्या मोळ्या सहज वाहून आणीन मी. आपल्या कामांद्वारा राजाचं लक्ष मी स्वत:कडे आकर्षून घेईन. म्हणजे साहसपूर्ण कामात तो माझा अुपयोग करून घेईल. चांगल्या बलवान आणि नामांकित मल्लांना मी मल्ल-युद्धात हरवीन आणि राजाच्या यशाला हातभार लावीन. अगोदर तू कुठे काम करत होतास, असं त्यानं विचारलं, तर सांगेन की, 'मी धर्मराजाकडे गुलाम होतो. माझी गुप्तता कायम रहावी म्हणून आवश्यक ती सर्व सावधगिरी बाळगीन मी. माझ्या बाजूनं निश्चिन्त रहावं आपण.''

अर्जुनाच्या अडचणीचा अुपाय पूर्वीच ठरलेला होता. अुर्वशीने त्याला नपुंसकत्वाचा शाप दिलेला होता अन् इन्द्राने अु:शाप देअून म्हटले होते की, 'हा शाप अज्ञातवासात अुपयोगी पडेल.''

''माझं नाव असेल बृहन्नडा. हाताच्या मनगटापासून कोपरापर्यन्त बांगड्या घालीन. मी पुरुष की स्त्री, हे कोणी ओळखूही शकणार नाही. त्या वेषात मी विराटाच्या अन्त:पुरातील स्त्रियांचं मनोरंजन करीन. मला 'अगोदर काय करत होता?' असं विचारलं, तर सांगेन की मी द्रौपदीची दासी होते.'' अर्जुन बोलला.

''माझं नाव असेल दामग्रन्थी. विराटच्या घोड्यांचा प्रशिक्षक बनेन मी. अश्वांच्या आजारांवर अुपाय करीन. ते काम अुत्तम माहीत आहे मला. 'पूर्वी धर्मराजाकडे अश्व-अधिकारी' होतो, असं सांगेन मी.'' नकुलने म्हटले.

''तन्तीपाल नाव धारण करून मी विराटच्या गायींचा राखणदार बनेन. पूर्वीही मी तुमच्या आज्ञेप्रमाणे हे काम करत असे. म्हणून मला ते नवं नव्हे. गायीबैलांबद्दल मला माहीत नाही, असं काही नाहीच.'' सहदेव म्हणाला.

द्रौपदी काय करील, याबद्दल धर्मराज मनोमन दु:खी होता. तिने आजपर्यन्त इतरांकडून सेवा घेतली होती, सेवा केली नव्हती! ती एक सुकुमार स्त्री असून पतींच्या आधाराने आयुष्य घालवत रहाणारी पतिव्रता होती.

पण धर्मराजची शंका दूर करत द्रौपदी आपण होअून म्हणाली, ''माझ्यासाठी आपण चिन्ताग्रस्त का? सैरन्ध्री वृत्ती, ही एक आदरणीय वृत्ती आहे. तिच्याशी इतर दासींप्रमाणे वर्तणुक केली जात नाही. मी तीच वृत्ती स्वीकारून अन्त:पुरातल्या स्त्रियांची केशरचना करत जाईन. विराटपत्नी सुदेष्णा हिच्याजवळ रहस्यपूर्वक राहू शकेन मी.''

आपले बन्धु व द्रौपदी यांच्या निर्णयांमुळे धर्मराज संतुष्ट झाला. त्याने धौम्य, सूत व अन्य नोकरांना द्रुपदाकडे रहायला सांगितले. इन्द्रसेन व अन्य मन्त्र्यांना रिकामे रथ घेअून द्वारकेला जायला सुचवले. सर्वांना सावधगिरीची सूचना दिली की, 'पांडवांबद्दल कोणी काही विचारले तर - आम्हाला काही माहीत नाही - असे सांगा.''

धौम्यने पांडवांना राजांकडे सेवेला रहाणाऱ्या लोकांचे कायकाय धर्म असतात, (त्यांची वर्तणुक कशी असावी इ.) नीट समजावून सांगितले. जेंव्हा सर्वजण आपापल्या ठिकाणी निघाले, तेंव्हा पांडवही आपापल्या हत्यारांसह द्वैतवन सोडून जायला निघाले. वने, पर्वत, नद्या इ. पार करत त्यांनी मत्स्य देशात प्रवेश केला. मत्स्य देश दशार्ण देशांच्या अुत्तरेला, पांचालच्या



दक्षिणेला व शूरसेनच्या देशाच्या मध्यावर होता.

द्रौपदी म्हणाली, ''इथे शेतं, रस्ते वगैरे बरेच आहेत. असं वाटतंय की विराटनगर इथून बरंच दूर आहे. मी दमून गेलेय. सकाळपर्यन्त आपण इथेच थांबू.''

कोणत्या मार्गाने जाअून जंगल पार करायचे हे धर्मराजने ठरवले. त्याने अर्जुनाला, द्रौपदीला अुचलून घेअून चालायला सांगितले. अशा प्रकारे ते विराटराज्याच्या सरहद्दीवर पोचले. आता धर्मराजाने हत्यारांबद्दल विचार केला. ती घेअून नगरप्रवेश करणे अुचित नव्हे. अर्जुनाचे गांडीव जगदविख्यात होते. पांडवांना ओळखायला ते एक आयुधच पुरेसे होते. त्यामुळे धर्मराजने अर्जुनाला आपली हत्यारे सुरक्षित ठेवता येतील, असे एकादे गुप्त स्थान



शोधायला सांगितले.

अर्जुनाने चारी दिशांना नजर फिरवली, तेंव्हा त्याला एक श्मशान व त्याच्या मध्यावर अुत्तम फैलावलेला असा एक शमीवृक्ष दिसला. साधारणतया अशा जागी कोणी येत नाही. कोणी आला तरी खालून वृक्षाचा अग्रभाग कोणाला दिसत नाही. तेंव्हा त्या वृक्षाच्या दाट फांद्यांमधे आपली शस्त्रे लपवून ठेवायचे अर्जुनाने ठरवले.

पांडवांनी आपल्या धनुष्यांच्या दोऱ्या अुतरवल्या व ती जमिनीवर ठेवली. आपली खड्‌गेही धनुष्यांबरोबरच ठेवली. धर्मराजाच्या आज्ञेने नकुल शमीवृक्षावर चढला अन् त्याने झाडाच्या दाट पानांमधे शस्त्रे नीट लपवली. पाअूस पडला तरी त्यांवर थेंबभरही पाणी पडणार नाही असे पाहिले. नंतर त्यांवर एक प्रेत झाकून ठेवलं.

शव वर चढवताना काही गुराख्यांनी त्याला पाहिले. पांडवांनी त्यांना सांगितले की, ''आठशे वर्ष वयाची आमची आई मृत्यु पावली. आमच्या वंशाच्या आचारांच्या अनुसार आम्ही तिचं प्रेत झाडावर ठेवलंय.''

नन्तर विराट नगरात जाताना एका जागी थांबून धर्मराजने दुर्गेचे स्मरण करुन प्रार्थना केली, ''माते, आम्ही तुला शरण आलो आहोत; आमचे रक्षण कर, आमची काळजी घे.''

दुर्गादेवी आपल्या दिव्य रूपात प्रकट होअून म्हणाली, ''निकट भविष्यात तुम्ही युद्ध जिंकाल. तुमचे कल्याण होईल.'' आशिर्वाद देअून देवी अन्तर्धान पावली. नन्तर धर्मराजने नदीत स्नान केले. हात जोडून धर्मदेवाची प्रार्थना केली, ''आपण यक्ष बनून मला वर देण्याचा जो वायदा केला होता, त्यानुसार आता वर मागत आहे.''

तत्क्षण फार विचित्र घटना घडली. धर्मराज भगवी वस्त्रे घातलेला दिसू लागला. त्याच्या हाती कमंडलुही होता. तो यति दिसू लागला. इतर पांडवांनाही आपल्यासाठी योग्य अशी वस्त्रे मिळाली सर्वांनी योग्य अशी सामग्री अुचलली. भविष्यात ज्या ज्या वृत्तीने रहायचे ठरले होते, त्या त्या वृत्तीला योग्य पोशाख धारण केले.

धर्मराजने फासे आपल्या अुपरण्यात बांधून घेतले. आणि तो विराटच्या दरबारात गेला. तो जरी यतिवेषात असला, तरी त्याच्या मुखावरचे तेज पाहून विराटराजा हतप्रभ झाला! राजाला वाटले की, याच्या-बरोबर याचा परिवारही असता, तर हा एकादा चक्रवर्ती राजा वाटला असता.

विराटच्या जवळ जाअून धर्मराज म्हणाला, ''राजा, माझं सर्वस्व नाहीसं झालंय. काहीकाळ आपल्या दरबारात रहायची माझी इच्छा आहे. मी वैयाघ्रपद गोत्राचा असून नाव कंक आहे. पूर्वी मी धर्मराज कडे होतो आणि त्याच्या आप्तांपैकी एक आहे. मी द्यूतात त्यांच्याहातून हरलो, तरी ते कधी माझ्याकडून धन घेत नसत. माझी इच्छा आहे की, आपणही माझ्याशी तसाच व्यवहार ठेवावा.''

विराट म्हणाला, ''माझ्या परिवारापैकी कोणी कधी तुझं काही वाकडं केलं, तर मी ताबडतोब त्याला शिक्षा करीन. तुझ्याकडून कोणी धन-धान्याची याचना केली, तर मला सांग. मी त्यांना ते देईन. सर्वजण माझ्याशी जसं वागतात, तसंच त्यांनी तुझ्याशीही वागावं!''

काही वेळानन्तर काळ्या वेषातला भीम राजाकडे आला. त्याच्या एका हातात झारा तर दुसऱ्यात तलवार होती. विराटराजाला प्रणाम करुन तो म्हणाला, ''महाराज, माझं नाव आहे बल्लव. माझी नेमणूक केली, तर मी विविध पक्वान्नं बनवून आपणाला संतुष्ट करीन.''

''तू स्वयंपाकी असशील, असा विश्वास नाही वाटत मला.'' विराट म्हणाला.

''धर्मराजांना माहीत आहे की, मी या विद्येत कसा पटु आहे. शारीरिक बळातही मी कुणाहून कमी नव्हे. मनोरंजनासाठी हत्ती, सिंह यांसारख्या जनावरांशी लढायला लावाल, तर तसं करुन पहा मी किती बलवान आहे.'' भीम म्हणाला.

''ठीक आहे, तू माझ्या पाकशाळेत प्रमुख बल्लव म्हणून काम कर.'' असे म्हणून





विराटने त्याला पाकशाळेकडे पाठवले.

द्रौपदी जुनी वस्त्रे नेसून, केस खांद्यावर पसरून सैरन्ध्री वेषात गल्लीगल्लीत फिरत होती. नगरवासीयांनी तिला विचारले, ''देवी, कोण आहात आपण? काय करता?''

द्रौपदी उत्तरली, ''मी सैरन्ध्री आहे. कोणी माझं पोषण करायला तयार असेल तर मी सेवा करीन त्यांची.''

राजभवनाच्या वरील भागात फिरत असलेल्या राणी सुदेष्णेने द्रौपदीला पाहिले आणि तिला आपल्याजवळ बोलावून विचारले, ''कोण आहेस तू? काय काम करतेस?''

''देवी, मी आहे सैरन्ध्री. केशालंकाराची कला मला येते. केसात फुलं माळण्यात प्रवीण आहे मी. विविध फूलमाळा गुंफण्यात माझ्या बरोबरीची दुसरी कोणीच नसेल. कृष्णपत्नी सत्यभामा, पांडवपत्नी द्रौपदी यांनीही माझा भरपूर गौरव केला आहे यासाठी. द्रौपदी मला 'माळिण' म्हणत असे.'' द्रौपदीने नम्रतेने आपली ओळख करून दिली.

''तू इतकी सुन्दर आहेस की, पुरुष सोड-स्त्रियासुद्धा तुझ्याकडे आकर्षित होतील. मला तर अशीही भीती वाटतेय की, महाराजांनीही एकदा तुला पाहिली, तर माझा चेहरा पहाणं नको वाटेल त्यांना. तुला अंतःपुरात ठेवलं, तर ते तुझाच दास बनून रहातील अशी भीती पडलीय मला.'' राणी सुदेष्णा म्हणाली!

''महाराणी, विराट राजा किंवा अन्य कोणीही, माझं काही बिघडवू शकणार नाहीत. महाबलशाली असे पाच गन्धर्वकुमार माझे पति असून त्यांचं हरक्षण माझ्यावर लक्ष असतं. बास, फक्त कुणाचे पाय धुण्याचं किंवा कुणाचं उष्टं खाण्याचं काम मला सांगू नका. इतकं सोडून अन्य कुठलंही काम मी अगदी मनापासून करीन. मला सामान्य स्त्री समजून कोणी माझ्याशी दुर्व्यवहार करू पाहील, मला छेडील, तर कोणत्याही बातमीशिवाय माझे पती त्याला रातोरात मारून टाकतील.'' द्रौपदी बोलली.

तिचे हे आश्वासन ऐकून राणी सुदेष्णाने तिला नोकरीला ठेवून घेतले. त्यानन्तर नपुंसक वेषात अर्जुन राजा विराटकडे आला. त्याने गडद लाल रंगाची वस्त्रे नेसली होती. भर दरबारात येऊन तो विराटराजाला म्हणाला, ''राजा, माझं नाव बृहन्नडा. नृत्य कलेत मी असामान्य आहे; केस विंचरण्यात कुशल आहे अन् फुलं सजवण्यातही दक्ष आहे.

विराटचा त्याच्या बोलण्यावर विश्वास बसला नाही. ''तुझे लांब हात अन् भुजा पाहून असं वाटतं, की तू धनुर्धारी असशील.''

''नाही महाराज, धनुष्य कसं असतं, हे ही माहीत नाहीय मला. संगीताचं ज्ञान आहे मला. वीणा-मृदुंग वाजवू शकते. नाट्य जाणते.''

विराटने आपली कन्या उत्तरा हिला बोलावले अन् म्हणाले, ''मुली, हिचं नाव बृहन्नडा आहे. हिच्याकडून नृत्य शीक तू.'' अर्जुन उत्तरेबरोबर अंतःपुरात गेला.

थोड्या वेळाने विराट आपले अश्व पहायला गेला असता, नकुल त्या अश्वांकडे निरखून पहात असलेला त्याला दिसला. तो आपल्या सेवकांना म्हणाला, ''त्या युवकाला घोड्यांचं चांगलं ज्ञान दिसतंय. त्याला सभेत पाठवा.'' अन् तो तेथून निघून गेला.

नकुल सभेत येऊन विराटराजाला भेटला. तो म्हणाला, ''महाराज, उपजीविकेसाठी आपल्या देशात आलोय. मला आपल्या अश्वांचा अधिपती बनवा. अडेल अश्वांना वठणीवर आणणं, त्यांच्या आजारावर उपचार करणं म्हणजे माझ्या हातचा मळ! खूप पूर्वी मी धर्मराजाच्या घोड्यांवर देखरेख ठेवत असे. माझं नाव दामग्रंथी.''

त्याच्या बोलण्यावर संतुष्ट होऊन विराटने त्याला आपले घोडे व रथ यांचा अधिपती बनवले.

आणखी थोड्या वेळाने सहदेव राजसभेजवळ आला; थेट गवळ्याच्या वेषात गळ्यात माळा, हातात दोऱ्या अन् लांब बासरी घेऊन त्याने दरबारात प्रवेश केला. राजासमोर उभा राहून तो म्हणाला, ''महाराज, मी आपल्या गायींना चोर व आजारांपासून दूर ठेवीन. त्या अधिक दूध देतील यासाठी प्रयत्नशील राहीन. मी अरिष्टनेमी नामक वैश्य आहे. धर्मराजाच्या एक कोटी गायी माझ्याच ताब्यात होत्या. मला 'तन्त्रीपाल' नावाने पुकारलं जातं.''

त्याच्यावर विश्वास ठेवून राजाने त्याला गायींच्या रखवालदाराचे पद दिले.

पाचही पांडव अशा प्रकारे विराटराजाकडे राहू लागले व त्यांचा अज्ञातवास सुरू झाला.



# 'चान्दोबा' च्या बातम्या

**भारतीय बालकांकरता**

जर्मनीतील काही व्यक्तींनी आय.सी.यू.एस् या नावाची संस्था स्थापन केलीय. जर्मन भाषेत 'भारतीय बालकांच्या भविष्यासाठी' अशा अर्थी शब्दांचे हे संक्षिप्त रूप. जिन्हार्ड नामक एक बँकर या संस्थेचे अध्यक्ष आहेत; आणि आश्रयदाते आहेत - डॉ. नार्मर्ट ब्लूम नामक कामगारमन्त्री. जर्मनीत रहाणारे काही भारतीय मिळून या संस्थेचे १६० सभासद आहेत. हे सहृदय लोक वाढदिवस, विवाह-दिवस आदि निमित्ताने या संस्थेला रकमा दान देतात आणि या रकमा मुलांचे शिक्षण, पंगु मुलांसाठी चाकाच्या खुर्च्या, कृत्रिम अवयव, शाळांसाठी इमारती अुभारणे, इस्पितळे, ग्रंथालये, मुलांच्या करमणुकीसाठी अुद्याने बनवणे इत्यादी साठी भारतात पाठवल्या जातात. आपल्या रकमांचा नीट अुपयोग केला जात आहे की नाही, हे पहाण्यासाठी संस्थेचे सभासद भारताला अधूनमधून भेटीही देतात.



**भारतीय चित्रांना मागणी**

लंडनची सुप्रसिद्ध लिलाव-संस्था क्रिस्टीसने आयोजित केलेला लिलाव पुन्हा एकदा विदेशी कलाप्रेमींना भारतीय चित्रांचे कसे आकर्षण वाटते, हे सिद्ध करत आहे. 'साडी नेसलेली स्त्री' हे रविवर्माचे चित्र २०,३०,००० रुपयांना विकले गेले. त्याची कॅटलॉग किंमत याच्या अर्ध्यापेक्षा कमीच होती. एन्.एस् बेन्द्रे यांच्या चित्राने ११,६०,०००रु. मिळवले. असे दिसते की के.के. हेब्बर, गणेश पायने आणि अन्जोली इला मेनन यांच्या चित्रांनाही चांगली मागणी होती. ऑक्टोबरमध्ये लंडनमधील लिलाव करणारा एक प्रसिद्ध व्यक्ती सोथबे हा न्यूयॉर्कमधेही येत्या ऑक्टो. मधे लिलाव आयोजित करणार आहे. गेल्या वर्षी ६०० भारतीय चित्रे लिलावासाठी बाजारात आलेली आहेत.

**अुत्तर-ध्रुवावर पोचणारी पहिली महिला**

फ्रान्सची चाळीस वर्षांची डॉक्टर महिला क्रिस्टीन जनियन, तिची मार्गदर्शक सेर्जी ऑगोरोडनिकॉव्ह या रशियन महिलेला बरोबर घेअून ३ मार्च रोजी रशियाच्या अुत्तर टोकावरून पायीच अुत्तर-ध्रुवाकडे रवाना झाली. त्यांना तेथे पोचायला ६० दिवसांपेक्षा थोडा अधिक काळ लागला. केवळ पायी जाअून तेथे पोचणे, इतकाच तिचा अुद्देश नव्हता, तर मार्गावर तिने आजारी मुलांच्या शुश्रुषेसाठी केन्द्र स्थापन करण्यासाठी पैसाही गोळा केला.

चांदोबा पुरवणी १०९



आपल्या देशाची सौन्दर्यस्थळे

# भागवत मेळा




तमिलनाडूतील तंजावर शहरापासून अठरा कि.मी. अंतरावर मेलट्टूर नावाचे एक गाव आहे. येथे दरवर्षी नरसिंह जयंतीच्या दिवशी 'भागवत मेळा' नावाने नृत्य-नाट्ये प्रदर्शित होतात. या अुत्सवात प्रेक्षक अगदी मनापासून आनन्द लुटतात. या अुत्सवाचा अनुभव खासच वाटतो. ही नृत्य-नाट्ये गल्ली-गल्लीत दाखवल्या जाणाऱ्या नाटकासारखीच असतात. पण या मेळ्याचे (जत्रेचे) मुख्य आकर्षण ही नाट्येच असतात.

भागवत मेळ्याबद्दल विशद रूपाने माहिती करून घ्यायची असेल, तर आपल्याला पाच शतकांपूर्वीची इतिहासाची पाने अुलटावी लागतील. द. भारताचे तेलगू नायक राजे कलेला आश्रय देणारे होते. हे नायक राजे सांस्कृतिक कार्यक्रमांना प्रोत्साहन देत असत. नायक राजांनी भागवत मेळ्याला प्रोत्साहन देण्यासाठी पाचशे ब्राह्मणांना मेलट्टूर गाव दान दिले.

मेलट्टूरमधील वरदराज स्वामी मंदिरासमोरच्या रस्त्यावर नाटक प्रदर्शनासाठी वेदीची व्यवस्था केली जाते. मंदिराच्या अुत्सव-मूर्ती सजवून प्रवेश-द्वारी ठेवल्या जातात. आपले नाटक देवांसमोरच आपण प्रदर्शित करत आहोत असे कलाकारांना वाटत असते. वेदीच्या (स्टेज) मागे वादक बसलेले असतात.

नाटकांची कथानके आपल्या पुराणांतून निवडलेली असतात. खूप काळपर्यन्त मेलट्टूरमधील पुरुषकलाकारच यात भाग होत असत. भागवत-मेळा म्हणजे एक विलक्षण अद्भुत नाटक-प्रदर्शन असते.

पुराणकाळातील राजे

# ब्रह्मदत्त

पांचाल राजा ब्रह्मदत्त हा अतिशय दयाळू होता. कोणत्याही परिस्थितीत तो धर्मपालन सोडत नसे. धर्म सोडून तो कोणताही निर्णय घेत नसे. सर्व प्राण्यांची भाषा समजण्याची कला त्याला प्राप्त झालेली होती.

एके दिवशी राणीसह उद्यानात फिरत असताना एका झाडोऱ्याकडे पहाता-पहाता तो अचानक हसला. राणीनेही तिकडे नजर फिरवली, पण तिला तिथे काहीच दिसले नाही, तेंव्हा तिने विचारले, ''तिथे तर कसलीच हालचाल दिसत नाहीय! मग तुम्ही असे हसलात का म्हणून?''

राजा म्हणाला, ''तसं काही विशेष कारण नाहीय.''

पण या उत्तराने तिचे समाधान झाले नाही. तिने विचारले, ''हवा कशी प्रशान्त आहे. कुठेही कसली हालचाल नाहीय. तरीही आपण का हसलात? विनाकारण कोणी कधी हसतं काय?''

ब्रह्मदत्त सत्यनिष्ठ होता. आपल्या हसण्याचे कारण सांगत तो बोलला, ''झाडोऱ्यात दोन मुंग्या अगीचच एका लहानशा विषयावरून भांडतायत. मला प्राण्यांची भाषा अवगत असल्याने त्यांचा अगदी लहानसा शब्दही ऐकू अन् समजू शकतो. त्यांचे हे भांडण ऐकून सहजच मला हसू आलं.

तरीही राणीचा विश्वास बसेना. राजा मस्करी करत आहे असे तिला वाटले, ''मी इतकी भोळी नाहीय, की आपलं सगळंच बोलणं खरं मानीन.''

राजाने आता सांगितले की, आपण जे बोललो, ते सत्यच बोललो. आता राजावर विश्वास बसून राणीने विचारले, ''असं आहे काय? पण ही अद्भुत शक्ती आपणाला कशी प्राप्त झाली?''

आतापर्यंत राजाला कारण माहितीच नव्हते. ही अद्भुत शक्ती कशी मिळाली याविषयी तो विचारात पडला. पूर्ण ध्यान लावून त्याने भगवन्ताचे स्मरण केले. दुसऱ्या दिवशी तो राजभवनाकडे जाऊ लागला, तेंव्हा एका वृद्ध ब्राह्मणाने त्याच्याकडे पाहून एक श्लोक म्हटला. त्या श्लोकात ब्रह्मदत्तच्या पूर्व-जन्मीचा वृत्तान्त स्पष्ट केला होता.

ब्रह्मदत्त कधी काळी एक मुनिकुमार होता. दुष्काळाच्या वेळी भूक सहन न झाल्याने, त्याने गुरुचा पाळीव प्राणी मारून त्याचे मास खाल्ले. या पापामुळे त्याला अनेक जन्म घ्यावे लागून खूप त्रास सहन करावा लागला. नंतर त्याला पुन्हा मुनिकुमाराचा जन्म मिळाला. त्यावेळी तेथील राजाचे वैभव पाहून तो चकित झाला. त्यामुळे आता या जन्मी तो राजा बनलाय. सर्व प्राणीमात्रात स्वतःला पहाण्याची शक्ती त्याला आपल्या तपोशक्तीमुळे पूर्व जन्मी मिळालेलीच होती. यामुळेच आता त्याला सर्व जीवांची भाषा जाणण्याचे शक्ती मिळालेली आहे.

पूर्वजन्मीच्या स्मृतीमुळे राजा अचानक बेशुद्ध झाला. थोड्या वेळाने तो शुद्धीवर आला व त्यानन्तर त्याने आपले आयुष्य भक्ति-पूजेत वेचले.

ब्रह्मदत्तची कथा आपल्याला सांगते की, पूर्व जन्मात आपल्याला मिळालेल्या शक्तींच्या बळावरच आपली या जन्मातली शक्ती व सामर्थ्य अवलंबून असते.



## तुम्हाला माहीत आहे काय?

### आईसबर्ग

समुद्राच्या पाण्यात तरंगणाऱ्या बृहदाकार बर्फाच्या खडकांना 'आइसबर्ग' म्हणतात. ध्रुव प्रान्तातल्या पर्वतातून हे तुकडे निराळे होतात व पाण्यात तरंगत रहातात. सर्वात मोठा आइसबर्ग जगाच्या दक्षिणटोकावर आहे. ६० मैल लांब, २० मैल रुंद व ३५० फूट उंच असणारे हे खडक अंटार्टिक हिमपर्वता पासून निराळे झालेले असतात. अशा हिमपर्वतांवर तात्पुरती वातावरण शोधकेन्द्रे उभी केली जातात. संशोधकांना विमानातून उतरवण्यासाठी आवश्यक जागांची सोय केली जाते. उत्तरटोकावरील आइसबर्ग सामान्यतः लहान असतात. ते ग्रीनलॅण्ड पासून उ. अटलांटिकच्या दक्षिणेकडे तरंगत जातात.





### इन्द्रधनुष्य

### सहायक भाषा

लुई ब्रेल नावाच्या पंधरा वर्षाच्या एका विद्यार्थ्याने आंधळ्यांच्या जीवनात क्रान्ती घडवली. त्यानेच 'ब्रेल' भाषा शोधून काढली. या भाषेद्वारे आंधळे लिहिणेवाचणे शिकतात. कागदावर उभरलेल्या ताऱ्यांसारख्या रेषांना बोटाच्या टोकांनी स्पर्श करुन आंधळे सहजपणे वाचू शकतात. सहा की वाल्या मशीनने टाइपरायटरसारख्या दिसणाऱ्या ब्रेलरायटरने या लिपीची योजना केलेली असते.





# महाकंजूष

एका गावात रविचन्द्र नावाचा एक भाग्यवान माणूस रहात असे. मरताना त्याने आपली इस्टेट हरी व गिरी या आपल्या दोन मुलांना सारखी सारखी वाटून दिली.

काहीही न करता नुसते बसून खाल्ले, तरीही काही फरक पडला नसता, इतकी अमाप संपत्ती होती. हरी मजेने राहू लागला, वैभवपूर्वक आयुष्य घालवू लागला. मनात येईल ते करत असे तो. त्याचा स्वतःचा मोठा महाल होता, दास-दासी होते. दररोज त्याच्या घरी कसला ना कसला जलसा होई. सर्वजण तोंड भरुन त्याची स्तुती करत, त्याला 'मोठा माणूस' मानत. हरी जमेल तितकी लोकांना मदतही करी. किंबहुना कुणाला मदत करण्यासाठी तो कारणे शोधी! सारे गावकरी त्याच्या दानधर्माबद्दल आपसात बोलत असत.

परन्तु गिरी मात्र एका लहानशा कौलारू घरात राही. त्याची बायको कल्पना हिचे विचार नवऱ्याशी मिळतेजुळतेच असत. त्यामुळे त्यांचे दिवस सुखाने व्यतीत होत. त्यांचे घर नेहमी स्वच्छ, नीट-नेटके असे. घरात फार किंमती सामानही नसे. ते चांगले कपडेच वापरत, पण ते भडक, चमकदार नसत. गिरीही इतरांना मदत करत असे. पण ती करण्यापूर्वी त्याला कारण माहीत असावे लागे. ज्यांना मदत करायची, त्यांना तो प्रश्न विचारी अन् समाधानकारक उत्तरे मिळाली, तरच आवश्यक ती मदत करी. सारे गाव त्याला 'महाकंजूष' म्हणे.

तेथून थोड्या अंतरावर आणखी एका गावात अचलपती नामक एक माणूस होता. तो त्याचे कुटुम्ब अगदी सामान्य असेच होते. त्याच्या मुलाचे नाव प्रदीप व मुलीचे नाव जया होते. जया उपवर झाली. अचलपती तिच्या विवाहासाठी पैसा जोडत होता.

राधिका आठले

एके दिवशी त्याचा शेजारी धनवान प्रवासाला निघण्यापूर्वी त्याच्या हाती एक अंगठी देत म्हणाला, "बाकी साऱ्या मूल्यवान वस्तु मी एका गुप्त ठिकाणी ठेवल्या आहेत. पण ही बोटातच राहून गेली. ही अंगठी केवळ मूल्यवानच नव्हे, तर मला ती खास वाटते. पिढ्यान पिढ्या आमचे पूर्वज ही आपल्या पुत्राच्या हवाली करत आले आहेत. तेंव्हा ही वंशाची खूण आहे." आणि ती सुरक्षित ठेवायला सांगून धनवान निघून गेला.

अचलपतीने आपल्या मुलीसाठी बनवलेले दागिने ठेवलेल्या पेटीतच ती अंगठीही सुरक्षित ठेवली. पण ही गोष्ट तो बायकोजवळ बोलला नाही.

दुसऱ्याच दिवशी लोक वरासह जयाला पहायला आले. त्यांना मुलगी आवडली अन् देण्याघेण्याच्या गोष्टीही ठरल्या. सासूने मुलीला पहायची इच्छा व्यक्त केल्यामुळे जयाची आई तिला खोलीत घेऊन गेली. जयाचे दागिने पाहून वरमाई फारच खूष झाली. विशेषतः अंगठीवर ती फिदा झाली. ती म्हणाली, "ही अंगठी फार आवडली मला! आपलं नातं आता पक्कं झालंच आहे, तेंव्हा या शुभ समयाच्या आठवणीदाखल ही अंगठी तेवढी मला द्या. ती तुम्ही दिलीत, की लग्न झालंच असं समजा."

अंगठी पाहून जयाच्या आईला फारच आश्चर्य वाटले. नवऱ्याने तिला कधी अंगठीबाबत काही सांगितले नव्हते! ती केंव्हा बनवली, हेही तिला ठाऊक नव्हते. म्हणून विहिणीला ती देण्याआधी नवऱ्याशी याबद्दल बोलणे तिला उचित वाटले. पण सासू



म्हणाली, "माझ्या यजमानांना मी अंगठी मागितली, असं कळलं तर रागावतील ते. ही क्षुल्लक गोष्ट आपण आपल्या नवऱ्यांजवळ बोलायलाच नको."

तिचे बोलणे ऐकल्यावर जयाच्या आईलाही वाटले, की वस्तु खरोखर नगण्य आहे. तिने होणाऱ्या विहिणीच्या बोटात अंगठी सरकवली. पुरोहित आला व विवाहमुहूर्ताचा दिवस व वेळही निश्चित झाली. नंतर वराकडची माणसे निघून गेली. जयाच्या आईनेही ठरवले की अंगठीबाबत नवऱ्याने विचारले, तरच सांगावे!

घरातली माणसे जयाचा विवाह पक्का झाल्याच्याच आनन्दात होती. एका आठवड्यानंतर शेजारचा धनवान प्रवासाहून परत आला. अन् अचलपतीजवळ त्याने



आपली अंगठी मागितली. दागिन्यांच्या पेटीत त्याने पाहिले तेंव्हा त्याला अंगठी सापडेना! घाबरून जाअून त्याने बायकोला विचारले, तेंव्हा तिने खरी गोष्ट सांगितली.

आपली पगडी अुतरवल्यासारखे, डोकेच अुडवल्यासारखे वाटले अचलपतीला! आपण अगोदरच बायकोला अंगठीबद्दल का बोललो नाही, असे त्याला वाटले. आता या स्थितीत काय करावे! जे घडले, ते सारे त्याने धनवानला सांगितले व आता पुढे काय करावे, याबद्दल त्याचाच सल्ला मागितला.

थोडा वेळ विचार करून धनवान म्हणाला, ''तुझ्या प्रामाणिकपणाबद्दल थोडाही संशय नाहीय मला. पण पिढ्यान पिढ्यांची वारसा हक्काची वस्तु सोडून द्यावी - असाही अर्थ नाही त्याचा! आता ती अंगठी मला परत मिळेल, असा काही अुपाय शोधून काढ. मी यासाठी तुला दोन आठवड्यांची मुदत देतो.''

''तुम्ही म्हणताय ते खरंच आहे. तुमच्या भावनांची कदर आहे मला. तशी अंगठी आणखी कुठे आहे, असं काही माहीत आहे का तुम्हाला? सोनार गाळून तशीच एक बनवून घेता येईल.'' अचलपतीने सुचवले.

धनवान हसत म्हणाला, ''अंगठीची किंमत माहीत आहे? दोन हजाराची आहे ती! तशी बनवणं तुझ्या हातची गोष्ट नव्हे.''

मुलीच्या लग्नासाठी साठवलेले पाच हजार रुपये अचलपतीजवळ होतेच. आता या अंगठीसाठी त्यातले दोन हजार जाणार. म्हणजे तेवढे आपल्याला कमी पडणार खर्चाला! पण आता आपली लाज राखायचा प्रश्न होता! आपल्या नावाला बट्टा लागू नये यासाठी तसली अंगठी बनवणे भागच होते. तो धनवानला पुन्हा-पुन्हा म्हणाला की, ''अगदी तसलीच अंगठी पहायला मिळाली, तर काम होअू शकेल.''

जरा थांबून धनवान म्हणाला, ''माझ्या आजोबांच्या हातात-एकाच प्रकारच्या चार अंगठ्या असत. त्यांनी आपल्या दोन मुलांना त्यातल्या दोन-दोन देअून टाकल्या-माझ्या वडलानाही दोन मुलगे. त्यांनी एक मला दिली अन् दुसरी माझ्या भावाला. भाअू व्यापारासाठी मलयद्वीपात निघून गेला. त्याचा पत्ता काढणं अशक्य आहे. आता प्रश्न माझ्या काकांचा. त्यांचा मृत्यु होअूनही खूप काळ लोटलाय. त्यांचे मुलगे हरी अन् गिरी दोघं अेकाच गावात रहातात. तुला जे वर्णन हवंय, ते त्यांच्याकडून मिळू शकेल. हरी दानशूर अन् गिरी कंजूष आहे, असं ऐकलंय मी.'' त्याने अचलपतीला दोन भावांची माहिती दिली.

आपला मुलगा प्रदीप याला सर्व काही स्पष्ट सांगून अचलपती म्हणाला, ''हे बघ, आता काहीही करून त्या अंगठीच्या जोडीची अंगठी मिळव. आपल्या कुटुम्बाच्या मानाचा अन् प्रतिष्ठेचा प्रश्न आहे हा.''

पित्याच्या आज्ञेने प्रदीप ताबडतोब हरी-गिरींच्या गावी गेला. प्रथम तो हरीला भेटून म्हणाला, ''मला आपली मदत हवीय. माझी हकीकत ऐकून घ्या.'' हरीकडे त्यावेळी कसलासा जलसा चालू होता. हो व्यस्त असल्यामुळे म्हणाला, ''तुझी गोष्ट ऐकण्याइतक वेळ नाहीय मला. तुला काय हवंय तेवढंच सांग. आपल्याकडून शक्य ती मदत करीन मी.''

''मला तुमच्या अंगठीची नक्कल हवीय.'' प्रदीप म्हणाला.

आपण फार गुंतलेले आहोत असे सांगून हरी म्हणाला, ''ती अंगठी आता माझ्या देवघरात आहे. तिची नक्कल करून घेणं आत्ता शक्य नाही मला. जवळच्याच गल्लीत माझा भाअू गिरी रहातोय. पण तो महाकंजूष आहे. अंगठीची नक्कल करवायला एक पैसाही खर्च नाही करणार तो. मी तुला दहा रुपये देतो. ती नक्कल बनवायला अन् इतर आवश्यक खर्चाला ही रक्कम पुरेशी होईल.'' प्रदीप काही बोलणार होता, पण पुढे काही ऐकायला तयार न होता, त्याच्या हातात दहा रुपये जबरदस्तीने कोंबून हरी निघून गेला. तिथे अुपस्थित असलेल्यांनी हरीच्या दानीपणाची वाहवा केली. खरे तर आपली स्तुती केली जावी, यासाठी मुद्दामच हरीने सर्वासमक्ष हे पैसे दिले. गिरीची बदनामी व्हावी, हा अुद्देशही होताच.





ते दहा रुपये घेताना प्रदीपला लाज वाटली. पण तो काही करू शकला नाही. मुकाट्याने पैसे खिशात घालून तो बाहेर पडला. आता पुढे काय करावे याबद्दल तो विचारात पडला. 'कंजूष' म्हणून प्रसिद्ध असणाऱ्या गिरींकडे जावेसे वाटत नव्हते त्याला. पण आता नाइलाजच होता. अंगठीचा नमुना मिळवणे अत्यंत आवश्यक होते.

घरी आलेल्या प्रदीपचे गिरीने नीट स्वागत केले. त्याच्याशी गोड बोलून, छानसे सरबतही दिले. प्रदीपची अडचण त्याने नीट समजून घेतली. काही प्रश्नही विचारले.

नंतर तो प्रदीपला म्हणाला, ''तुझं काम मोठं नाजूक आहे. फार सावधगिरीनं वागावं लागेल. ही माझ्या हातातली अंगठी परंपरेनं चालत आलेली आमच्या कुटुंबाची निशाणी आहे. माझ्या दृष्टीने अमूल्य आहे ती. तेव्हा मी ती तुला देऊ शकत नाही. अगदी बरोबर अशी अंगठी बनवण्याची हातोटी वज्रपुरीच्या रत्नगुप्तलाच साध्य आहे. आता तो मोठा करोडपती बनलाय. इतकी लहान-सहान कामं करायला तो आता तयार नाही होणार. तरीही त्याला समजावून, खूष करून हे काम करायला लावण्यासाठी मी तुझ्याबरोबर वज्रपुरीला येतो. तिथे नकलीच कशाला, चांगली खरी अंगठीच बनवूया आपण.''

''पण महाराज, माझ्याजवळ आत्ता इतके पैसे नाहीत. मला आपल्या गावी जाऊन पैसे आणायला हवेत.'' प्रदीप म्हणाला.

गिरी त्याचे उत्तर ऐकून जरा थांबून म्हणाला, ''अरे पण, मुलीच्या लग्नासाठी जमवलेल्या धनातनंच हे पैसे तुझे वडील देणार नं? या अंगठीमुळे आता लग्नच मोडायची वेळ आली, तर सगळ्यावर बोळा फिरेल. लग्न पार पाडायसाठी आता त्यांना कर्ज घ्यावं लागेल. ते मी देतो नं. कबूल आहे तुला?''

गिरीच्या भलेपणाचे प्रदीपला आश्चर्य वाटले. लोकांनी आणि प्रत्यक्ष भावानेही त्याच्यांवर 'कंजूष' पणाचा शिक्का का मारला हे त्याला कळेना. नंतर दोघे मिळून वज्रपुरीला गेले. प्रवासात पन्नास रुपये खर्च झाले. वज्रपुरीत खानावळ चालवणाऱ्या एका म्हाताऱ्या आजीकडे त्यांनी मुक्काम ठेवला. सारा खर्च गिरीनेच केला. दोनच दिवसात आपल्या अंगठीसारखी अंगठी रत्नगुप्तकडून बनवून घेण्यात गिरी सफल झाला, अन् त्याबरोबरच रत्नगुप्तशी घासाघीस करून एकशे पन्नास रुपये किंमतही त्याने कमी करवली.

वज्रपुरीचा हा व्यवहार पुरा करून गिरी व प्रदीप व्याह्यांच्या गावी पोचले. तिथे गिरी अचलपतीच्या व्याह्याला म्हणाला, ''व्याहीबुवा, विहीणबाई नकार देत असूनही अचलपतीच्या बायकोनं आग्रह करून त्यांच्या हातात अंगठी घातली. पण ती अंगठी आपली नाही, हे त्यांना माहीत नव्हतं. त्यावर दुसऱ्या कुणाचं नावही आहे. अक्षरं फार लहान असल्यानं ती स्वच्छ दिसत नाहीत. वहिनींच्या चुकीबद्दल अचलपतींना फार वाईट वाटलं. त्यांनी तसलीच दुसरी बनवून विहीणबाईंचं नावही घातलंय पहा यावर. गैरसमज करून न घेता ती देऊन ही घ्या ना.''

अचलपतीचा व्याही गिरीच्या बोलण्यावर खूश झाला. त्याने अंगठी घेऊन बायकोकडून जुनी अंगठी परत आणून त्याला देत म्हटले, ''अचलपती सारखी मोठ्या मनाची माणसं क्वचितच आढळतात. त्यांना सांगा, की आम्ही सर्वजण त्यांच्या या वर्तणुकीवर फार खूश आहोत.''

गिरी अन् प्रदीप आता अचलपतीच्या गावी गेले. जे घडले, ते सर्व प्रदीपने पित्याला सांगितले. अन् त्याच्या हातावर अंगठी ठेवली.

गिरीचे दोन्ही हात प्रेमाने हातात घेत अचलपती म्हणाला, ''आपण हे काम मोठ्या कुशलतेनं हाताळलंत. कुणाचंही मन न दुखवता, आमची अब्रू राखून आपली व्यवहारकुशलता दाखवलीत. योग्य वेळी कर्ज देऊन आम्हाला मदत केलीत. आपलं कर्ज मी सव्याज फेडीन, अन् तरीही जन्मभर



आपला ऋणीच राहीन. आपली कृतज्ञता कशी व्यक्त करू हेच समजत नाहीय मला.'' बोलताना त्याच्या डोळ्यात पाणी आले.

आपले हात हळुवारपणे सोडवून घेत गिरी म्हणाला, ''प्रत्येकाचं कर्तव्यच असतं, की दुसऱ्यांना खूप मदत करावी. देवदयेनं माझ्याजवळ भरपूर आहे. माझ्या कर्जाबाबत चिन्ता करू नका. जमेल तेव्हा फेडा ते; अन् न जमलं तरी काही हरकत नाही. स्वतःला कर्जदार समजून दुःखी होऊ नका.''

आता प्रदीप आश्चर्याने म्हणाला, ''सर्वांचं म्हणणं तर असं आहे की, आपण महाकंजूष आहात. आपल्या भावाइतकीच संपत्ती आपणाजवळही आहे. ते मोठ्या थाटामाटाने रहातात; अन् आपण? आपण तर साधेपणानं रहाता. गरजवन्ताला आपण मदत करता.

त्याच्यासाठी आपण त्रासही सोसता. त्याच्यासाठी लागेल तो खर्चही करता. तरीही आपल्या दानीपणाचं कौतुक केलं जात नाही; कोणी मान नाही देत आपल्याला! मला तर याचं कारण समजत नाहीय.''

गिरी हसत म्हणाला; ''बेटा, मदत मागणाऱ्या प्रत्येकाला, काही चौकशी न करता, खरं कारण न जाणता मदत केली, तर मदत करणाराला 'कर्ण' म्हणून त्याची प्रशंसा केली जाते. पण असल्या माणसांमुळे भिकाऱ्यांची संख्या वाढते; याशिवाय त्यातून काही प्रयोजन साधलं जात नाही. दुसऱ्याची गरज जाणावी अन् नंतरच मदत करावी - यात खरा आनन्द आहे. असा आनन्द आपलं नाव अन् प्रसिद्धी मिळण्याच्या मागे धावत नाही; तिकडे लक्षच देत नाही. दान दिलं, तरी ते 'सत्पात्री दान' असावं. असं वाटतं मला. तीच गोष्ट कर्ज देण्याबाबतही. आता राहिलं माझं जीवन! माझ्या पित्यानं मला जी संपत्ती दिलीय, ती आपल्या मुलांच्या हाती देणं माझं कर्तव्य आहे. मी स्वतः कष्ट करून, त्यातून इतरांना मदत करतो. कमवलेलं धन अपुरं पडलं, तर पित्याच्या धनातून तेवढं घेऊन मदत करतो. इतरांनी घेतललं कर्ज परत केलं, तर ठीकच. पण न केलं. तर काटकसर करून तेवढं धन वाचवून मूळ धनात भर घालतो. आजपर्यन्त दिलेल्या पैशातून बरचसं धन मला परत मिळालेलं नाहीय. त्यामुळे मला ती रक्कम भरावी लागली, भरतोय. साधेपणानं रहाण्याचं हेच कारण आहे. यामुळेच लोक मला कंजूष म्हणतात.''

अचलपतीने निरोप पाठवून गिरीला गावी पोचवण्यासाठी बैल गाडी मागवली. बैलगाडीतून जायला नकार देत, ''स्वतःच्या प्रवासाचा खर्च मी तुमच्यावर टाकणार नाही. काही दिवस मला अजून काटकसर करायची असल्यानं पायीच गावी जाई.'' असे म्हणून गिरीने त्याचा निरोप घेतला.

गिरी स्वतः मुळीच कंजूष नसून, उलट त्याच्याकडून मदत मिळवणारेच कंजूष आहेत असे प्रदीपच्या लक्षात आले. त्याने आता तोलूनमापून स्वतःचा खर्च चालवण्याची सवय लावून घेतली. वर्ष पूर्ण होता-होता गिरीचे कर्ज फेडण्यात त्यानेही पित्याला हातभार लावला. एक चांगला गुण अंगी बाणवण्यात प्रदीपला गिरीमुळे मदतच झाली.





# अ - धर्मशाळा

एकदा रंगापुरचे सर्व प्रमुख एकत्र आले व त्यांनी ठरवले की, प्रवाशांच्या सोयीसाठी, गावापासून दूर असणाऱ्या मुख्य सडकेच्या कडेला एक धर्मशाळा बांधायची. स्वयंपाक करण्यासाठी एका म्हातारीची नियुक्ती करावी अन् हिशोब संभाळण्यासाठी एक कारकून ठेवावा. इतर किरकोळ कामांसाठी एक निराळा नोकरही असावा. मंदिराच्या सुपीक जमिनीतून येणाऱ्या उत्पन्नातून धर्मशाळा चालवण्यात यावी. अशा प्रकारे धर्मशाळा चालवण्यासाठी आवश्यक ती व्यवस्थाही त्यांनी केली.

काही काळपर्यन्त धर्मशाळेचे काम व्यवस्थित चालले. गावापासून दूर असणाऱ्या त्या धर्मशाळेत प्रवासी व यात्रेकरू येऊन रहात. गावचा कोणी तेथे जातही नसे. सामान्यतः प्रवासी जेवण करून रात्री तिथेच मुक्काम करत व सकाळी उठून निघून जात. जे लहान-मोठे पैसेवाले प्रवासी येत, ते धर्मशाळेच्या तीन्ही नोकरांना काही चिरी-मिरी देत असत.

आता या तिघांना हळूहळू असे पैसे घेण्याची सवयच लागली. ते आता सर्वांकडूनच पैसे वसूल करू लागले. न देणारांना धर्मशाळेत प्रवेश च करू देत नसत. प्रवाशाने आत पाऊल ठेवताच नोकर. आपली खंडणी वसूल करी. पैसे हाती आल्यावरच तो त्याला झोपायची जागा दाखवी. धर्मशाळा आता हॉटेल बनली होती. पण गावच्या लोकांना हे रहस्य कळू नये, याबाबत तिघेही जागरूक असत.

अशी गडबड चालू असतानाच, एकदा आर्यापुरला जाता जाता एक युवक अंधार झाल्यामुळे रंगापुरच्या धर्मशाळेत आश्रयाला आला. पण त्याच्याजवळ पैसे नसल्यामुळे त्याला धर्मशाळेत येऊ दिले गेले नाही.

तो बिचारा उपाशीच एका झाडाखाली झोपला आणि दुसऱ्या दिवशी आर्यापुरला

पंचवीस वर्षांपूर्वी चान्दोबात प्रकाशित झालेली गोष्ट

पोचला. तेथे त्याने आपला कडू अनुभव आपल्या मित्रांना सांगितला.

हा अनुभव ऐकणारांच्यात रामावतारही एक होता. धर्मशाळेच्या नोकरांना चांगला धडा शिकवायचा निश्चय त्याने केला. एका नोकराला बरोबर घेऊन रात्रीच्या वेळी तो रंगापुरला पोचला. जेवणाची वेळ होती ती. तो आपल्या नोकराला म्हणाला, ''अरे, गावात जाऊन सांग, की रंगापुरच्या राजाचा मेहुणा धर्मशाळेत उतरला आहे.'' नोकराला पाठवून तो स्वतः धर्मशाळेत पोचला. तेथे पोचल्याबरोबर तिथला नोकर मंगू याने पैसे मागितले. तो म्हणाला, ''पैसे द्या, म्हणजे तुमच्या स्नानाचीही व्यवस्था करतो.''

रामावतारने बहिरा असल्याचे नाटक करून म्हटले, ''हो, मी एकटाच आलोय.'' अन् त्याने धर्मशाळेत प्रवेश केला.

जेवणघरात आजीबाई पाने वाढत होत्या. रामावतारला ती म्हणाली, ''पैसे द्या, म्हणजे तुम्हालाही जेवायला वाढते मी.''

''मला काहीही चालतं. कोणत्याही पदार्थाचं पथ्य वगैरे नाहीय मला.'' असे म्हणून तो पटकन एका वाढलेल्या पानासमोर बसला.

''हे पहा, तुमचं पान नाहीय ते!'' म्हातारी ओरडली. पण आपल्याला काही ऐकू येत नसल्याचे नाटक रामावतारने चालूच ठेवले.

''बसू देत आजीबाई; बहिरा आहे बिचारा तो. आणखी एक पान वाढा त्या कोपऱ्यात म्हणजे झालं.'' तिथे जेवायला आलेला एक प्रवासी म्हणाला. तिथे हजर असणारे इतर प्रवासीही मुक्तकंठाने म्हणाले, ''जेवणावरून कुणाला उठवणं, हे महापाप आहे.'' नाइलाजाने म्हातारीला त्याला जेवण वाढावेच लागले.

रामावतार पोटभर जेवला अन् कारकुनाला





पहाताच म्हणाला, ''माझ्यासाठी अंथरूण घाल.''

जोराने ओरडून तो म्हणाला, ''पैसे द्यावे लागतील.''

रामावतार तरीही बहिऱ्याचे सोंग करत म्हणाला, ''चांगला मऊ कापसाचा बिछाना घाल.''

कारकून बाहेर येऊन नोकराला म्हणाला, ''अरे मंगू, त्या बहिऱ्याला बाहेर काढ बरं! त्याला वाटतंय की धर्मशाळा त्याच्या बापाचीच आहे.''

नोकर व कारकून तेथे पोचले. त्यांना दिसले की रामावतार दुसऱ्याच कुणाच्या अंथरुणावर झोपलेला आहे. अन् घोरत राहून गाढ झोपल्याचे नाटक करत आहे.

मंगूने त्याला हलवून हलवून उठवले. रामावतारने डोळे उघडून 'काय झालं?' असे विचारले. कारकुनाने ओरडून सांगितले, ''चल, चालू लाग इथून!''

''हा बिछाना चांगला मऊ आहे. याच्यावरच झोपतो मी.'' रामावतार म्हणाला. कारकून नोकराला ओरडून म्हणाला, ''अरे पहातोस काय? याला बाहेर ओढ.'' नोकर त्याला ओढायच्या प्रयत्नाला लागला.

इतक्यात गावची चार प्रमुख माणसे तेथे येऊन पोचली. ते म्हणाले, ''राजेसाहेबांचे मेहुणे इथे आल्याची खबर आहे. कुठे आहेत ते?''

रामावतार त्यांना म्हणाला, ''राजाच्या मेहुण्याचा विषय द्या सोडून. मी पैसे न दिल्यानं ही माणसं अशा अर्ध्या रात्री मला बाहेर काढत आहेत.'' अन् घडलेले सारे त्याने त्या गावप्रमुखांना सांगितले.

सारी हकिकत ऐकून ती माणसे तर आश्चर्यचकितच झाली! बाकीच्या प्रवाशांना विचारले, तेंव्हा त्यांनीही कोणाकोणाला किती पैसे द्यावे लागले, हे स्पष्ट सांगितले.

पंचायत बोलावण्यात आली. तिघांनी प्रवाशांकडून बरेच धन लुटल्याचे सिद्ध झाले.

गावप्रमुखांनी, तिघांनाही दंड भरायला लावून त्यांना नोकरीवरून काढून टाकले. त्यांच्या जागी नवीन माणसे भर्ती केली. तेंव्हापासून अधूनमधून एक एक गावप्रमुख येऊन धर्मशाळेच्या व्यवहारावर लक्ष ठेवू लागले. धर्मशाळा त्यांच्या देखरेखीखाली सुचारू रुपात चालू राहिली.



समाचार विशेष

# आपले नवे राष्ट्रपती

गरीब कुटुम्बात जन्मूनही आपली अकुंठित दीक्षा, दृढनिश्चय, निरंतर परिश्रम यांचे फळ म्हणून अत्युच्च पदाला पोचणारी माणसे विरळाच! अशा व्यक्तींमध्ये अमेरिकेचे पूर्वीचे अध्यक्ष अब्राहाम लिंकन हे एक होते. १२ जुलै रोजी झालेल्या निवडणुकीत सर्वात अधिक मते मिळवून आपल्या देशाचे अकरावे राष्ट्रपति म्हणून निवडून येणारे महान् व्यक्ती म्हणजे श्री. के. आर. नारायणन. यांचा जन्म एका कुग्रामातील गरीब कुटुम्बात झाला. खूप अडचणी सोसून त्यांनी शिक्षण घेतले. एक एक पायरी चढत ते या उच्च पदावर पोचले.



कोचरिल रामन नारायणन् यांचा जन्म केरळ राज्यातील कोट्टायम जवळील उझवूर नामक खेड्यात २७ नोव्हेंबर, १९२० रोजी झाला. त्यांचे वडील आयुर्वेदिक वैद्य होते. सातव्या वर्षी श्री नारायणन् यांना सरकारी प्राथमिक शाळेत दाखल केले गेले. माध्यमिक शाळेत असताना मासिक फी भरता न आल्याने त्यांना अनेक संकटांना तोंड द्यावे लागले. तरीही मनलावून, श्रद्धापूर्वक आपले शिक्षण पूर्ण करून उत्तम गुण मिळवून ते उत्तीर्ण झाले.

पुढे ते तिरुअनन्तपुरमच्या विश्व विद्यालयात दाखल झाले. १९४२ मधे इंग्रजी साहित्यात ते प्रथम श्रेणीत उत्तीर्ण झाले. काही दिवस त्यांनी एका ट्युटोरियल कॉलेजात अध्यापक म्हणून काम केले व नन्तर ते दिल्लीला गेले. इंडियन ओव्हरसीज विभागात त्यांना नोकरी मिळाली. नंतर ती नोकरी सोडून त्यापेक्षा कमी पगारावर त्यांनी एका वर्तमानपत्रात काम केले. काही दिवसपर्यन्त मद्रासहून निघणाऱ्या 'हिन्दू' व मुंबईहून प्रकाशित होणाऱ्या 'टाईम्स ऑफ इंडिया' या वर्तमानपत्रांच्या उपसंपादकाचे काम संभाळले. 'कौटिल्य' या नावाने ते लेख लिहीत असत. १० एप्रिल १९४४ रोजी ते गांधीजींना भेटले. त्या दिवशी गांधीजींचे मौनव्रत होते. त्यामुळे श्री. नारायणन् यांनी जे जे प्रश्न विचारले. त्यांची उत्तरे त्यांनी पोस्टाच्या पाकिटांवर लिहून दिली. श्री. नारायणन् यांच्या जवळ ती पाकिटे अजूनही सुरक्षित ठेवलेली आहेत.

१९४५ मधे ते इंग्लंडला गेले आणि लंडन स्कूल ऑफ एकॉनॉमिक्समध्ये भरती झाले. प्रोफेसर हेरॉल्ड लास्की यांचे त्यांच्यावर खास प्रेम बसले. १९४८ मधे भारतात परत आले व जवाहरलाल नेहरूंनी त्यांना परराष्ट्र-विभागात नोकरी दिली. ब्रह्मदेश (मियान्मार) राजधानी रंगून येथील भारतीय दूतावासात काम करण्यासाठी त्यांना तिथे पाठवण्यात आले. यानंतर त्यांनी जपान, व्हिएतनाम व ब्रिटन येथील दूतावासांमधे काम केले. यानन्तर थायलंड, तुर्कस्तान व चीन या देशात ते भारतीय राजदूत होते.

१९७८ मधे सरकारी पद सोडून ते जवाहरलाल नेहरू विश्वविद्यालयाचे उपकुलगुरू बनले. १९८० मधे श्रीमती इंदिरा गांधींनी राजदूत म्हणून त्यांना अमेरिकेला पाठवले.

प्रधानमन्त्री बनल्यावर राजीव गांधींनी त्यांना राजनीतीच्या क्षेत्रात प्रवेश करण्यासाठी प्रोत्साहन दिले. केरळ राज्याच्या संसदेवर कॉंग्रेसचे उमेदवार म्हणून निवडून आले आणि योजना व विदेश शाखांची जबाबदारी त्यांच्यावर सोपवण्यात आली. ओट्टपालमधूनच ते पुन्हा संसदेवर निवडून आले. यानन्तर भारताचे उपराष्ट्रपती म्हणून त्यांची निवड झाली.

आज जरी देशाच्या उत्तुंग पदावर आरूढ असले तरी ते आपला बाल्यकाल विसरले नाहीत. ''जनतेने माझ्याबद्दल जो आदरभाव दाखवला, त्याचा मी विनयपूर्वक स्वीकार करत आहे. त्यांच्या अभिलाषा व आकांक्षा पूर्ण करण्याचा मी यथाशक्ती प्रयत्न करीन.'' श्री. नारायणन् म्हणाले.



# अपेक्षित-अनपेक्षित

सर्वांचे असे मत होते की, चन्द्रपुरीचा राजा चन्द्रसेन हा महाहट्टी राजा आहे. मनात येईल ते तो करत असतो. कुणाचा सल्लाही विचारत नाही. दरबारात मन्त्री असणे आवश्यक असे, म्हणूनच केवळ त्याने वृद्ध मन्त्र्याला त्याच्या स्थानावर राहू दिले होते. परन्तु मन्त्र्याकडे राजाने कधी, कसलाही सल्ला मागितला नाही. कसल्याही विषयाबाबत सल्लामसलत करायची गरजच त्याला भासली नाही.

गुप्तहेरांकडून चन्द्रसेनला समजले की, आपली अधिकांश प्रजा सुखी व संतुष्ट नाहीय. पण याबद्दलही मंत्र्याशी वा अन्य कोणाशी तो बोलला नाही. प्रजेच्या असंतुष्टतेचे कारण स्वतःच शोधायचा त्याचा विचार होता. वेष बदलून तो एकदा रात्री नगरात फिरायला निघाला.

एका अरुन्द गल्लीतून जात असताना त्याला एका घरातून नवरा-बायकोचे बोलणे ऐकू आले. घराच्या खिडकीमागे अुभा राहून तो लक्षपूर्वक संभाषण ऐकू लागला.

''गेले तीन महिने पहातेय मी; तुम्ही नेहमी चिन्ताग्रस्त दिसता; कारण सांगता मला?'' बायको आपल्या नवऱ्याला विचारत होती.

''काय सांगू? विचार तर खूप करतो मी. पण काहीच अुपयोग होत नाहीय.'' नवरा निराश आवाजात अुत्तरला.

राजाला वाटले की - जनतेच्या असंतुष्टतेचे कारण कळले आपल्याला. 'जनता ज्याचा विचार करते आहे, ते घडत नाहीय.'

चन्द्रसेन अंतःपुरात परत येअून रात्रभर याबद्दल विचार करत राहिला. खूप विचार करून त्याने ठरवले की - दुसऱ्या दिवशी काही लोकांना 'त्यांना काय हवे आहे' हे विचारून घ्यायचेच, अन् त्यांची इच्छा पूर्ण करून त्यांना संतुष्ट करायचे.

आशालता करंदीकर

दुसऱ्या दिवशी स्नान अुरकून चन्द्रसेन बाहेर आला, तेंव्हा एक नोकर त्याच्यासाठी दुधाचा लोटा घेअून अुभा होता. त्याला पहाताच नोकराने लोटा त्याच्या हाती दिला. पण दूध नासलेले असल्याचे त्याने बहुधा पाहिलेले नसावे. लोटा राजाहाती देतादेता त्याच्या ते लक्षात आले. आता तो बिचारा भयाने कापू लागला.

त्याच्याकडे रोखून पहात राजाने विचारले, ''आत्ता मनात तू काय विचार करत आहेस, ते खरं खरं सांग.''

''मला तर असं वाटतंय, की ते गरम दूध आता आपण माझ्याच तोंडावर ओतणार!''

नोकराच्या विचाराप्रमाणेच राजाने ते गरम दूध त्याच्या तोंडावर ओतले. नोकर बिचारा रडत तेथून निघून गेला. त्याच दिवशी दरबारात एका मामुली चोराला आणण्यात आले. त्याचा गुन्हाही शाबित झाला. त्याला कसलीही शिक्षा न करता खूश करायचे चन्द्रसेनच्या मनात होते. त्याने चोराला विचारले, ''बोल, आता मी काय करीन असं तुझ्या मनात आहे?''

''महाराज, मला भीती पडलीय की आपण मला चाबकाने फटके मारवाल!'' चोर घाबरत बोलला, राजाने त्याची ती इच्छा समजून फटके मारवले.

त्या रात्री आपला पती चन्द्रसेन याला विडा देत राणी म्हणाली, ''माहेरी जाअून आईवडिलांना भेटून यावं, असं फार वाटतंय! परवानगी द्याल नं?''

पान खात हसत हसत चन्द्रसेनने विचारले, ''माझ्याकडून काय अुत्तर येईल



अशी अपेक्षा आहे तुझी?''

''आत्ता-आत्ता तर तुझे नातेवाईक येअून तुला भेटून गेले, आता नको जाअूस, असं म्हणालसं वाटतंय मला.'' राणी मनातलं बोलली.

''हां, बरोबर. तसंच म्हणतो मी.'' चन्द्रसेन म्हणाला. दीर्घ अुसासा सोडून राणी आपल्या शयनागारात निघून गेली.

आजच्या दिवसात ज्या ज्या घटना घडल्या, त्यांचा आता एकान्तात राजा विचार करू लागला. ज्यांच्या ज्यांच्या मनात जे जे होते, तेच तर केले होते राजाने! त्यांना आनन्द मिळावा, म्हणून तर तसे केले होते त्याने! पण आता असे वाटू लागले की, ''यामुळे कोणीच संतुष्ट झाले नाही!' त्याला आता असे वाटू लागले की, प्रजेच्या



असंतुष्टतेचे दुसरेच काही कारण असावे. त्या रात्रीही वेषांतर करून राजा पुन्हा नगरात गेला.

एका भवनाबाहेर खुर्च्यांत बसून पति-पत्नी आपसात बोलत असलेले त्याला दिसले. झाडामागे लपून राजा त्यांचे बोलणे ऐकू लागला.

"अलिकडे काही दिवस तुम्ही आनन्दी दिसत नाही. पहिल्याप्रमाणे चेष्टामस्करी नाही चालत ! अगदी गप्प-गप्प अन् चिन्तित दिसता; जसं काही आपलं काही हरवलं आहे! काय कारण घडलंय?" बायकोने विचारले.

पति म्हणाला, "हंऽ! हल्ली काही दिवस आयुष्य अगदी घाण्याच्या बैलासारखं चाललंय. काही अनपेक्षित घडलं, काही अघटित घडलं, तरच आनन्द होईल नं!"

चन्द्रसेनला वाटले की, कल्पना नसताना अकस्मात काही झालं, तर जनतेची चिन्ता दूर होईल. त्याने ठरवले की अुद्यापासून ज्याची त्याची इच्छा जाणून घेअून बरोबर त्याच्या अुलट कृति करावी. म्हणजे अनपेक्षित घडून त्यांना आनन्द होईल!

दुसऱ्या दिवशी दरबारात निघण्यापूर्वी सेवकाने दिलेले कपडे राजाने अंगावर चढवले. अन् लगेच नोकराच्या ध्यानात आले की, खांद्याजवळ राजाचा कुडता थोडासा फाटका आहे. घाबरत नोकर म्हणाला, "क्षमा करा महाराज! दुसरा कुडता आणतो मी!"

"बोल, आता काय करीन मी?" चन्द्रसेनने त्याला विचारले. "मला शिक्षा द्याल, अन् हा कुडता घालून दरबारात नाही जाणार आपण!" सेवक बोलला.

"मी तुला शिक्षा तर नाहीच करणार; पण हाच फाटका कुडता घालून दरबारात जाणार आहे मी!" असे म्हणत चन्द्रसेन निघून गेला. दरबाराचा कार्यक्रम यथावत् चालू होता. पण वृद्ध मन्त्री मात्र त्यावेळी पेंगत होता. राजाला ते दिसले तेंव्हा जवळच्या सभासदाला त्याने इशाऱ्याने मन्त्र्याला जागे करायला सुचवले अन् तसे घडताच मन्त्री जागा झाला.

मन्त्री अेकदम गडबडून नीट बसला अन् म्हणाला, "क्षमा असावी महाराज!"

"महामन्त्री, आता मी काय म्हणेन सांगा बरं!" चन्द्रसेनने विचारले. राजाकडून असल्या प्रश्नाची मन्त्र्याला अपेक्षा नव्हती. तो चाचरत हळूहळू म्हणाला, "तुम्ही कदाचित असं म्हणाल की, तुमच्यासारखा



झोपाळू मन्त्री पाहून मला आपली स्वत:चीच लाज वाटतेय!"

पण त्याच्या विरुद्ध बोलायच्या अुद्देशाने राजा एकदम म्हणाला, "तसं मुळीच नाही. तुमच्या सारख्या योग्य मंत्र्याचा अुलट मला अभिमानच वाटतोय!"

सर्वजण एकाएकी हसू लागले. राजाने जाणून-बुजूनच हा आपला अपमान केला आहे असे वाटून मन्त्री मनातल्या मनात नाराज झाला; वेदनेने तडफडत राहिला.

त्याच दिवशी संध्याकाळी राजा चन्द्रसेन आपल्या अुद्यानात फिरत असताना अचानक एक काटेरी डहाळी वाऱ्याने अुडून राजाच्या पायाला लागली. म्हाताऱ्या माळ्याने धावत येअून ती दूर टाकली अन् तो म्हणाला, "क्षमा करा महाराज, पुन्हा कधी अशी चूक घडणार नाही. खूप सावध राहीन मी."

"बोल. जे घडलं, त्यावर माझ्याकडून काय कृति घडेल?" राजाने माळ्याला विचारले.

एक-दोन क्षण थांबून माळी म्हणाला, "आपण म्हणाल की, गुलाबाच्या या बागेत काटे असणं सहाजिकच आहे. म्हातारा आहे न मी, म्हणून मला कमजोर मानून नोकरीवरून काढून टाकाल कदाचित! पण महाराज, माझी अशी विनंती आहे की आपण असं करू नये."

"नाही, नाही; मी तर तेच करणार आहे. तुला कामावरून काढून टाकून एकाद्या तरुण माळ्याला नोकरीवर ठेवणार आहे मी!" असे म्हणत रडत असलेल्या माळ्याकडे न बघताच राजा आपल्या महालाकडे निघून गेला.



रात्री पुन्हा राणी माहेरी जायचा प्रस्ताव मांडत म्हणाली, "काल स्वप्नात मी आपल्या आईला आजारी असलेली पाह्यली. तिला एकदा भेटून यायची परवानगी द्या ना!"

"माझ्याकडून कसल्या अुत्तराची अपेक्षा आहे तुझी?" चन्द्रसेनने विचारले.

राणी हसत म्हणाली, "पुन्हा पुन्हा विचारते आहे, म्हणून तुम्ही मला जायला परवानगी द्याल."

"नाही, तुझा विचार चुकीचा आहे. मी तुला माहेरी जायची परवानगी नाकारत आहे." राजा बोलला.

खाली मान घालून राणी आपल्या दालनात निघून गेली. तिचा चिन्ताग्रस्त चेहरा पाहून राजा विचारात पडला. त्याला वाटले की, 'अनपेक्षित घडल्यानंतरही कोणी

संतुष्ट झालेलं दिसलं नाही. मग आता काय केल्यानं जनता सुखी, संतुष्ट होईल? खूप विचार करूनही त्याला या प्रश्नाचे उत्तर सुचेना. रात्रभर या विचारातच तो जागा राहिला.

मध्यरात्र उलटली, तरीही राजा न झोपता इकडे-तिकडे फिरत राहिलेला पाहून राणीने विचारले, ''झोप नाही येत तुम्हाला? इतकं व्याकूळ व्हायला कसली गंभीर गोष्ट घडलीय?''

आयुष्यात प्रथमच राजाने आपल्या राणीला आपले विचार खुलासेवार सांगून टाकले. तो म्हणाला, ''ज्यांची इच्छा पूर्ण झाली, ते लोक आणि जे अनपेक्षित रीत्या सफल झाले ते लोक - दोन्हींपैकी कोणीही संतुष्ट तर नाहीच झाले! काय केलं म्हणजे आपली प्रजा चिन्तामुक्त होईल, याचाच विचार पडलाय मला.''

राणी हसू लागली अन् म्हणाली, ''घडणारं अन् अघटित या दोन्हींबद्दल आपण जो विचार करतो, त्यांचा आपल्या गरजांशी संबधच नसेल, कदाचित त्यामुळे आपल्याला आनन्द मिळणारच नसेल. प्रजेच्या दृष्टीने राजा हा पित्यासारखा असतो. अन्न, वस्त्र अन् निवारा या माणसाच्या मूलभूत गरजा आहेत. या गरजा जो राजा पुऱ्या करतो, तोच प्रजेचा खरा प्रतिनिधी असतो. पण याचा अर्थ असा नव्हे, की प्रजेला सुखी करण्यासाठी राजाने लोकांना आरामात बसवून ठेवून खायला प्यायला घालावं. त्यांनी परिश्रमही करायला हवेत अन् त्या परिश्रमांमुळे मिळणारा आनन्द हाच खरा आनन्द मानला जातो. ज्या दिवशी तुम्ही हे काम कराल, त्या दिवसापासून आपली प्रजा चिन्तामुक्त होईल.''

शासनपद्धतीत आपण काय-काय चुका केल्या, हे आता चन्द्रसेनच्या ध्यानात आले. दुसऱ्या दिवशी सकाळीच त्याने मन्त्री आणि प्रमुख अधिकाऱ्यांबरोबर चर्चा केली. प्रजेच्या कल्याणासाठी काही योजना बनवल्या.

त्या दिवसापासून राजाला आपल्या गुप्तहेरांकडून प्रजा दुःखी असल्याबद्दल, किंवा त्यांच्या गरजा पुरवल्या न गेल्याबद्दल एकदाही कसली तक्रार ऐकू आली नाही.





# राजा तो राजाच!

**स्ना**न करता-करता प्रवाल देशचा राजा पाय घसरून पडला अन् त्याचा पाय लचकला. पाय जराही हलवता येईना. दरबारी वैद्यांनी कसल्या-कसल्या पानांचा रस काढून त्याचा लेप दिला अन् वर पट्टी बांधली. त्यांनी राजाला कमीत कमी पंधरा दिवस तरी आराम करायला सांगितले; जागेवरून जराही न हलायची खबरदारी घ्यायला राजाला बजावले.

मन्त्र्याला बोलावून महाराजांनी पूर्ण राज्यकारभार तात्पुरता त्याच्यावर सोपवला आणि मुख्य निर्णय घेण्याचा अधिकारही दिला.

मन्त्र्याने एक आठवडाभर राजाचा प्रतिनिधी म्हणून कारभार छान संभाळला. खुद्द महाराज व मंत्री यांच्या शासन पद्धतीत कसलाही फरक कोणाला जाणवला नाही. पण मन्त्री स्वभावतःच काहीसा अहंकारी होता. 'आता स्वतःची राजाशी तुलना करून, आपण त्याच्यापेक्षा कोणत्याही बाबत कमी नाही; महाराज शासनात जितके दक्ष आहेत तितकेच आपणही आहोत' अशी कल्पना त्याने करून घेतली. त्याचा अहंकारही वाढत राहिला.

''मी किती दक्षतेनं कारभार संभाळतो आहे! आजपर्यन्त मीच महाराजांना सल्ला देत आलो ना! त्या आधारानंच तर ते कारभार सुरळित संभाळू शकले आजवर! तसे तर ते केवळ उत्सवमूर्तीच. राजाशिवायही, कसला उतार चढाव न येता कारभार संभाळला जाऊ शकतो, हे मी सिद्ध केलंय.'' असा विचार करून तो आता हुकुमशहा सारखा वागू लागला.

एक दिवस मेहनत-मजुरी करणाऱ्या गरीबांच्या कमीत कमी साठ तरी झोपड्या जळून खाक झाल्या आणि दोनशेच्या वर माणसे निराश्रित झाली. मन्त्र्याने 'सर्व झोपड्या नव्याने बांधल्या जातील' अशी घोषणा दिली. आठवडाभर पुरेल इतका तांदूळ बेघर लोकांना फुकट दिला.

इतके सारे केल्यानन्तरही ते मजूर खूश दिसेनात! मन्त्र्याने त्यांना विचारले, ''आता तुम्हाला आणखी काय काय हवं, ते सांगा.''

''एकदा महाराजांना भेटायची परवानगी द्या आम्हाला. या विपदेत त्यांनी आम्हाला धीर दिला, तर धन्यता वाटेल. आमच्या संकटात ते नेहमी आमच्या बरोबर असत. प्रत्येक परिस्थितीत त्यांनी मदत केलीय आम्हाला! त्यांना भेटायची तीव्र इच्छा आहे आमची!'' मजूर म्हणाले.

मजूरांचे बोलणे ऐकून मन्त्री आश्चर्यात पडला. काय करावे हे समजेना त्याला. त्याचवेळी खुद्द महाराज बग्गीत बसून तेथे आले. त्यांना पहाताच सर्वांचे चेहरे आनन्दाने अुजळले! सर्वांकडे एकवार नजर टाकून ते म्हणाले, ''तुम्हा सर्वांच्या झोपड्या जळून गेल्याचं आत्ताच ऐकलं मी!''

सर्वजण राजाची बग्गी वेढून अुभे राहिले. आपल्या अडचणी सांगून त्यांनी राजाच्या तब्येतीचीही आपुलकीने चौकशी केली.

महाराजांनी सर्वांना धीर देअून, 'त्यांच्या झोपड्या पुन्हा अुभ्या केल्या जातील' असे आश्वासन दिले.

मन्त्र्याच्या डोळ्यासमोरच हे सर्व घडले. घरी परतून तो खोलवर विचार करू लागला. बराच वेळ विचार केल्यावर एक गोष्ट मन्त्र्याच्या लक्षात आली. जनतेची अशी इच्छा आहे की - त्यांच्या राजाची तब्येत अुत्तम असावी. अन् त्याच्या शासनाखाली आपणही सुखी-संतुष्ट असावे. त्यांच्या दृष्टीने मन्त्री काय, किंवा सेनापती आणि अन्य अधिकारी काय - सर्वजण राजाची आज्ञा पाळणारे केवळ सेवकच आहेत. त्याच्या मनात इतकीच भीती असते की - आपण काही चूक केली, तर राजाकडून आपल्याला शिक्षा होईल. पण त्याबरोबरच त्यांचा गाढ विश्वासही आहे की, संकटकाळी तोच आपल्याला आधार देईल अन् कष्टही दूर करील. ही खात्रीच सर्वांना एकत्र बांधते अन् राज्यात शांतता नान्दते.

ही वास्तविकता कळल्यावर मन्त्र्याचा अहंकार दूर झाला. महाराजांचे महत्त्व अन् मोठेपणा त्याने ओळखला. तेंव्हापासून तो दुप्पट अुत्साह व तत्परतेने अगदी मनापासून राजाच्या सेवेत रत झाला आणि महाराजांचा प्रमुख सल्लागार बनला.





# सम्राट अशोक

९

(पित्याच्या आज्ञेने अशोक अवन्तीची राजधानी अुज्जयिनीकडे जायला निघाला. त्या दिवशी संध्याकाळी विदिशा या स्थानी त्याने मुक्काम केला. पहाटे निसर्ग सौन्दर्याचे अवलोकन करत चालताना अचानक खोल खाईत पडणार, इतक्यात शाक्यनायकाची कन्या विदिशा हिने त्याला वाचवले. त्याच रात्री अशोकची हत्या करायच्या प्रयत्नात असणाऱ्या दोन तरुणी पकडल्या गेल्या.) - यानन्तर

**अ**पराधी तरुणींसमोरच त्यांच्या बरोबर आलेल्या पुरुषांना यश हरतऱ्हेने छळू लागला, त्यांना मार-पीट करत राहिला. नन्तर तो त्या स्त्रियांना म्हणाला, ''तुम्ही दोघी युवराजांना मारायला आल्या होतात, याबद्दल तुम्हाला मृत्युदण्ड मिळेल, मरण तुम्ही टाळू शकणार नाही. तेंव्हा मरणापूर्वी तरी, खरी गोष्ट सांगा. नरकात तरी तुम्हाला कमी यातना भोगाव्या लागतील.''

त्या नर्तकी घाबरून एकमेकींकडे पाहू लागल्या. त्यांच्यातील एक म्हणाली, ''दया करा आमच्यावर. नरकाला आम्ही भीत नाही. कारण आम्ही तो कधी पाहिलेला नाही. पण आपल्याकडून होणारा हा छळ आम्हाला सोसवत नाहीय; मृत्यूचं भय वाटतं आम्हाला. आमचा जीव घेतलात, तर आपल्याला काहीच अुपलब्ध होणार नाही. पण आम्हाला जिवन्त ठेवलंत, तर मात्र



कदाचित आम्ही तुमच्या अुपयोगी पडू. खरं काय आहे, ते सर्व आम्ही आपणाला सांगून टाकू.''

''प्रथम खरं काय ते सांगा, नंतर तुमच्या जीवनमरणाबद्दल युवराज काय तो निर्णय सांगतील.'' यश बोलला.

''राजधानी पाटलीपुत्रपासूनच आम्ही युवराजांच्या पाठलागावर होतो. आम्ही नर्तकी आहोत. जो कोणी धन देईल, त्यांच्या सांगण्यानुसार वागणं हा आमचा पेशा आहे. युवराजांचा अन्त करण्यासाठी आम्हाला ज्यांनी पाठवलं, ते नक्कीच त्यांचे शत्रू आहेत; पण आम्ही तर नक्कीच त्यांच्या शत्रू नव्हेत.'' एका नर्तकीने दीन स्वरात सांगितले.

''धन देअून युवराजांच्या कोणत्या शत्रूंनी पाठवलं तुम्हाला?'' यशने कठोर आवाज़ात विचारले.

''आम्हाला प्राणदान मिळेल, असं वचन द्या अगोदर.'' नर्तकीने विनवले.

''अटी नाही, प्रथम खरं सांगा; नाहीतर मारून टाकीन.'' यश कर्कश्श आवाजात बोलला.

''पहा महाराज, युवराजांची हत्या करायला, आम्हाला इथे पाठवणारा माणूस अन्य कोणी नसून, बिन्दुसार महाराजांचे ज्येष्ठ पुत्र व भावी राजा प्रत्यक्ष सुशेमच आहेत.'' नर्तकीने सांगून टाकले.

हे ऐकताच अशोकने विचारले, ''अगदी खरं सांगत आहेस?''

''अगदी शंभर टक्के खरं आहे युवराज!'' असे म्हणून नर्तकीने - आपल्याला राजभवनात केंव्हा व कसे बोलावले गेले हे



सांगितले. तिने पुढे सांगितले की - प्रत्येकीला एकेक हज़ार अशर्फ्या आणि हिऱ्याची एकएक अंगठी बक्षीस मिळाली. याशिवाय कार्य सफल झालं तर आणखीही धन मिळणार होतं. त्यांनी घातलेल्या अंगठ्या आणि सांगितलेली अुच्च-पदस्थ अधिकाऱ्यांची नावे, त्यांचे बोलणे खरेच असल्याची साक्ष पटवत होती. अशोक व यशचा त्यावर पूर्ण विश्वास बसला. हे काम सुशेमचे असल्याचा अशोकला संशय होताच. या अगोदरही त्याने अशोकच्या हत्येचा प्रयत्न केला होताच, पण तो सफल झाला नव्हता. आता स्पष्टच झाले की, सुशेम अशोकला आपल्या मार्गातला काटा समजून तो कायमचा दूर करायचा हरप्रकारे प्रयत्न करत आहे. 'सुशेम महत्वाकांक्षी असून, आपली प्रगती पाहून जळत असतो' हे



अशोकला ठाऊक होते. 'तो स्वतःला गादीचा वारस समजतो, शुद्ध कुळातला समजतो व आपल्याला फक्त दासी-पुत्र!' अशोकने त्याला जरी दोन-तीनदा सावध केले तरीही त्याचा स्वभाव बदलला नव्हता. याबद्दल अशोक थोडा वेळ विचारात पडला. त्या स्त्रियांकडून सर्व काही सविस्तर जाणून घेतल्यावर अशोकने टाळ्या वाजवताच तीन दृढकाय सैनिक येऊन त्याच्यासमोर उभे ठाकले.

''यांना इथून घेऊन जाऊन, त्यांना जिथं जायचंय तिथं सोड.'' अशोकने फर्मावले.

नर्तकींनी नम्रतेने विचारले, ''प्रभु, कुठं पाठवताय आम्हाला?''

''तुम्ही मला जिथं पाठवणार होता तिथं!'' अशोक तुटकपणे बोलला.

''नाही - नाही! आम्हाला मारू नका!'' म्हणत त्या आक्रोश करू लागल्या.

''रडू नका अभागी तरुणींनो! शाक्यमुनि गौतमची प्रार्थना करा. ज्याप्रकारे त्यांच्या अपार करुणेने युवराजांचं रक्षण केलं, त्याचप्रकारे ते तुमचंही करतील.'' मधुर आवाज सर्वांना ऐकू आला. आणि सर्वजण त्या दिशेला पाहू लागले. विदीशा हसत आत येत होती!

''उगीच त्यांच्या मनात आशा पालवू नको ताई!'' यश बोलला.

''मी आशा पालवत नाहीय. तूच त्यांना प्राण-भिक्षा मिळेल अशी लालूच दाखवली होतीस. आपलं वचन विसरलास का?'' विदीशाने भावाला विचारले.

''चांगली विवेकी, बुद्धिमान आहेस. अर्थहीन, शुष्क बोलणं का करते आहेस? प्राण-दान देईन असं मी केव्हा म्हटलं होतं? खरं तर, असं दान द्यायचा मला हक्कच कुठं आहे?'' यशने कडवटपणे विचारले.

''खरं सांगा, नाहीतर मारून टाकीन - असं म्हणून तूच तर त्यांना सावध केलं होतंस. याचा अर्थ असाच नं, की खरं बोललं तर त्यांना जीवदान मिळेल? मग आता का वचन मागं घेतोस?'' विदीशाने गंभीरतेने विचारले.

''अद्भुत!'' म्हणत अशोकने टाळ्या वाजवून यशला म्हटले, ''इतकी कुशाग्र बुद्धीची बहीण मिळालीय तुला! किती भाग्यवान आहेस मित्रा!''

यश अवाकच झाला! अशोक आपल्या बहिणीचे समर्थन करत असल्याचे पाहून त्याला आश्चर्य वाटले. विदीशाही आनन्दाने क्षणभर दिङ्मूढ झाली. तिचे बोलणे ऐकून नर्तकींच्या डोळ्यात कृतज्ञता तरळली.

स्वतःला संभाळत यशने अशोकला विचारले, ''युवराज, या धोकेबाज नर्तकींना सोडून दिलं जावं, असं खरोखरच वाटतंय तुम्हाला?''

''विदीशाच्या इच्छेप्रमाणेच होईल. आपल्याला त्यांचं ऐकावं लागेल. पण त्यासाठी त्यांना किंमत मोजावी लागेल!'' असे म्हणत अशोकने विदीशाकडे पाहिले.

''माझ्या आटोक्याबाहेर नसेल, तर नक्की मोजीन मी युवराज! सांगा, काय किंमत आहे?'' विदीशाने विचारले.

''ती किंमत तुम्हीच मोजू शकाल; फार मूल्यवान आहे. मला सांगणं कठीण जातंय.'' थोडे थांबून अशोक म्हणाला, ''ही गोष्ट मी तुमच्या भावाजवळ बोलेन.''

युवराजांचे आपल्या बहिणीवर प्रेम बसले असल्याचे, आणि आपल्या मनातली गोष्ट तिच्यासमोर सांगायला त्यांना संकोच वाटत आहे, हे यशने ताबडतोब ओळखले. मनोमन त्याला फार हर्ष झाला. हसतच त्याने बहिणीकडे पाहिले. ती मान खाली घालून तेथून निघून गेली.

अशोकने नोकरांना नर्तकी व कैदी माणसांना तेथून दूर न्यायची आज्ञा दिली.

☆ ☆ ☆

युवराज अशोक आपल्या कन्येशी विवाह करू इच्छित असल्याचे यशकडून कळल्यावर शाक्यनायक व त्याची पत्नी यांचा प्रथम विश्वासच बसेना. दोघे आनन्दाश्चर्यात बुडाले. थोडा वेळ त्यांच्या तोंडून शब्दही उमटेनासा झाला.

यश म्हणाला, ''युवराज अशोक शुद्ध



कुळातले आहेत. सर्व राजपुत्रांप्रमाणेच तेही महत्वाकांक्षी असून अधिकारावर त्यांचं प्रेम आहे. परन्तु सर्वांचं म्हणणं आहे, की ते उन्नत स्वभाव आणि कोमल हृदयाचे आहेत. माझंही तेच मत बनलंय. संपन्न अशा अवन्ती राज्याचे ते लवकरच राज-प्रतिनिधी बनणार आहेत. त्यांच्याशी विवाह झाला, तर आपली विदीशा नक्कीच राणी बनणार!''

इतक्यात तेथे आलेली विदीशा म्हणाली, ''बहिणीच्या बाबतीत तुझं इतकंच मत आहे? माझ्याबाबत तुला इतकंच समजलं? एवढंच ओळखलंस मला? राणी बनून मला फार आनन्द वाटेल असं वाटलं तुला?''

काही उत्तर न सुचल्याने यश गप्पच राहिला. पण नन्तर हसत तो म्हणाला, ''होय ताई, आपल्या बहिणीला राणी बनताना



पाहून कोणत्या भावाला आनन्द नाही वाटणार? यात चूक कसली? युवराजांच्या प्रस्तावाला मान्यता देण्यात कसला अडथळा वाटतोय, सांग तर खरं? मला तुझं मन कळत नाहीय.''

विदीशाची आई बोलली, ''यश, युवराज खरोखरच आपल्या मुलीशी विवाह करू इच्छितात, यावर प्रथम माझा विश्वासच बसत नव्हता. माझी खात्री आहे, की आपली विदीशा कोणी सामान्य मुलगी नव्हे! घडलेल्या घटना पाहून मला वाटतंय की या घटनांमागे काही तरी दैवी योग असला पाहिजे.''

आत्तापर्यन्त गप्प असणारा विदीशाचा पिता बोलू लागला, ''मला असं वाटतंय की विदीशाचं जीवन युवराजांच्या जीवनाशी जोडलेलंच आहे. नाहीतर केवळ एक दिवस आणि एका रात्रीतच युवराजांना तिनं दोन वेळा वाचवलं कसं असतं?

त्यांची बोलणी ऐकून विदीशाच्या डोळ्यातून अश्रू वाहू लागले. चुपचाप घराबाहेर येऊन, हात जोडून आकाशाकडे पहात ती बोलू लागली, ''तथागत बुद्धदेव! ही कसली परीक्षा माझी? माझ्या या व्याकुळ अन् दोलायमान् अवस्थेतून बाहेर पडायचा मार्ग दाखवा मला! माझी तर अशी इच्छा आहे की, आपण दर्शवलेल्या मार्गानं जाऊन निर्वाण प्राप्त करावं. उच्च पद किंवा ऐहिक सुखाचं मला मुळीच आकर्षण नाहीय. मी द्विधा मनःस्थितीत सापडले आहे. मला अशा अवस्थेला का सामोरं जावं लागत आहे?'' तिने अशा प्रकारे प्रार्थना केली.

नंतर यश जवळ जाऊन विदीशा म्हणाली, ''बरं काय, वाईट काय याचा निर्णय घेऊ शकत नाहीय मी. खरं म्हणजे या विषयात आपल्या मातापित्यांच्या सल्ल्यावरही विश्वास बसत नाहीय. कारण ते माझ्या ऐहिक सुखाचाच विचार करत आहेत. कोणतेही आईबाप आपल्या कन्येचा योग्य माणसाशी विवाह व्हावा, अशीच इच्छा करणार. इच्छा पूर्ण झाली की त्यांना फार आनन्द होतो अन् ते समतात की परमेश्वरकृपेन आपलं कर्तव्य पूर्ण झालंय. याबाबत मला सल्ला देऊ शकतील असे एकच व्यक्ती आहेत आणि ते म्हणजे गुरुदेव अुपगुप्त.''

यश म्हणाला, ''ठीक आहे; त्याचं मत विचार.'' तिच्या मातापित्यांनीही या विचाराला संमती दिली. अुपगुप्त दुसऱ्याच दिवशी विदिशेला येणार असल्याची बातमी समजली. यशकडून विदीशाची इच्छा अशोकला समजली. त्याने ही भेट होईपर्यन्त प्रतिक्षा करायचे ठरवले.

सकाळीच विदीशा आपले माता-पिता व यश यांच्यासह अुपगुप्तांचा मुक्काम असणाऱ्या विहाराकडे गेली. ते तिघेजण बाहेर थांबले आणि विदीशा एकटीच विहाराच्या आत गेली.

थोड्या वेळाने विदीशा बाहेर आली. तिचा चेहरा गंभीर होता. चेहऱ्यावर कोणताच भाव नव्हता. गुरु अुपगुप्तांनी काय अुपदेश दिला हे चेहऱ्यावरून कोणीच सांगू शकले नसते. मोठ्या अुत्कंठेने सर्वजण तिच्याकडे पाहू लागले. झाडाखाली अुभ्या असणाऱ्या अशोकला पाहून ती यशला म्हणाली, ''जे जवळ येऊ इच्छित आहेत, ते दूर का अुभे आहेत?''

यशचा चेहरा आनन्दाने अुजळला. धावत जाऊन तो अशोकला आपल्या मातापित्यांजवळ घेऊन आला.

''युवराज, गुरुदेवांनी आपला प्रस्ताव मान्य करायला अनुमती दिली आहे. परन्तु माझी एक विनन्ती आहे. बुद्धदेवांनी दाखवलेल्या धर्ममार्गावर चालत रहाण्यासाठी मला आपला सहयोग व स्वीकृती हवी.'' विदीशा शांत स्वरात बोलली.

''विदीशाची विनन्ती मी मनापासून स्वीकारत आहे.'' अशोक आनन्दाने म्हणाला.

''कृतज्ञ आहे मी. गुरुदेवांची खात्री आहे की आपणाशी माझा विवाह तथागतांना मान्य आहे. आपल्या गुरुंवर माझा दृढ विश्वास



आहे. त्यांच्या सल्ल्याचं पालन करायला मी संनद्ध आहे.'' असे म्हणून विदीशाने माता-पिता, अशोक व यश यांना वाकून प्रणाम केला.

विवाहाची परवानगी मागण्यासाठी शाक्यनायकाने एका दूताकरवी पत्र लिहीले. परन्तु ते बिन्दुसारपर्यन्त पोचलेच नाही. सुशेमच्या एका मित्राने दूताला खूप पैसे देऊन ते पत्र हस्तगत केले व जाळून टाकले. नन्तर 'बिन्दुसारची या विवाहाला पूर्ण अनुमति आहे' असे कळवणारे एक पत्र तयार करून ते अशोककडे पाठवले. अर्थात् बिन्दुसार या बाबत पूर्णतः अनभिज्ञ होता.

'अवन्तीचा राजप्रतिनिधी म्हणून पद ग्रहण केल्यानन्तर अशोकने विदीशाशी विवाह केला.

एक दिवस सुशेम पित्याला म्हणाला, ''अशोकने शाक्यनायकाच्या कन्येशी विवाह केला असल्याची बातमी मला गुप्तहेराकडून समजलीय.''

''काय? पित्याला न कळवता पुत्राचा विवाह झालासुद्धा? अन् तोही एका राजकुमाराचा एका साधारण स्त्रीशी? हंऽ, एका सामान्य स्त्रीच्या पोटी जन्मलेल्या पुत्राची बुद्धी आणखी निराळी कशी असणार म्हणा!'' असा विचार करून राजा बिन्दुसार गप्प राहिला. त्याच्या मनात विरक्ती पसरली. पित्याच्या या वागण्याचा सुशेमला आनन्दच वाटला.

काळ जात राहिला. तक्षशिलामधे पुन्हा बंडाळी झाली. बिन्दुसार सुशेमला म्हणाला, ''अशोकला अुज्ञयिनीहून बोलावून तक्षशिलाकडे पाठवणं कठीण आहे. आता तू किंवा तुझ्या बन्धूंपैकी कोणी तिथे जाअून बंड मोडून काढावं!''

सुशेमचा आपल्या सामर्थ्यावर विश्वास नव्हता. जायला नकार दिला, तर 'आपलं पितळ अुघडं पडेल', म्हणून तो म्हणाला, ''तात, तक्षशिलाला जाअून बंड मोडणं, हे मी आपलं कर्तव्य आणि जबाबदारी मानतो. अशोकनं मागच्या वेळीच सर्व शत्रूंचा नाश केला असता, तर आज पुन्हा ही वेळ आलीच नसती. इतक्या लवकर पुन्हा बंडाळी माजून आपल्याला टक्कर द्यायची वेळ आली नसती.''

अशोकबद्दल पित्याचे मन कलुषित करायची संधी सुशेम कधीही सोडत नसे. अशोकचा मागचा पराक्रम विसरून त्याचा हा दोषच दाखवायचा प्रयत्न सुशेमने केला त्याचप्रमाणे विदीशा व अशोक यांच्या विवाहाबद्दले कळवणारे अशोकचे पत्र मित्रांनी नाहीसे केले असल्याचे माहीत करून घेऊन नंतर 'अशोकने पित्याच्या परवानगीवाचूनच विवाह केला असल्याची' खोटी बातमी बिन्दुसारला त्याने सांगितली.

''मला वाटतंय की, यात पुन्हा ग्रीकांचाच हात असावा. मी आजारी असल्याचं त्यांना माहीत आहे. त्यांच्या ताब्यात असलेला भारताचा भू-भाग मौर्यांनी पराक्रम व युक्ती यांच्या मदतीनं काबीज केला असल्याचं ते विसरू शकलेले दिसत नाहीय!'' बिन्दुसार म्हणाला.

**क्रमशः**





# वेताळ कथा

## कविराज व्याघ्रेश्वर

दृढनिश्चयी विक्रमराजा पुन्हा झाडाकडे गेला. झाडावरून ते कलेवर खाली अुतरवून त्याने आपल्या खांद्यावर टाकले आणि नेहमीप्रमाणे तो स्मशानाची वाट तुडवू लागला. तेंव्हा प्रेतातला वेताळ बोलू लागला, ''राजा, माझी खात्री आहे की, तुझ्यासारखा आग्रही अन् कष्टाळू माणूस या दुनियेत पहायलाही मिळणार नाही. इतके पराभव झाल्यानन्तर कोणीही आपली हार कबूल करून आपला अुद्देशच बदलून टाकील; पण तू तर अगदी हट्टाला पेटला आहेस; स्वतःला त्रास करून घेअून इतरांनाही त्रास देत आहेस? पण तुझ्यासारखा सत्यव्रती हट्टी आणि दृढनिश्चयी माणूसही कधीकधी कसला विचार न करता भावनेच्या आहारी जाअून आत्मसन्मानही घालवून बसतो; ज्यांनी-पूर्वी त्यांचा अनादर केलेला असतो, ज्यांच्या दृष्टीत त्यांना कसलीही किंमत नसते, अशा लोकांच्या हाती



स्वतःला सोपवून बसतात. असलं आत्मसमर्पण महायोद्धा आणि शूर वीरांसाठीच नव्हे, तर कवींसाठीसुद्धा योग्य नसते. तुला सावध करण्यासाठी, जागं करण्यासाठी मी कलानाथ नावाच्या कवीची गोष्ट सांगतो; ती ऐक.'' आणि वेताळ त्या कवीची गोष्ट सांगू लागला.

खूप जुनी गोष्ट. सिंहपुरीच्या राजदरबारात व्याघ्रेश्वर नावाचा कवी होता. त्याने सर्व शास्त्रांचा अभ्यास केलेला होता; अठरा पुराणांत पांडित्य प्राप्त केलं होतं, वेद-अुपनिषदांचं सार ग्रहण केलं होतं. त्यामुळे त्याची कविता अर्थपूर्ण, भावयुक्त आणि रसयुक्त असे. राजाने कविचे गुणवैशिष्ट्य लक्षात घेअून त्याला अनेक अधिकार दिले होते. कधीकधी राजा त्याला आपला प्रतिनिधी म्हणून गावाबाहेरही पाठवत असे व्याघ्रेश्वर लोकांना स्वतः भेटून लोकांच्या तक्रारी, मागण्या वगैरे समजून घेत असे. प्रवासाहून परत आल्यावर राजाला ही सारी वर्णनं सांगून लोकांच्या मागण्या पुऱ्या करवत असे.

राजाचं व्याघ्रेश्वर फार प्रेम असे व तो त्याचं सर्व बोलणं, सूचना मानत असे. त्यामुळे बरीच माणसं त्याला भेटून त्याच्याकरवी आपली कामं करून घ्यायचा प्रयत्न करत. त्यामुळे सामान्य माणसांना व्याघ्रेश्वरची भेट घेणं दुरापास्त होई. एक वेळ राजदर्शन सोपं, पण व्याघ्रेश्वरचं दर्शन कठीण वाटे.

त्याच देशच्या रामपुर गावात कलानाथ नावाचा एक तरूण होता. त्याला साहित्याची आवड होती. लहानपणापासूनच तो महान कवींच्या काव्याचा अभ्यास करत असे. ते वाचत असताना त्याला स्फूर्ती येई आणि ताबडतोब काव्य रचून तो ते लोकांना म्हणून दाखवी. एके दिवशी एक कवि त्या गावी आला. कलानाथचे अुत्स्फूर्त काव्य ऐकून त्याला कवीने आशिर्वाद देअून म्हटलं, ''बेटा, तू अुपजत कवी आहेस. चांगली साधना कर. एक दिवस विश्वविख्यात कवी बनशील.''

तेंव्हापासून कलानाथची काव्यश्रद्धा वाढतच गेली. सुरुवातीला तो अुत्स्फूर्त कविता म्हणून दाखवी, पण वीस वर्षांचा होता होता त्यानं तीन मोठी काव्यंही रचली. ज्या पंडितांनी ती वाचली, त्या सर्वांनी त्याची खूप प्रशंसा केली. काहीनी तर असंही म्हटलं की, ''तू सरस्वती-पुत्रच वाटतोयस. एकदा व्याघ्रेश्वरला का भेटायला जात नाहीस? त्याला आपलं काव्य ऐकव. जनतेला तुझा योग्य परिचय होईल. तुला मान मिळेल.''

आपली काव्यं घेअून कलानाथ व्याघ्रेश्वरला भेटायला सिंहपुरीला गेला. त्याच्या घरी पोचला, तेंव्हा राखणदार त्याला म्हणाला, ''तुझं काम काय ते सांग; मी जाअून सांगतो. पुढे तुझं भाग्य!''

कलानाथनं काही निवडक कविता निराळ्या ताडपत्रांवर लिहून त्या पहारेकऱ्याच्या हाती देत म्हटलं, ''या काव्यांवर कविवरांचा अभिप्राय हवा मला.''

ती ताडपत्रं हाती घेत पहारेकरी म्हणाला, ''बास, इतकंच? तुला आणखी काही नकोय त्यांच्याकडून? कविवरांचं मन मोठं आहे, स्वभावही फार चांगला आहे त्यांचा; अुदार आहेत. तुला हवी ती मदत करतील ते.

आणखी कसलीच मदत नको असल्याचे कलानाथने सांगितल्यावर पहारेकरी आत गेला व त्याने कलानाथबद्दल व्याघ्रेश्वरला सांगितलं. त्यावेळी खूपशी माणसं तिथे बसलेली असल्यानं ती ताडपत्रं आपल्या शिष्याच्या हवाली करत व्याघ्रेश्वर म्हणाला, ''हे वाच अन् आपला अभिप्राय लिहून दे. मी सही करीन त्यावर.''

शिष्यानं ती काव्य लक्षपूर्वक वाचली आणि म्हटलं, ''गुरुवर, ही काव्यं तर असामान्य वाटतायत! या कवीला एकदा आत बोलवावू?''

''नको बेटा, आत्ता इथं बरीच माणसं आहेत. त्या कवीनं तर केवळ अभिप्रायच



मागितला आहे. त्याला जे हवं ते देअून पाठवून दे परत.'' शिष्यानं अभिप्राय लिहिला अन् गुरुनं सही केली. पहारेकऱ्यानं ताडपत्र परत दिल्यावर कलानाथ निराश झाला. व्याघ्रेश्वरनं आपल्याला भेटायला न बोलावल्याचं त्याला वाईट वाटलं

काही काळानन्तर राजाज्ञेवरुन व्याघ्रेश्वर देशभ्रमणाला निघाला. अन् एके दिवशी रामपुरला पोचला. तो हत्तीवर बसून आला होता; बरोबर इतरही अनेक लोक होते. गावकऱ्यांनी वैभवपूर्वक त्याचं स्वागत केलं.

व्याघ्रेश्वर तिथे दोन दिवस राहिला. पहिल्याच दिवशी एकेकानं जाअून आपल्या तक्रारी त्याला सांगितल्या. गावपाटील त्याला म्हणाला, ''महाशय, जनतेच्या अडचणी आपण समक्ष पाहिल्यातच. त्या



सोडवण्यासाठी आम्हाला आर्थिक सहाय्य हवं. महाराजांना सांगून आपणच ते मिळवून द्यावं.''

''होय, महाराज माझं सांगणं मानतात. माझ्याकडून जमेल तितकं नक्की करीन मी तुमच्यासाठी. अद्या तुमचं गाव पहायची इच्छा आहे माझी. त्यासाठी जरूर तेवढी व्यवस्था करून ठेवा.'' व्याघ्रेश्वरने पाटलाला सुचवले.

दुसऱ्या दिवशी व्याघ्रेश्वर गाव पहायला निघाला. त्याला पहाण्यासाठी गावकऱ्यांनी खूप गर्दी केली. त्यांना ताब्यात ठेवणं कठीण झाले. दुपारपर्यन्त व्याघ्रेश्वर गावात फिरत राहिला तरीही काही गावकऱ्यांना त्याचे दर्शन झालेच नाही. परत येऊन भोजनानन्तर व्याघ्रेश्वर पाटलाला म्हणाला, ''गावात कवि कोणी असतील तर सांगा. त्यांना मदत करीन मी.''

''महोदय, आमच्याकडे दोन-तीन कवि आहेत. शंभरेक लोकांचा साहित्याशी परिचयही आहे. ते सर्वच आपणाला भेटायला अुत्सुक आहेत. त्यांच्यासाठी विशेष सभेची व्यवस्था करू? मोठ्या अुत्साहानं पाटलानं विचारलं.

''अशा चर्चेत जास्त लोक भाग घेअू शकणार नाहीत. तुम्ही म्हणालात की बरेच लोक मला भेटायला अुत्सुक आहेत? तेंव्हा, बरं म्हणजे एक सभाच बोलवा ना! मी त्यात एक भाषण देईन. ज्यांना-ज्यांना आपल्या अडचणी सांगायच्या असतील त्यांनी ताडपत्रावर पत्ता घालून त्या लिहून द्याव्या. मी त्यावर विचार करून जरूर ती अंमलबजावणी करीन.'' व्याघ्रेश्वर म्हणाला.

यासाठी सभेची घोषणा देण्यात आली. लोकांनी गर्दी केली. व्याघ्रेश्वरनं मोठं रोचक भाषण दिलं. टाळ्या वाजवून सर्वांनी हर्ष प्रकट केला.

सभा संपल्यावर दोन कवी आणि तीन-चार साहित्यप्रेमी व्याघ्रेश्वरला भेटले. त्यांच्या अुपयोगासाठी लवकरच गावात एक ग्रंथालय स्थापायचं आश्वासन व्याघ्रेश्वरनं दिलं.

आता पाटलाच्या लक्षात आलं की जमलेल्या लोकांत कलानाथ कुठे दिसत नाहीय. त्याला असंही कळलं की कलानाथनं व्याघ्रेश्वरला भेटायचा अजून प्रयत्नही केलेला नाही. त्याचं कलानाथ आणि त्याच्या काव्यावर भारी प्रेम होतं. या दोघांची एकदा गाठ घालून दिली, तर फार छान होईल असं त्याला वाटलं. 'ताबडतोब येअून व्याघ्रेश्वरला भेटावं' असा निरोप त्यानं कलानाथला पाठवला.

पण 'आपण फार कामात आहोत' असे सांगून कलानाथ भेटीला गेलाच नाही. काळ जात राहिला. अलिकडे व्याघ्रेश्वरला एकूणच अस्वस्थ, अतृप्त वाटायला लागलं होतं. इहलोकचं वैभव, संसारबंधनं याबद्दल त्याला विरक्ती वाटू लागली. शेवटी त्यानं आपलं दरबारातलं पदही सोडून दिलं. संपत्ती आपल्या मुलांच्यात वाटून टाकून जवळच्या अरण्यात त्यानं एक आश्रम बांधला व तो तिथं राहू लागला. त्यानं वानप्रस्थाश्रम स्वीकारला. त्याची पत्नीही त्याच्याबरोबर राहू लागली.

कलानाथला ही वार्ता कळली. आपली काव्यं घेअून तो व्याघ्रेश्वरला भेटायला गेला. त्याच्या आश्रमात पोचता पोचता त्याला अनेक अडचणींना तोंड द्यावं लागलं-शेवटी व्याघ्रेश्वरला भेटण्यात तो सफल झालाच.

आश्रमात फक्त व्याघ्रेश्वर अन् त्याची पत्नीच होते. त्यांच्या सेवेसाठी तेथे असलेला एक परिचारक आणि परिचारिका त्यावेळी जवळच्याच तळ्याकडे गेलेले होते.

कलानाथ पोचल्यावेळी व्याघ्रेश्वर पत्नीला भागवत पुराण वाचून दाखवत होता. ती डोळे मिटून तन्मयतेनं ते ऐकत होती. वाचून झाल्यावर ती म्हणाली, ''तुमच्या मुखानं पुराण ऐकून माझा जन्म सार्थक झालाय.

''माझ्याच तोंडून नव्हे, तर कुणाच्याही तोंडून ऐक. हे पुराणच अद्‌भुत आहे. ज्या दिवशी मी अशी महान् काव्य-रचना करू शकेन, त्या दिवशीच मी खऱ्या अर्थानं कवी बनेन.'' व्याघ्रेश्वर बोलला.

''तुमचं म्हणणं असत्य आहे'' असे मी





म्हणू धजणार नाही. माझी तितकी योग्यता नाही. पण मी मानू आणि जाणू इच्छितो की, आपण कोणत्याही महाकवींच्या तोडीस तोड असं काव्य रचून चुकला आहात.'' कलानाथ एकदम मधेच बोलला.

आता व्याघ्रेश्वरचं कलानाथकडे लक्ष गेलं. त्यानं कलानाथकडून त्याची माहिती जाणून घेअून त्याला स्वरचित एखाद्या काव्यातली काही पदे म्हणायला सांगितले.

कलानाथ म्हणत असताना व्याघ्रेश्वरने लक्षपूर्वक ऐकून घेतले. तो म्हणाला, ''मुला, तू खरोखरच सरस्वतीपुत्र आहेस. पण तुझ्या काव्यात काही व्याकरणदोष आहेत. ते सुधारणं मोठंसं कठीण नाहीय. पण ते सुधारले नाहीस, तर मात्र तुझं काव्य फिकं वाटेल.

''महाराज, आपण हे काव्य पूर्वीच वाचलेलं आहे. तेंव्हा आपण व्याकरण दोष दाखवून दिले नाहीत?'' कलानाथ बोलला.

हे कसं घडलं ते व्याघ्रेश्वरला कळल्यावर तो म्हणाला, ''वत्सा, त्या दिवशी काव्य माझ्या शिष्यानं वाचलं होतं, मी वाचू शकलो नव्हतो. त्यावेळी तू फक्त अभिप्रायच मागितला होतास. प्रत्यक्ष भेटायची इच्छा त्याच दिवशी दर्शवली असतीस, तर बरं झालं असतं. मी आपलं मत स्वतःच सांगितलं असतं. त्याच दिवशी तुझे व्याकरण-दोष कळून चुकले असते.''

कलानाथ हसून बोलला, ''मला आशा होती की पदं वाचल्यावर अन् माझ्याबद्दल माहिती मिळाल्यावर आपण भेटीची परवानगी नक्कीच द्याल स्वतः होअून. आज माझ्या पदांची आपण स्तुती केलीत. त्यामुळे मला आनन्द वाटलाच; पण माझे व्याकरण-दोष दाखवलेत म्हणून जास्त बरं वाटलं. पहिल्या वेळच्या आपल्या अभिप्रायापेक्षा यावेळचा अभिप्राय जास्त महत्वाचा. आता काही दिवस आपण मला आपल्या सेवेची संधी द्यावी इतकीच इच्छा आहे माझी.''

इतकी गोष्ट सांगून वेताळ म्हणाला, ''राजा, अनेक कविपंडितांकडून स्तुतिपात्र ठरलेल्या कलानाथचं वागणं विचित्र अन् असंबद्ध नाही वाटत? त्यानं आत्म-समर्पण केलं, आपला अभिमान घालवला असं नाही वाटत? व्याघ्रेश्वर त्याच्या गावी आला तेंव्हा गाव-पाटलानं त्याला घेअून कविराज व्याघ्रेश्वरला भेटायला सांगितलं होतं; पण त्यानं भेटीला नकार दिला. पण नंतर त्याच व्याघ्रेश्वरला भेटायला तो संकटं झेलत जंगलाच्या वाटेनं गेला. त्यानं असं का केलं? हे त्याच्या बुद्धि-हीनतेचं द्योतक नव्हे? इतकंच नव्हे; त्यानं व्याघ्रेश्वरची सेवा करायची इच्छाही प्रकट केली. या सर्व गोष्टी विचारात घेता, असं दिसतं की कलानाथची बुद्धी भ्रष्ट झाली होती. तो एक असंतुलित युवक आहे. माझ्या या शंकांची अुत्तरं माहीत असूनही गप्प राहिलास, तर तुझ्या मस्तकाचे तुकडे होतील.''

अुत्तरादाखल विक्रम म्हणाला, ''कलानाथ सिंहपुरीला गेला असता, त्याची आशा होती की, आपलं काव्य वाचल्यावर व्याघ्रेश्वर स्वतःच भेटायला बोलवील. पण त्यानं फक्त अभिप्रायच लिहून पाठवला. त्यामुळे व्याघ्रेश्वरची काव्याची आवडच कमी झाली असावी. अन् आता ते फक्त आपल्या व्यक्तिगत प्रसिद्धीचा अुपयोग करून इतरांना मदत करतात असं त्याला वाटलं. कवितेचं क्षेत्र सोडून कलानाथचं व्याघ्रेश्वर-कडे व्यक्तिगत कसलं कामही नव्हतं. त्याची फक्त काव्य चर्चेची अपेक्षा होती; त्याच्या भेटीशी त्याला काहीच कर्तव्य नव्हतं. ज्याक्षणी व्याघ्रेश्वरनं दरबार सोडून देअून वानप्रस्थ आश्रम स्वीकारला अन् ते जंगलात रहायला गेल्याचं समजलं, तेंव्हा आता त्यांच्या भेटीमुळं आपलं भलं होईल असं कलानाथला वाटलं. म्हणूनच अडचणींना तोंड देत तो आश्रमात पोचला बोलता-बोलता व्याघ्रेश्वरनं त्याला सांगितलं की त्याच्या कवितांवर जो अभिप्राय लिहिलेला होता, तो स्वतःचा नसून शिष्याचा होता. आता स्वतः त्याचं काव्य ऐकून आपला अभिप्राय व्यक्त केला की, काव्यात व्याकरण-दोष असून ते सुधारणं अत्यन्त आवश्यक आहे. यावरून कलानाथनं ओळखलं की व्याघ्रेश्वर अुच्च कोटीचे महान् कवि आहेत. आता त्याला खरा कवि दिसला! त्यामुळेच कलानाथने त्याची सेवा करायची संधी मागितली. या कारणांच्या आधारे स्पष्टच दिसतं की, कलानाथनं आपला मान, अभिमान घालवलेलाही नाही अन् त्याचं डोकंही फिरलेलं नाहीय. तुझा संशय निराधार आहे.''

आता राजाचं मौन भंग करण्यात सफल झालेला वेताळ प्रेतासह गायब होअून पुन्हा झाडावर जाअून बसला.



# सोमसेनचे चित्र

हेलापुरी गावात दरवर्षी चित्रकलेचे प्रदर्शन भरवले जाई. त्यात प्रसिद्ध चित्रकारांच्या चित्रांबरोबरच अप्रसिद्ध व या क्षेत्रात नुकतेच पदार्पण करणाऱ्या चित्रकारांची चित्रेही प्रदर्शनार्थ मांडली जात.

दरवर्षीप्रमाणे या वर्षीही हे प्रदर्शन चालू होते. देशाच्या कानाकोपऱ्यातून आलेल्या प्रसिद्ध चित्रकारांची चित्रे दाखवली जात होती. नवनव्या चित्रकारांची चित्रेही प्रदर्शित होत होती. चित्रे पहायला रसिक लोक मोठ्या संख्येने गर्दी करत होते.

सुगंधीपुरहून सोमसेन नामक चित्रकारही आपली चित्रे घेऊन आला होता. त्याची चित्रेही प्रदर्शनात मांडलेली होती.

सोमसेन ज्या धर्मशाळेत अुतरला होता, तेथेच शिवगिरी व विलासही अुतरले होते. बोलता-बोलता सोमसेनबद्दल कळल्यावर विलास म्हणाला, ''आज मी गेलो होतो प्रदर्शनात. तिथं तुमच्या चित्रासमोर चांगला तासभर अुभा होतो.''

खूप आनन्दाने सोमसेनने विचारले, ''माझं चित्रं इतकं आवडलं तुम्हाला! आभारी आहे मी तुमचा.''

''का कुणास ठाअूक, इतर चित्रांसमोर खूपच गर्दी होती. त्यामुळं तुमच्या चित्रासमोर मला एकटंच चांगलं तासभर अुभं रहावं लागलं.'' विलास म्हणाला.

त्याचे बोलणे ऐकून सोमसेनचा चेहरा पांढरा पडला!





# ओरिसाच्या किनाऱ्यावरून

शब्दांकन : मीरा नायर ▼ चित्रकार : के.एस. गोपकुमार




किनाऱ्यापासून काही कि.मी. आत गेल्यावर आपण बोमकाई येथे पोचतो. हा छोटासा गाव साड्यांसाठी प्रसिद्ध आहे. कपडे विणणे हा ओरिसाचा परंपरागत हस्तव्यवसाय आहे. आणि कुटिरोद्योग म्हणून संपूर्ण ओरिसात लाखो कुटुंबांच्या अुदरंभरणाचे साधन आहे. एकादी बोमकाई साडी खरीदलीत, तर खात्री बाळगा, की तुम्ही एक अद्वितीय वस्तु मिळवलीय; कारण कोणत्याही दोन बोमकाई साड्या हुबेहूब एकमेकींसारख्या नसतात.

तटापासून जरा अुत्तरेकडे गेलात की लागते चिल्का सरोवर. चिल्काचे शुद्ध रूप 'चिलिका' असून अुरिया लोक तसाच अुच्चार करतात. चहूबाजूंनी घेरलेल्या सरोवरात 'चिल्का' च भारतातील सर्वात मोठे सरोवर आहे. ते फक्त एका अरुंदशा वाटेने बंगालच्या अुपसागराला जोडलेले आहे. याचे क्षेत्रफळ १.१०० वर्ग कि.मी. असून अुन्हाळ्यात त्याचे पाणी खारट असते. परन्तु पावसाळ्यात दया व भार्गवी नद्यांच्या पाण्याच्या लोंढ्याने सारे खारट पाणी बाहेर लोटून दिले जाअून सरोवराचे पाणी गोडे बनते; सरोवर गोड्या पाण्याने काठोकाठ भरून जाअून ते भारतातील सर्वात मोठे 'गोड्या पाण्याचे सरोवर' बनते.

सरोवरातच काही हिरवीगार बेटे आहेत. त्यातील एका बेटावर सरोवराची अधिष्ठात्री देवी कालीजाई हिचे देअूळ आहे. या बेटांवर तऱ्हेतऱ्हेचे अनेक जलचर प्राणी आढळतात. थंडीच्या दिवसात येथे बदक, सारस, पेलिकन व मातकट रंगाच्या बगळ्यांचे थवेच्या थवे दृष्टीस पडतात.



चिल्काचे चिलिका सरोवर

चिल्का सरोवरात फिरणाऱ्या मच्छीमार नावांची शिडे चटईनि बनवलेली व चौकोनी आकाराची असतात.

आपला पुढला मुक्काम म्हणजे पुरी किंवा जगन्नाथपुरी. जुन्या काळी परदेशी लोक याला पलौरा म्हणत असत. व याचे परदेशाशी घनिष्ट व्यापारिक संबंध होता - विशेषतः इंडोनेशियाशी.

पुरीचा समुद्री व्यापार तर आता बन्दच झाला आहे. पण अजूनही तिथली आरोग्यदायक हवा खाण्यासाठी बंगाल, आन्ध्र व मध्य प्रदेशातून लोक येत असतात. ओरिसाचे राज्यपाल अुन्हाळ्यात पुरीलाच रहातात.

परन्तु पुरीचे सर्वात जास्त महत्व म्हणजे ते हिन्दूंच्या चार मोठ्या धामांपैकी एक गणले जाते. (बाकीची तीन म्हणजे - रामेश्वर, द्वारका व बद्रीनाथ) येथील जगन्नाथ मन्दिर सर्वात पवित्र व खूप विशाल अशा हिन्दू मंदिरांपैकी एक होय. १२व्या शतकात राजा चोडगंग याने दक्षिण ओरिसाहून आपली राजधानी हलवून पुरीला स्थापन केली. आणि त्या घटनेची स्मृती म्हणून या मंदिराची निर्मिती केली. येथे भगवान जगन्नाथाची पूजा श्रीकृष्णाच्या रूपात, त्याचा मोठा भाअू बलभद्र (बलराम) व धाकटी बहीण सुभद्रा हिच्यासह केली जाते.

तीनही मूर्ती लाकडाच्या बनवल्या जातात व रूप अर्धवट् घडवल्यासारखे ठेवलेले असते.

अशी कथा आहे की, पुरीत भगवान विष्णूंची एक नीलमण्याची मूर्ती होती. राजा इन्द्रद्युम्नाला तिचा मोह निर्माण झाला. त्याने ती हस्तगत करायचा प्रयत्न केला. परन्तु तो जेंव्हा ती घ्यायला गेला, तेंव्हा मूर्ती अदृश्य झाली. आपल्या अनीतिकारक वागणुकीची राजाला लाज वाटली व प्रायश्चित्त म्हणून त्याने अुग्र तपश्चर्या आरंभली.

तेंव्हा आकाशवाणी झाली की, ''हे राजा, भगवन्ताचा प्रसाद तुला समुद्रात एका ओंडक्याच्या रूपात मिळेल.'' थोड्याच काळात एक ओंडका समुद्रकिनाऱ्यावर तरंगत असलेला सापडला राजाने त्या लाकडी ओंडक्यातून मूर्ती घडवायचे ठरवले. परन्तु राजाचे सुतार जेंव्हा ते लाकूड तासू लागले, तेंव्हा त्यांची औजारेच मोडू लागली व हातांना जखमा होअू लागल्या. कोणीच मूर्ती घडवू शकले नाही.

नंतर एके दिवशी खुद्द जगन्नाथच एका म्हाताऱ्या सुताराच्या वेषात राजासमोर प्रकट झाले आणि म्हणाले की, 'मी एकवीस दिवसात मूर्ती घडवून देईन.' परन्तु अट अशी होती की, 'मूर्ती तयार होण्यापूर्वी कोणीही ती पहायचा प्रयत्न करू नये.' राजा एकवीस दिवस पूर्ण होण्यापूर्वीच मूर्ती पहायला अत्यन्त अुत्सुक झाला व त्याने खोलीत डोकावून पाहिले. तिथे त्याला फक्त त्या अर्धवट घडलेल्या मूर्ती आढळल्या. म्हाताऱ्या सुताराचा कुठे पत्ताच नव्हता! यानन्तरही तो कधीच कुणाला दिसला नाही.

श्रीकृष्ण, बलभद्र व सुभद्रेच्या मूर्ती दर बारा वर्षांनी बदलल्या जातात.

नव्या मूर्ती काही खास भक्तांना स्वप्नात दिसलेल्या कडुनिंबाच्या झाडातूनच बनवल्या जातात. एक गुप्त वस्तु (अनेक विद्वानांच्या मते, गौतम-बुद्धाचा दात) जुन्या मूर्तीतून काढून नव्या मूर्तीत ठेवली जाते. हे काम पुजाऱ्याच्या डोळ्यांवर पट्टी बांधून. इतकेच नव्हे तर त्या वस्तूला सरळ स्पर्श न व्हावा स्पर्शानि वस्तु कळू नये म्हणून हातावर कपड्याची अनेक आवरणे चढवून नंतरच केले जाते. ही क्रिया 'नव कलेवर' नावाच्या अुत्सवात रथयात्रेच्या थोड्याच अगोदर केली जाते.

रथयात्रा दरवर्षी जुलै महिन्यात निघते. भगवान श्रीकृष्णाच्या गोकुळातून मथुरेकडे जाण्याच्या स्मृतिप्रीत्यर्थ ही यात्रा काढण्यात येते. यासाठी श्रीकृष्ण,, बलभद्र व सुभद्रेच्या मूर्ती तीन विशाल अशा रथांवर बसवून गुंडीचाबाडीला नेल्या जातात. हे भगवान जगन्नाथाचे अुद्यानगृह होय. सर्वांत जास्त अुंच रथ जगन्नाथ म्हणजे श्रीकृष्णाचा असून त्याला १६ चाके असतात. रथाची अुंची १४ मीटर व रुंदी ११ मीटर असते.

तसे गुंडीचाबाडी हे स्थान जगन्नाथमंदिरापासून केवळ एक मैलच दूर आहे. पण रथ तिथे पोचायला संपूर्ण दिवस दिवस लागतो. देशाच्या कानाकोपऱ्यातून लाखो भक्त रथयात्रेत भाग घेण्यासाठी येतात व रथ ओढण्यास मदत करतात. त्यांच्यातल्या अनेकांची अशी इच्छा असते की जगन्नाथाच्या प्रसादाला स्पर्श करावा. कारण अशी धारणा आहे की तसे केल्याने माणसाची जन्ममरणाच्या फेऱ्यातून कायमची मुक्ती होते.

आठ दिवस अुद्यान गृहात वस्ती केल्यानन्तर नवव्या दिवशी मूर्ती गाजावाजानेच जगन्नाथमंदिरात परत येतात.

रथयात्रा



याला 'बाहुडा यात्रा' (परतीची यात्रा) असे म्हणतात.

ओडिसी नृत्य ही ओरिसाची विशिष्ट नृत्यशैली आहे. त्याचा विकास मंदिराच्या पूजा अनुष्ठानांमधून झाला आहे. नर्तकी अशा प्रकारे साडी नेसते की ती कमरेपासून पायापर्यन्त पंख्यासारखी पसरते. शरीरावर चांदीचे चमकदार दागिने आणि वेणीत कागदाची फुले धारण करते. अशा प्रकारे सुंदर वेषभूषेत ती जेंव्हा देवमूर्तीसमोर नृत्यांजली अर्पित करते, तेंव्हा ते नृत्य पहातच रहावेसे वाटते. ओडिसी नृत्याबरोबर बहुधा संस्कृत कवि जयदेव यांच्या अमर काव्य 'गीतगोविन्द' मधील अष्टपदी गायल्या जातात. पुरीच्या समुद्रतटावरील एका नवीन मंदिरात आदि शंकराचार्य व चैतन्य महाप्रभु यांच्याबरोबर जयदेवचीही मूर्ती पहायला मिळते. आद्य शंकराचार्यांनी स्थापलेल्या चार प्रमुख मठांपैकी एक मठ पुरीला आहे. अिथल्या मठाला 'गोवर्धनपीठ' असे म्हणतात.

पुरीहून १६ कि.मी. दूर छोटेसे रघुराजपुर आहे. येथील चित्रकार सुंदर 'भित्तिचित्रे' बनवतात.

दहा कि.मी. आणखी पुढे गेल्यावर 'साक्षीगोपाळ' चे देवालय आहे. येथील बाल श्रीकृष्णाची मूर्ती पूर्णाकृती आहे. गोष्ट अशी आहे की, एकदा दोन ब्राह्मणात भांडण झाले व श्रीकृष्णाने स्वत: बालकरूपात येअून साक्ष दिली.

**ओडिसी नृत्याची एक मुद्रा**







# सर्प-मन्त्र

**ती**मर गावात परबत नावाचा एक लहानसा शेतकरी होता. तो आपल्या लहानशा शेताची मशागत करून अुदारनिर्वाह चालवी. सर्पदंशाचा मन्त्र शिकायची त्याची बऱ्याच वर्षांपासूनची इच्छा होती. पण तो शिकवणाराच कोणी सापडत नव्हता.

एकदा तो आपल्या एका नातेवाइकाला भेटायला शेजारच्या गावी गेला. परबत त्याला म्हणाला, ''सर्प-मन्त्र शिकायची माझी फार दिवसांची इच्छा आहे. तुमच्या गावात कोणी जाणकार आहे का?''

''माझ्या गावात काय, पण आसपास कोणत्याही गावात सर्प-मन्त्र जाणणारा कोणीही नसावा. सामान्यत: बैरागी आणि संन्याशांनाच ही विद्या येते, ती दिव्य शक्ती त्यांच्या जवळच असते. तू अशा एकाद्याची मदत मिळवू शकलास तर तुला सर्प-दंशाचा मन्त्र शिकायला मिळेल.'' तो नातेवाईक म्हणाला.

त्या दिवसापासून परबत साधू संन्याशांच्या शोधाला लागला. मन्त्र शिकायला आता तो फारच आतुर झाला होता.

या वर्षी परबतने आपल्या शेतात ज्वारीचे पीक घेतले होते. पीक छान आले होते. कणसांनी भरलेले शेत फारच छान दिसत होते. पक्ष्यांपासून ज्वारी वाचवण्यासाठी त्यानं शेतात मचाण अुभे केले होते. रात्रं-दिवस राखणीसाठी तो शेतावर रहात होता.

एके दिवशी संध्याकाळी बैराग्यांचा एक जथा शेताजवळून जात असलेला त्याला दिसला. आपल्या इच्छा-पूर्तीची वेळ जवळ आली असावी, असेच त्याला वाटले. मचाणावरून अुतरून धावतच तो बैराग्यांना भेटायला गेला. त्याने त्यातल्या एका काळ्या, लांब दाढीवाल्या धष्टपुष्ट बैराग्याला

दामोदर खरे



प्रणाम करून त्याच्याजवळ आपली इच्छा प्रदर्शित केली. मन्त्र शिकवण्यासाठी त्याला विनंती केली.

परबतकडे लक्षपूर्वक पाहून बैरागी म्हणाला, ''सर्पमन्त्र सूर्योदय किंवा सूर्यास्ताच्या वेळी शिकला तरच त्याचं फळ मिळतं. आता अन्धार होऊ लागला आहे. ही वेळ योग्य नव्हे. या रात्री आम्हाला शेतात राहू दिलंस, तर उद्या सकाळी मन्त्र शिकवीन तुला.''

परबतने मोठ्या आनन्दाने परवानगी दिली. त्यानं सगळ्या बैराग्यांना तिथे रहायची विनन्ती केली. ते सर्वजण भक्तिगीते गात अन् कणसे तोडून खात राहिले. सारे शेत त्यांनी विस्करून टाकले आणि पोट भरल्यावर आरामात झोपून गेले.

आपल्या पिकाची नासाडी होताना पाहून सुद्धा परबतला दुःख वाटलं नाही. सकाळी सर्प-मन्त्र शिकायला मिळणार असल्याचा त्याला आनन्द झाला होता. त्या आनन्दात तो रात्रभर जागाच राहिला.

सकाळ झाल्याबरोबर बैरागी जागे होऊन निघायच्या तयारीला लागले.

परबत भराभरा त्या धष्टपुष्ट बैराग्या-जवळ जाऊन त्याच्या पायांवर आडवा पडून ओरडू लागला, ''स्वामी, सर्प-मन्त्र? सर्प-मन्त्र?''

बैरागी त्याला रागावून म्हणाला, ''जोगी आया, ज्वार खाया, अुठो जाव.'' त्याने परबतच्या खांद्यावर जोराने लाथ मारली; आणि तो चालू लागला. परबतला वाटले की हाच सर्प-मन्त्र. त्याच्या आनन्दाला पारावार राहिला नाही. त्याची इच्छा पुरी झाल्यामुळे जगच हातात आल्यासारखे त्याला वाटले. बैराग्याचे बोलणे जपत तो घरी गेला. आपण बैराग्याकडून सर्पमन्त्र शिकल्याचे त्याने बायकोला सांगितले. तिने ती बातमी गावभर पसरवली.

या घटनेनन्तर एका महिन्याने एका गावकऱ्याला साप डसला. त्याचे नातेवाईक घाबरून गेले होते. काय करावे, हे कळत नव्हते त्यांना! अचानक एकाला परबतची आठवण झाली. तो ताबडतोब म्हणाला, ''अरे घाबरता काय? आपल्या परबतला सर्प-मन्त्र येतो. ही विद्या त्याला एका महान साधूनं दिलीय. साधूंनी दिलेला वर कधी व्यर्थ होत नाही. माझी खात्री आहे की परबतच्या मन्त्रानं हा वाचेल. चला याला नेऊया त्याच्याकडे.''

ते त्याला परबतकडे घेऊन गेले. परबतने मनातल्या मनात मन्त्र म्हटला आणि त्याच्या खांद्यावर लाथ मारली. त्याबरोबर सर्पदंश झालेला गावकरी अुठून बसला! आता लोकांचा पूर्ण विश्वास बसला की बैराग्याचा मन्त्र खरंच प्रभावशाली आहे. परबतने प्रथमच मन्त्राचा अुपयोग केला होता. त्याला भीती पडली होती की मन्त्राचा प्रभाव पडेल की नाही? आता ती भीती दूर झाली. त्याचाही मन्त्राच्या प्रभावावर विश्वास बसला.

तेंव्हापासून आसपास कोणालाही साप चावला की, लोक त्याला परबतकडे आणत अन् मन्त्र जपल्याबरोबर माणूस अुठून बसे. त्यामुळे परबतची ख्याती त्या पंचक्रोशीत पसरली. लोक त्याला काही धनही देऊ लागले. यामुळे परबतची आर्थिक स्थितीही सुधारली. खरे तर मन्त्र शिकून पैसा कमवायचा त्याचा विचार नव्हता; केवळ तो शिकायची तीव्र इच्छा मात्र होती. पण लोक जेंव्हा त्याच्या अुपकाराच्या बदल्यात धन देऊ लागले, तेंव्हा ते त्याने सहर्ष स्वीकारले.

त्याने आपल्या शेताजवळच चार-पाच एकर जमीन खरीदली. झोपडीच्या जागी त्याने एक छानसे घरही बांधले. मुलीचे लग्न श्रीमन्त कुटुम्बातील तरुणाशी करून दिले. पण अशा सफलतेनंतरही त्याला गर्व मात्र झाला नाही. अजूनही आपली जमीन स्वतः कसून तो निष्काळजी जीवन जगत होता.

परबतचा एक मोती नावाचा मित्र होता. बरेच दिवस तो धन कमवण्यासाठी इकडे-तिकडे भटकत राहिला होता. एके दिवशी मित्राला भेटायला तो परबतकडे आला. त्याची प्रगती पाहून मोतीला फार आनन्द वाटला. दोन-तीन आठवडे दोघे मित्र आपल्या बालपणच्या आठवणीत बुडून राहिले. परत निघण्यापूर्वी मोतीने परबतला



विचारले, "तू परोपकार करून धन कमावतोस हा मोठा प्रशंसनीय विषय आहे. पण अजून तू, त्या बैराग्यानं तुला कोणता मन्त्र दिला, ते नाही सांगितलंस?"

मोठ्याने हसत परबतने म्हटले, "जोगी आया, ज्वार खाया, अुठोजाव! बास, हाच तो बैराग्यानं शिकवलेला मंत्र!"

यावर मोती खो खो हसून बोलला, "हा मन्त्र? अरे, फसवलं तुला बैराग्यानं. तुझ्या ज्वारीच्या पिकाचा सर्वनाश केला त्यानं, अन् तू नुसताच पहात राहिलास? म्हणूनच त्यानं ओळखलं की तू येडचाप आहेस! माझी खात्री आहे की, बैराग्याला काही मन्त्र-बिन्त्र येत नव्हता. मन्त्र शिकण्या-साठी तू त्याचे पाय धरलेस, तेंव्हा राग आला असावा त्याला. त्यानं म्हटलं सुद्धा की, तुझी कणसं खाल्ली; अुठ आता अन् त्यानं शिवी दिली. 'अुठोजाव' चा हाच अर्थ आहे!"

बालपणचा मित्र खोटे बोलणार नाही, याबद्दल परबतला खात्री होती. मित्र खरेच सांगत आहे अशी आता त्याची खात्री पटली. आपण म्हणत असलेला मन्त्र, खरा सर्पमन्त्र नव्हे - याचे त्याला वाईट वाटले. मंत्र तर पूर्णत: खोटा आहे.

या घटनेनन्तर एका आठवड्याने सर्पदंश झालेला एक माणूस त्याच्याकडे आणला गेला. परबत आता विचारात पडला. मन्त्राचा प्रयोग करावा की नाही, याबद्दल त्याचा निर्णय होईना. तरीही मन्त्र जपून त्याने त्या माणसाच्या खांद्यावर लाथ मारली. पण त्या माणसाची जराही हालचाल झाली नाही. मित्राचे म्हणणे खरे असल्याबद्दल आता परबतची खात्री पटली. मन्त्रावरचा त्याचा विश्वास अुडाला.

ताबडतोब त्याने जमलेल्या लोकांना म्हटले, "माझ्या हातून एक पाप घडलं, त्यामुळे माझा मन्त्र विफल झालाय. शक्ती नाहीशी झालीय. या माणसाला ताबडतोब शहरात न्या अन् चांगल्या वैद्याला दाखवा."

लोकांना आता 'परबतची मन्त्रशक्ती नाहीशी झाल्याचे' समजले. प्रामाणिक परबतने यानन्तर कधीही मन्त्राचा अुपयोग केला नाही. आतापर्यन्त मिळवलेल्या धनावर संतुष्ट राहून आपले पुढील आयुष्य तो मजेने जगला.





सोनेरी
क्षण - १६

चांदोबा

**१. पाया नसलेला स्तंभ?**

मंचावर अुभा असणारा हा स्तंभ मंचाशी कोठेही जोडलेला नाहीय. नअुशे वर्षांपूर्वी होय्सल राजा विष्णुवर्धनने याची निर्मिती केली. याला 'गुरुत्वाकर्षण स्तंभ' असेही म्हणतात.



## जगात हे कोठे आढळेल?



**२. जगातील सर्वात अुंचावरचा रेल्वेमार्ग?**

समुद्रसपाटीपासून एण्डिस पर्वतात ४८१६ मीटर अुंचीवर असणाऱ्या या रेल्वेमार्गावर प्रवास करताना कमी दाबाच्या हवेमुळे काही प्रवाशांना ऑक्सिजन देण्याची गरज पडते. गरजेच्या वेळी प्रवाशांच्या सोयीसाठी आगगाडीत नर्सेसही अुपलब्ध असतात.



**३. भूगर्भात असणारे खनिज मिठाने निर्मित नगर?**

जमिनीखाली तीनशे मीटर खोल असणारे हे नगर पूर्णत: मिठाने बनवलेले असून ते खनिज मिठाच्या खाणीतच आहे. हे विलक्षण नगर खाणमजूरांनी खूप मेहनतीने मीठ कोरून बनवले असून त्यात एक चर्च, रेल्वस्टेशन आणि बॉलरूमही आहे.

प्राण्यांविषयी कोडे

## मी कोण?



१. मी एक बुटक्या पायांचा पक्षी आहे. मी हवेत अुडू शकत नाही, पण पाण्यात सफाइने पोहू शकतो.
२. माणसांशी माझे अनेक प्रकारे साम्य आहे.
३. भूमीवर अस्तित्वात आलेल्या प्राण्यांमधे मी आकाराने सर्वात मोठा आहे.
४. मी एक न अुडू शकणारा पक्षी असून माझ्या प्रान्तातल्या लोकांना बहुधा माझ्या नावाने ओळखले जाते.



५. पक्ष्यांत मी सर्वात मोठा पक्षी आहे.
६. माझ्या पाठीवर कुबड असून, मला 'वाळवंटातील जहाज' असेही म्हणतात.
७. मला 'आस्ट्रेलियातला जंगली कुत्रा' असे म्हणतात.

गोष्टीचे कोडे

## चूक घडली

गौरवला असे कळले की कॉलेजच्या वसतीगृहातील एका खोलीतल्या विद्यार्थ्या जवळ मोठी रक्कम आहे. ताबडतोब आपल्या घरासमोरील सायकल-दुकानातून एक सायकल भाड्याने घेअून तो खूप वेगाने वसतीगृहात पोचला. सायकल खाली ठेवून जिना चढून तो खोलीजवळ पोचला दरवाजाचे कुलूप तोडायला त्याला विशेष कष्ट पडले नाहीत. रक्कम घेअून जिन्यातून तो खाली आला आणि सायकलवरून थोड्याच वेळात तो मुख्य सडकेवर पोचला. आपल्या सफलतेमुळे मजेने शीळ घालत तो अुत्साहाने चालला होता. अचानक आपल्या हातून मोठीच चूक घडल्याचे त्याच्या लक्षात आले. ताबडतोब तो परत वसतीगृहाकडे वळला. पण त्याला अुशीरच झाला होता. फूटबॉल खेळून परत आलेल्या मुलांच्या चोरीप्रकरण ध्यानात आले होते. ते पाहिल्याबरोबर तो तेथून पळाला. पण आता तो घरीही जाअू शकत नव्हता; कारण पोलीस तेथे आपली वाट पहात असणार हे त्याने ओळखले होते.

तो पकडला जाईल अशी कोणती खूण त्याने मागे ठेवली होती? सांगू शकाल?





गंमतीचे प्रश्न

## सावधान !

१. मधमाशी अुडू शकत नाही आणि अुड्याही मारु शकत नाही. असे का?
२. ऑस्ट्रेलियातील आदिवासी 'बूमरँग' असे फेकू शकतात, की, ते परत फिरून त्याच्या हाती येते. टेनिसच्या साध्या चेंडूनेही असे करता येते. कसे?



३. या चित्रात एक चूक आहे. कोणती?



४. माझ्या मित्राने कागद-पेन्सिल हाती घेतली व मला म्हणाला की, 'मी आपल्या डाव्या कानाने लिहू शकतो.' 'करून दाखव' असे आव्हान दिल्यावर त्याने करूनही दाखवले. कसे?
५. एक हत्ती तुमच्या हातरुमालावर बसला, तर तुम्ही काय कराल?



६. वासरू एक वर्षाचे झाल्यावर काय बनते?
७. प्रत्येक जण एकाच वेळी हे काम करत असतो. कोणते?

हस्त व्यवसाय

## काडेपेटीचा ठिपकेवाला छोटा कुत्रा

**साहित्य :**

दोन रिकाम्या काडेपेट्या, आइस्क्रीमच्या तीन लाकडी पट्ट्या, काडेपेट्या गुंडाळण्यासाठी पांढरा कागद एक चाकू, काळे फेल्टपेन आणि डिंक.

**कृति :**

१. काडे पेट्या कागदाने मढवा. आइस्क्रीम पट्ट्या काळ्या रंगवा.
२. आइस्क्रीमची एक पट्टी एका काडेपेटीच्या वरच्या व दुसरीच्या खालच्या बाजूने खोचा.
३. दुसरी आइस्क्रीम पट्टी मोडून दोन तुकडे करा. ते असे खोचा की एक शेपूट म्हणून बाहेर राहील अन् दुसरा पाय म्हणून पुढे येईल. तिसरी पट्टीही मोडून दोन तुकडे करा व ते लोंबत्या कानांसारखे दिसतील असे चिकटवा.
४. डोळे, हसरे तोंड व शरीरावरील ठिपके फेल्टपेनने चितारा.



## इंग्रजी पाच आकडयाच्या मदतीने चित्र काढूया



५ हा अंक नाराज पक्ष्याच्या रूपात आपण कसा बदलू शकतो.



इथे पहा.

आणि अंक 6



एका रडणाऱ्या मुलाच्या रूपात

### सोनेरी क्षण - १५ ची अुत्तरे

**जगात कुठे?**

१. ग्वाटेमाला, द. अमेरिका २. जतींगा, आसाम
३. तुर्कस्तानचे इस्तंबुल

**चित्रकोडे**

१.आक्टोपस २. शार्क ३.स्टार मासा ४. डॉल्फिन ५. समुद्री कासव ६. ली मासा

**चित्रकोडे**

खिडकीच्या काचा बाहेरून फोडल्या तर तुकडे आत पडायला हवेत. पण ते तर बाहेरच्या बागेत पडलेत म्हणजे काचा आतूनच फोडल्या असणार. चोरी झाल्यावेळी राखणदार तिथे हजर होता. त्यामुळे तोच चोर आहे हे सिद्ध होते.

**गंमतीदार प्रश्न**

१. 'अ' कपात साखरेचा एक क्यूब 'आ' कपात दोन आणि 'इ' मधे तीन क्यूब टाका. नंतर 'इ' कप 'आ' कपात ठेवा. आता प्रत्येक कपात क्यूब विषम संख्येनेच आहेत.

२. तुमची आई. ३. कोळसा. ४. पिंजऱ्यात एक माकड सोडले की त्याला 'रिकामा' म्हणता येणार नाही. ५. कारण ते चालू शकत नाहीत. ६. बंद पडलेले घड्याळ.





# महाभारत

**पां**डव आपला अज्ञातवास द्रौपदीसह रहस्यपूर्वक घालवत होते. द्यूतात धर्मराज नेहमी जिंके आणि मिळणारे धन आपल्या भावांना वाटून देई. भीम आपण बनवलेले रुचकर पदार्थ भावांना खायला देई. अंत:पुरात मिळणारे जुने कपडे अर्जुन द्रौपदीला व आपल्या भावांना देई. अश्व-परिचर्येवर खूश होअून राजा जी बक्षिसे नकुलला देई, ती तो आपल्या भावांमधे वाटून देई. सहदेव भावांना दूध-दही इ. पुरवी. द्रौपदीही आपलं रहस्य लपवून मोठ्या सावधगिरीने वागत असे. जरासे गैरसावध राहिले, तर दुर्योधनाला आपला पत्ता लागेल, या गोष्टीचे भय त्यांना सदैव असे.

असे चार महिने निघून गेले. नंतर मत्स्य देशात ब्रह्मोत्सव साजरा झाला. या अुत्सवात भाग घेण्यासाठी अनेक देशांतून कित्येक लोक तेथे आले. विराटराजा मल्लयुद्धाचा चांगला जाणकार होता. त्यामुळे त्याने मल्लांच्या रहाण्याची व अन्य गरजांची अुत्तम व्यवस्था केली. आणि त्यांच्या कुस्त्यांची खूप मजा लुटली.

आलेल्या मल्लयोध्यांमधे जीमूत नावाचा मोठा बलशाली मल्ल होता. सर्व मल्लांना त्याने स्वत:शी युद्ध करायला ललकारले. पण त्याच्याशी भिडायला कोणीही तयार होईना - सर्वचजण त्याला भीत होते. त्यामुळे विराटराजाने आपला बल्लव भीम याला त्याच्याशी लढायची आज्ञा दिली. भीमही त्याच्याशी झुंजायला तयार झाला.

भीम आणि जीमूत दोन मस्त हत्तींसारखे मल्लयुद्ध करू लागले. त्यांची अति भयंकर झुंज पाहून प्रेक्षक फार खूश झाले. भीमाने जीमूतला अुचलले आणि त्याला तो खूप वेगाने गरगरा फिरवू लागला. ते पाहून बाकी साऱ्या मल्लांना मोठेच आश्चर्य वाटले. भीमाने



जीमूतला अशा प्रकारे थोडा वेळ फिरवून शेवटी जोराने जमिनीवर आपटले. तो तिथल्या तिथेच मरून पडला! विराटराजाने भीमाला अगणित बक्षिसे दिली.

अर्जुन अंत:पुरातल्या स्त्रियांना गायला, नाचायला लावून विराटराजाला खूश ठेवी. नकुल नाठाळ घोड्यांना ताळ्यावर आणून राजाकडून खूप पुरस्कार मिळवी. त्याचप्रमाणे मदमस्त वळूंना सहदेव पाळीव प्राणी बनवत असे. फलस्वरूप त्यांना अनेक भेटी मिळाल्या. आपल्या पतींची ही कामं आणि त्यांचे कष्ट पाहून द्रौपदीला फार वाईट वाटे.

असे करता करता पांडवांचा अज्ञात वासाचा काळ संपत आला. अशातच एके दिवशी सिंहबल नावाच्या कीचकाने द्रौपदीला पाहिले. हा कीचक विराटराजाचा मेहुणा व राज्याचा सेनापती होता. त्याने महाराणी सुदेष्णाकडे द्रौपदीला पाहिले तेंव्हा तो तिला पहातच राहिला! तिच्या सौन्दर्याने तो जणू आंधळा बनला. त्याचा स्वत:वर ताबा राहीना. आपली बहीण सुदेष्णा हिला तो म्हणाला, "मी हिला पूर्वी कधी पाहिली नाही? हिच्या सौन्दर्यानं मला मोहित केलंय. कोण आहे ही? ही माझ्याकडे आली, तर पूजा बांधीन मी तिची; सुखी ठेवीन तिला!" इतके बोलून तो तेथून निघून गेला. परन्तु द्रौपदीला भेटायचे प्रयत्न त्याने चालू ठेवले. एके दिवशी एकान्तात तो तिला भेटला अन् त्याने आपली इच्छा व्यक्त केली.

द्रौपदी त्याला म्हणाली, "माझ्याशी असं बोलणं बरं नव्हे! मी कोणाची तरी पत्नी आहे. तुझी ही इच्छा तुलाच हानिकारक ठरेल."

"माझा असा अव्हेर करू नकोस. तुलाच नंतर पश्चात्ताप होईल. हे राज्य अन् राजाचा मीच एकटा आधार आहे. साधन-संपत्ती, भोग-भाग्य, रूप-यौवन यात माझ्यापेक्षा अधिक कोणीही नाही इथे. मला आपलासा कर, दास बनव आणि आनन्द लूट. उगीच कशाला कुणाच्या सेवेत राहून आपल्या जीवनावर अन्याय करते आहेस?" कीचक बोलला.

द्रौपदी चिडून म्हणाली, "माझ्या मोहातून स्वत:ला सोडवलं नाहीस, तर नक्की समजून रहा की, तुझ्या डोक्यावर मृत्यूच घिरट्या घालतो आहे. माझे पाच गंधर्व पती माझं नेहमीच रक्षण करत असतात. त्यांचं माझ्यावर लक्ष केन्द्रित झालेलं असतं. त्यांना





जेंव्हा ही गोष्ट कळेल, तेंव्हा तुला कोणीही वाचवू शकणार नाही. त्यांच्या हातून तुझं मरण अटळ आहे.''

द्रौपदीच्या या चेतावणीला कीचक जराही भ्यायला नाही. तो निराश झाला नाही. त्याचा मोह दिवसेन् दिवस वाढतच चालला. सुदेष्णेकडे जाऊन तो म्हणाला, ''कोणत्याही परिस्थितीत, कोणत्याही किंमतीवर सैरन्ध्री माझी व्हायलाच हवी. नाहीतर मी जिवन्त रहणार नाही. मी तिला अनेक प्रकारे समजावले, गयावया केली, प्रार्थना केली; पण तिचं मन माझ्याकडे झुकतच नाहीय. भावाला सावधगिरीचा इशारा देत सुदेष्णा म्हणाली, ''सैरन्ध्री माझ्या आश्रयात आहे; मी तिच्या रक्षणाचा वायदा केला आहे. अगोदरच 'आपले पाच गंधर्व पती असल्याचं' तिनं मला सांगितलं आहे. तू माझा सख्खा भाऊ आहेस, म्हणूनच हे रहस्य मी तुला सांगतेय. सैरंध्रीवर आपलं मन लुटून आपला जीव संकटात लोटू नकोस.''

''हजार गंधर्व आले, तरी माझं काहीही वाकडं करू शकणार नाहीत. पतिव्रता स्त्रियाही माझ्या सौंदर्यावर खूश होतात. माझं वैभव पाहून सैरन्ध्री माझ्यावर प्रेम करू लागेल, असा दिवस दूर नाहीय. माझ्या संगतीत रहाण्यासाठी तडफडू लागेल ती. काहीही करून तिला माझी बनव आणि वाचव मला.'' कीचक गयावया करू लागला.

''अरे पाप्या! एक तर तू चुकीचं पाऊल उचलत आहेस, अन् त्यात मलाही अडकवू पहातोस? मला साधन बनवू पहातोस? तुझं पाप तुझ्यापुरतं सीमित न रहाता, ते साऱ्या कुळाचा नाश करील. आता तू घरी जा. सुरा आणि उत्तम अन्न तयार ठेव. ते आणायला मी सैरंध्रीला तुझ्याकडे पाठवीन. मग तिला कसं वश करायचं, ते तुझं तू पहा.'' सुदेष्णा म्हणाली.

कीचक ताबडतोब आपल्या भवनाकडे गेला आणि रुचकर पक्वान्ने व पेय त्याने तयार ठेवले.

त्यानन्तर सुदेष्णा द्रौपदीला म्हणाली, ''सैरन्ध्री, मला फार तहान लागलीय. कीचकाकडे जाऊन पिण्यासाठी सुरा घेऊन ये.''

''देवी, मी नाही त्याच्या घरी जाऊ शकणार! मोहाच्या आवेशाने तो आंधळा झालेला आपणाला ठाऊक आहे. मी तिथे गेले, तर तो नक्कीच माझा अपमान करील. आपणाकडे आणखी कितीतरी दासी आहेत. त्यांच्यापैकी कोणाला पाठवा ना!'' द्रौपदी म्हणाली.

''सुरा आणण्यासाठी प्रत्यक्ष मीच तुला पाठवलं असताना तुला स्पर्श करायचं धाडस करील तो?'' असे म्हणत सुदेष्णाने एक सुवर्णपात्र तिच्या हाती दिले.

राणीची आज्ञा पालन करण्यावाचून अन्य मार्ग नाही, असे पाहून द्रौपदी पात्र घेऊन कीचकाच्या घरी गेली. तिला पहाताच कीचकाला आनन्दाच्या उकळ्या फुटल्या. तो म्हणाला, ''सुंदरी, तुझं स्वागत आहे. तू प्राण आहेस माझा. तू माझ्याकडे आलीस, हे माझं अहोभाग्य! माझी इच्छा पूर्ण कर. उत्तम वस्त्रं नेस, हिरे-जवाहीर लेवून घे. माझ्याबरोबर मदिरा पी. आनन्द लूट अन् सुखी रहा.''

''राणीनं मला सुरा आणायला पाठवलं आहे. त्यांना फार तहान लागली आहे. ताबडतोब सुरा देऊन मला रवाना करा.'' द्रौपदी बोलली.

''सुरा दुसऱ्या कुणाच्या हाती पाठवतो.'' असे म्हणत कीचकाने तिचा हात धरला. द्रौपदी घाबरली. कीचकाला धक्का देऊन तिने खाली पाडले अन् धावत जाऊन विराटाच्या दरबारात प्रवेश केला. कीचकाने तिच्या मागोमाग येऊन तिचे केस धरून लाथ मारली. विराटराजा हे सर्व मुखस्तंभासारखा पहात होता.

प्रत्यक्ष धर्मराज व भीमासमोर हा अन्याय व अपराध घडला. भीम त्याच क्षणी कीचकाला मारून टाकू इच्छित होता. क्रोधाने तो दातओठ खाऊ लागला, त्याचे सर्व शरीर



घामाघूम झाले. डोळे खादिरांगारासारखे लाल झाले; स्वतःवर ताबा राहीनासा झाला. समोरच दिसणारे एक झाड उपटण्याच्या दृष्टीने तो पुढे सरसावला.

भीमाच्या पायाच्या अंगठ्याला स्वतःच्या अंगठ्याने दाबत धर्मराज म्हणाला, ''अरे काय करतोयस तू? सरपणासाठी हे झाड पाडायला पहातोस? पुढे दूरवर आणखी झाडं आहेत की! पाहिजे तर ती पाड ना!''

द्रौपदीने आता आपल्या पतींची असहायता ताडली आणि डोळ्यांवाटे आग ओकत ती विराटजाकडे पहात म्हणाली, ''हा नीच माझा अपमान करतो आहे आणि महाबली असणारे माझे गंधर्व पती वचन व काळाने बद्ध असल्यामुळे माझं रक्षण करायच्या परिस्थितीत नाहीत. अशा